कविकुलगुरू कालिदास संस्कृत विश्वविद्यालय, रामटेक

हस्तलिखित संग्रह

दाखल क्र. M-3087 विषय ............

नाव पांडव प्रताप अध्याय १ ते ६४

लेखक/लिपीकार ............

पृष्ठ 448 काळ शके-1782 पूर्ण/अपूर्ण

श्रीगणेशायनमः॥श्रीसरस्वत्यैनमः॥श्रीगुरुभ्योनमः॥ ॥ओंनमोश्रीदिगंबरा॥ब्रह्मानंदानिर्वि
कारा॥पुराणपुरुषापरात्परा॥जगदोद्धाराजगत्पती॥१॥श्रीमद्भीमातटविहारा॥कमळोद्भवजनकाअनि
उदारा॥अनादिसिद्धापद्मसारा॥रुक्मिणीवरापांडुरंगा॥२॥तूंचिजालासिसिद्धिविनायक॥मंगळारंभीं
मंगळकारक॥करणारतूंवरदायक॥सर्वविद्याप्रदतूंचि॥३॥अरुणोदयसंध्याराग॥आरक्तरत्नांचेमेळवि
लेरंग॥कींग्रीष्मऋतूंतबालार्कसुरंग॥तैसेंअंगसतेजपैं॥४॥सिंदुरचर्चितमंदरगिरी॥रम्यदोंदिलत्रिभु
वनउदरीं॥हेरंबतवध्यानअंतरीं॥ऋषिसुरनरींसेविजे॥५॥निजमस्तकींचादिव्यसुगंध॥तेथेंविद्वज्जन
जालेमिलिंद॥लीलाविग्रहीसच्चिदानंद॥आनंदकंदमंगळमूर्ती॥६॥उगवलेदोन्हीवासरमणी॥तैसींमकरा
कारकुंडलेंश्रवणीं॥नक्षत्रपुंजवोविलेगुणीं॥मुक्तामाळातेविदिसती॥७॥नक्षत्रींवेष्टिलारोहिणीकांत॥तैसें
पदकहृदयींविराजित॥सौदामिनीवेषेंझळकत॥शुभ्रवासगणतीचें॥८॥सिद्धिबुद्धीजवळीतिष्ठत॥कीं
कनकाचळमूर्तिमंत॥सुरासुरऋषिसमस्त॥चरणांबुजसेविती॥९॥दंतदिनकरझळकत॥देखतांअज्ञान
तमपळत॥तोविनायकवरदहस्त॥उचलोनदेतनाभीकरातें॥१०॥म्हणेमीआहेंपाठीशीं॥पांडवप्रतापग्रंथ
राशी॥वदसाहित्यदृष्टांतेंसीं॥नवरसींसुरसजो॥११॥वंदूंकमळोद्भवकुमारी॥जेवर्षेशब्दसंभारीं॥जेज्ञान
गंगास्नानंदलहरी॥ब्रह्मानंदसागरींची॥१२॥जेसदांविलसेकविजिव्हाग्रीं॥जेत्रिभुवनलावण्यसुंदरी॥साहित्य
कल्हारभ्रमरी॥जेसुरासुरींवंदिजे॥१३॥जेसहस्रवदना॥कींनवरसींभरलीयमुना॥गुप्तराहोनिहालवीरस
ना॥शब्दवर्षेसरस्वती॥१४॥सकळविद्यांचेंमूळपीठ॥जेचातुर्यसौभाग्यवरिष्ठ॥प्रमेयरत्नखाणीसुभट॥स्वा
मिणकविकुशलांची॥१५॥विधिविष्णुउमापती॥हेतुझेउपासकसरस्वती॥व्यासवाल्मीकादिऋषिपंक्ती॥तु
जस्तविती सर्वदा॥१६॥निगमकामधेनूचेकांसेस॥अर्थदुग्धभरलेंसुरस॥तेंहेंभारतभरितनवरस॥पंचमवे

दबोलती॥१७॥त्यांतूनकाढूननवनीता॥कविबाळकांदेतमाता॥तेभारतीवंदिलीतत्वता॥ग्रंथारंभींप्रीतीनें॥१८
तेवाग्वादिनीब्रह्मपुत्री॥जेरसनानाचवीनिजसूत्रीं॥जेशब्दब्रह्माचीधात्री॥ठाणेंजिह्वाग्रींघालित॥१९॥मीस
र्वांचेजिव्हाग्रींवसें॥शुभाशुभफळेंबोलवीतसें॥सद्भासशब्दविलासें॥मीचवर्षेंसरस्वती॥२०॥श्रीधरह्मणेत्रि
भुवनजननी॥ब्रह्मानंदपददायिनी॥भारतरचनायेथुनी॥सुरसवदवींमाउलिये॥२१॥देशीकराजब्रह्मानंद
लीलाविग्रहीस्वानंदकंद॥त्याचेंचरणारविंदसुगंध॥तेथेंमिलिंदहोईनमी॥२२॥उत्तरविज्ञानगोदावरी॥अ
नुभवकृष्णादक्षिणपारीं॥मध्येंभीमरथीसुंदरी॥ब्रह्मानंदेंवहातसे॥२३॥भागीरथीकींभीमरथी॥ज्यात्रि
भुवनींविख्यातमिरवती॥यालागींपुंडलीकवरदप्रीती॥अक्षयवस्तीकरीतेथें॥२४॥जेकांदक्षिणद्वारावती
पंढरीचीत्रिभुवनींकीर्ती॥जेथेंविराजेपांडुरंगमूर्ती॥भीमरथीतीरींसदा॥२५॥त्यापांडुरंगक्षेत्रींनिश्चित॥
ब्रह्मानंदयतीसमाधिस्थ॥जोवेदांतज्ञानीअद्भुत॥माहिमात्याचानवर्णवे॥२६॥वंदूंकुलदैवतनिश्चयेंसी॥
जोमहाराजप्रेमपुरविलासी॥मणिमल्लमर्दनकैलासवासी॥स्वानंदराशीजगदात्मा॥२७॥वैराग्यतुरंगींबैस
ला॥बोधखंडाहातींधरिला॥अर्धांगींविलसेज्ञानकळा॥ह्माळसादेवीचिच्छक्ती॥२८॥तडिदंबरपरमतेजा
ळ॥कींउगवलेंमार्तंडमंडळ॥मणिमल्लपरमकुटिळखळ॥दळासहितमर्दिले॥२९॥शातकुंभप्रभेसमान॥उ
धळेभावहरिद्राचूर्ण॥ग्रंथारंभींमणिमल्लमर्दन॥प्रेमभावेंवंदित॥३०॥जेकरवीरपुरविलासिनी॥आदिमा
यात्रिजगज्जननी॥तिचाअनुग्रहबोधतरणी॥हृदयाकाशींउगवला॥३१॥जेलावण्यामृताचीसरिता॥म-
नोरथपुरवीकल्पलता॥शक्रनंदनविधीसविता॥जीचेंकरितीआराधन॥३२॥भेदकल्हारसुरसंहारके॥निज
ज्ञानामृतदायके॥श्रीधरताऱ्हेंकौतुकें॥वोसंगाघेईआपुल्या॥३३॥पाजूनियांप्रेमपाऱ्हा॥बोलवीपांडवप्रता
परचना॥तेआदिमायाविष्णुललना॥ब्रह्मानंदेंवंदिली॥३४॥वंदूंतोदक्षिणकेदार॥रत्नाचळसाप्रतापशूर॥क

रीनदैत्यांचासंहार॥दक्षिणदिशेपातला॥३५॥जोभक्तांससौम्यशीतळ॥दैत्यांसभासेप्रळयकाळ॥ऋषिसुर
नरसकळ॥पदकमळवंदितीसदां॥३६॥अन्नसत्रकथाभारती॥नवरसअन्नेंस्वाददेती॥श्रवणभोजनासंतपं
क्ती॥परमप्रीतीबैसले॥३७॥मूळभारतकर्ताव्यास॥लेखकजालाजेथेंगणेश॥तेथेंम्याग्रंथकेलाह्मासोस॥
व्यर्थकासयायेइजे॥३८॥व्यासवाल्मीककविश्रेष्ठ॥कविगुरुगौतमवसिष्ठ॥पूर्वींचेकवीसंतवरिष्ठ॥महिमा
अद्भुततयांचा॥३९॥कलियुगींजालेजेसंत॥वर्तमानींचेआतांसमस्त॥पुढेंहोणारजेनिश्चित॥दीर्घदंडवत
समस्तांतें॥४०॥श्रोतेबोलतीकुशळ॥सांडोनिआतांसर्वपाल्हाळ॥बोलेभारतरसाळ॥आदिपर्वापासोनी॥
४१॥आदीचभारतकथाथोर॥तीतूंबोलसीसविस्तर॥तरीग्रंथहोईलजैसासमुद्र॥श्रोतेचतुरविदती॥४२॥बोल
सीध्वनीगुह्यार्थ॥तरीअबलांसनकळेअर्थ॥तरीथोडक्यांतरसअद्भुत॥कथासमस्तआवरीं॥४३॥ब्रह्मानंद
पुत्रश्रीधर॥सकळकविसंतांचाकिंकर॥साष्टांगघालूननमस्कार॥ह्मणेसादरपरिसाआतां॥४४॥उग्रश्रवा-
लोमहर्षणी॥शौनकादिकअपारमुनी॥सूतासपुसतीनैमिषारण्यीं॥भारतनिरोपीआह्मांतें॥४५॥जोवैकुं
ठनारायण॥तोचअवतरलाकृष्णद्वैपायन॥तेणेशब्दब्रह्ममथुन॥भारतसारनिवडिलें॥४६॥साठलक्षभा-
रत॥देवलोकींअर्धदिल्हेंयथार्थ॥पांचलक्षगोडबहुत॥पितृलोकींठेविलें॥४७॥पावणेचवदालक्षसुरस॥गं
धर्वलोकींठेवीवेदव्यास॥सवालक्षमनुष्यांस॥मृत्युलोकींठेविले॥४८॥मनुष्यांसअन्नगतप्राण॥अल्पायुषी
बहुतविघ्न॥कृपाळूसत्यवतीनंदन॥तेणेंसुरसकाढिलें॥४९॥जेजन्मेजयकरीप्रश्न॥व्यासशिष्यवैशंपाय
न॥तेणेंसांगतांसंपूर्ण॥मगप्रगटलेजगतीवरी॥५०॥हरिवंशासमवेत॥अवघेंसवालक्षभारत॥बृहदश्वाक
थाअद्भुत॥स्वर्गींसांगेनिर्जरां॥५१॥असितऋषीविख्यात॥तोपितृलोकींकथावर्णित॥यक्षराक्षसविद्याध
रसमस्त॥शुकमुखेंश्रवणकरिती॥५२॥मनुष्यलोकींसर्वज्ञ॥जन्मेजयासांगेवैशंपायन॥त्यामाजीआख्या

नेंपावन ॥ गीतासनत्कुजातादि ॥ ५३ ॥ स्वयेंबोलिलासत्यवतीसुत ॥ भारतींशब्दकूटगणित ॥ आठसहस्रआ
ठशत ॥ संख्यानेंमरतम्यांकेली ॥ ५४ ॥ त्यांतमीमानितोंयथार्थ ॥ शुकजाणेतेथिंचाअर्थ ॥ संजयचतुरबहुत ॥
जाणतोकिंवानेणतोपैं ॥ ५५ ॥ अर्थमनासआणित ॥ हेरंबचपळलेंलिहित ॥ ह्मणूनकूटेंअद्भुत ॥ व्यासघालितठा
ईठाईं ॥ ५६ ॥ असोकथाऐकाविचित्र ॥ कुरुक्षेत्रींदीर्घसत्र ॥ जन्मेजयआचरतांपवित्र ॥ सिद्धीनपवेसर्वथा ॥ ५७
श्रुतसेनउग्रसेनभीमसेन ॥ हेजन्मेजयाचेबंधूतिघेजण ॥ सकळपारिपत्यात्याआधीन ॥ रायेंकेलेंसत्रींचें ॥ ५८
तिहींदेवशुनीसुत ॥ सारमेयदुरीहोतांक्रीडत ॥ अन्यायनसतांकिंचित ॥ दंडप्रहारेंताडिला ॥ ५९ ॥ तोरुदनकरी
तमातेससांगे ॥ येरीराजसभेपातलीवेगें ॥ ह्मणेअनीतीवेश्येसंगें ॥ दवडिलीनितिधर्मपत्नी ॥ ६० ॥ रावविचा
रीबंधूस ॥ तोअन्यायलगटलाआंगास ॥ बोलावयावागदेवीस ॥ शब्दसहसाफुटेना ॥ ६१ ॥ शुनीबोलेशापवच
न ॥ सिद्धीसनपवेतुझायज्ञ ॥ राजाहोऊनउद्विग्न ॥ मृगयेप्रतीचालिला ॥ ६२ ॥ श्रुतश्रव्याचासुत ॥ सोमश्रवा
ज्ञानीअद्भुत ॥ त्याचेहातेंनृपनाथ ॥ आरंभीतसत्रातें ॥ ६३ ॥ धौम्यऋषीपरमपावन ॥ त्याचेशिष्यतिघेजण ॥
वेदअरुणीउपमन्य ॥ आज्ञापितीगुरूत्यांतें ॥ ६४ ॥ पांचाळखंडाजाउनी ॥ केदारआणबांधुनी ॥ ऐसेंऐकोनअ
रुणी ॥ पाणीनेतवाफयातें ॥ ६५ ॥ वाटेसफुटतांकेदार ॥ नमिळेमृत्तिकापाषाणअणुमात्र ॥ आडवेंघालूनआपु
लेंशरीर ॥ बहुतदिवसनिजला ॥ ६६ ॥ कायजालेंशिष्यवत्सासी ॥ ह्मणोनिधौम्यपाहूंआलात्यासी ॥ सद्गदहोऊ
नमानसी ॥ हृदयींधरिलासप्रेमें ॥ ६७ ॥ ह्मणेतूंधन्यगुरुदास ॥ ऐश्वर्यसर्वपावेंनिर्दोष ॥ प्रज्ञाआणिज्ञानविशेष
होवादतेंतुझेठाईं ॥ ६८ ॥ आतांदुसराशिष्यउपमन्य ॥ तोकरितजालागोरक्षण ॥ धर्मारण्याजाउन ॥ गोशुश्रूषा
बहुकरी ॥ ६९ ॥ जालेदिवसबहुत ॥ धौम्यउपमन्यापुसत ॥ बाळाशरीररक्षणार्थ ॥ कायउपायकरितोसी ॥ ७०
येरुह्मणेभिक्षान्नेंअसेजिवंत ॥ तेंगुरुह्मणेनिषिद्धयथार्थ ॥ सद्गुरूसअर्धद्यावेंसत्य ॥ अन्नतरीचपावनतें ॥ ७१

येरू ह्मणे आज्ञाप्रमाण ॥ मग अर्ध भिक्षा देत आणुन ॥ पक्ष मास लोटतां पूर्ण ॥ गुरू पुढती आज्ञापिती ॥ ७२ ॥ ह्मणे
वत्सा अवंचकपणें ॥ भिक्षा अवघी आह्मा सदेणें ॥ उपमन्य अवश्य ह्मणे ॥ आज्ञेप्रमाणें वर्ततो ॥ ७३ ॥ दुसऱ्यानें भिक्षा
करित ॥ गुरूनें तेंहि वर्जिलें समस्त ॥ जनास पीडिशी बहुत ॥ द्विवार भिक्षा न मागेंतूं ॥ ७४ ॥ अवश्य ह्मणे तो सकुमार
वनीं धेनू चारी निराहार ॥ बहु पीडितां क्षुधावैश्वानर ॥ सेवी गोक्षीर द्रोणभरी ॥ ७५ ॥ गुरु ह्मणे उच्छिष्ट केलें ॥ यज्ञासि
नाहीं कदां घेतलें ॥ मग तेंही शिष्यें वर्जिलें ॥ क्लेश तिरस्कार न मानितां ॥ ७६ ॥ मग वत्सें दुग्ध पितां विशेष ॥ मुखांतून
गळूं लागला फेस ॥ तो पान करितां कायेस ॥ दोषी चढे पुढती ॥ ७७ ॥ गुरू तयासी पुसत ॥ येरू वर्तलें तें सांगत ॥ आ
चार्य ह्मणे पानक बहुत ॥ पान न करीं सहसा ही ॥ ७८ ॥ अवश्य ह्मणे उपमन्य ॥ मग अर्कीचा चीक काढुन ॥ पानक
रितां द्रोण भरून ॥ गेले नयन विषें तया ॥ ७९ ॥ धेनू आणिता गृहा लागुन ॥ कूपांत पडला उपमन्य ॥ गुरू ह्मणे परम स
हिष्णा ॥ बाळ काय जाहलां ॥ ८० ॥ गुरू परम सद्रुद होउनी ॥ बहात हिंडे घोर काननीं ॥ वत्सा उपमन्या येउनी ॥ मज
भेटें रे स्नेहाळा ॥ ८१ ॥ तंव तो कूपांतून तांतडी ॥ सद्गुरु नामें हांक फोडी ॥ स्वामी मज एथूनि काढी ॥ अति अवघ-
डी पडियेलों ॥ ८२ ॥ तेथें गुरु आला ते अवसरीं ॥ ह्मणे वत्सा तूं भय न धरीं ॥ अश्विनीदेवांचें स्तवन करीं ॥ कूपातु
ज वरी करतील ॥ ८३ ॥ स्तवना सरसे दोघे येती ॥ अपूप आणून दिधला हातीं ॥ येरू ह्मणे मी न भक्षीं कल्पांतीं ॥ स
द्गुरूप्रती न देतां ॥ ८४ ॥ देखोनि निकट गुरुदास ॥ अश्विनीदेव पावले हर्ष ॥ दिव्य दृष्टी देऊनि त्यास ॥ कूपाबाहेर
काढिला ॥ ८५ ॥ प्रसन्न होऊन ते क्षणीं ॥ वर देती आनंदोनी ॥ वेदशास्त्रसंपन्न होउनी ॥ अनुभवज्ञानी निपुण
हो ॥ ८६ ॥ ऋद्धिसिद्धी तुझे घरीं ॥ वोळंगिती अहोरात्रीं ॥ तुझे दर्शनें या धरित्री ॥ उद्धरतील जीव बहु ॥ ८७ ॥ शेव
टीं स्वच्छंदें होईल मरण ॥ पावसी हरिपद निर्वाण ॥ ऐसें बोलोनि दोघे जण ॥ अंतर्धान पावले ॥ ८८ ॥ यावरी तो उप
मन्य ॥ जाऊनि धरी सद्गुरुचरण ॥ तेणेंही तैसेंच वर देउन ॥ आश्रमा आपुल्या धाडिला ॥ ८९ ॥ यावरी तृतीय शि-

थवेदसत्य ॥ तेणें गुरुसेवा केली बहुत ॥ जाणोन गुरूचे मनोरथ ॥ पुरवी अर्थ सर्वही ॥ ९० ॥ गुरूस प्रियतें चि आचरत ॥ नसांगतां मनींचें जाणत ॥ केलें लोकीं न मिरवत ॥ झिजवी शरीर सेवेशी ॥ ९१ आलिया ही मरण ॥ न सांडी मर्यादा जाण ॥ अर्पियेलें तनमनधन ॥ वर्कड तेथें का यसें ॥ ९२ ॥ अग्रापासोनि मूळपर्यंत ॥ इक्षुदंड गोड बहुत ॥ तैसा भजनीं उल्हासत ॥ दिवसेंदिवस आगळा ॥ ९३ ॥ गुरू हून ईश्वर भिन्न ॥ ऐसें कल्पेना गेलिया प्राण ॥ गुरुसेवा परमानुष्ठान ॥ मंत्र पूर्ण गुरुनाम ॥ ९४ ॥ सेवा देखोनि धौम्यऋषी ॥ परम संतोषला मानसी ॥ आलिंगोनि यातयासी ॥ मस्तकीं हस्त ठेविला ॥ ९५ ॥ सर्वज्ञ आणि अगर्वता ॥ रूपवती आणि पतिव्रता ॥ सभाग्य आणि उदारता ॥ हें तों दुर्लभ त्रिभुवनीं ॥ ९६ सभाग्य पुत्र आणि पितृभक्त ॥ शास्त्रज्ञ आणि वैराग्ययुक्त ॥ ब्रह्मज्ञानी आणि निरपेक्ष चित्त ॥ हें तों दुर्लभ त्रिभुवनीं ॥ ९७ ॥ गुरु पंडित आणि उदास ॥ शिष्य प्रज्ञावंत भावविशेष ॥ हिरा आणि तो चि परिस ॥ हें तों दुर्लभ त्रिभुवनीं ॥ ९८ ॥ असो संतोषोनि गुरुनाथ ॥ वेद शिष्यास आज्ञा देत ॥ ह्मणे वत्सा आश्रमा लरित ॥ जाऊनि नांदें यथाविधी ॥ ९९ ॥ संतती संपत्ती दिव्यज्ञान ॥ हे प्राप्त होतु ज लागोन ॥ यावरी तो आज्ञा घेउन ॥ निजाश्रमी राहिला ॥ १०० ॥ तेणें करून तीन शिष्य ॥ पाळी पुत्राहून विशेष ॥ गुरुगृहीं आपण भोगिले बहुत क्लेश ॥ ह्मणून सेवा न सांगे त्यां ॥ १ ॥ तेणें उत्तंकनामा शिष्य जाण ॥ गृहीं ठेऊनि यां रक्षण ॥ जन्मेजयाच्ये सत्रीं जाउन ॥ ऋत्विज जाहला वेदनो ॥ २ ॥ मागें भार्या तरुणा रूपवती ॥ कामानळें आहाळली चित्तीं ॥ प्रार्थिती जाहली उत्तंका प्रती ॥ मज प्रीतीनें भोगीं तूं ॥ ३ ॥ मी गुरुतुल्य गुरुगृहिणी ॥ वचन एवढें माझें मानीं येरें ऐकतां च निज कर्णीं ॥ बोटें घालून बुजवित ॥ ४ ॥ हरिस्मरण करून देख ॥ ह्मणे तूं माता मी बाळक ॥ मनीं भावोनि परम दुःख ॥ परतोनि गेला उठोनियां ॥ ५ ॥ भुजंगावरी न घालवे हात ॥ उडी न घालावे अग्नींत ॥ तैसा परम सती भावित ॥ तरि तो नारायण नरनव्हे ॥ ६ ॥ रूपवती सभाग्य उदार तरुण ॥ एकांतीं प्रार्थी स्वयें येउन ॥ ज्याचें

विकारनपवेमन ॥ तरितोनारायणनरनव्हे ॥ ७ ॥ एकांतवनीएकलाफिरत ॥ महाराजतोलोहदेखत ॥ पायेंढकलू नपुढेंजात ॥ तरितोनारायणनरनव्हे ॥ ८ ॥ निंदकनिंदितीरात्रदिन ॥ संतापेंनपाळेज्याचेंमन ॥ हरिरूपदेखेसर्व जन ॥ तरितोनारायणनरनव्हे ॥ ९ ॥ मनोजयवासनाक्षय ॥ सर्वज्ञदयाळसदासदय ॥ रावरंकसमानपाहे ॥ तरि तोनारायणनरनव्हे ॥ १० ॥ वेदआश्रमाआलापरतोन ॥ ज्ञानदृष्टाकळलेंवर्तमान ॥ ह्मणेहाईश्वरकेवळपूर्ण ॥ इंद्रि यजितनिश्चयें ॥ ११ ॥ गुरुकृपाआणिशास्त्रींदृष्टी ॥ ब्रह्मवेत्तासत्कर्मराहटी ॥ त्रिसकळतीर्थेंभेटी ॥ येती- त्यान्वियाजाणिजे ॥ १२ ॥ वेदेंउत्तंकधरिलाहृदयीं ॥ ह्मणेसर्वसुखपावसीगृही ॥ आतांस्वस्थळाप्रतीजायीं ॥ तं वतोकायबोलत ॥ १३ ॥ ह्मणेकांहींगुरुदक्षिणा ॥ मजमागावीसर्वज्ञा ॥ स्त्रियेसपुसेतोऋषिराणा ॥ मागा कांहींइच्छित ॥ १४ ॥ ह्मणेपौष्यभूपाळाचीगृहिणी ॥ दिव्यकुंडलेंतियेचेकर्णीं ॥ तींआणूनदेचौथेदिनीं ॥ मांग ल्यकर्मीत्यावया ॥ १५ ॥ तींकुंडलेंरविसमद्युती ॥ इच्छिलेवेळेअमृतस्रविती ॥ येरूचालिलात्वरितगती ॥ तोंमार्गींवृषभदेखिला ॥ १६ ॥ त्यावरीएकपुरुषदेखिला ॥ तेणेंगोमयदिधलेंतेवेळां ॥ ह्मणेहेंसेवींबाळा ॥ येरें तत्काळभक्षिलें ॥ १७ ॥ मूत्रलाविलेंवदनीं ॥ तयासिवंदनकरूनी ॥ गुरुउपासकाकृत्रिमकरणी ॥ कोणाचीही चालेना ॥ १८ ॥ पुढेंचालिलावेगेंकरून ॥ लंघिलेंपरमघोरविपिन ॥ पावोनियांनृपराजसदन ॥ कोठेंकांहींदिसेना ॥ १९ ॥ बाहेरआलापरतोन ॥ निकेतनीनदिसेगृहिणीपूर्ण ॥ ह्मणेउच्छिष्टअसेलवदन ॥ मुखप्रक्षालनकरीवेगें ॥ २० ॥ मगशुद्धहोऊनपुढती ॥ प्रवेशलानिकेतनाप्रती ॥ तोंदेखिलीजैसीपार्वती ॥ सर्वलक्षणींमंडित ॥ २१ ॥ केलें बहुतस्तवन ॥ सांगितलेंसकळवर्तमान ॥ ह्मणेगुरुगृहिणीनेंपूर्ण ॥ तुझींकुंडलेंमागितलीं ॥ २२ ॥ भूपाळआज्ञे वरून ॥ द्विजतोषविलाकुंडलेंदेउन ॥ ह्मणेकुंडलेंअमूल्यपूर्ण ॥ तक्षकेंहींमागीतलीं ॥ २३ ॥ परीमीदिधलींनाहीं त ॥ तींतुजलागींजालींप्राप्त ॥ तरीमार्गींसांभाळींबहुत ॥ तक्षकनेईलएकदां ॥ २४ ॥ भूपराज ह्मणेतूंधन्य ॥ आज

पितृयज्ञसंपादुन॥ उत्तंकआज्ञेवरून॥ राहिलाहोतातेदिवसीं ॥२५॥ तोंमुक्तकेशहोउन॥ वाढिलेंहोंदिव्यान्न
परीक्षणभरीलागलापूर्ण॥ पर्युषितपणसहजआलें॥२६॥ आंतकेशपडिलागळून॥ ऋषिह्मणेनजेवीमीपूर्ण
रागेंकोपोनशापिलाब्राह्मण॥ तवसंततीनवाढे॥ २७॥राजाविचारूनपाहत॥ तोंकेशदेखिलाअन्नांत ॥अधोव
दनेंविलोकित॥ प्रत्युत्तरनेदीकाहीं ॥२८॥ मगतोषविलाब्राह्मण॥ तत्काळकेलेंशापमोचन ॥ येरूह्मणेगुरुभ
क्तासिपूर्ण॥शापबंधनबाधीना ॥२९॥ मगअभयमागूनघेतलेंनिःशंक ॥पुढतीकरूनशब्दपाक ॥पिंडपितृयज्ञ
करूनदेख॥ मागुतीउत्तंकबोळविला॥ ३०॥तोगुरुभक्तनिर्दोष॥ परनारीमानीजैसेंविष॥दुसऱ्याचेगुणदोष॥
दृष्टीनपडतीजयाच्या॥३१॥आज्ञाघेऊनिउत्तंकऋषी॥जाताजालापवनवेगेंसी॥ चिंतावाटेमानसी॥मागेंपु
ढेंपाहत॥३२॥ तोंतक्षकपाठींशींधांवत॥उत्तंकजालातृषाक्रांत॥ वापीचेतीरींठेवित॥ दिव्यकुंडलेंतेधवां॥ ३३
उत्तंकप्राशितांउदकें॥कुंडलेंनेलींतक्षकें॥ येरूपाठींधांवतवेगें॥तंवतोभूमींतप्रवेशला॥ ३४॥ काष्ठदंडेंतोखण
त॥ वरूनविलोकीविबुधनाथ॥होऊनियाकृपावंत॥ वज्रप्रेरीतत्काळपें॥३५॥ धराफोडूनसवेग॥ करूनदारववि
लाप्रोकळामार्ग॥उत्तंकप्रवेशलामनींराग॥ नसावरेतयातें॥३६॥नागभुवनदेखेअद्भुत॥ पद्मिणीनारी-
विराजित॥ ब्राह्मणतक्षकाधुंडत॥ निर्भयनिःशंकएकला॥ ३७॥ तोंदेखिलाधाताविधाता॥ श्वेतकृष्णादो
राकांतितां॥द्वादशधाराचक्रपाहतां॥ द्वादशपुत्रषट्कुमार॥ ३८॥ तोंएकदेखिलामहापुरुष॥ तोह्मणेस्तवींइं
द्रास॥ तेणेंस्तवितांअमरेश॥तोंश्वेताश्वदेखिला॥३९॥ पुरुषह्मणेउत्तंका॥यातुरंगाचेंअपानफुंकीकां
॥येरेंतेसेंचकेलेंदेखा॥तोंअपूर्ववर्तलें॥ ४०॥ अश्वाचेमुखींकर्णींनयनीं॥ज्वाळाप्रगटतीतेक्षणीं॥ धूरभरला
पाताळभुवनी॥तडफडतीपादोदर॥४१॥तक्षकभयाभीततेक्षणी॥कुंडलेंउत्तंकादेउनी॥ मजअकस्मात
सांपडलीवनी॥तुझीह्मणूननेणेमीं॥४२॥पुरुषह्मणेउत्तंकालागुनी॥पळेवेगेंअश्ववरीबैसोनी॥येरेंपुरु

षतोवंदुनीं ॥ वोळंघेतुरंगीत्वरेनें ॥ ४३ ॥ चतुर्थदिवसींतोद्विजन्मा ॥ पावलावेगेंवेदाश्रमा ॥ कुंडलेंदेऊनिरामा ॥ स
द्गुरूचीतोषविली ॥ ४४ ॥ वेदेंहृदयींधरिलाउत्तंक ॥ ह्मणेमार्गीकायदेखिलेंकौतुक ॥ येरूह्मणेमार्गीवृषरक्षक ॥ नाना
परीसांभाळिलें ॥ ४५ ॥ परिभेटलेनेकोण ॥ सांगावेतेंकृपाकरून ॥ गुरूह्मणेवृषभारूढपुरुषजाण ॥ ऐरावतारूढइं
द्रतो ॥ ४६ गोमयभक्षिलेंविशेष ॥ तोंचिजाणसुधारस ॥ तरीसर्पभवनाहूनिनिर्दोष ॥ विषरहितआलासी ॥
४७ ॥ क्षपणीकतोकलीसत्य ॥ तुजव्यसनीपडूंपाहत ॥ परिपुण्यशीळतूंगुरुभक्त ॥ तुजस्पर्शनकरवे ॥ ४८ ॥ धा
ताविधातादेखिलेनेत्रक्षणी ॥ कृष्णाश्वेतदोरेदोनी ॥ तेदिवसरात्र्यंशगणी ॥ देखिलेनयनीतुवांकीं ॥ ४९ ॥ द्वादशा
धारदेखिलेंचक्र ॥ तें द्वादशमेयचदलेअपार ॥ देखिलेजेषट्कुमार ॥ षडऋतूतेचपैं ॥ ५० ॥ पाताळींपुरुषतोमेघ
जाण ॥ अश्वतोबोळखेंहिसूर्धान ॥ तेणेतुझीसाह्यताकरून ॥ येथवरीआणिलें ॥ ५१ ॥ मगउत्तंकधरूनहृद
यीं ॥ ह्मणेस्वाश्रमाप्रतीजायीं ॥ तूंसर्वदाहोविजयी ॥ बहुतसुखभोगींकां ॥ ५२ ॥ आश्रमाआलाउत्तंक ॥ परि
तक्षकेंभोगिलेंदुःख ॥ तेंआठऊनदेख ॥ तळमळतविप्रतो ॥ ५३ ॥ मगजाऊनकुरुक्षेत्रा ॥ भेटलाजन्मेजयनरें
द्रा ॥ ह्मणेसर्पसत्रकरूनपवित्रा ॥ पितृसूडघेईंका ॥ ५४ ॥ अरेपरीक्षितीचाप्राण ॥ घेनलातक्षकेंनलगतांक्षण
ऐसेंजन्मेजयाक्षोभउन ॥ सर्पसत्रमांडिलें ॥ ५५ ॥ यावरीच्यवनभार्गवाचापुत्र ॥ प्रतीतीनामेंपरमपवित्र ॥ रु
रुनामाऋषेश्वर ॥ त्याचेपोटींजन्मला ॥ ५६ ॥ त्याचीप्रियाप्रवीणपद्मिणी ॥ रूपवतीचातुर्यखाणी ॥ तेआश्र
माअसतांकामिनी ॥ सर्पदंशजाहला ॥ ५७ ॥ तिचेंआलिंगूनकुणप ॥ रुरुकरीदीर्घविलाप ॥ तिचेआठऊनगुण
स्वरूप ॥ वदनपिटीआक्रोशें ॥ ५८ ॥ ह्मणेमित्रपुत्राकृपावंता ॥ उठवींएवढीलावण्यसरिता ॥ मीजोडलेंअसेल
त्यासुकृता ॥ पालटेंइचेदेईन ॥ ५९ ॥ साधुसंतदेवब्राह्मण ॥ मातापितागुरुजाण ॥ याचेंकेलेंअसेलभजन ॥ त
रीप्राणपरतोइचा ॥ ६० ॥ अयाचितदुर्बळब्राह्मण ॥ पीडिलाबहुतऋणेकरून ॥ त्याचेंकेलेंअसेलऋणमोचन ॥ त

रीप्राणपरतोइच्चा॥ ६१॥ दीनपरदेशीरोगिष्टकेवळ॥ त्याचाकेलाअसेलसांभाळ॥ मिथ्याअभिशापबोलतांरवळ
जरीउठोनगेलोंअसें॥ ६२॥ अनाथप्रेतअग्निसंस्कार॥ तरुणादरिद्रीयाचेंलग्नसाचार॥ साह्यकेलेंअसेलनिर्धार॥
तरीप्राणपरतोइयेचा॥ ६३॥ रुरुस्त्रीचेंप्रेतघेउनी॥ रुदनकरीघोरवनीं॥ तोंदेवदूतगगनीं॥ विमानींबैसोनविलो
कितीं॥ ६४॥ तिहींविमानगतीरखुंटउन॥ पाहतेजालेएकक्षण॥ करुणाशब्दऐकोन॥ हृदयत्यांचेंकळवळलें॥ ६५
परोपकारपरमपुण्य॥ सत्तासामर्थ्यवेचुन॥ मित्रआपुलामित्रनंदन॥ प्रार्थूनप्राणआणिला॥ ६६॥ सावधजा-
लीपद्मिणी॥ रुरूचाहर्षनमायेगगनी॥ देवदूतांचेसप्रेमचरणधरूनी॥ स्तवनकरीक्षणक्षणा॥ ६७॥ बहुतग्रं
थकासयाश्रवण॥ सारासारविचारसंपूर्ण॥ अर्धश्लोकींव्याससांगेसंपूर्ण॥ निगमागमगुह्यजें॥ ६८॥ परोपका
रहेंचपुण्यअसुप॥ परपीडाहेंचमहत्पाप॥ आपुलेयत्नेंपुण्यरूप॥ क्लेशहरतीपरांचे॥ ६९॥ आपणासमानविश्व
पाहत॥ पराच्यामोदेंअतिसंतोषत॥ परक्लेशेंव्याकुळचित्त॥ परोपकारीपुरुषतो॥ ७०॥ संकटींपडतांप्राणी॥
पाठीसघालीकृपाकरूनी॥ केलेंस्फ कृतनवदेवदर्नी॥ परोपकारीपुरुषतो॥ ७१॥ धिक्संपदाधिक्ज्ञान॥ धिक्
विद्याधिक्अभिमान॥ परोपकारवरित्याविणा॥ संपत्तीविधवानिंद्यती॥ ७२॥ परोपकाराविणनर॥ पशुवत्सं
सारींसाचार॥ जेलेइलेतेश्रृंगार॥ प्रेतासव्यर्थजेविकेले॥ ७३॥ तोयानारूढहिंडत॥ जैसेंदहनार्थचालविलेंप्रेत
पुढेंवाद्येंवाजवित॥ तेंवितोव्यर्थसंसारीं॥ ७४॥ गुरुह्मणेधन्यधन्य॥ देवदूतुह्मींपावन॥ तुमचेचरणावरून
देहसांडणेंहोमाझा॥ ७५॥ असोदेवदूतगेलेतेथुनी॥ आश्रमाआलाप्रियाघेउनी॥ परिसर्पाचाअपराधआठउ
नी॥ तळमळितरात्रदिवस॥ ७६॥ रुरूनेंसांडूनअनुष्ठान॥ हस्तींलोहदंडघेउन॥ सर्पमारीशोधून॥ वारुळेंबिळेंस
र्वहीं॥ ७७॥ करितांसर्पसंहार॥ देखिलाडुंडुभीनामाअजगर॥ वरीयालितांदंडप्रहार॥ तंवतोकायबोलिला ७८
मीपूर्वीहोतोंविप्र॥ खगनामामुनेश्वर॥ म्याफरूनवस्त्राचाविरवार॥ साधुसंतांभेडसाविलें॥ ७९॥ भयामी तब्रा-

ह्मण ॥ पळालेजपध्यानसोडून ॥ हांसलेसकळविषयीजन ॥ तेणेंशापूनमजसर्पकेलें ॥ ८० ॥ कोपिष्ठतपस्वीसा
धुराव बलिष्ठप्रतिष्ठितमहानुभाव ॥ यांसीविनोदकरितांअपाव ॥ कदांकाळींचुकेना ॥ ८१ ॥ तरीरुरूअवधारीं ॥ स
र्वथातूंमजनमारीं ॥ जन्मेजयाचेसत्रीं ॥ संहारसर्पाहोईल ॥ ८२ ॥ रुरूचेदर्शनेंसाचार ॥ उद्धरलातोअजगर ॥ दि
व्यदेहपाऊन सत्वर ॥ स्वर्गाप्रतीपावला ॥ ८३ ॥ मातृशापेंकरूनदेख ॥ यागींजळतीलदंदशूक ॥ सूतासह्मणे-
शौनक ॥ कथासांगेसत्वरसती ॥ ८४ ॥ दक्षाच्याकन्यातत्वता ॥ कश्यपस्त्रियाकद्रुविनता ॥ लावण्यखाणीपतिव्रता ॥
परीमत्सरदोघींमध्यें ॥ ८५ ॥ सेवेनेंतोषलाभ्रतार ॥ दैत्यकश्यपदिव्यवर ॥ कद्रूसह्मणेतुजपुत्र ॥ एकसहस्त्रहोती
ल ॥ ८६ ॥ परमबळिष्ठदोघेजण ॥ विनतेतुजहोतीलनंदन ॥ दोघींसदेवूनवरदान ॥ कश्यपगेलाअनुष्ठाना ॥ ८७
यथाकाळेंकद्रुवेल्हाळी ॥ सहस्त्रअंडींप्रसवली ॥ दिव्यतेजोमयआगळीं ॥ विनताअंडींदोनप्रसवे ॥ ८८ ॥ हो
तांपंचशतसंवत्सर ॥ सहस्त्रअंडींउल्लोनसत्वर ॥ जन्मलेघोरविखार ॥ भयंकरधुधुःकारती ॥ ८९ ॥ शेषवासु
कीतक्षकअही ॥ कर्कोटकऐरावतधनंजयपाही ॥ मणिव्याळपत्रादिसर्वही ॥ तीतेंपुत्रजन्मले ॥ ९० ॥ कद्रूदेखो
निपुत्रवंती ॥ विनतातळमळीपरमचित्तीं ॥ दिवसनभरतांहस्तीं ॥ अंडएकफोडिलें ॥ ९१ ॥ तोंचरणाकडेअर्ध
शरीर ॥ निपजलेंनाहींसाचार ॥ रुधिरमांसमयताम्र ॥ लवथवीतनधरवे ॥ ९२ ॥ तोमहाराजअरुण ॥ मातेस
बोलेशापवचन ॥ दिवसनहोतांसंपूर्ण ॥ अंडफोडिलेंत्वरेने ॥ ९३ ॥ जिचेंदृषेंफोडिलें अंडपाहीं ॥ तिचेचगृहींदा
सीहोईं ॥ सहस्त्रअयनेंकदांही ॥ तुजसुटकानोहेचि ॥ ९४ ॥ वचनऐकूननिर्धारीं ॥ दुसरेंअंडेंजतनकरी ॥ सहस्त्र
वर्षांउपवरी ॥ आपेंआपउलेल ॥ ९५ ॥ त्यांतजन्मेलसुपर्ण ॥ सोडवीलदासीपणापासुन ॥ करीलत्रैलोक्यपावन
॥ विष्णुवाहनहोईलतो ॥ ९६ ॥ ऐसाजन्मलाअरुण ॥ आरक्तवर्णदेदीप्यमान ॥ सूर्यरथींसारथीहोउन ॥ अद्या
पिअन्वळबैसला ॥ ९७ ॥ मगदुसरेंअंडेंनिगूढस्थळीं ॥ ठेवीतविनतावेल्हाळी ॥ यावरीकद्रूएकेकाळीं ॥ कापट्यध

रूनबोलत॥९८॥उच्चैश्रवानयनीं॥पाहूंचलादोघीजणी॥मगसूर्याजवळयेउनी॥विलोकित्याजाहल्या॥
९९॥ शफ्रश्वेततेजाळ॥उदधीमथूननवनीतगोळ॥शशांकबंधूतोनिर्मळ॥वेगप्रबळनयाचा॥१००॥
त्याअश्वोत्तमाचीप्रतिमा॥निर्मूनशकेकमळजन्मा॥ज्याच्यावेगाचीसीमा॥मनासहीआकळेना॥१॥शौनक
ह्मणेसूतानिर्धारीं॥उच्चैश्रवाकैसाजन्मलासमुद्रीं॥सूतह्मणेअवधारी॥चरित्रत्याचेंकिंचित॥२॥इंद्रासगुरुअ
वज्ञेचादोष॥वरीदुर्वासाचाशापविशेष॥तेणेंस्वर्गसंपत्तीनिःशेष॥समुद्रांतपडियेली॥३॥सर्वत्रिदशदशा
हीन॥पद्मोद्भवागेलेशरण॥मगब्रह्म्यासमवेतमिळोन॥वैकुंठासपातले॥४॥बहुतकरितांस्तवन॥तोषलेप
द्माक्षीरमण॥ह्मणेदैत्यांससाह्यकरून॥समुद्रमथनकरातुह्मी॥५॥अन्योक्तीन्यायप्रसंगेसी॥धाकरेंकाम
सांगात्यासीं॥त्यावरीतेगर्वराशी॥अवलंबतीलथोरकार्य॥६॥तेथेंमीतुमचीपाठी॥सर्वस्वेंरक्षीनजगजे
ठी॥ऐसीऐकतांगोष्टी॥त्रिदशेश्वरचालिला॥७॥आत्मकार्यसाधावयापूर्ण॥बलीगृहासयेसहस्रनयन
विरोचनसुतेंसन्मान॥बहुतकेलातेसमयीं॥८॥इंद्रह्मणेक्षीराब्धीमथुन॥रत्नेंकाढावींसंपूर्ण॥तुमचाआ
मचासमान॥विभागकरूंसाचहें॥९॥अवश्यह्मणेप्रल्हादपौत्र॥देवदानवझालेएकत्र॥विधिह्मणेरवीअ
वक्र॥मंदराचळपाहिजे॥१०॥सहस्रयोजनेंभूमीमाझारीं॥एकादशसहस्रवरी॥बहुप्रयत्नकेलासुरारी॥
परिकोणासीउपटेना॥११॥मगशेषाहातींसुरारी॥पर्वतकाढवीझडकरी॥तडाडिलीतेणेंधरित्री॥गजबज
लेंत्रिभुवन॥१२॥शेषेंउचलूनमंदरगिरी॥ठेविलाक्षीराब्धीच्यातीरीं॥बारडीनेव्हांनिर्धारीं॥वासुकीचीके
लीहो॥१३॥कमळावराचेंसंकेतें॥इंद्रह्मणेदानवातें॥तुह्मीधरणेंपुच्छातें॥मुखप्रतापेंधरितोंआह्मीं॥१४
दैत्यबोलतीसत्राणें॥अधमांगधरावेंबलहीनें॥शचीवरअवश्यह्मणे॥मुखतुह्मीचधराआतां॥१५॥असो
दैत्यींमुखदृढधरिलें॥देवींपुच्छआकळिलें॥विषबाधेंवेगळें॥तमालनीळेंत्यांसकेलें॥१६॥समुद्रींघालितां-

मंदरगिरी॥ बुडतचालिलानिर्धारीं॥ मगतोवैकुंठविहारी॥ कमठतळींजाहला॥ १७॥ गर्जनाकरितीसुरासुर॥
घुमूंलागलाक्षीरसागर॥ मथनमांडिलेंअनिवार॥ तडतडेशरीरवासुकीचें॥ १८॥ हेलावलेंसप्तपाताळ॥ घुम
घुमीब्रह्मांडगोळ॥ जळचरवनचरसकळ॥ गतप्राणपैंहोती॥ १९॥ देवदैत्यश्रमलेअपार॥ आंगींलोटतीघर्मपू
र॥ तैंमांडिलाप्रळयथोर॥ विषदुर्धरप्रगटलें॥ २०॥ वासुकीच्यामुखांतून॥ काळकूटउसळलेंदारुण॥ दैत्यां
चेंसमूहसंपूर्ण॥ दग्धकरीतचालिलें॥ २१॥ विषाग्निपेटलादारुण॥ आहाळूंलागलेंत्रिभुवन॥ देवदैत्यशि
वस्तवन॥ करितेजाहलेतेधवां॥ २२॥ त्वरेंधांवलाकैलासनायक॥ पसरोनियाविशाळमुख॥ विषप्राशिलें
सकळिक॥ कंठींदेखधरियेलें॥ २३॥ विषानळजालाशीतळ॥ घुसळणमांडिलेंसबळ॥ चतुर्दशरत्नेंतत्का
ळ॥ निघतींजालींतेधवां॥ २४॥ कमळाकौस्तुभशार्ङ्गशंख॥ देऊनिपूजिलावैकुंठनायक॥ वसिष्ठासकाम
धेनुदेख॥ उच्चैश्रवाभास्करानें॥ २५॥ इंद्रस्वेच्छेंविचरेगगनी॥ सुरादेतीदैत्यांलागुनी॥ ऐरावतपारिजातक
रंभारमणी॥ सहस्राक्षआवरी॥ २६॥ विषपूर्वींचनिघालें॥ तेंहीचतुर्दशांतगणिलें॥ अमृतकुंभघेऊनतेवेळे
धन्वंतरीनिघाला॥ २७॥ अमृतदेखतांदृष्टी॥ धांवल्यादैत्यांच्याथाटी॥ सकळीघालूनियांमिठी॥ सुधा
रसघटनेला॥ २८॥ ह्मणतीदेवींठकविलेंपूर्ण॥ अवघींरत्नेंनेलींहिरोन॥ आतांसुधाकुंभगेलियाप्राण॥ स
र्वथानेदूंदेवासी॥ २९॥ देवयुद्धासीउठावले॥ परीअमृतदानवकरींगेलें॥ इंद्रेंवक्षस्थळपिटिलें॥ ह्मणेनास
लेंकाजसर्व॥ ३०॥ धांवधांवरेश्रीकरधरा॥ वैकुंठवासीकरुणाकरा॥ कैटभारियासुरहरा॥ पावेसत्वरयेवेळे॥
३१॥ मगतोपरमपुरुषकैवल्यदानी॥ प्रगटलामोहिनीरूपधरूनी॥ जिच्यास्वरूपावरूनी॥ ब्रह्मांडचिवो
वाळिजे॥ ३२॥ आदिमायाप्रणवरूपिणी॥ तेहीलागेइचेचरणीं॥ अनंतशक्तींचीस्वामिणी॥ वेदपुराणीं
वंद्यजे॥ ३३॥ ब्रह्माविष्णूशिवतीन्हीं॥ गर्भींपाळीबाळेंतान्हीं॥ दंततेजमळकतांक्षणीं॥ महामणीपाषाणहोती

३४॥ कोट्यानुकोटीमीनकेतन॥सांडणेंहोतनरवावरून॥आंगींचासुवाससंपूर्ण॥ब्रह्मांडभेदूनवरजाई ३५
सहजबोलतांक्षिती॥वाटेरत्नराशीविरवरती॥पदमुद्राजेथेंउमटती॥कमळेंउगवतीदिव्यतेथें॥३६॥त्यासु
वासासवेधूनवसंत॥भोंवतागडबडांलोळत॥असोकैवल्यकनकलताअद्भुत॥वैकुंठाहूनउतरली॥३७॥नय
नकटाक्षबाण॥सोडीअसुरांकडेपाहून॥दैत्यवोवाळूंपाहतीप्राण॥वचनावरूनतियेच्या॥३८॥देवींदैत्यींसुटमां
डिलें॥पाहावयाभोंवतीमिळाले॥समस्तांचेमनोमृगपडले॥नयनकटाक्षबाणेंचि॥३९॥बळीह्मणेइजवरून
कमळांसांडावीवोवाळुन॥जरीहेंमजवरीलसंपूर्ण॥तरीरत्नलाभपावलों॥४०॥याब्रह्मांडमंडपींदेख॥ऐसें
स्वरूपनहोयआणिक॥तोंतेचित्कळाहास्यमुख॥करूनिबोलेबळीसी॥४१॥कोणकार्यकायस्वार्थ॥कलह
आरंभिलाएथ॥बळीनेंअवघावृत्तांत॥तियेप्रतीसांगितला॥४२॥ठकऊननेलींअवघींरत्नें॥आतांभांडती
अमृताकारणें॥आमुचाव्यवहारतुवांनिवडणें॥वचनाधीनतुझ्याआह्मी॥४३॥मोहिनीह्मणेतेनष्टसर्व॥म
हाठकमीजाणेंदेव॥माझेवचनीधराभाव॥तरीअमृतवाटीनमी॥४४॥बळीह्मणेन्यायकरीं॥आमुचाबहु
अभिमानधरी॥ऐसेंबोलोनमोहिनीचेकरीं॥अमृतकुंभदिधलातो॥४५॥विचित्रशाळानिर्मिल्यातेथ॥सर्वां
हातींस्नानेंकरवित॥दैत्यपंक्तीसमस्त॥उच्चस्थानींबैसविल्या॥४६॥देवरवालींबसविले॥याउपरीमोहिनीकाय
बोले॥प्रथमकोणावाढूंवहिलें॥निरोपमजलासांगावा॥४७॥तोंदैत्यह्मणतीविहित॥आदींदेवांसवाढींअमृत॥पा
ठींआह्मीसमस्त॥प्राशनकरूंसाचहें॥४८॥सिंहिकासुतराहुकुटिळ॥दैत्यामाजीधूर्तरवळ॥ह्मणेदैत्यभुल
लेसकळ॥मोहिनीरूपेंविष्णूहा॥४९॥ह्मणेबोलतांनयेयेथ॥मनांतगुसठेविलीमात॥देवांचावेषधरूनधूर्त॥
सुरपंक्तीसबैसला॥५०॥चंद्रार्कांमध्येंजाऊन॥राहूबैसलाकपटधरून॥तोंयथानुक्रमेंकरून॥अमृतवाढीमोहिनी
५१॥राहूचियाकरांत॥मोहिनीघालीअमृत॥येरूमागेंपुढेंपाहत॥ह्मणेत्वरितहेंघ्यावें॥५२॥श्रेष्ठींघेतलेंन–

सतांअकस्मात ॥ राहूप्राशित अमृत ॥ तेंचंद्रार्कैंलक्षूनत्वरित ॥ मोहिनीसरवुणाविलें ॥ दैत्यजाणोनिमोहि
नीदेख ॥ काढूनवामकर्णींचेंताटंक ॥ राहूचेंशिरएकाएक ॥ गगन पंथेंउडविलें ॥ ५४ ॥ शिरगर्जनाकरीनिराळीं
दैत्यहोठकल्यांसकळी ॥ मोहिनीरूपेंवनमाळी ॥ अमृतनेदीदैत्यांतें ॥ ५५ ॥ एकचिजाहलाहाहाःकार ॥ अमृत
कुंभसत्वर ॥ पळविताजाहलापुरंदर ॥ हातोहातनतेधवां ॥ ५६ ॥ मोहिनीजाहलीगुप्त ॥ संग्राममांडिलाअद्भुत
देवह्मणतीरंकदैत्य ॥ साह्यसमर्थश्रीवल्लभ ॥ ५७ ॥ सवेंचनरनारायणरूपधरून ॥ पुन्हाप्रगटलाभगवान ॥
दैत्य अपारसंहारुन ॥ विजयीदेवजाहले ॥ ५८ ॥ केलेंअमृतहरण ॥ दुःखत्दर्यीआठउन ॥ पुन्हादैत्यकरितीभां
डण ॥ ह्मणतीवाचूनकायआतां ॥ ५९ ॥ अकाळप्रळयदेखोनितेवेळा ॥ विधिनेंनारदपाठविला ॥ तोदेवांसह्म-
णेआगळा ॥ अभिमानसांडाव्यर्थहा ॥ ६० ॥ सर्ववस्तूनेल्याठकऊन ॥ पुन्हांत्यांसीकरितांभांडण ॥ नारदवचनें
करून ॥ देवसर्वघाबरले ॥ ६१ ॥ बगळीसह्मणेनारदमुनी ॥ तुजकाळसाह्यनाहींयेक्षणीं ॥ आतांविश्वजित
यज्ञकरुनी ॥ इंद्रपदघेईंमग ॥ ६२ ॥ यथार्थमानूनिदैत्य ॥ स्वस्थळापरतलेसमस्त ॥ ग्रहणींराहूकेतूझोंबत
चंद्रसूर्यासतैंपासूनी ॥ ६३ ॥ मगशतमखकरीब ळी ॥ वामनरूपेंवनमाळी ॥ प्रगटोनघातलापाताळीं ॥
अवघेंराज्यदिधलेंत्या ॥ ६४ ॥ सूतसांगतांहेंकथन ॥ तोषलेशौनकादिमुनिजन ॥ सुधारसपाहूनगहन ॥ गोड
कथाऐकिली ॥ ६५ ॥ ब्रह्मानंदजोडूनकर ॥ भक्तपंडितांविनवीश्रीधर ॥ पुढेंकथासुरसफार ॥ अत्यादरेंपरि-
सिजे ॥ ६६ ॥ सुरसपांडवप्रतापग्रंथ ॥ आदिपर्वव्यासभारत ॥ त्यांतीलसारांशयथार्थ ॥ प्रथमोध्यायींकथिये
ला ॥ ६७ ॥ स्वस्तिश्रीपांडवप्रतापग्रंथ ॥ आदिपर्वटीकाश्रीधरकृत ॥ मंगळाचरणउत्तंककथाभावार्थ ॥ समु
द्रमंथनसंपविलें ॥ ६८ ॥ ॥ इतिश्रीश्रीधरकृतपांडवप्रतापादिपर्वेप्रथमोऽध्यायः ॥ १ ॥ ओव्या २६८
श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ७ ॥ शुभंभवतु ॥ ॥ ७ ॥ ॥ ७ ॥ ७ ॥ ७

श्रीगणेशायनमः॥ ॥ संपलेंअगाधसिंधुमथन॥ ऐकासिंहावलोकनेंकरून ॥ कद्रूविनतायेउन ॥ वारूविलोकि
तीरवींचा॥१॥ पाहोनिआल्यानिजसदनीं॥ कद्रूह्मणेविनतेसाजणी ॥ उच्चैःश्रवाकोणेवर्णी ॥ येरीह्मणेशुद्धधवल॥
२॥ चंद्रकिरणाचावोतिला॥ कींशुद्धरजताचाघडला॥ कीजान्हवीनीरेंधुतला॥ दुग्धवर्णतेजस्वी॥ ३॥ कद्रूह्मणेसत्यजा
ण॥ परिपुछआहेकृष्णवर्ण॥ अरुणजननीबोलेवचन॥ तुझेनयनतरळले॥ ४॥ कद्रूह्मणेपुच्छश्वेत॥ जरीमजदाख
विसीयथार्थ॥ तरीसहस्रअयनेंपर्यंत॥ दासीतुझीहोईनमी॥ ५॥ जरीश्यामवर्णपुच्छपाही॥ तरीतूंदासीमाझीहो
ई॥ उदयीकजाऊलवलाहीं॥ पुछपाहावयावारूचें॥ ६॥ रात्रींपुत्रपाचारुनी॥ रुदनकरीकद्रूतेक्षणी॥ ह्मणेअसत्यपंकें
करूनी॥ विनतेनेमजमारिलें॥ ७॥ तरीतुह्मीसर्वहीजाउन॥ वारूचापुच्छासदंशकरून॥ करूनदाखवावाश्यामवर्ण॥
दासीआसुचीविनतामग॥ ८॥ व्यालह्मणतीतत्क्षणीं॥ आह्मांभस्मकरीलतरणी॥ समर्थासीद्वंद्वबांधुनी॥ मगआ
ह्मीकोठेंराहावें॥ ९॥ कोपलीकद्रूअनिवार॥ शापशरेंताडिलेविरवार॥ ह्मणेतुह्मानेंसापत्न आणिवेश्वानर॥ करि-
तीलसंहारचुकेना॥ १०॥ जन्मेजयाचायागपरम॥ तेथेंव्हालतुह्मीभस्म॥ ऐसाशापऐकतांउत्तम॥ मानिताजाह
लापरमेष्ठी॥ ११॥ सर्पहिंसकचांडाळ॥ महादुर्मतीविरवाररवळ॥ वाढेलबहुत्यांचेंकुळ॥ बरेंशापिलेंकद्रूनें॥ १२॥ ऐ
कोनिमातेचाशापदेरव॥ भयाभीतधांवतीद्वंद्वोत्सुक॥ कृष्णकेशहोऊनिसकळिक॥ पुच्छींजडलेवारूच्या॥ १३
कद्रूनेंतेंजाणून॥ विनतेसपदरींधरून॥ ओढिलीह्मणेश्वेतवर्ण॥ पुछकोठेंदारववी॥ १४॥ उदयायेतांवासरमणी॥
विनतेसनेलेंओढुनी॥ पुछश्यामवर्णपाहुनी॥ विनतावचननबोले॥ १५॥ मगकद्रूनेंनेउनी॥ दासीकरूनठेविलीस
दनी॥ जैसीधेनूंकर्दमीजाउनी॥ अकस्मातगुंतली॥ १६॥ सहस्रवर्षेंहोतांपूर्ण॥ आपोआपअंडेंउलोन॥ प्रगटलाम
हाराजसुपर्ण॥ जैसासूर्यकल्पांतीचा॥ १७॥ किंवाप्रगटलाप्रळयाग्न॥ ब्रह्मांडउजळलेतेजेंकरून॥ लोकभावितीप्रळय
पूर्ण॥ करितीस्तवनअपार॥ १८॥ तुझेंस्मरणकरितांनिःशेष॥ उतरेसंसारविरवारविष॥ तुझेजेकांअनन्यदास॥ त्या

च्यास्मरणेंसर्पपळती॥१९॥पक्षस्पर्शतांजगती॥पाखूच्यारवाणीउमटती॥चोवीससहस्रयोजनेंगणती॥दोनपक्ष
दोहीकडे॥२०॥बिंबप्रवाळरंगाहुन॥आरक्तचंचुचरणलोचन॥किरीटकुंडलेंमंडितध्यान॥चतुर्भुजस्वरूपतुझें २१
तुजभजतीजेआवडी॥तेचिगरुडउपासकगारोडी॥तुझेस्मरणेंसर्पकोडी॥पळतीलउठोनियां॥२२॥पंचाहत्तरसह
स्त्रयोजनेथोर॥एवढेंतुझेंदीर्घशरीर॥दोनीपक्षचोवीससहस्र॥वेदध्वनीउमटती॥२३॥पूर्वउत्तरमीमांसादोई॥
पक्षामधूनउमटतीध्वनी॥पक्षतेजझळकतांमेदिनी॥पाषाणहोतीदिव्यपाचू॥२४॥तुझेंतेजनावरेप्रचंड॥करपोन
जाईलब्रह्मांड॥नाभीनाभीह्मणेगरुड॥चिंताकाहींकरूंनका॥२५॥जेविष्णुभक्तिविहीन॥जांसनावडेस्मरणकी
र्तन॥निंदकदुष्टदुर्जन॥त्यासविदारीनक्षणार्धें॥२६॥मातापितागुरुब्राह्मण॥साधुसंतहरिभक्तजाण॥यांसद्वे
षीजोदुर्जन॥त्यासविदारीनक्षणार्धें॥२७॥वेदशास्त्रपुराण॥करितीजेकांप्रमाण॥विष्णुशिवनिंदितीजेदुर्जन॥
त्यासविदारीनक्षणार्धें॥२८॥हरिशिवप्रतिमाह्मणेपाषाण॥तीर्थमहिमासांडीखंडून॥निंदीहरिस्वरूपेंसगुण॥
त्यासविदारीनक्षणार्धें॥२९॥ह्मणोनिप्रजाहोनिश्चिंती॥सद्भावेंकराभगवद्भक्ती॥तरीतुह्माअहोरात्री॥घरदीघा
लूनरक्षीन॥३०॥प्रजेचेंकरूनसमाधान॥अद्भुततेजआच्छादुन॥मातेचेंघ्यावयादर्शन॥सर्पसदनीपातला॥३१॥
देखोनिमातेचेक्लेश॥परमसंतापलाखगेश॥दासीपुत्रसुपर्णास॥सर्वह्मणतीमागेंपुढें॥३२॥कद्रूह्मणेगरुडापा
हीं॥रमणकद्वीपींसर्पनेई॥सुपर्णपृष्ठीवाहोनिलवलाहीं॥सर्पनेलेत्याठाया॥३३॥सर्पांचीसत्तादेखोन॥ह्मणे
मातेससुपर्ण॥तुझेपालटदासजाण॥मागतीतेंदेईनमी॥३४॥विनताह्मणेकद्रूतें॥माझेपालटेंमागेदिव्यवस्तूतें
कद्रूह्मणेमजसहितपुत्रांतें॥अमृतपानकरवींकां॥३५॥तुवांदिधल्याअमृत॥तत्काळचितुजकरीनमुक्त॥विन
तागरुडाशींसांगत॥अपेक्षितसर्पांचे॥३६॥बाहूपिटूनिबोलेपुरुषार्थ॥देवजिंकोनिआणिनोंअमृत॥गरुडचालि
लात्वरित॥निषादभक्षितससुद्रींचे॥३७॥भक्षिलेबहुतनिषादगण॥त्यांतसांपडलाएकब्राह्मण॥तोतात्काळटाकिला

उगळुन॥ श्रेष्ठवर्णह्मणोनी॥ ३८॥ क्षुधानळहोयशांत॥ कश्यपह्मणेपुत्राऐकत्वरित॥ देवलोकींसरोवरअद्भु
त॥ कूर्मकुंजरभांडतीतेथें॥ ३९॥ विभावसुसुप्रतीक॥ पूर्वींहेबंधूदोघेदेख॥ द्रव्यसंबंधेंएकासएक॥ शापूनऐसेजा
हले॥ ४०॥ तीनयोजनेंजाण॥ दोघांचेंशरीरविस्तीर्ण॥ गरुडेंतत्काळतेमारून॥ अंतरिक्षेंघेऊनिजातसे॥ ४१॥ जंबुवृ
क्षाचीविशाळ॥ शतयोजनेंशाखानिर्मळ॥ वरीबैसलाखगपाळ॥ तंवतीशाखामोडली॥ ४२॥ किजेऐसीकडकड
त॥ गरुडविलोकूनपाहत॥ तोंपानोपानीसमस्त॥ जडलेवालखिल्ययेउनी॥ ४३॥ साठसहस्रत्यांचामेळा॥ सर्वपानी
जडोनठेला॥ अंगुष्ठप्रमाणपरीआगळा॥ प्रतापत्याचानवर्णवे॥ ४४॥ मरतीलआतांब्राह्मण॥ गरुडउडालाशाखा
घेउन॥ मुखींकूर्मइभधरोन॥ अंतरिक्षहिंडत॥ ४५॥ संकटींपडलासुपर्ण॥ देखोनकश्यपप्रार्थित॥ ह्मणेस्वामी
भग्नशाखात्वरित॥ सांडूनजाउत्तमस्थळा॥ ४६॥ ऐकोनकश्यपाचेंवचन॥ मानसगतीअवघेजण॥ हिमाचळा
प्रतीजाउन॥ तपध्यानआरंभिती॥ ४७॥ विहंगोत्तमेंक्षुधाहरण॥ केलेंकूर्मकरीभक्षून॥ कनकशाखानेउन॥ हि
माद्रीशिरींठेविली॥ ४८॥ वैनतेयबळअगाध॥ देखोनिइंद्राचाअपराध॥ हादुसराशक्रप्रसिद्ध॥ वालखिल्यक
रीतहोते॥ ४९॥ शौनकह्मणेसूता॥ शक्रेंकायअन्यायकेलाहोता॥ सूतह्मणेकश्यपेंयागकरितां॥ पुत्रोत्पत्तीका
रणें॥ ५०॥ साठसहस्रवालखिल्यजाणा॥ समिधाआणूंचालिलेवना॥ मूर्तीअंगुष्ठप्रमाणा॥ परमवेगेंचालती
॥ ५१॥ शिखायज्ञोपवीतधोत्र॥ चिमणींचझळकतीपवित्र॥ सामर्थ्यजयाचेंपवित्र॥ गणपतीशक्रसूर्या
तें॥ ५२॥ वेदशास्त्रचर्चाकरित॥ एकएकदर्भकाडीधरित॥ शनैःशनैजातीकष्टत॥ तोंगोपदींउदकदेखिलें॥ ५३
पायनिरसोनअकस्मात॥ आंतपडलेविप्रसमस्त॥ बुचकळ्यादेतांतेथ॥ कासावीसजाहले॥ ५४॥ जीवान्वितये
काकुळती॥ एकासएकझोंबती॥ टाळीवाजवूनअमरपती॥ हंसेविमानीगदगदां॥ ५५॥ पाहाहोगोष्पदजळीं॥
विप्रहेबुडतीसकळी॥ परीधावोननयेजवळी॥ कौतुकमात्रविलोकित॥ ५६॥ मगवालखिल्यहस्तजोडिती स्त्र

वितेजालेरमापती ॥ विश्वव्यापकसगुणमूर्ती ॥ कादींआह्मांयेऊनी ॥ ५७ ॥ मगधांवूनिश्रीकरधर ॥ कडेकादि
लेब्रह्मपुत्र ॥ परीइंद्रहंसलातेणेंविप्र ॥ परमसंतापपावले ॥ ५८ ॥ तेथेंचआरंभिलेंतपतीव्र ॥ दुसराकरूंइछिलापु
निशक्र ॥ कंपायमानशचिवर ॥ शरणगेलाकश्यपा ॥ ५९ ॥ मगकश्यपेंयेउन ॥ स्तविलेसर्वतेब्राह्मण ॥ ह्मणेमजव
रीदृष्टीदेउन ॥ कोपसांडावाआतांह्मा ॥ ६० ॥ तुह्मींनिर्मिलादुसराइंद्र ॥ नरितोआतांकरारवगेंद्र ॥ वीर्येंशौर्येंबळसा
गर ॥ शक्राहूनविशेष ॥ ६१ ॥ द्वादशमित्रकरूनएकत्र ॥ पडिलातोसर्पामित्र ॥ जोविष्णुभक्तांचापरममित्र ॥ ऐका
चरित्रतयाचें ॥ ६२ ॥ शक्रसामर्थ्यकरूनहीन ॥ त्याचामलापवाढलगहन ॥ मगविनतागर्भीदिव्यरत्न ॥ पक्षीश्वर
जन्मला ॥ ६३ ॥ असोपक्षवातेंकरून ॥ हडबडिलेंस्वर्गभुवन ॥ शक्रासिह्मणेअंगिरानंदन ॥ सावधानअमृतर-
क्षा ॥ ६४ ॥ गरुडदेखोनियादृष्टी ॥ धांवतीसुरवरांच्याथाटी ॥ करितेजाहलेशस्त्रवृष्टी ॥ परीनगणीसुपर्णतो ॥
६५ ॥ आक्रांतभावेंनिर्जरदळीं ॥ शस्त्रेंसकळांचींगिळियेलीं ॥ देवसेनाविदारिली ॥ दिक्पाळसकळपळविले
६६ ॥ लागतांनरवाचामार ॥ शस्त्रेंचूर्णजालींसमग्र ॥ पाठीदेऊनसत्वर ॥ पळतीनिर्जरत्वरेनें ॥ ६७ ॥ वीजझळके अं
तराळीं ॥ तेविविहंगराजतळपेदळीं ॥ अमृतकुंडाजवळी ॥ लक्षिनआलानिजबळें ॥ ६८ ॥ तोंतेथेंज्वाळावर्ण ॥
विझविलीचंचूउदकेंकरून ॥ वायूचेंकरणारखंडन ॥ कर्तरियंत्रउपडिलें ॥ ६९ ॥ रजतकलशींसुधारस ॥ भरोनिचा
लिलारवगेश ॥ अद्भुतदेखोनिश्रीनिवास ॥ धांवोनिचक्रमोकलिलें ॥ ७० ॥ येतांदेखोनिसुदर्शन ॥ गरुडेंगिळिलें
नलगतांक्षण ॥ हृदयस्थजोभगवान ॥ त्याचेहातीदीधलें ॥ ७१ ॥ सुपर्णासिह्मणेनारायण ॥ तुजमीजाहलोंप्रस
न्न ॥ मगबोलेविनतानंदन ॥ तूंचिमागकाहीं ॥ ७२ ॥ हरीबोलेसुहास्यवदन ॥ तूंहोईमाझेंवहन ॥ गरुडेंधांवोनिचर
ण ॥ श्रीरंगाचेवंदिले ॥ ७३ ॥ असोतोसर्पारिजाण ॥ तेथूनजाहलाविष्णुवाहन ॥ इंद्रहीस्नेहेंयेउन ॥ सुपर्णासभेटला
॥ ७४ ॥ इंद्रह्मणेतूंकश्यपकुमर ॥ होसीमाझासहोदर ॥ अमृतपाजूनविरवार ॥ अमरसहसाकरूंनको ॥ ७५ ॥

वैनतेयह्मणेकौतुकपाहीं ॥ सुधाघटनेंतोलवलाहीं ॥ अंतरेंठेवितांचनेसमईं ॥ घेऊनयेईंतुझानूं ॥ ७६ ॥ ऐसासंके
तसांगून ॥ सर्पसदनाआलासुपर्ण ॥ अमृतकुंभदाउन ॥ ह्मणेस्नानेंकराआतां ॥ ७७ ॥ गंगाजळपुण्यरूप ॥ तेथें
स्नानकरितीसर्प ॥ सुधाघटखगाधिप ॥ कुशमंडळींठेवित ॥ ७८ ॥ ह्मणेमाझीमातायेथुन ॥ मुक्तजाहलीदासीप
णापासून ॥ साक्षीधरणीसूर्यनारायण ॥ बोलेगर्जोनीअंडजप्रभू ॥ ७९ ॥ तों इंद्रअदृश्यरूपेंयेउन ॥ सुधाघटने
लाउचलोन ॥ कृतांतनेनोजैसाप्राण ॥ कोणासहीनकळतां ॥ ८० ॥ स्नानसंध्याकरूनव्याळ ॥ धावोनिआलेतेथें
सकळ ॥ शोधितीसकळकुशमंडळ ॥ नदिसेसुधाघटकोठेंही ॥ ८१ ॥ हाहाकारकरितीफणी ॥ घेतांकपाळेंबडवो
नी ॥ ह्मणतीठकविलेंआह्मालागुनी ॥ कपटकेलेंसुपर्णें ॥ ८२ ॥ अमृतघटठेविलाजेथें ॥ चाटितीसर्पदर्भातें ॥
तोंजिव्हाचिरल्यासमस्तातें ॥ दुःखजाहलेंअपार ॥ ८३ ॥ हातींचागेलासुधारस ॥ वरीजिव्हाचिरल्याविशेष
सर्पद्विजिव्हनिःशेष ॥ अद्यापजनपाहती ॥ ८४ ॥ मगसत्तावीसव्याळकुळें ॥ समूळग्रासिलींखगपाळें ॥ उर
लेतेपळाले ॥ विवरद्वारेंपाताळीं ॥ ८५ ॥ स्कंधींघेऊनविनतेसी ॥ सपारीगेलानिजाश्रमासी ॥ विनताआणिक
श्यपासी ॥ ऐक्यताकेलीसुपुत्रें ॥ ८६ ॥ हेंसुपर्णाख्यानजे पठती ॥ बहुतश्रोतयांऐकविती ॥ त्यांसपृष्ठींवाहोनअं
ती ॥ गरुडनेईलवैकुंठा ॥ ८७ ॥ आणिसंसारींअसतांसदा ॥ कदानहोयसर्पबाधा ॥ ऐसीव्यासवचनमर्यादा
असत्यनव्हेकालत्रयीं ॥ ८८ ॥ असोशेषवासुकीसर्पसकळी ॥ तपकरितांहिमाचळीं ॥ विष्णुनाभयेऊनते
काळीं ॥ पुसताजाहलातयातें ॥ ८९ ॥ कांआरंभिलेंतपघोर ॥ शेषवासुकीबोलतीउत्तर ॥ चांडाळहेपरमवि-
खार ॥ यांच्यासंगेंबुडालों ॥ ९० ॥ सुपर्णासिसदावैर ॥ पाळितीहेविखार ॥ आणिमातृशापअनिवार ॥ सर्पस
त्रींभस्महावें ॥ ९१ ॥ ह्मणोनतीव्रतपवैश्वानर ॥ त्यांतचिजाळूंआपुलेंशरीर ॥ मगबोलेचतुर्वक्त्र ॥ भयमानसीं
धरूंनका ॥ ९२ ॥ माथांघेऊनिकुंभिनी ॥ अक्षयीराहापाताळभुवनी ॥ हरिस्मरणकराअनुदिनीं ॥ शापतुह्मावाधे

ना॥९३॥मगसर्पपप्रायधरणी॥शेषधेमाथांउचलुनी॥रवळकुटिळभावटाकुनीं॥भगवद्भजनींराहिले॥९४॥स
हस्रफणाचामध्यमणी॥त्यावरीपुष्पवत्धरिलीधरणी॥परमभक्तह्मणउनी॥त्यावरीपहुडेनारायण॥९५
मिळोनदुर्जनविरवार॥एकांतींकरितीविचार॥ह्मणतीजन्मेजयाचेंसत्र॥नचालेऐसेंकरावें॥९६॥एकह्मणती
प्रधानमोहुन॥विवेकसांगूनमोडावायज्ञ॥एकह्मणतीरात्रींजाउन॥ऋत्विजगणडंकावे॥९७॥होमद्रव्यसमूळीं
हुन॥नासावेंगरळघालुन॥किंवाजन्मेजयासीमारुन॥टाकावेंपरिक्षितीसारिखें॥९८॥एकह्मणतीविषधारेंअ
मोघ॥पाडावायज्ञावरीमेघ॥एकह्मणतीसवेग॥गजपूरचिबुडवावें॥९९॥वासुकीह्मणेतेक्षणी॥दुष्टपडती
हुताशनीं॥सुखरक्षीलआस्तिकमुनी॥भविष्यअसेपूर्वींचें॥१००॥परमसुरसभारतकथा॥पावनहोयश्रो
तावक्ता॥शौनकादिकऋषिसमस्तां॥सूतसांगेआदरें॥१॥जोपांडवकुळींकुळभूषण॥सर्वलक्षणीविराजि
तपूर्ण॥जोपरिक्षितीचानंदन॥जन्मेजयराजेंद्र॥२॥विद्याप्रवीणगुणसमुद्र॥भारतसमुद्रउल्हासचंद्र॥सुर
भूसुरसमकर॥नृपसजाचेंनिजग्रहीं॥३॥कलीमाजीराज्यकरून॥केलेंकलीसीनिग्रहण॥करीगोविप्रप्रतिपा
लन॥प्रजाजनसुखरूप॥४॥षोडशवर्षेंविराजित॥सभेसबैसलेनृपनाथ॥अमात्यहस्तजोडूनसमस्त॥उ
भेतिष्ठतनिजस्थानीं॥५॥सभाघनवटलीपूर्ण॥पुढेंगर्जतीबंदीजन॥तोंमंत्रीयांकडेपाहून॥जन्मेजयबोलत
॥६॥माझापिताअभिमन्युनंदन॥कल्पायुष्येंकांत्यासमरण॥वर्तलेंतेंसर्वकारण॥श्रुतपूर्णमजकरावें॥
७॥अमात्यजाहलेसद्गदित॥नृपासआलेअश्रुपात॥सभाराहिलीनिवांत॥प्रधानसांगेवर्तलेंतें॥८॥पांडव
निजधामागेलियावरी॥कलीसुटलाउर्वीवरी॥परिक्षितीनृपराज्यकरी॥कुंजरपुरीतेधवां॥९॥तोकुरुकुला
वतंसनृपती॥पवित्रराजापरिक्षिती॥राज्यामाजीबहुतनीती॥धर्माऐसीचालवी॥१०॥मृगयाव्याजेंकरूनी
चतुरंगसेनादळघेउनी॥हिंडतांघोरकाननी॥सायकलाउनीचापातें॥११॥तोंदूरदेखिलाकुरंग॥सायकेंव

धिलासवेग ॥ घायाळपळेतो वेगेंमृग ॥ पाठीलागेनृपतीतो ॥ १२ ॥ आंगीं भेदलाअसतांमार्गण ॥ घोरकांतारलं
घीहरिण ॥ राजापाठीधांवतांशीण ॥ बहुसालपावला ॥ १३ ॥ रावफारतृषाक्रांत ॥ तोंगोपाळदेखिलेबहुतवना
नाविनोदकरित ॥ जालेमत्तदुग्धपानें ॥ १४ ॥ त्यांतेंनृपपुसेजीवन ॥ गोपह्मणतीकरीपयपान ॥ भरोनिआणितीदु
ग्धद्रोण ॥ परितोनेघेसर्वथा ॥ १५ ॥ महापर्वताचेदरींमधून ॥ मृगगेलातुकाउन ॥ भोंवतापाहेअभिमन्युनंदन
तोऋषिआश्रमदेखिला ॥ १६ ॥ तंवतयाआश्रमांत ॥ शमीकऋषीबैसलेध्यानस्थ ॥ तयांसपरिक्षितीपुसत ॥ कु
रंगगेलायामार्गें ॥ १७ ॥ तंवतोसमाधिसुखेंतल्लीन ॥ दारुप्रतिमाविरहितप्राण ॥ रायविषादपावोन ॥ ह्मणेग
र्वेंनबोले ॥ १८ ॥ विनाशकाळींबुद्धिविपरीत ॥ अविद्याआठवलीमनांत ॥ ईश्वरीमायाअद्भुत ॥ पूर्वकर्मस्फुरेना
॥ १९ ॥ मृतउरगहोतापडला ॥ धनुष्यकोटीनेउचलिला ॥ कंठींऋषीच्याघातला ॥ हतबहुतांसांगतो ॥ २० ॥ परम
सज्ञानचतुर ॥ विवेकसमुद्रींपोहणार ॥ बहुतांसांगेनीतिशास्त्र ॥ कुबुद्धींकूपींपडियेला ॥ २१ ॥ परमपुण्य-
वंतपरीक्षिती ॥ परिकर्माचीगहनगती ॥ घोरअनर्थकरूननृपती ॥ कुंजरपुराप्रतिगेला ॥ २२ ॥ तेंसर्पशरीर
घाणत ॥ दुर्गंधीसुटलीअरण्यांत ॥ पिपीलिकाआंगासझोंबत ॥ सावचित्तशमीकनोहे ॥ २३ ॥ ऋषीजातीआ
श्रमावरून ॥ कंटाळतीउरगदेखोन ॥ त्याचापुत्रशृंगीतपोधन ॥ ब्रह्मदर्शनागेलाहोता ॥ २४ ॥ मागेंरायेंयेउ
नवनी ॥ करूनगेलादुष्टकरणी ॥ तेंनेणूनसर्वब्राह्मणीं ॥ कंटाळतीआश्रमातें ॥ २५ ॥ नित्यनेमसारोनआ
श्रमायेत ॥ तोंस्वाध्यायीभेटलेबहुत ॥ ह्मणतीपितातुझाध्यानस्थ ॥ मृतसर्पगळांत्याचे ॥ २६ ॥ तोवेगेंआ
श्रमाआला ॥ मृतसर्पगळांदेखिला ॥ परमक्षोभपावला ॥ जेविकल्पांतींव्योमकेश ॥ २७ ॥ अनुचितकर्मक
रूननिश्चिती ॥ गेलानागपुरापरिक्षिती ॥ सर्वकळलेंतयाप्रती ॥ क्रोधचित्तींनसमावे ॥ २८ ॥ हातींघेऊनिसलि
ल ॥ शापशस्त्रसोडिलेंसबळ ॥ जेहरिहरदेवपाळ ॥ असत्यकरूंनशकती ॥ २९ ॥ आजपासूनसातवेदिनीपूर्ण

तक्षकदंशें पावेल मरण ॥ मग मृतसर्प काढून ॥ अंगप्रक्षालन करी उदकें ॥ ३० ॥ बापा नोनकळे होणार ॥ क्रोधें शा
पिला नृपवर ॥ सावध जाहले शमीक ऋषीश्वर ॥ पुढें पुत्र देखिला ॥ ३१ ॥ न सांगतां कळला समाचार ॥ शापिला कुरु कु
ळदिवाकर ॥ क्षमाशीळ तो योगीश्वर ॥ शृंगीप्रत बोलतसे ॥ ३२ ॥ ह्मणे आह्मां निंद्य कर्म केलें ॥ राजहंसा जोडिलीं ब
ळें ॥ त्या रायाचे स्नेह मेळें ॥ यावनीं स्करवें राहतों ॥ ३३ ॥ प्रजापाळक पवित्र भला ॥ पांडवकुळीं तेवढाच उरला ॥
आह्मां अविवेकें अनर्थ केला ॥ राजा शापिला परिक्षिती ॥ ३४ ॥ भूसुरां पाळी नृपती ॥ तेणें यज्ञादि कर्में चालती ॥
मग संतोषोन स्करपती ॥ पर्जन्य पाडी समयोचित ॥ ३५ ॥ तेणें सर्वौषधी पिकून ॥ स्करव पावती सकळ जन ॥ गाई
सहो यत्तृण जीवन ॥ असा धर्म रायाचा ॥ ३६ ॥ शमीक विचारी चित्तीं ॥ शाप न टळे कल्पांतीं ॥ शृंगी ह्मणे कर्मगती
न टळे निश्चिती तत्वता ॥ ३७ ॥ मग गौरमुख नामा शिष्य ते वेळें ॥ शमीकें त्यास आज्ञापिलें ॥ रायास सावधान
करीव हिलें ॥ शाप न टळे कल्पांतीं ॥ ३८ ॥ मग तो गौरमुख ब्राह्मण ॥ परीक्षिती पासीं येउन ॥ कांहीं नेदीच
आशीर्वचन ॥ मौन्यें करून उगाची ॥ ३९ ॥ नरेश्वरें नमुन ॥ केलें गौरमुखाचें पूजन ॥ तो ह्मणे राया कर्म गहन
वनीं करून आलासी ॥ ४० ॥ शमीक ऋषी पुण्यात्मा ॥ जो कमलोद्भवाची प्रतिमा ॥ तयें बोलिलीं वचनें नृपसत्त
मा ॥ तीं तुजला समर्पितों ॥ ४१ ॥ मृगयानंदें येउन वनीं ॥ गेलास कंठीं मृतसर्प घालुनी ॥ तें मम पुत्रें देखोनी ॥ प
रम क्षोभ पावला ॥ ४२ ॥ शापकुठारें परमतीक्ष्ण ॥ आयुष्यमेरु टाकिला छेदुन ॥ जीं ऐकतां न्व वचनें आकर्षण
होय सर्व स्करवाचें ॥ ४३ ॥ सात दिवस होतां पूर्ण ॥ तक्षक दंश करील येउन ॥ तत्काळ जासी भस्म होऊन ॥ म
रीचिनंदन सदना प्रती ॥ ४४ ॥ शक्र शिव कमळासन ॥ अन्यथा न करिती त्याचें वचन ॥ सावध होईं येथुन ॥ क
रीं यत्न बहु साल ॥ ४५ ॥ तक्षकविषहरणार्थ ॥ उपाय करी अत्यद्भुत ॥ ऊठ पळे पळें मृत्यु सत्य ॥ जवळ आहे
येथुनी ॥ ४६ ॥ गौरमुखें हें सांगोन ॥ निघतां नृपें धरिले चरण ॥ ह्मणे सांग शमीका जाउन ॥ मी अन्यायी सर्व-

स्वें॥४७॥माझाअपराधप्रचंड॥ याहूनकराविशेषदंड॥दुष्कृतकर्मगहनप्रचंड॥नसुटेभोगिल्यावीणपैं॥४८
शमीकचरणीमाझेंभाळ॥सांगठेविलेंमीसहस्त्रवेळ॥परत्रींतरीदोषमळ॥भजझगटूंनेदीतूं॥४९॥असोबोलऊ
नगौरमुख॥पाचारीअमात्यप्रजासकळिक॥जालेंकर्मतेंसर्वदेख॥श्रुतकेलेंसमस्तां॥५०॥टांकावयाश्वासोश्वा
स॥यावरीनाहींअवकाश॥कोणेंतीर्थीकरूंवास॥कोणसत्पुरुषभेटेल॥५१॥कोठेंदेवहोईलप्रगट॥नाशीलहेंएवढें
अरिष्ट॥करीलस्वरूपसाक्षात्कारस्पष्ट॥ऐसाश्रेष्ठगुरूकोठें॥५२॥नक्षकविषउतरी॥ ऐसाकोठेंधन्वंतरी॥स्नानेंअ
ज्ञानजायदुरी॥ऐसेंतीर्थकोठेंअसे॥५३॥वारीमृत्युभयनेटें॥ऐसासोयराआहेकोठें॥हेराज्यविलासमोठे॥मज
कासयासांगपां॥५४॥हडबडूनरावउठला॥ह्मणेनक्षकआलारेआला॥मजसंतचरणींघाला ॥तोंतेथेंप्रगटलेनार
द॥५५॥नृपेंनारदाचेचरणधरिले॥ह्मणेगुरुवर्याआयुष्यसरलें॥सातांदिवसांमरणआलें॥सार्थककेलेंजायकैसें
॥५६॥व्यासवाल्मिकमहापुरुष॥ध्रुवप्रन्हादजाचेशिष्य॥तोनारदबोलिलासारांश॥ गोष्टीऐकनृपश्रेष्ठा॥५७॥
व्यासपुत्रशुकजाण॥जोयोगियामाजीचूडारत्न॥त्याच्यामुखेंकरून॥श्रीभागवतश्रवणकरीं॥५८ऐकनृपतेंसा
वधान॥पूर्वींराजाखट्वांगजाण॥तेणेंतीनमुहूर्तींसार्थककरून॥हरिपदपूर्णपावला॥५९॥सात्पदिवसपर्यंत॥तुज
अवकाशआहेनिश्चित॥उपायहाचियथार्थ॥भागवतपरिसेंकां॥६०॥नारदगेलासांगोन॥रायेंकेलेंशुकाचेंस्म
रण॥तत्काळउभाठाकलायेउन॥देदीप्यमानदयाळू॥६१॥षोडशवर्षेंविराजित॥तेजाशींउणाज्याच्याआदित्य
ज्याचेस्वरूपावरूनमन्मथ॥ओंवाळूनटाकावा॥६२॥सुधापानकरितीनिर्जर॥त्याहूनशुकाचेंशरीरसुंदर॥विराजे
गौरवर्णशरीर॥जटाभारमस्तकीं॥६३॥विभूतिचर्चुनिसुंदर॥विराजेगौरवर्णशरीर॥ दृढकौपीनपंचशर॥जेणेंतो
डरीघातला॥६४॥मोहभ्रमक्रोधकाम॥ जेणेंजाळोनिकेलेंभस्म॥रंभेनेंछळिलेंहोउनिकाम॥नचळेमनतत्वता ६५
तोप्रगटलामहाराजशुक॥कक्षेसभागवतपुस्तक॥देखोनिपरिक्षितीनृपनायक॥भाळठेवीशुकचरणीं॥६६॥स्वा

मीशुकव्यासनंदना॥ तोडीवेगेंसंसारबंधना॥ पुढती मिठीघालोनिचरणा॥ प्रेमभरेंस्फुंदत॥ ६७॥ मगबोलेव्यासस्रु
त॥ सर्पभयेंतूं अतिव्याप्त॥ क्षणक्षणादचकसीयथार्थ॥ सर्पसर्पह्मणउनी॥ ६८॥ तुझेंमनन्नाहींस्थीर॥ कैसाश्रव
णींहोसीसादर॥ मगपरीक्षितीराजेंद्र॥ स्थळपाहेश्रवणातें॥ ६९॥ गगनचुंबितलोहस्तंभ॥ त्यावरीहृदगृहनि
र्मिलेंस्वयंभ॥ त्यांतबैसविलारावशुभ॥ जेविमित्रउदयाचळीं॥ ७०॥ हृदयींरक्षिजेजैसाप्राण॥ कृपणजतन
करीजैसीधन॥ तैसेंरक्षिलेंमन॥ हरिचरणीआवडी॥ ७१॥ स्तंभाभोंवत्यानिर्धारी॥ बैसल्याऋषेश्वरांच्याहा
री॥ जैसेंमानससरोवरी॥ राजहंसविराजती॥ ७२॥ नानायंत्रमंत्रमणी॥ स्तंभीं बांधिती आणुनी॥ सुपर्णसू-
क्तेंकरूनी॥ द्विजजपकरिताती॥ ७३॥ नानाअनुष्ठानेंपुरश्चरण॥ महामंत्रजपतीब्राह्मण॥ सेनासन्निधकरू
न॥ प्रधानरक्षितीभोंवती॥ ७४॥ त्यागृहामाजीशुकपरीक्षिती॥ बैसलेजैसेंवाचस्पती॥ शुकह्मणेधरणीप
ती॥ नकरीस्वंतीभवभयाची॥ ७५॥ अठरासहस्रदिव्यग्रंथ॥ विष्णुलीलाश्रीभागवत॥ शुकमुखेंश्रवणकरित
नृपनाथपरिक्षिती॥ ७६॥ राजेंद्रबैसतांश्रवणी॥ प्रधानासीबोलाउनी॥ ह्मणेधन्वंतरीशोधुनी॥ अवनीवरी
काढावा॥ ७७॥ वाराणसीविश्वनाथनगरी॥ तेथेंअसेमहाधन्वंतरी॥ द्रव्यमागेलतेंत्याचेघरीं॥ देउनीएथेंआ
णावा॥ ७८॥ पाचारिद्वादशस्कंधभागवत॥ सत्यवतीसुतसांगत॥ सप्रेमेंराजाऐकत॥ भवभयसमस्तवि
सरला॥ ७९॥ तक्षकभयेंअत्यंत॥ गोष्टप्रगटलीदेशांत॥ सकळराजेसुहृदआप्त॥ येतेजाहलेपाहावया॥ ८०
परस्परेंऐकतांसमाचार॥ धन्वंतरीकश्यपनामाविप्र॥ तोगजपुरासयेतांसत्वर॥ तक्षकमार्गीभेटला॥ ८१
विप्ररूपधरूनी॥ तक्षकपुसेत्यालागुनी॥ बहुतत्वरेंधावतीवनी॥ कोठेंजातोससांगपां॥ ८२॥ तोह्मणेपरिक्षि
तीमहाराज॥ पांडवकुळींविजयध्वज॥ त्यासतक्षकदंशकरितांसहज॥ मीउतरीनक्षणार्धें॥ ८३॥ तक्षकह्म
णेकश्यपासी॥ मीग्रासूंजातोंनृपासी॥ तुझीमंत्रविद्याकैसी॥ दाखवीआतांसत्वर॥ ८४॥ तेथेंएकसरोवरभ

रला। तरीन्यग्रोधवृक्षवाढला॥ वरीएकद्विजचढला॥ पत्रेंतोडी वृक्षाचीं॥८५॥ तक्षकधावेक्रोधेंकरूनी॥ वृक्ष
दंशिला निजदशनीं॥ तत्काळकोळसे होउनी॥ विप्रासहितदग्धजाहला॥८६॥ कश्यपेंतैसेंचतेक्षणीं॥ सरोवरीं
चेंउदकमंत्रुनी॥ शिंपितांचदवटवोनी॥ वटमागुतींविस्तरला॥८७॥ विप्रतेसाचपत्रतोडित॥ मगत्यासतक्षक
ह्मणत॥ धन्यतुझासद्गुरूसमर्थ॥ ऐसामंत्रदिधला॥८८॥ तूंजातोसउतरावयासी॥ श्रृंगीचेंवचनअसत्यकरि
सी॥ माझ्याप्रतापाउणेआणिसी॥ जायवेगेसीमाघारां॥८९॥ तोह्मणेनृपदेईलधन॥ मीपीडिलोंदरिद्रेंकरून॥ त
क्षकह्मणेत्याचेशतगुण॥ द्रव्यदेईनतुजलागीं॥९०॥ भूमीतीलवि वरउघडिलें॥ तक्षकेंअपारद्रव्यकाढिलें॥ सेवका
चेमस्तकींदीधलें॥ पाठविलेंगृहात्याच्या॥९१॥ असोकश्यपपरतविला॥ लांचदेउननयेसाकेला॥ कश्यपतेथूननि
घाला॥ गुप्तआलागजपुरासी॥९२॥ तोसप्तमदिवसाचेअंत॥ संपतआलेंश्रीभागवत॥ सप्रेमेपरिक्षितीऐकत
क्षालनहोतमहत्पापा॥९३॥ जपतपविप्रकरित॥ देखोनियांतक्षकह्मंसत॥ ऋषिवचनअसत्य॥ याचेनिकेवीं
होयपां॥९४॥ तक्षकेंपाठविलेब्राह्मण॥ कापट्यवेषेंविरवारपूर्ण॥ अस्ताजातांसूर्यनारायण॥ वेळसाधूनचालिले
९५॥ पुष्पेंफळेंघेउन॥ चालिलेराजदर्शनाब्राह्मण॥ विशाळरूपआच्छादुन॥ तक्षकसूक्ष्मजाहला॥९६॥ लाहानकी
टकहोउन॥ फळगर्भींरिघेदुर्जन॥ घ्यावयानृपाचाप्राण॥ जातलपोनदुरात्मा॥९७॥ कक्षेसघेऊनपाश॥ मेंदजैसे-
आलेयात्रेस॥ तैसेविप्रवेषेंवेदघोष॥ करीतसर्पचालिले॥९८॥ नृपासजाणविती प्रधान॥ तपोवनाहूनिआलेब्राह्म
ण॥ येऊंद्याह्मणेउत्तरानंदन॥ द्विजजीवनआमुचें॥९९॥ रायेंब्राह्मणनमस्कारिले॥ इतुक्यांतभागवतसंपलें॥ नृपेंशु
कासपूजिलें॥ अंतर्धानपावला॥२००॥ स्त्रवासिकपक्कफळेंविविध॥ विप्ररायासदेती प्रसाद॥ नृपसकळांसदेऊनशु
द्ध॥ आपुलाभागघेतला॥१॥ पूर्वपुण्यगहनबळ॥ ज्यामाजीहोतातक्षकखळ॥ तेंराजविभागाआलेंफळ॥ अंत
काळसमयासी॥२॥ सकळविप्रपूजिलेतयेक्षणीं॥ द्विजप्रार्थितीप्रीतीकरूनी॥ रायाहेंफळघेउनी॥ मुखमाजी

घालीकां ॥ ३ ॥ रायें फळ उकलिलें तेवेळीं ॥ तों आतूनि निघाली आरक्त अळी ॥ परीक्षितीनें सकळां दाविली ॥ ह्म
णे वेळ टळली मरणाची ॥ ४ ॥ आळी निघाली ये वेळे ॥ इतुकेन आमुचें मरण टळलें ॥ अळीस सहज ग्रीवेवरी ठेविलें
तों तक्षकें धरिलें विशाळ रूप ॥ ५ ॥ आरक्त वर्ण फणिमंडळ ॥ धुंधुःकारा सरिसे भडकले ज्वाळ ॥ भयानक रस
ना विशाळ ॥ कडकडून दंश केला ॥ ६ ॥ सुरवींच्या ज्वाळा गगनीं जाती ॥ ग्रीवास्थळीं वेष्टिला नृपती ॥ सेवक आ
णि द्विज पळती ॥ उड्या टाकुनी चहूंकडे ॥ ७ ॥ त्या लोहगृहासमवेत ॥ राजा भस्म जाला तेथ ॥ गजपुरीं एकचि आकां
त ॥ नोळखती कोणा कोणी ॥ ८ ॥ लोक पळती ग्राम सोडुन ॥ प्रळयवर्त्तला दारुण ॥ गुणियांलांच्व देउन ॥ परतवि
ला चांडाळें ॥ ९ ॥ वटवृक्षीं होता जो ब्राह्मण ॥ तेणें हें सांगीतलें वर्तमान ॥ ब्रह्मशाप परम दारुण ॥ येतला प्राण परीक्षि
तीचा ॥ १० ॥ योग्यायोग्य असो ब्राह्मण ॥ परिसहसा न करावें छळण ॥ घडे तरी पूजावा प्रीती करून ॥ न घडे तरी न निं
दिजे ॥ ११ ॥ ब्रह्मशाप दुर्धर देख ॥ परीक्षिती पावला विष्णुलोक ॥ मग ऋषी अमात्य प्रजा सकळिक ॥ जन्मेजयास्था
पिती तूतें ॥ १२ ॥ ऐसें हें पूर्वकथन ॥ प्रधानीं सांगीतलें संपूर्ण ॥ राजा नेत्रासी वस्त्र लाउन ॥ करी रुदन पितयालागीं ॥
१३ ॥ सभा जाली सद्गदित ॥ प्रजेस महिवरन धरवत ॥ नेत्रीं अश्रु धारा स्फुंदत ॥ काय बोलत तये वेळां ॥ १४ ॥ व्यर्थ
गेला पुत्रधर्म माझा ॥ अहा परीक्षिती कुरुकुळध्वजा ॥ चांडाळें तक्षकें प्राण तुझा ॥ एकाएकीं घेतला ॥ १५ ॥ स
तदिवस उपोषण ॥ करून दिल्हें उदकपान ॥ अवचिता घेतला प्राण ॥ महादुर्जनें तक्षकें ॥ १६ ॥ हृदयीं हस्त पिटू
न ॥ ह्मणे देहत्याग करीन ॥ निर्वंश किंवा तक्षकाचा प्राण ॥ घेईन आतां निर्धारें ॥ १७ ॥ सूड घेईन पितयाचा ॥ निर्वं
श करीन तक्षकाचा ॥ समुदाय मेळविला ऋषींचा ॥ सर्पसत्र आरंभिलें ॥ १८ ॥ सर्पसंहारावे समस्त ॥ उत्तंक ऋषीच्वे मनो
गत ॥ ते गोष्टीस साह्य करित ॥ रुरुनामा ऋषी जाहला ॥ १९ ॥ श्वासोश्वास टांकित ॥ दशन बिंबाधरीं रोवित ॥ क्रो
धना टोपे हस्त चुरित ॥ नयन आरक्त जाहले ॥ २० ॥ कुशल जाण ने मंत्र तीक्ष्ण ॥ ते अविलंबें आणिले ब्राह्मण ॥ जेमं

त्रोच्चारकरितांपूर्ण ॥ सर्पांच्याकोटीभस्महोती ॥ २१ ॥ गरुडास्त्रमंत्रउपासक ॥ तीचगारुडीविद्यासम्यक ॥ कोटी
च्याकोटीअहीकसकळिक ॥ भस्मकर्तेक्षणार्धें ॥ २२ ॥ विप्रह्मणतीभूभुजजनका ॥ पितृभक्तहोसीनिका ॥ सर्प
भस्मकरितांदेखा ॥ त्रिभुवनींकीर्तीगाजेल ॥ २३ ॥ रावलागेविप्रचरणी ॥ आतांकरूनदाखवाकरणी ॥ तक्षकआ
ठवतांमाझेमनीं ॥ प्राणव्याकुळहोताती ॥ २४ ॥ अवश्यह्मणूनियांभूसुर ॥ सामग्रीसिद्धकेलीसमग्र ॥ गौडमल्या
ळदेशअंध्र ॥ तेथिंचेविप्रपातले ॥ २५ ॥ ज्यांचीसमर्थसामर्थ्यें ॥ आवाहनकरितांमंत्रदेवतें ॥ उभींठाकतीयेऊनी
तेथें ॥ यज्ञकुंडाजवळपें ॥ २६ ॥ सकळतीर्थींराहणारद्विज ॥ सप्तपुरामाजीलसतेज ॥ सर्पसत्रींमहाराज ॥ नृपेंआ
दरेंआणिलें ॥ २७ ॥ अथर्वणवेदींचेब्राह्मण ॥ कृष्णावस्त्रेंपरिधान ॥ कृष्णावरेंचप्रावरण ॥ आरक्तनयनहोमधूम्रें ॥
२८ ॥ ज्याचापेटलाक्रोधाग्न ॥ ब्रह्मांडजाळीलनलगतांक्षण ॥ इंद्राचेंपदहिरोन ॥ रंकासपददेतील ॥ २९ ॥ कुंडवेदि
कामंडपसत्वर ॥ करितीचतुरसूत्रधार ॥ हवनसामग्रीसमग्र ॥ सिद्धकरूनठेविली ॥ ३० ॥ अतींद्रियद्रष्टेब्राह्मण
ज्यांसभूतभविष्यज्ञान ॥ ह्मणतीसिद्धीनपावेयज्ञ ॥ होईलखंडणशेवटीं ॥ ३१ ॥ आग्रहकरीलएकब्राह्मण ॥ पू
र्णाहुतीहोऊंनेदीपूर्ण ॥ जन्मेजयक्रोधायमान ॥ भरींभरलानाटोपे ॥ ३२ ॥ शौनकादिकश्रोतेजन ॥ सूताप्रतीकरि-
तीप्रश्न ॥ मगखंडीलजोब्राह्मण ॥ त्याचेंकथनसांगेपां ॥ ३३ ॥ सूतह्मणेआस्तिक ॥ परमतपस्वीदुसराअर्क ॥ सर्पकु
ळाचारक्षक ॥ कथानकऐकेत्याचें ॥ ३४ ॥ परमतपस्वीजरत्कार ॥ हिंडतअसतांवनांतर ॥ कूपगर्तेंतआपलेपितर
अधोवदनदेखत ॥ ३५ ॥ त्यांसपुसेतुह्मींकोण ॥ तंवतेकरितेजालेरुदन ॥ आह्मीतुझेपितृगण ॥ वंशखंडणकेलेंतु
वां ॥ ३६ ॥ तूंस्त्रीकरूनआदीं ॥ करीवंशवल्लीचीवृद्धि ॥ तेणेंआह्मांब्रह्मपदीं ॥ ठावदेईलअब्जज ॥ ३७ ॥ जरत्कारू
ह्मणेतेक्षणी ॥ माझियानामाचीमिळेलतरुणी ॥ तरींचगृहस्थाश्रमीवर्तुनी ॥ वंशवृद्धीकरीन ॥ ३८ ॥ करीतपृथ्वीप
र्यटन ॥ ठाईंठाईंबोलेगर्जुन ॥ माझ्यानामाचीस्त्रीआणुन ॥ भिक्षेलागींद्याकोणी ॥ ३९ ॥ मीवृद्धमाझीशक्तीक्षीण ॥ मा

ड्यानेंनदेववेअशनवसन॥आज्ञाभंगिलांटाकुन॥जाईनतिलाक्षणार्धें॥४०॥ऐसेंऐकतांवचन॥हंसतीदेशोदेशीं
चेजन॥कोणीनदेतप्रतिवचन॥तामसीब्राह्मणदेखोनियां॥४१॥स्वर्गमृत्युअष्टलोकपाळ॥जरत्कारेंशोधिलेंसकळ
मगगर्तेपासींयेउनतत्काळ॥गर्जोनसांगेपितरांतें॥४२॥तुमचेगांठीपुण्यअसेल॥तरीसंकल्पहाहोईलसफळ॥क
न्यादानकोणीकरील॥ममनाम्नीवधूसी॥४३॥पाताळासगेलाब्राह्मण॥हांकफोडीआक्रोशेंकरून॥तेनयनद्वारें
करितीश्रवण॥चक्षुश्रवेंसर्वही॥४४॥ब्राह्मणाचेवृत्तसकळिक॥वासुकीससांगतीदंदशूक॥भविष्यजाणोनिअ
हिनायक॥अनुजाआपुलीजरत्कारी॥४५॥तेथेंआणिलीशृंगारुनी॥ह्मणेहेमाझीकनिष्ठभगिनी॥दुसरीइंदिराला
वण्यखाणी॥धर्मपत्नीकराहो॥४६॥जरत्कारूह्मणेतत्वता॥तुह्मांसमर्थांचीदुहिता॥स्वरूपशृंगारपाहतां॥उर्व-
शीरंभादासीपैं॥४७॥नम्रअसावेंमृदुवचन॥बोलोनहरावेंमाझेंमन॥आज्ञाभंगितांजाईनटाकुन॥अनुमानका
हींनकरितां॥४८॥हेजातीचीपद्मीणशुद्ध॥सुवासेंवेधिलेमिलिंद॥इचेंपाहतांवदनारविंद॥मीनकेतनभुलेपैं॥
४९॥माहेरींचेंबळदाउन॥भ्रतारासमानितीजैसेंतृण॥कींवनींचेमर्कटजाण॥धरूनआणूननाचविती॥५०
वासुकीह्मणेऋषीलागुनी॥तैसीनव्हेमाझीभगिनी॥रूपवंतीचातुर्यखाणी॥पतिभजनीसादर॥५१॥चीरभ
षणेसर्वसंपदा॥तीसमीपुरवीनसदा॥होऊंनेदीकाहींआपदा॥अंगिकारास्वामीही॥५२॥मगयथासांगलावि
लेंलग्न॥चारदिवससंपादुन॥सकळसंपत्तीआणुन॥राजभोगसमर्पिती॥५३॥नित्यनैमित्तिककर्मेंसमस्त
अन्नसत्रचालविलेंनित्य॥अतिथीपूजनेदानेंदेत॥पतीचेंअनुमतजाणुनी॥५४॥ऐसाकाळक्रमितबहुत॥
जरत्कारीसगर्भराहत॥जैसासूर्यदीप्तिवंत॥तैसाउदरांतपुत्रवसे॥५५॥गर्भराहिलाउदरीं॥हेंनेणेचिजरत्का
री॥तेणेंएकेअसरीं॥नित्यकर्मसारूनियां॥५६॥निद्रेनेंव्यापिलाजरत्कार॥तिचेमांडीवरीठेवीशिर॥निद्रिस्थ
जाहलेऋषीश्वर॥तोंदिनकरमावळला॥५७॥मनींविचारीऋषिललना॥आदित्यजातोअस्तमाना॥संध्याहो

मकाळजाण॥ टळतांऋषीकोपेल॥५८॥जागेंकरितांकोपलक्षणीं॥नकरितांसत्कर्माहानी॥मनीविचारीनागभ
गिनीं॥दोषसामान्यथोरकोण॥५९॥निद्राघेइजेलरजनींत॥परिसत्कर्मभंगेंप्रायश्चित्त॥मगचरणाचुरीतबोलत
गेलाआदित्यअस्तमाना॥६०॥होमदेऊनयेक्षणीं॥सुखेंपहुडावेंसुखशयनीं॥ऐसेंऐकतांक्रोधेंकरूनी॥जरत्कार
उठिला॥६१॥तुझेअंकींपडतांभार॥कष्टीजालीसतूंसकुमार॥हृदूदेखोनफत्नार॥हेळणागर्वेंकरित्येस॥
६२॥माझीआज्ञानहोतांपूर्ण॥सूर्यकेवीपावेअस्तमान॥मीनदेतांअर्घ्यदान॥अग्निसेवानयथाविधी॥६३
क्षणएकधरूनधीर॥पाहावाहोताचमत्कार॥कैसामावळतांदिनकर॥जरत्कारनउठतां॥६४॥मीहृद्दूदेखतां
नयनी॥हेळणाकरिसीसर्पिणी॥आतांनांदेबंधुसदनीं॥नष्टकर्मेंयथार्थ॥६५॥जरत्कारचालिलाउठोनी॥पाठी
धावेनागभगिनी॥हृदधरिलेपायदोनी॥अश्रुनयनींवाहत॥६६॥ह्मणेआग्रहकरिसीपापिणी॥तरीभस्मकरी
नशापुनी॥थरथरांकांपेकामिनी॥भयेंकरूननबोले॥६७॥सर्पठाईठाईदडती॥समोरकोणीनयेती॥भ
गिनीचेचरणधरिती॥शांतवींपतीआपुला॥६८॥त्वरेंजातजरत्कार॥पाठीधांवेसकुमार॥महाराजतुह्मी
सत्वसमुद्र॥माझात्यागनकरावा॥६९॥सकुमारनेकामिनी॥अडखळोनपडेधरणी॥पद्मिणनेपद्मलोच
नी॥बाहूउभाराहोनहांकदेत॥७०॥सांडूनियांललना॥नजावेंहोतपोवना॥मजवधूनयाचक्षणा॥ऋषिवर्या
जाईजे॥७१॥तुम्हचेसकुमारचरण॥मीआपुलेकेशींझाडीन॥एवढाअन्यायक्षमाकरून॥पोटींघालीऋषिवर्या
७२॥काहींमींकापत्यनेणें॥बोलिलें आजभोळेपणें॥सर्वज्ञेंविचारूनपाहणें॥क्षमाकरणेंअन्यायहा॥७३॥
मागेंपाहेजरत्कार॥तोंपाठीसींधावेसकुमार॥हृदयींदाटलागहिवर॥सजळनेत्रजाहले॥७४॥जवळयेतांज
रत्कारी॥ह्मणेतूंजाईमाघारी॥येरीह्मणेनेअवसरीं॥वचनऐकामहाराजा॥७५॥पुत्रफळनाहींपूर्ण॥कसेउ-
द्धरतीपितृगण॥माझेबंधूसर्पजाण॥निराशात्याचीजाहली॥७६॥आज्ञाभंगिलीह्मणून॥कद्रूनेंशापिलेंसं

पूर्ण॥ ह्मणेसहकुळभस्महोउन॥ जारेतुह्मीदुर्जनहो॥ ७७॥ जन्मेजयाचेसत्रींपरम॥ अवघेउरगहोतीलभ
स्म॥ त्यांतकिंचित्स्वस्तिक्षेम॥ राहावेनेमएकअसे॥ ७८॥ माझेंजठरसत्पात्रींजाण॥ स्वामीतूंकरसीलवीर्य
दान॥ तोपुत्रहोतांनिर्माण॥ सर्पकुळेंरक्षील॥ ७९॥ ऐसेंबोलतांजरत्कारी॥ ऋषिह्मणेतूंअवधारी॥ तुझेगर्भ
शक्तिकेमाझारीं॥ मुक्ताफळपुत्रआहे॥ ८०॥ नास्तिकनाहींआस्तिक॥ पुत्रजैसाहोईलअर्क॥ जेविंवसिष्ठवा
मदेवशक्र॥ चौथादेखतेसाहा॥ ८१॥ ऐसेंजरत्कारूबोलिला॥ तत्काळतेथेंगुप्तजाहला॥ विकळपडलीनागबाळा
पतिवियोगेंकरूनियां॥ ८२॥ सावधकरूनिविरवारी॥ घरानेलीजरत्कारी॥ वासुकीह्मणेसुंदरी॥ आह्मास
अभयदेईंकां॥ ८३॥ येरीह्मणेतुमचारक्षक॥ गर्भांतआहेसत्यआस्तिक॥ आनंदलेसर्पसकळिक॥ गुढियातो
रणेउभारिती॥ ८४॥ अभ्रेंआच्छादिलेंअर्कस्वरूप॥ कींकाश्मीरसदनीचाजैसादीप॥ नवमासभरतांपुण्यरू
प॥ आस्तीकजन्मपावला॥ ८५॥ जैसाविधूमपावक॥ तैसाजन्मलामुनिआस्तीक॥ आनंदलेसर्पसकळिक
गगनीहर्षनमावे॥ ८६॥ नागिणीनागसकळिक॥ प्राणाऐसेरक्षितीबाळक॥ कृत्तिकाप्रथमचरणीदेख॥ मुनि
आस्तिकजन्मपावला॥ ८७॥ जातकर्मादिउपनयन॥ वासुकीकरीस्वयेंआपण॥ च्यवनभार्गवापासून॥ विद्या
प्राप्ततयाची॥ ८८॥ संहिताब्राह्मणअरण्य॥ छंदनिघंटशिक्षाजाण॥ ज्योतिषसूत्रव्याकरण॥ निरुक्तदशग्रंथप
ढियेला॥ ८९॥ बोलकाजैसाअंगिरासुत॥ तेजस्वीजैसाआदित्य॥ तपस्वीजैसाभासत॥ व्योमकेशदुसराजो
॥ ९०॥ शीतळजैसाशीतकर॥ मेघाहूनिअतिउदार॥ ब्रह्मांडमोडूनरचणार॥ दुसरेंपुढतीसामर्थ्ये॥ ९१॥ पु
ढेंअनुसंधानपाहीं॥ हस्तिनापुरींऋषिसर्वही॥ मिळालेजन्मेजयाचेगृहीं॥ सर्पसत्रआरंभिलें॥ ९२॥ सिंहाव
लोकनेंकरून॥ पाहामागीलअनुसंधान॥ जेपंडितभक्तविचक्षण॥ निर्मत्सरमनज्यांचें॥ ९३॥ आदिपर्वसु-
धारस॥ सज्जनश्रोतेहेत्रिदश॥ पानकरोतअतिसुरस॥ ब्रह्मानंदेंकरोनियां॥ ९४॥ ब्रह्मानंदमहाराजपिता॥

सावित्रीनामेमाझीमाता ॥ वंदूनितेउभयतां ॥ परमआल्हादपावलों ॥ ९५ ॥ उभयतांचेंनामसार ॥ श्रीधरजपेहा मंत्र ॥ श्रीपांडुरंगरुक्मिणीवर ॥ तेणेंकरूनतोषला ॥ ९६ ॥ श्रीधरनामआपुलें ॥ अभंगींतेणेंघातलें ॥ त्याचेंचरित्रवर्णिलें ॥ तेणेंचिकथिलेंऐकानें ॥ ९७ ॥ सुरसपांडवप्रतापग्रंथ ॥ आदिपर्वव्यासभारत ॥ त्यांतीलसारांशयथार्थ ॥ द्वितीयाध्यायींकथियेला ॥ ९८ ॥ इतिश्रीपांडवप्रतापग्रंथ ॥ आदिपर्वटीकाश्रीधरकृत ॥ परीक्षितीनिधनसत्रारंभाद्भुत ॥ आस्तीकजन्मकथनकेलें ॥ ९९ ॥ ॥ इतिश्रीमहाभारतटीकापांडवप्रतापादिपर्वेद्वितीयोऽध्यायः २ ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥ शुभंभवतु ॥ ॥ ओव्या ॥ २९९ ॥ छ

॥ छ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥ ॥ छ

श्रीगणेशायनमः ॥ ॥ आस्तिकाचेंजन्मकथन ॥ द्वितीयाध्यायींकथिलेंपूर्ण ॥ जन्मेंजयेंऋषीमेळउन ॥ सर्पसत्र आरंभिलें ॥ १ ॥ सुवर्णवर्णनृपतीनामा ॥ त्याचीकन्यावपुष्टमा ॥ तेजन्मेजयाचीरामा ॥ पतिव्रतापरमते ॥ २ ॥ भार्येसहितदीक्षाग्रहण ॥ जन्मेजयव्रतस्थपूर्ण ॥ कुंडींप्रतिष्ठिलाकृशान ॥ मूर्तिमंततेजस्वी ॥ ३ ॥ चत्वारिशृंगत्रिचरण ॥ सप्तहस्तद्विमूर्धान ॥ हस्तिशुंडेसमान ॥ वसुधाराप्राशित ॥ ४ ॥ विशाळकुंडभयंकरगहन ॥ जैसेंकाळेंपसरिलेंवदन ॥ ऋषीसमिधामंत्रुन ॥ कुंडामाजीटाकिती ॥ ५ ॥ नागलोकींहलकल्होळ ॥ सर्पकांपतीसकळ भ्रमितहोऊनितत्काळ ॥ आकाशमार्गेंउसळती ॥ ६ ॥ सर्पजुंबाडेअकस्मात ॥ कुंडींयेऊनिरिचवत ॥ एकवृक्षातेंवेढेघालित ॥ तरूंचउसळतीआकाशीं ॥ ७ ॥ फणीएकमेकांबाहाती ॥ एकाचेगळांएकपडती ॥ शताचींशतेंवेंटाळिती ॥ मरूनपडतीकुंडांत ॥ ८ ॥ नानासर्पांचामुखध्वनी ॥ नादउमटतीगगनीं ॥ एकएकमुखेंपसरुनी ॥ भयाभीतपडताती ९ । एकेंशिळेसघातलेवेढे ॥ तेशिळायेउनीकुंडींपडे ॥ असंख्यपडतीजुंबाडे ॥ लेखानकरवेतयाची ॥ १० ॥ एककाळेकाजळवर्ण ॥ खदिरांगारतैसेनयन ॥ एकपीतवर्णएकनीलवर्ण ॥ दूर्वारंगएकपैं ॥ ११ ॥ तमलोहार्गळाऐसेसबळ ॥ लंबायमानस्थूळविशाळ ॥ मुखींनियतीमहाज्वाळ ॥ कंकणाकारएकपडती ॥ १२ शंखवळाकारशंखवर्ण ॥ चित्रविचित्रविक्राळवदन ॥ आरक्तमाणिकासमान ॥ केशाळआस्वलासारिखे ॥ १३ ॥ अत्यंतजुनाटस्थळवासी ॥ मणीझळकतीकोणाचेशीर्षीं ॥ ब्राह्मणआपुलेमंत्रपाशीं ॥ बांधोनआणितीबळेंची ॥ १४ ॥ आरदुतोंडेअजगर ॥ महाडुळफोडसेकवडेथोर ॥ डोंबधामणेंअजगराकार ॥ शंखपाळफुरडपैं ॥ १५ पंचमुखीदशमुखी ॥ शतमुखीसहस्रमुखी ॥ एकाचेमुकुटमस्तकीं ॥ पडतीजळतीतडतडां ॥ १६ ॥ पर्वताकारविशाळ ॥ लांबजैसेमंदराचळ ॥ ज्याचेदर्शनेंतात्काळ ॥ मृत्युहोयप्राणिया ॥ १७ ॥ व्याघ्रवदनजंबुकाननवृकमुखगजवदन ॥ मातृशापेंकरुन ॥ कुंडाग्नीतसंचरती ॥ १८ ॥ धडधडांजळतीविखार ॥ दुर्गंधीनेंभरलें

अंबर॥ धन्यजन्मेजयराजेंद्र॥ प्रतापनमायत्रिभुवनीं॥१९॥ सहस्त्रवदनानोहेलेखा॥ ऐसेसर्पजाळिलेदेखा॥ या
जाह्मणेआणातक्षका॥ माझ्याजनकाग्रासिलेंतो॥२०॥ ऐसेंऐकतांद्विजगण॥ तक्षकनामरूपस्मरुन॥ आकर्षिला
मंत्रेंकरून॥ घेतअवदानटाकावया॥२१॥ मरणाकाळींचेंअवचिन्ह॥ तक्षकेंतेव्हांजाणोन॥ धनुष्यापासूनसुटेबा
ण॥ तैसागेलाशक्रपदा॥ २२॥ तक्षकरडेतेकाळीं॥ ह्मणेदेवेंद्राणाठिसीघालीं॥ शरणागतरक्षींयेवेळीं॥ बन्द्वांजु
ळीविनवित॥२३॥ ऋषीअवदानेंटाकिती॥ तयासरसेसर्पपडती॥ निर्वंशकेलानिश्चिती॥ उरलेक्षितीकिंचित
॥२४॥ इंद्रह्मणेरेदुर्जना॥ परमचांडाळखळामळिना॥ अन्यायकरितांकरुणा॥ किमपीनाहींकांआली॥२५
तक्षकह्मणेदेवपाळा॥ मीउत्तरीहोईनतुझियागळां॥ तेव्हांशक्रेंपाठिसीघातला॥ कश्यपसुतह्मणोनी॥ २६॥ पा
ताळींवासुकीशेषभुवनीं॥ आकांतहोतसर्पालागुनीं॥ एकदुष्टेंकेलीकरणी॥ निर्वंशजाहलासर्वांचा॥ २७॥ कु-
डुमानेचाथोरशाप॥ उत्तंकऋषीचाविशेषकोप॥ रुरुचीभार्यासुस्वरूप॥ डंखूनपूर्वींमारिली॥ २८॥ देवदूतीं
बळेंकरुनी॥ उठविलीमागुतीतयानी॥ मगलोहार्गळाहातींघेउनी॥ सर्पमारीतवनींहिंडे॥ २९॥ कोटिच्या-
कोटीमारीविखार॥ तरीनसरतीदुष्टअपार॥ मगजन्मेजयाचेंसर्पसत्र॥ तेथेंसाह्यतोजाहला॥ ३०॥ असोवा
सुकीह्मणेजरत्कारी॥ कंपसुटलाआसुचेशरीरीं॥ कलेवरेंजळतीएकसरीं॥ ज्वाळादृष्टीदिसताती॥ ३१॥ अनु
ष्ठानीबैसलाआस्तिकमुनी॥ मातावोलेसद्गदहोउनी॥ ह्मणेबंधूवांचवींयेक्षणी॥ मातुळतुझेसुपुत्रा॥ ३२॥ अ
वघेसर्पभिव्वोन॥ आस्तिकासआलेशरण॥ भक्तांसधांवेरमारमण॥ तैसाधावेयेकाळीं॥ ३३॥ मगआस्तिक
ऋषीराणा॥ धांवतवेगेंसर्परक्षणा॥ मनोवेगेंसत्वरजाणा॥ सर्पसत्रींपावला॥ ३४॥ तपोतेजआंगींप्रचंड॥ जे
साउदेलाप्रळयमार्तंड॥ द्वारपाळआडदंड॥ घालूंनशकतीमहाभयें॥ ३५॥ आंत आलाआस्तिकमुनी॥ दे
खिलासमस्तऋषीनीं॥ जैसाउगवलावासरमणी॥ तपोधनतेजस्वी॥ ३६॥ बळिचेद्वारींयेउन॥ उभाठाकला

जैसावामन ॥ तैसा आस्तिक दिव्यवामन ॥ तेजनमायेमंडपीं ॥ ३७ ॥ बोल्का जैसा अंगिरासुत ॥ उचलोनियां
वरदहस्त ॥ स्कती आशीर्वाद वदत ॥ ऋषीतटस्थपाहती ॥ ३८ ॥ यज्ञनारायणातुजनमन ॥ सकळब्रह्मवृंदमाझें दे
वतार्चन ॥ तुम्हंचेंमंत्रसामर्थ्यदारुण ॥ ब्रह्मांडनूतनकराल ॥ ३९ ॥ कुरुपांडवकुळवर्या ॥ आशीर्वादतुजजन्मेजया
धन्यसामर्थ्यप्रतापसूर्या ॥ शत्रुनक्षत्रेंविध्वंसिलीं ॥ ४० ॥ तुष्टिपुष्टीऐश्वर्यपूर्ण ॥ आयुष्यवृद्धी धर्माचरण ॥ शांति-
क्षमाविष्णुपूजन ॥ वर्धमानहोकांसदां ॥ ४१ ॥ यशकीर्तीऔदार्यभजन ॥ आनंदसद्विवेकसमाधान ॥ क्षेत्रदयाउप
रतीस्थान ॥ वर्धमानहोसदां ॥ ४२ ॥ निर्दोषाचेकोश ॥ भरोतअक्षयीनिर्दोष ॥ माझेंवांछितनिःशेष ॥ होउसंपूर्णतु
झेनी ॥ ४३ ॥ तथास्तुऐसेंत्रिवार ॥ बोलतीसर्वऋषेश्वर ॥ आस्तिकह्मणेधन्यराजेंद्र ॥ सार्थककेलेंजन्माचे ॥ ४४ ॥
पूर्वीजाहलेबहुतयाग ॥ परीतृप्तयेथेंचत्वारिशृंग ॥ पडलेंनाहींकाहींव्यंग ॥ आश्चर्यथोरजाहलें ॥ ४५ ॥ बुद्धीस
उपमेबृहस्पती ॥ वैखरीससरस्वती ॥ तेजस्वीपणेंगभस्ती ॥ पवित्रपणेवैश्वानर ॥ ४६ ॥ दंडाविषयींतमारिसुत
लोकरक्षणींइंदिराकांत ॥ राजरचनाधनबहुत ॥ यक्षपतीदूसरा ॥ ४७ ॥ ऋषीजैसाव्योमकेश ॥ लोकरक्षणींस
त्यलोकेश ॥ सभेबैसतांअमरेश ॥ जन्मेजयाशोभसी ॥ ४८ ॥ भार्गवदाशरथीभीष्मद्रोण ॥ धनुर्धरकिरीटीअभि
मन्य ॥ तैसाधनुर्विद्याप्रवीण ॥ जन्मेजयातूंएक ॥ ४९ ॥ वाल्मिकविश्वामित्रवसिष्ठ ॥ दधीचिअगस्तीअत्रीवरि
ष्ठ ॥ तयांसमानस्पष्ट ॥ धैर्यतपतुझेंअसे ॥ ५० ॥ उपमन्युभगीरथभरत ॥ प्रयत्नाविषयींतैसातूंसत्य ॥ देवकीतन
यभीमहनुमंत ॥ तूंबळेंयेकतैसा ॥ ५१ ॥ वयेंदिसशीबाळक ॥ परीप्रतापेंभरलासर्वलोक ॥ धाकटेदिसतीचंद्रा
र्क ॥ परीप्रतापआगळा ॥ ५२ ॥ जन्मेजयह्मणेभाग्यअद्भुत ॥ ऐसामहाराजआलामंडपांत ॥ परीतक्षकजाळू-
निवांछित ॥ पूर्णकरीनशेवटीं ॥ ५३ ॥ ह्मणोनिघातलेंकनकासन ॥ ह्मणेबैसेयेकक्षण ॥ आस्तीकह्मणेमनीका
रण ॥ धरोनियेकआलोंआहे ॥ ५४ ॥ तेंपूर्णकरीनवचन ॥ बोलमगमीबैसेन ॥ तोंबोलती समस्तब्राह्मण ॥ राया

वैसर्वीऋषीतें ॥ ५५ ॥ रावह्मणेममजनकभक्षक ॥ आधींभस्मकरीनतक्षक ॥ कींकोणीजाहलात्यासिरक्षक
त्यासहीतभस्मकरा ॥ ५६ ॥ मगमीरत्नराशीआणुन ॥ आस्तिकासीअभिषेकिन ॥ जेंमागेलतेंदेइन ॥ तनमन
धनराज्यहें ॥ ५७ विप्रह्मणतीपळालातक्षक ॥ त्याससहस्त्राक्षजाहलारक्षक ॥ ऐकतांकोपलानरनायक ॥ का
यबोलेतेधवां ॥ ५८ ॥ इंद्रासहतक्षकासी ॥ भस्मकरादोघांदुष्टांसी ॥ जोपरिक्षितीनृपासभक्षी ॥ त्यासरक्षीश
चिनाथ ॥ ५९ ॥ इंद्रासहिततक्षकाच ॥ स्वाहाह्मणतीऋषिवर्य ॥ सिंहासनासहितअमरराय ॥ ब्राह्मणींखाल
ताआणिला ॥ ६० ॥ ऋषीह्मणतीजन्मेजयाशी ॥ नरीचहेंकार्यपावेलसिद्धीसी ॥ समाधानकरोनिआस्तिकासी
वनकासनीपूजिजे ॥ ६१ ॥ तपसामर्थ्यअद्भुत ॥ आस्तिकदिवाकरमूर्तिमंत ॥ वरीन्चरक्षिलानिर्जरनाथ ॥ महिमाअ
द्भुतऋषींची ॥ ६२ ॥ मगभूभुजह्मणत ॥ ब्राह्मणांमागअपेक्षित ॥ तंवऋत्विजजननवलसांगत ॥ इंद्रेंतक्षकदव
डिला ॥ ६३ ॥ तुझायागलक्षून ॥ भयाभीतदशशतनयन ॥ तक्षकउत्तरीगुंडाळुन ॥ भिरकाविलाअंतरिक्षीं ॥
६४ ॥ अलातचक्रवतविरवार ॥ गगनींफिरतोदुराचार ॥ दक्षणेपासूनउत्तर ॥ इतुकाथोरपसरला ॥ ६५ ॥ स्फुसाटे
गर्जेगगनीं ॥ जाहलाउर्ध्वपुच्छअधोवदनी ॥ तोंआस्तिकेंउचलोनिपाणी ॥ तिष्ठतिष्ठवचनबोले ॥ ६६ ॥ ब्राह्मणह्मण
तीजन्मेजयासी ॥ आह्मींभस्मकरूंतक्षकासी ॥ तूंसन्मानोनिआस्तिकासी ॥ अपेक्षितदेईकां ॥ ६७ ॥ आस्तिका
सिरावह्मणत ॥ प्रसन्नजाहलोंमागइच्छित ॥ येरूह्मणेयागसमाप्त ॥ करावाआतांयेथुनी ॥ ६८ ॥ जाहलीआतांये
थूनिसिमा ॥ उरगनजाळीराजोत्तमा ॥ जाहलापुरुषार्थकरींक्षमा ॥ इतुकेंचआह्मांदेइजे ॥ ६९ ॥ जन्मेजयरवोंचला
अंतरीं ॥ माझातक्षकमुख्यवैरी ॥ त्यावेगळसर्वधरित्री ॥ राज्यतुलासमर्पिन ॥ ७० ॥ नकरीमाझायागरवंडण
घालितोंसहस्त्रलोटांगण ॥ आस्तिकह्मणेतूंपुण्यपरायण ॥ दुसरेंवचननबोलें ॥ ७१ ॥ सर्पासजिव्हादोनी ॥ एक
चिजिव्हातुझेवदनी ॥ सत्वशीळपुण्यरवाणी ॥ विटाळवाणीहोइल ॥ ७२ ॥ असेंमागणेंएवढेंएक ॥ आणीकमा

न॥ कीर्तीकल्याणतेणेंसदां॥९॥ इंद्रध्वजपूजाअव्हेरी॥ तोदारिद्र्यदुःखीजन्मवरी॥ पूजितीभावेंत्याचेमंदिरीं
पुरवीहत्रारिसंपदां॥१०॥ पृथ्वीचेंराज्यसंपूर्ण॥ तेचदिवसींसमर्पुन॥ स्वपदागेलापाकशासन॥ मित्रमनतो
षउनी॥११॥ प्रजापालनींपरमचतुर॥ यास्तवनामउपरिचर॥ त्यासजाहलेपांचपुत्र॥ नामेंपवित्रऐकपां
॥१२॥ ब्रहद्रथप्रत्यग्रहकुशांबसगुण॥ महाहत्तचौथापांचवामणिवाहन। पांचहीपुत्रइंद्रासमान॥ प्रतापगहन
नवर्णवे॥१३॥ वसुमतीनगरीपुढुन॥ शक्तमतीनदीवाहेजाण॥ तीसकामेपर्वतफोडुन॥ दुराग्रहेंभोगित॥
१४॥ कालाहलनामापर्वत॥ शक्तमतीनदीसभोगित॥ प्रवाहखुंटलासमस्त॥ उदककिंचितमिळेना॥१५॥ मृ
गयामिषेंशोधित॥ तेथेंपावलानृपनाथ॥ हाणोनियांसबळलात॥ कालाहलपर्वतफोडिला॥१६॥ जलप्रवाहजा
हलामुक्त॥ तवतेसरिताहोनिमूर्तिमंत॥ उपरिचररायासस्तवित॥ ह्मणेपुरुषार्थकेलातुवां॥१७॥ पर्वतवीर्यें
कुमरकुमरी॥ हीजन्मलीमाझेउदरीं॥ यांसिरायाअंगिकारी॥ परमसुंदरदोघेंही॥१८॥ शक्तमतीआपत्येंदेऊ
निदोघें॥ प्रवाहरूपेंचाललीवेगें॥ कन्येचेंस्वरूपदेखूनिअनंगें॥ मोहलातोनृपवर॥१९॥ गिरिकानामेंतीवेल्हाळ
रायेंपत्नीकेलीतत्काळ॥ बंधूतिचासबळ॥ सेनापतीतोकेला॥२०॥ सुंदरदेखोनिनृपनाथ॥ निजसंगेंबहुकाळ
रमत॥ एकदांतेअसतांऋतुस्नात॥ रावगेलामृगयेशीं॥२१॥ परमसुंदरउद्यान॥ छायेबैसलारावसुखघन
तोंगिरिकाआठवतांमन॥ अनंगानेंव्यापिलें॥२२॥ आठवीसुरतानंदसुख॥ वीर्यउसळलेंअधोमुख॥ क्षिती
नपडतांतत्काळिक॥ पर्णद्रोणीधरियेलें॥२३॥ ह्मणेस्त्रीघरींऋतुस्नात॥ तयेसहेंपाठवावेंत्वरित॥ श्येनपक्षा
जवळीदेत॥ आज्ञाकरीनरावत्यानें॥२४॥ गिरिकेसदेईहेंरेत॥ चंचूसधरूनपक्षीजात॥ तोंअनेकविहंगम
उन्मत्त॥ पाठीधांवतीतयाचे॥२५॥ हाएकपक्षीबहुत॥ युद्धकरितांसांडलेंरेत॥ तेंयमुनाजळींपडत॥ भक्षि
येलेंमत्सीनें॥२६॥ मत्सीउदरींगर्भवाढत॥ तोंमत्स्यघ्नेंतेधरिलीअकस्मात॥ मांसदेखोनिबहुत॥ विदारीत

तियेतें ॥ २७ ॥ तोंकुमरकुमरीदोघेंजण ॥ जावळींनिघाल्लीं सगुण ॥ उपरींघरासनेउवन ॥ भेटविलीं किरातीनें ॥ २८ ॥ सं
तोषलानृपनाथ ॥ बाळलेणींद्वेवींवित ॥ मत्स्यनामापुत्रआपणघेत ॥ कन्यादेतकैवर्तका ॥ २९ ॥ जिचेपोटीं दोघेंजन्मं
ली ॥ ती आद्रिकानामेंदेवांगनावाहली ॥ ब्रह्मशापेंमत्सीजाहली ॥ यमुनाजळींबहुकाळ ॥ ३० ॥ कुमरकुमरीउप
जतांजाण ॥ ते स्वर्गागेलीउद्धरोन ॥ असोरायेंमत्स्यपुत्रघेउन ॥ मत्स्यदेशींरावकेला ॥ ३१ ॥ कन्यादिधलीकैवर्तांप्रती
नावठेविलेंसत्यवती ॥ सौंदर्यासउणारोहिणीपती ॥ रतिदमयंतीदासीतिचा ॥ ३२ ॥ पितृआज्ञेनेंसुंदरी ॥ नौकार
क्षीयमुनेतिरीं ॥ परीजन्मलीतेमत्स्यउदरीं ॥ दुर्गंधीआंगींबहुत ॥ ३३ ॥ तोंतीर्थयात्राकरित ॥ पाराशरऋषीपात
लातेथ ॥ सत्यवतीचेसऊनिनौकेंत ॥ नेतीजालीपैलपार ॥ ३४ ॥ मध्यभागानौकाजात ॥ देखोनिपरमएकांत ॥ मन्म
थेंव्यापिलाशक्तिसुत ॥ विलोकीतनयेतें ॥ ३५ ॥ ह्मणेपद्मनेत्रेसुंदरी ॥ मजसींसुरतानंदेंक्रीडाकरीं ॥ मगबोलेमत्स्य
कुमरी ॥ विपरितकर्मकैंविकरूं ॥ ३६ ॥ प्राणींदेहविक्रित ॥ पुढेवरनयेसत्य ॥ भंगितांमाझेंकुमारत्व ॥ पुढेंअनर्थज
न्मवरी ॥ ३७ ॥ दिवसप्रथमप्रहरदेख ॥ उभयतटींपाहतीलोक ॥ रहस्यप्रकटेलतात्काळिक ॥ उपहासजन्मवरी ॥
॥ ३८ ॥ पितामाझाकैवर्तपाहीं ॥ त्याप्रार्थूनमजन्यूघेईं ॥ ऋषिह्मणेइतुक्याचेंकार्यनाहीं ॥ भोगदेईंआतांच ॥ ३९ ॥
दुर्गंधीदवडूनसमग्र ॥ सुवासीकेलेंतिचेंकलेवर ॥ भोंवताएकयोजनमात्र ॥ सुगंधसुंदरधावतसे ॥ ४० ॥ मजसीं
करितांसुरत ॥ तुझेंनमोडेकुमारत्व ॥ पुढेंरावबरीलयथार्थ ॥ वचनसत्यजाणपां ॥ ४१ ॥ मनांतह्मणेसुंदरी ॥ ह्याकें
वळईश्वरनिर्धारी ॥ सुरतयुद्धानेंअवसरी ॥ प्रवर्तलींदोघेंजणें ॥ ४२ ॥ मनोरथकरूनपूर्ण ॥ निघालाशक्तीचानंदन
उदयाचळींउगवेसहस्रकीर्ण ॥ तैसापुत्रजन्मला ॥ ४३ ॥ षड्गुणऐश्वर्यसुक्त ॥ जन्मलेव्यासप्रतापवंत ॥ ज्याचेज्ञाना
सहीअंत ॥ जोविख्यातत्रिभुवनीं ॥ ४४ ॥ एकमुखवाचाब्रह्मदेव ॥ कींकेवळद्विबाहूरमाधव ॥ कींआभाळलोचनशि
व ॥ स्वयमेवअवतरला ॥ ४५ ॥ जोवसिष्ठाचापणतूहोय ॥ शक्तीचापुत्रनिश्चय ॥ त्यापाराशरसुताचेंपाहे ॥ महत्व

कोणवर्णील ॥ ४६ ॥ ऐसा तो शक्तात पूर्ण ॥ सत्यवतीचें उदररत्न ॥ जगद्गुरु कृष्णाद्वैपायन ॥ यमुनाद्वीपीं जन्मला ॥
४७ ॥ वेदशास्त्रें पुराणें बहुत ॥ चतुर्दशविद्याकलासमस्त ॥ सर्वविद्यासांगअवगत ॥ उपजतांच महाज्ञानी ॥ ४८ ॥
जननीस नमस्कार करून पाहीं ॥ ह्मणे तपा जावया आज्ञा देई ॥ सत्यवती ह्मणे ते समई ॥ तृप्ती नसे तुज पाहतां ॥ ४९
तुझा पाहतां वदनचंद्र ॥ नृत्य करी मानसचकोर ॥ व्यास ह्मणे स्मरतां च सत्वर ॥ येईन मी तुज पाशीं ॥ ५० ॥ ऐसा दाऊ
न संकेत ॥ योगमार्गें गेला गुप्त ॥ नाहीं मोडलें कुमारत्व ॥ सुखी जाहली सत्यवती ॥ ५१ ॥ ज्याचे मुखकमळापासून ॥ नि
द्रसद्रव्ला परिपूर्ण ॥ त्या वाङ्मयामृतें करून ॥ त्रिजग पूर्ण धालें हो ॥ ५२ ॥ वेदार्थ केला सुगम ॥ ह्मणोन वेदव्यास नाम
की वेदाब्जविकाशक परम ॥ भास्कर व्यास जन्मला ॥ ५३ ॥ पंचमवेद भारत ॥ शिष्य वत्सालागीं देत ॥ पैल स्ती जैमि
नी सुमंत ॥ गालव आणिक संजय ॥ ५४ ॥ साहवा शुक निजसुत ॥ ज्ञानी केला अद्भुत ॥ जेणें श्रवण करउनि भागवत
परिक्षिती उद्धरिला ॥ ५५ ॥ इतुक्या जाहल्यागत कथा यथार्थ ॥ जन्मेजयराव पुसत ॥ आमचा पूर्वजांस भारत ॥ कां
ह्मणती सांगा तें ॥ ५६ ॥ यावरी बोले वैशंपायन ॥ कुरुवंशीं विख्यात पूर्ण ॥ दुष्यंतराव गुणनिधान ॥ चक्रवर्ती जन्मला
॥ ५७ ॥ प्राचीप्रतीची उत्तरदक्षिण ॥ चारी दिशा आक्रमुन ॥ पृथ्वीचें राज्य संपूर्ण ॥ आज्ञेत चालवी राव तो ॥ ५८ ॥ नवखं
डछपन्नदेश ॥ सप्तद्वीपींचे लोक निःशेष ॥ दुष्यंतराजा निःर्दोष ॥ धनें वसनें तो पवी ॥ ५९ ॥ ज्याचे भाग्याची गणणा ॥
न व्हे कदां सहस्रनयना ॥ सौंदर्या समदन उणा ॥ देवराणा दुसरा तो ॥ ६० ॥ अधर्माची वार्ता ॥ राज्यांत नाहीं नव्हता ॥
दुःखदारिद्र रोग पाहतां ॥ कोणा सहि न सेचि ॥ ६१ ॥ यथाकाळीं वर्षे घन ॥ सुखरूप नांदती चारी वर्ण ॥ वेदघोषें गर्जती
ब्राह्मण ॥ चर्चा करिती शास्त्राची ॥ ६२ ॥ वर्णूं काय आतां बहुत ॥ विष्णुसमान तो रावदुष्यंत ॥ षड्गुणैश्वर्यमंडित
प्रतापसूर्य तेजस्वी ॥ ६३ ॥ बळें प्रबळ तो सबळ ॥ उपडूं न शके मंदराचळ ॥ दुष्टदंडणीं प्रत्यक्ष काळ ॥ उदर मेघासा
रिखा ॥ ६४ ॥ वेदशास्त्रीं निपुण बहुत ॥ धनुर्वेदपारंगत ॥ नानावहनीं बैसोनि फिरत ॥ नसे अंत विद्येसी ॥ ६५ ॥

दुष्यंतरावमृगयेसी ॥ निघालावेगेंदळभारेसी ॥ समुद्रफुटेतैशी ॥ सेनाचालेसांगातीं ॥ ६६ ॥ चातुरंगदळअद्भुत ॥ मिर
वतजातसेदुष्यंत ॥ नारीनरगोपुरींपाहत ॥ ह्मणतीमन्मथदूसरा ॥ ६७ ॥ तंतवितंतघनसुस्वर ॥ वाद्येंवाजतीअपार ॥
चंडपर्वतथोरथोर ॥ उल्लंघूनजातसे ॥ ६८ ॥ नानावृक्षमंडित ॥ वनेंउपवनेंदेखेबहुत ॥ ऋषींचेंआश्रमविलोकि
त ॥ दर्शनेंघेतजातसे ॥ ६९ ॥ दुष्टसावजेंअपारवधित ॥ येताजाहलाकश्यपारण्यांत ॥ कण्वऋषीचेंआश्रमांत
प्रवेशलाराजेंद्रतो ॥ ७० ॥ तोंकोणीनदिसेसमोर ॥ मगगंभीरगर्जेनृपवर ॥ ह्मणेआश्रमींअसेकायऋषेश्वर ॥ प्र
तिउत्तरनदेकोणी ॥ ७१ ॥ तोंलावण्यामृतसरिता ॥ बाहेरआलीऋषीदुहिता ॥ कींतीशांतकुंभदिव्यलता ॥ सुगंध
रवाणीपद्माक्षी ॥ ७२ ॥ वैकुंठवनितारमा ॥ तिचीदुसरीअपारप्रतिमा ॥ कींसरस्वतीआणिउमा ॥ उपमाद्यावीत
यांची ॥ ७३ ॥ रूपयौवनचातुर्यखाणी ॥ मंडितदिव्यकनकाभरणी ॥ राजेंद्रासीसन्मानुनी ॥ आसनदेतबैसा
वया ॥ ७४ ॥ स्वागतपुसोनिसमस्त ॥ अर्घ्यपाद्यविधीपूजित ॥ रावतोषलामनांत ॥ ह्मणेहेमंडितसर्वगुणी ॥ मग
बोलतेकामिनी ॥ राजचक्रचूडामणी ॥ तुमचेनावऐकावेंश्रवणी ॥ ऐसेंमनीवाटत ॥ ७६ ॥ स्नेहदिसतोबहुत ॥ अं
तरशब्देंजाणावासमस्त ॥ मगबोलेरावदुष्यंत ॥ वचनेंतृप्तजाहलों ॥ ७७ ॥ सुलक्षणचातूर्यखाणी ॥ मैंथुळीनरं
द्रविख्यातत्रिभुवनीं ॥ त्याचापुत्रमीसुलक्षणी ॥ दुष्यंतरावनाममाझें ॥ ७८ ॥ कण्वऋषीचेंदर्शनघ्यावें ॥ ह्मणो-
निआलोंसद्भावें ॥ केव्हांयेतीलबोलावें ॥ सुवदनेपिकस्वरे ॥ ७९ ॥ शकुंतलाह्मणेनृपनाथा ॥ फळेंआणावयागे
लापिता ॥ तोयेईलआतां ॥ विलंबकाहींनलागे ॥ ८० ॥ यालागींनृपकुलावतंसा ॥ क्षणभरतुह्मीस्वस्थबैसा ॥ इ
छाअसेलजेमानसा ॥ परिपूर्णहोईलते ॥ ८१ ॥ देखोनिपरमएकांत ॥ राजासजाचीमन्मथ ॥ पुनःतीसरावबोल
त ॥ चातूर्यपणेंएकांतें ॥ ८२ ॥ रावह्मणेसद्गुणखाणी ॥ ऊर्ध्वरेताकण्वमुनी ॥ त्यांसतूंजाहलीसनंदिनी ॥ प्रगटवच
नकरीते ॥ ८३ ॥ मगचातूर्यसरोवरमराळी ॥ ह्मणेएकांतपस्वियाजवळी ॥ कण्वेंकथासांगीतली ॥ तेआतांपरिसा

वी ॥ ८४ ॥ जेमीमनीं धरिली पूर्ण ॥ ते चतुजमी सांगेन ॥ पूर्वी विश्वामित्र गांधीनंदन ॥ तपदारुण तेणें केलें ॥ ८५ ॥ तप
पुण्याचळ वाढे अद्भुत ॥ त्यापुढें मेरू ठेंगणा दिसत ॥ पुरंदर चित्तीं चिंताक्रांत ॥ मग प्रेरी मेनिके तें ॥ ८६ ॥ ह्मणे जाऊनि तूं
सुंदरी ॥ कौशिक तपाचा क्षय करीं ॥ मी पुरवीन सामग्री ॥ जैं जें इच्छिसी मानसें ॥ ८७ ॥ येरी ह्मणे विश्वामित्र ॥ तप
स्वियामाजि अतिपवित्र ॥ भूमंडळीं अपरमित्र ॥ उदयास्तरहित तो ॥ ८८ ॥ हा प्रतिसृष्टीचा धाता पूर्ण ॥ शापें भस्म
करील त्रिभुवन ॥ मग बोले सहस्रनयन ॥ आधीं करणें येवढें ॥ ८९ ॥ वस्त्रें अलंकार मंडित ॥ मेनिका आली कौशिका
रण्यात ॥ ऋषीसन मूनि त्वरित ॥ नृत्यकौतूक कळा दावी ॥ ९० ॥ वस्त्रें ठेऊनि तीरीं ॥ नग्न होउन स्नान करी ॥ सर्वोचि आ
ली बाहेरी ॥ वस्त्र घ्यावया कारणें ॥ ९१ ॥ तों मळयाचळ सुगंधधावत ॥ वस्त्रांत उडवूनि नेत ॥ येरी नाचत चमकत ॥
धांवे वस्त्र धरावया ॥ ९२ ॥ वामहस्त कामसदनी ॥ झांकोनि धावे लावण्यखाणी ॥ मृगेंद्रकटी कुरंगनयनी ॥ विलोकिली
तें कौशिकें ॥ ९३ ॥ विसरला वैराग्य ज्ञान ध्यान ॥ धांवोन देत आलिंगन ॥ सुरतानंदें दोघें जाण ॥ क्रीडत येकांतीं मनेच्छा
९४ ॥ बहु काळें तीस भोगिन ॥ तेव्हां जाहला वीर्यपात ॥ मग ऋषी सावध होत ॥ तपास ह्मणे आचवलों ॥ ९५ ॥
कौशिक चालिला तपाप्रती ॥ मेनिका जाय स्वर्गा निरुती ॥ वाटे सहिमाचळ पर्वती ॥ गर्भ टाकी तत्काळ ॥ ९६ ॥ क
न्या सुलक्षण सुंदर ॥ टाकोनि जायती निष्ठुर ॥ पक्षी मिळोनि समग्र ॥ पक्षछाया वरी करिती ॥ ९७ ॥ मधुर स आणो
नि स्नेह मेळी ॥ मुखीं घालिती क्षुधाकाळीं ॥ कोणी श्वापदें येतां जवळी ॥ झडपोन दवडिती आवेशें ॥ ९८ ॥ तों कण्व
ऋषी आला तेथ ॥ देखे बाळ रक्षिती शकुंत ॥ उचलोनि वो संगा घेत ॥ गृहा आणोनि प्रतिपाळी ॥ ९९ ॥ शकुंतीं रक्षीली
यथार्थ ॥ शकुंतळा नामें पिता बाहत ॥ पालन केलें आजपर्यंत ॥ ऐसा वृत्तांत असे हा ॥ २०० ॥ मनी ह्मणे राव दुष्यंत ॥
हे स्वर्गींची अप्राप्त वस्त ॥ मज होईल जरी प्राप्त ॥ नाहीं अंत भाग्यातें ॥ २०१ ॥ दुष्यंत ह्मणे नितंबिनी ॥ तूं लावण्यर
त्नखाणी ॥ तुज वास ऐशिया काननी ॥ योग्य न वाटे तत्वता ॥ २ ॥ लाज सांडूस कळी ॥ मज वरिसी ये काळीं ॥ कीर्ती

वाटेलयाभूमंडळीं॥पट्टराणीतूंसाच॥३॥देवांदुर्लभपदार्थ॥तेतेसदनीं आहेतयथार्थ॥पृथ्वीचीस्वामिनीयथार्थ॥
होशीलआजपासुनी॥४॥अष्टविवाहामाजीजाण॥उत्तमतेंगांधर्वलग्न॥जरीघेईलतुझेंमन॥तरिमाळघालीकां॥
॥५॥मगह्मणेशकुंनळा॥यथार्थबोलसीभूपाळा॥परित्यासनसांगतांयेवेळां॥व्यभिचारकर्मदिसेहें॥६॥तरिक्ष
णभरीराहेंनत्वता॥आश्रमायेईलमाझापिता॥त्यासमागोनकरींकांता॥नृपनाथागुणालया॥७॥येरूह्मणेमन॥
आपणावडीलआहेपूर्ण॥आदिमध्येंअंतीजाण॥आपलाआपणसांगाती॥८॥शकुंतळाविचारीमनी॥हागेलि
यावरीयेथुनी॥दृष्टीनपडेपुन्हःनयनीं॥बहूततपेसाधितां॥९॥मगहास्यवदनेंबोलत॥मजभाष्यद्यावीयथार्थ॥
माझेपोटींहोईलसुत॥राज्यछत्रत्यासद्यावें॥१०॥दुष्यंतउचलोनहात॥त्रिवारतिशीभाष्यदेत॥तूंपट्टराणीयथा
र्थ॥तुझापुत्रछत्रपती॥११॥हेंमाझेंसत्यवचन॥उल्लंघूंनशकेविधिईशान॥मगशकुंतळामाळघालुन॥अनुसरली
तयासी॥१२॥संपूर्णझालेंस्फुरत॥गर्भराहिलाउदरांत॥ऋषिभयेंरावजात॥मगबोलेतयेसि॥१३॥देऊनिआलिंगनचुंब
न॥ह्मणेतूजन्यावयापाठवीन॥छत्रेंचामरेंशिबिकायान॥तुजपाठवीनन्यावया॥१४॥रावनिघेवेगेंकरून॥तीजविषयीं
गुंडाळतमन॥परिकण्वभयवाटेदारुण॥शापीलयेउनीमहाऋषी॥१५॥गेलेपाहूनिनृपाळा॥सद्गदहोयशकुंतळा॥तोंक
ण्वऋषीआश्रमाआला॥घरांतअबळालपतसे॥१६॥ऋषीनेंजाणिलेंदिव्यदृष्टी॥दुष्यंतासिपडलीगांठी॥संतोषोनियां
पोटीं॥आश्वासीतकन्येतें॥१७॥मनींनधरावीआन॥उत्तमझालेंगांधर्वलग्न॥येरीधांवेधरीचरण॥वर्तमानसांगतसे॥
१८॥कण्वपरमआनंदत॥पुरलेमाझेमनोरथ॥तुझाभ्रतारआयुष्यवंत॥तुजसहीतसुखीअसो॥१९॥ब्रह्मानंदह्मणे
श्रीधरा॥पुढेंकथारसाळफार॥श्रवणाकेरोतपंडीतचतुर॥शकुंतळाआख्यानहें॥२०॥सुरसपांडवप्रतापग्रंथ॥आदि
पर्वव्यासभारत॥त्यांतीलसारांशयथार्थ॥तृतीयोध्यायींकथियेला॥२१॥इतिश्रीपांडवप्रतापग्रंथ॥आदिपर्वटीका
श्रीधरकृत॥व्यासजन्मशकुंतळादुष्यंत॥यांचेंचरित्रकथियेलें॥२२॥ ॥इतिपांडवप्रतापेतृतीयोध्यायःसमाप्तः॥ ॥

श्रीगणेशायनमः॥ ॥ श्रीसरस्वत्यैनमः॥ ॥ महाराजकण्वऋषी॥ आशिर्वाददेतकन्येसी॥ तुजपुत्रहोई
ललावण्यराशी॥ जोवंशासिकुळभूषण॥ १॥ शकुंतलाजाहलीगर्भिणी॥ गर्भवाढेत्वरेकरूनी॥ जैशाशुक्लपक्षीं
रोहिणी॥ रमणकळावाढत॥ २॥ पूर्णभरतांनवमास॥ पुत्रजन्मलाडोळस॥ जैसाउदेलाबाळचंद्रांश॥ तैसाप्रका
शनयाचा॥ ३॥ कन्यापुत्रदेखोनिअभिनव॥ जातकर्मादिकरीकण्व॥ भरतऐसेंनाव॥ ठेविलेंतेव्हांऋषीनीं॥ ४॥
अजानबाहूअतिसरळ॥ आकर्णनेत्रविशाळभाळ॥ कींसौंदर्यआटोनिसकळ॥ एकेचठायींगोठलें॥ ५॥ बत्तीस
लक्षणींडोळस॥ सामुद्रीकलक्षणेंविशेष॥ कण्वऋषीसांगेआत्मजेस॥ भविष्यार्थतयाचा॥ ६॥ सागरांतपृ
थ्वीसमस्त॥ हाचिहोईलनृपनाथ॥ याचेंनावेंभारत॥ वंशपुढेंम्हणवितील॥ ७॥ साहावर्षेंजाहल्यावरी॥ पारधी
खेळेवनांतरी॥ व्याघ्रसिंहकुंजरहारी॥ धरोनिआणीजिवं॥ ८॥ ठेवीमहावृक्षाबांधुन॥ मगत्यांवरीकरीआरो
हण॥ पिटितसेरानोरान॥ तटस्थब्राह्मणपाहती॥ ९॥ दुसरेंनामाभिधान॥ ब्राह्मणठेवितीसर्वदमन॥ धनुष्य
कोटीनेबोढुन॥ गंगाआणीसुरडोनी॥ १०॥ पर्वतबळेंलोटोनियां॥ समानभूमीकरीहिंडावया॥ जेमनुष्यासनव्हे
चर्या॥ देवकर्मेंकरीतसे॥ ११॥ मनांतविचारीकण्वऋषी॥ हाभेटवावापित्यासी॥ युवराज्यद्यावेंयासी॥ दिग्विज
यकरीलहा॥ १२॥ भेटतीलपितापुत्र॥ आत्मजापाहेलभ्रतार॥ इतुकेनउत्तीर्णसमग्र॥ आह्मींजाहलोंनिश्चयें॥
१३॥ वनितांसुंदरतरुण॥ पितृगृहींवसतांबहुदिन॥ लोकनिंदेचेवाग्बाण॥ हृदयींपूर्णखोंचती॥ १४॥ ब
हूकाळमाहेरींराहत॥ विहितकर्मेंजरीवर्तत॥ तरीलोककुश्चितबहुत॥ काजळलावितीमुखानें॥ १५॥ स्त्रियांसि
मुक्ततापाहीं॥ विचरतांकदांदोषनाहीं॥ संग्राममंडळींयागगेहीं॥ विवाहयात्रासर्वतीर्थें॥ १६॥ पिताश्वशुरप
तीअसतांजवळी॥ चिताभूमीउत्साहमेळी॥ मांगल्यकर्मेंशास्त्रेंबोलली॥ दोषनाहींविचरतां॥ १७॥ स्त्रीपुरुष
एकचित्त॥ गृहस्ताश्रमींवर्तत॥ दोघांसहीदयाबहुत॥ सदांचित्तधर्मावरी॥ १८॥ जेकांस्त्रियाधर्मानुकूल॥ ते

त्विपतिव्रतानिर्मळ ॥ त्यागृहींराहेघननीळ ॥ लक्ष्मीसहितसर्वदां ॥ १९ ॥ भ्रताराचेंभाग्यदेखती ॥ लटकीप्रीतीवरि
वरीदाविती ॥ ज्यावदाळाअत्यंतकरिती ॥ भ्रतारासीवचनार्थ ॥ २० ॥ एकतोंडाळअत्यंत ॥ पतीदेखतांक्षोभेमनां
त ॥ एकसदामलीनबहुत ॥ तिचात्यागअवश्यकीजे २१ ॥ अखंडज्याक्रोधमुखी ॥ दुर्भगाकुश्चळानष्टएकी ॥ गृहीं
सर्वअसोनदैन्यभाकी ॥ तिचात्यागअवश्यकीजे ॥ २२ ॥ करीभ्रताराचीनिंदा ॥ जीपरगृहींवसेसर्वदा ॥ जीचेबोल
ण्यासनाहीमर्यादा ॥ तिचात्यागअवश्यकीजे ॥ २३ ॥ जारजारिणीचीसंगतीधरी ॥ मनाआवडेतेथेंनिद्राकरी ॥ ए
कलीमार्गचालेदुराचारी ॥ तिचात्यागअवश्यकीजे ॥ २४ ॥ चिरेंउत्तमअळंकार ॥ घेउनिसदांकरीश्रृंगार ॥ उदकीं
रूपपाहेवारंवार ॥ तिचात्यागअवश्यकीजे ॥ २५ ॥ भलत्यासींकरीएकांतगोष्टी ॥ जारन्याहळीसदांदृष्टी ॥ स्व
खमानीपतीहोतांकष्टी ॥ तिचात्यागअवश्यकीजे ॥ २६ ॥ सदांउघडेपयोधर ॥ सर्वेचिहांसेझांकोनिपदर ॥
निरियासरसावीवारंवार ॥ तिचात्यागअवश्यकीजे ॥ २७ ॥ स्त्रीकेवळअविद्यापसारा ॥ महाअनृताअविचा
रा ॥ केवळअसत्याचाथारा ॥ भयनधरीपापाचें ॥ २८ ॥ स्त्रीअनर्थाचेंगृहसबळ ॥ कींतेंमहाकलहाचेंमूळ ॥ कीं
विषवल्लीचकेवळ ॥ स्त्रीरूपेंविस्तारली ॥ २९ ॥ कींतेकामाचीविशाळदरी ॥ कींपापसमुद्रलहरी ॥ क्रोधव्याघ्रा
चीजाळीखरी ॥ भाजनचिअसत्याचे ॥ ३० ॥ कींदुःखवृक्षाचेंश्रेष्ठफळ ॥ कींमदाचापर्वतसबळ ॥ कींतेंम-
त्सरवनकेवळ ॥ किंवाभ्रांतीअवतरली ॥ ३१ ॥ कींदंभमूर्तिमंतप्रगटला ॥ कींअहंकारेंस्त्रीगडबांधिला ॥ सक
ळमूर्खलत्यास्थळा ॥ मिरासकरोनीराहिलें ॥ ३२ ॥ कींमूर्तिमंतभवव्याधी ॥ कींषड्रूर्मीचीभरलीनदी ॥ सकळ
विकाराचीमांदी ॥ यात्नेसआलीत्याठाया ॥ ३३ ॥ कोणेंनिर्मिलीहेकुऱ्हाडी ॥ सबळपुण्यवृक्षतोडी ॥ अविश्वा
साचीबेडी ॥ जिवाचेपायींठोकिली ॥ ३४ ॥ कौटाल्यदंभसयुक्ता ॥ क्षमाशमचित्तविवर्जिता ॥ महामंत्राचेसा
मर्थ्या ॥ क्षणेहरीननकळेतें ॥ ३५ ॥ हेस्वर्गमोक्षार्गळासत्य ॥ दर्शनेंपुरुषाचेंचोरीचित्त ॥ स्पर्शबळेंवीर्यहरित

अप्सरीप्रत्यक्षकामिनी ॥ ३६ ॥ गौडीमाधवीपयोष्णी ॥ तीनमध्येंप्रगटजनी ॥ चौथेंमद्यतेकामिनी ॥ दुर्गंधीनाहा
णीपायाची ॥ ३७ ॥ स्त्रीस्वरूपाचीधरोनिदिवी ॥ महानर्काचीवाटदावी ॥ सज्ञानासहीभुलवी ॥ वनींहिंडवीवि
षयाचे ॥ ३८ ॥ काळेंहीदूतीपाठविलीदेखा ॥ चाळउनीनेतसेमहानर्का ॥ दुराविलेंमोक्षसुखा ॥ अधःपतनींपाडि
ले ॥ ३९ ॥ आतांअसोहाअनुवाद ॥ जरीकृपाकरीलगोविंद ॥ तरीचतुटेलभवबंध ॥ हृदयींबोधठसावे ॥ ४० ॥ दु
ष्टस्त्रियेसिकरणेंसंसार ॥ अज्ञानगुरूमूर्खपुत्र ॥ यजमानदरिद्रीकृपणमित्र ॥ सुख अणुमात्रनसेतेथें ॥ ४१ ॥
धनीनिर्बळशत्रुथोर ॥ वक्तातामसीश्रोतापामर ॥ अंधासांगतांपंथदुर्धर ॥ सुखअणुमात्रनसेतेथें ॥ ४२ ॥ खोटें
नाणेंमोडकेंशस्त्र ॥ अबद्धपुस्तकअशक्तीदानपात्र ॥ पढलेसमयींनाठवेशास्त्र ॥ तरीयशनयेकल्पांतीं ॥ राजा
कोपीअविचारीप्रधान ॥ भांडारीनस्करमोडकेंसदन ॥ शिष्यअभावीकुगुरूमलिन ॥ दुःखांतन्यूनकायतेथें ॥ ४४
पैशून्यवादीयाचाविश्वास ॥ पोहूंनेणेंत्याचीधरणेंकास ॥ रोगिष्टवैद्याचेओषधास ॥ नयेयशकल्पांतीं ॥ ४५ ॥ अ
सोहापाल्हाळबहुत ॥ लोकचर्यासांगीतलीकिंचित ॥ माझीकन्यागुणवंत ॥ लक्ष्मीभवानीसारिखी ॥ ४६ ॥ प
रिशिखाकेशदंत ॥ स्वस्थानीचशोभिवंत ॥ ह्मणोनिदुहितापुत्रसमवेत ॥ कुंजरपुरान्यावीहे ॥ ४७ ॥ वृद्धजुना
टतपोनिधी ॥ बहुश्रुतसत्यवादी ॥ पवित्रजनाचीधेउनमांदी ॥ स्वगृहाजायशकुंतला ॥ ४८ ॥ शकुंतलाआणिभर
त ॥ हस्तनापुराआलींत्वरित ॥ सभेबैसलासेनृपनाथ ॥ राजेबहूतयनवटले ॥ ४९ ॥ अकस्मातझळकेसौदामि
नी ॥ तैसीरायापुढेंकुमरयेउनी ॥ उभीठाकलीयेउनी ॥ पाहतीनयनींसभाजन ॥ ५० ॥ जयजयकारकरोनिऋ
षी ॥ आशिर्वाददेतीरायासी ॥ रायेंनमोनितयांसी ॥ सन्मानेंसीबैसविले ॥ ५१ ॥ परमसुंदरबाळभरत ॥ त्याप्र
तीशकुंतलासांगत ॥ नमस्कारकरींत्वरित ॥ पित्यालागींसुपुत्रा ॥ ५२ ॥ भरतलागलातत्काळचरणीं ॥ ह्मणेरा
जेंद्रासद्गुणखाणी ॥ पुत्रमांडीवरीघेउनी ॥ अवघ्राणीमस्तकातें ॥ ५३ ॥ वाटपाहिलीबहूदिवस ॥ परीनिष्ठुरस

मर्थाचें मानस॥ आतां गृहस्वामी आला गृहास॥ जैसा चंडांशप्रतापी॥ ५४॥ कण्वाश्रमीं येऊन॥ सुमुहूर्तीं लाविलें गांधर्वलग्न॥ वचनभाषाप्रमाण॥ दिधलें कीं मजलागीं॥ ५५॥ ऐसें शकुंतळा बोलत॥ रायें ओळखिली स्त्रीसुत॥ जाणूनि नेणतपणा घेत॥ क्रोधयुक्त बोलतसे॥ ५६॥ जारचोरकपटी धूर्त॥ हिंसक पातकी बहुत॥ करोनि नाहीं ह्मणतलों कानं॥ तैसा नृपनाथ जाहला॥ ५७॥ ह्मणे तूं कैंची कोण॥ आलीस कैंचा पुत्र घेऊन॥ कैंचें लग्नसंभाषण॥ कोणप्रमाण कोठें दिलें॥ ५८॥ माझ्या स्फुद्ददांस ठाउकें नाहीं॥ लग्न लागलें कोणे ठाईं॥ देव ब्राह्मण वन्हि पाहीं॥ साक्षी नाहीं सर्वथा॥ ५९॥ मज समान वय दाण॥ अल्पकाळेंच कोठून॥ कैंचा झाला नंदन॥ अप्रमाण सर्व ही॥ ६०॥ मज अणुमात्र ठाउकें नाहीं॥ आलीस तें शीघ्र मागुती जाईं॥ निर्लज्जे माघारी होईं॥ सोंग काय आणिलें॥ ६१॥ मज ला विशी अपेश॥ निर्दोषास ठेविशी दोष॥ डागला विशी यानावास॥ आलीस कैंची पापरूपे॥ ६२॥ तुझी भार्या ह्मणोन॥ गळीं पडशी येऊन॥ ऋषिसोयरे स्वजन॥ हसतील मज आतां॥ ६३॥ ऐसें बोलतां मेदिनीनाथ॥ शकुंतळा झाली संतप्त॥ तैशी प्रळयज्वाळा अद्भुत॥ ग्रासूं धांवे गगनातें॥ ६४॥ कंठ झाला सद्गदित॥ नयनीं वाहती अश्रुपात॥ ह्मणे धन्य तूं नृपनाथ॥ न्यायें सत्य बोलशी॥ ६५॥ जो सर्वांतर निवासी॥ आत्माराम आहे साक्षिसी॥ पापपुण्य कर्में परीक्षिसी॥ सदा रक्षिसी सद्भक्तां॥ ६६॥ वन्हीस न कळतां दीप लागला॥ जीवन न घालितां वृक्ष वाढला॥ ठाउकें नाहीं मना ला॥ पाप ऐसें न संचि॥ ६७ अंतरीं जाणोन यथार्थ॥ अन्यथा बळें प्रतिपादित॥ न करावें तें बळें करित॥ तरि अनर्थ जवळ आला॥ ६८॥ पुण्य जोडी तुझी समस्त॥ साक्ष करून ह्रदयस्थ॥ पंचभूतें साक्षी सत्य॥ अंतर्बाह्य व्यापिलीं॥ ६९॥ तुझें मन माझें साक्षिसी॥ माझें मन तुझें परीक्षेसि॥ जाणोनियां नेणता होसी॥ पाहें मानसीं भूभुजा॥ ७०॥ मी जाणता सर्वज्ञ॥ ह्रदयीं धडके अभिमान॥ सहस्रमुखी ह्मूननीचपूर्ण॥ कर्में करिसी त्या तुल्य॥ ७१॥ पाप करून नाना परी॥ ह्मणे मी पुण्यवंत बाहेरी॥ देवताचक्र साक्ष अंतरीं॥ तत्वरूप पाहतसे॥ ७२॥ कर्में घडती सत्यासत्य॥ चित्रगुप्त लिहिन समस्त॥ सा-

क्षीअसेजगन्नाथ॥ जयसत्यत्यापासिं॥ ७३॥ लटकेंबोलती पुरुषगोड॥ पुरविती आपुली चाड॥ बोलदावितील
टकेगाद॥ आत्मकार्यापूरते॥ ७४॥ पापाचेंभयधरिती॥ तेइहींपरत्रींजयवंतहोती॥ असत्यअनाचारेंवर्तती॥ कुं
भीपाकींपडतीते॥ ७५॥ कामधेनूचिंतामणी॥ घराआलीपुण्येंकरूनी॥ त्यासमाघारेंघालीलोटुनी॥ तरितोअ
भागीसहजचि॥ ७६॥ कुंभिनीपाळाऐकेंयथार्थ॥ माथांघेऊनीअसत्यपर्वत॥ केसाचदशीलपरत्रपंथ॥ अन्या
येंयेथेंवर्तोनि॥ ७७॥ जायासुंदरपतिव्रता॥ पुत्रसभाग्यभाविकज्ञाता॥ गुरूसर्वज्ञदयाळतत्वता॥ पूर्वपुण्येंहेंपा
विजे॥ ७८॥ शिष्यप्रज्ञावंतसप्रेमउदार॥ वक्ताक्षमावंतसुरसफार॥ पदलातेंसमर्थीआठवेशास्त्र॥ हेंपूर्वपुण्येंपा
विजे॥ ७९॥ कवितारसीकसाहित्यपरम॥ श्रोताप्रज्ञावंतसप्रेम॥ सत्पंथआणिसत्समागम॥ पूर्वपुण्येंपाविजे॥ ८०॥
कायाआरोग्यसुंदर॥ यजमानसभाग्यउदार॥ मित्रविश्वासीपवित्र॥ पूर्वपुण्येंपाविजे॥ ८१॥ नृपआणिन्यायवंत॥
अमात्यचतुरआणिपंडित॥ साधुविरक्तआणिभक्त॥ पूर्वपुण्येंपाविजे॥ ८२॥ तुझापुत्रतुझाअवतार॥ यशस्वी
परमबळसागर॥ बाळभावेंक्रीडतांसाचार॥ प्रतापअद्भुतकेलेबहु॥ ८३॥ तुझेंवीर्यसबळसत्य॥ त्यावरीकण्व
ऋषनेंगुरुत्व॥ प्रतापपाहाअद्भुत॥ पृथ्वीक्षणांतजिंकालहा॥ ८४॥ वडिलांचीमर्यादाभयधरून॥ उगाचिअसे
धरिलेंमौन॥ जैसायाज्ञिकांचेकुंडीकृशान॥ आच्छादूनटाकिला॥ ८५॥ हेसभाआणिराजेसमस्त॥ मशकप्रा
यत्यासदीसत॥ जैसेसूर्यापुढेंखद्योत॥ कींवासुकीपुढेंमशकपैं॥ ८६॥ पादघायेंकरून॥ जेणेंपर्वतकेलेचूर्ण॥
सिंहव्याघ्रजीतधरून॥ जेणेंबैसोनिफिरविले॥ ८७॥ धनुष्यकोटीनेवोढुनी॥ ऋषिआश्रमानद्याआणि॥ गोकु
ळींजैसाचक्रपाणी॥ बाळपणीकरीख्याती॥ ८८॥ हाहोईलपृथ्वीपती॥ धरींआपुलापुत्रहातीं॥ मीजातेंसें
कश्यपारण्याप्रति॥ सांगेनख्यातीपितयाला॥ ८९॥ पिताकण्वप्रळयाग्न॥ ब्रह्मांडटाकीलजाळून॥ जातेंज्य
वेंर्यापासून॥ चतुराननदुसरातो॥ ९०॥ जेणेंप्रतिसृष्टिकेलीनिर्माण॥ मेनिकास्वर्गींचेंदिव्यरत्न॥ तिचे-

ठायींकरितांवीर्यदान॥ हेंशरीरजाणजाहलें॥९१॥ भरतजन्मलाकुशी॥देववाणीझालीआकाशीं॥पृथ्वीप-
तीनेजोराशी॥शतमखकरीलहा॥९२॥ षड्गुणऐश्वर्यसंपन्न॥याचेनावेंवंशाभूषण॥भारतीराजेसंपूर्ण॥हें
अभिधानगाजेल॥९३॥ब्राह्मणकन्यामीसंपूर्ण॥मीतुजदिधलादेहदान॥झालासत्वरउत्तीर्ण॥जात्येंयेथून-
मींआतां॥९४॥ऐसेशकुंतलेचेबोलउत्तम॥दुष्यंतासलागतीतीव्रपरम॥ह्मणेस्त्रीहोऊनिअधम॥बहुभाषअ
निवारा॥९५॥भ्रष्टब्राह्मणपेटलाअग्न॥निर्लज्जस्त्रीचेंभाषण॥मातलागजक्षोभलासर्पजाण॥चतुराननआ
वरीना॥९६॥स्वर्गवेश्यामेनिकाजाण॥तिचेपोटींजाहलीनिर्माण॥जीसभोगीतीबहुजन॥संख्यानसेमोजितां॥
९७॥दर्पणबांधलेंनगरद्वारीं॥पाहतीसर्वकोणनिवारी॥गंगातिरींचेशिळेवरी॥आवडेतेणेंधुइजे॥९८॥साह्
णदेउळींरोविलीसे॥रवोडआणूनभलताचघांसे॥कागधांवतीजेसे॥नाळीकपशूदेखोनि॥९९॥देउळींबांधल
दोल॥येतांजातांबडवितीसकळ॥धर्मशाळेचेंउखळ॥मोकळेंसर्वांकांडावया॥१००॥मेनिकेचीवर्तणुक॥ऐशी
चजाणतीसर्वलोक॥तिचीहीकन्यादेख॥महानिःशंकानिर्लज्ज॥१॥यालागीउभयकुळपवित्र॥स्त्रीकरावीबोल
तीचतुर॥पिताइचाविश्वामित्र॥तोक्षत्रीयहोयजातीचा॥२॥ब्रह्महत्याकेल्याबहुत॥मारिलेवसिष्ठाचेशतसु
त॥तपोबळेंहट्टेंबहुत॥ब्राह्मणत्वमिरविलें॥३॥नटझालापरमहंस॥मेंदेंधरिलासाधुवेष॥तैसाकौशीकनिःशे-
ष॥क्षत्रीयब्राह्मणकळेना॥४॥नागविलातस्करीं॥तोउदासीहांवधरी॥तैसाविश्वामित्रगेलानिर्धारी॥तपो
धनसांचवावया॥५॥गर्भटाकूनहिमाचळीं॥मेनिकागेलीशक्राजवळी॥शकुंतींहेपाळिली॥नावपावलीश-
कुंतळा॥६॥तूंकोणाचीमीकोण॥गळांपडतीसदाटून॥त्यावरीतीबोलेवचन॥परमक्षोभानितेधवां॥७॥परा-
वेदोषबिंदूप्रमाण॥दाविसीसिंधूयेवढेकरून॥आपलेदोषपर्वताहून॥सबळपूर्णआठवेना॥८॥विश्वामित्रकेव
ळमित्र॥निर्दोषजेसाविनेत्र॥ज्याचेंस्मरणकरितांपवित्र॥दोषमात्रउरेना॥९॥देवपंक्तीतमेनिकामान्य॥जी-

समानितीशिवविधीनारायण॥ चौदालोकींजिचेंगमन॥ तिच्यासमानमींअसे॥ १०॥ यान्विदेहेंकरोन॥ येईनवै
कुंठपाहोन॥ चतुर्दशलोकभुवन॥ धांडोळीनक्षणार्धें॥ ११॥ तूंभूचरमानवविचक्षण॥ नेणसीमाझेंसामर्थ्यपू॰
र्ण॥ तिन्हीदेवसाक्षीसआणीन॥ तरीचकन्याकौशिकाची॥ १२॥ जोप्रतिसृष्टीचाधाता॥ तूंनिंदसीत्याविश्वामि
त्रा॥ मेनिकामान्यसहस्रनेत्रा॥ नीलगात्रामहेशा॥ १३॥ मागेंबोलावेंन्यून॥ समरींपळावेंउठोन॥ हेंनीचाचेंल॰
क्षण॥ विचक्षणनमानिती॥ १४॥ निर्नासीकआरसानपाहे॥ तोंवरीरूपाभिमानवाहे॥ ह्मणेमाझेंरूपासतुळ॰
णानये॥ रतीवरशोधितां॥ १५॥ मुक्ताफळसेवीराजहंस॥ क्षतउकरीवायस॥ दोषीयाचेदृष्टीनिर्दोष॥ कोणीजगीं
दिसेना॥ १६॥ तरिआतांकपटसांडुनी॥ पुत्रबैसवींअंकासनी॥ महापुण्येंकरूनी॥ पुत्रऐसाजन्मला॥ १७॥ शत॰
कूपनिर्जळवनीं॥ खणतांपुण्यउदकेंकरूनी॥ शतकूपांसमानमानी॥ एकवापिकानिर्धारें॥ १८॥ शतवापिके
चेंपुण्य॥ एकंकरितांमहायज्ञ॥ शतयज्ञांचेंफळतपूर्ण॥ एकसत्पुत्रजन्मतां॥ १९॥ शतपुत्रांचेंपुण्यसंपूर्ण॥ घडे॰
बोलतांसत्यवचन॥ सकळतीर्थांचेंअवग्रहण॥ सत्यवचनेंघडेहो॥ २०॥ ऐसेंबोलतांशकुंतळा॥ अश्रुधाराचा॰
लिल्याडोळां॥ कांत्याभूलिंगासनिर्मळा॥ गळत्यालाविल्याअधोपंथें॥ २१॥ अधरथरथरांस्फुरत॥ कंठदाटला
सद्गदित॥ ह्मणेहेशिवहेवैकुंठनाथा॥ सांभाळींसत्यसत्यपते॥ २२॥ तोंअकस्मातआकाशवाणी॥ देवबोलतीते
क्षणीं॥ ऐकतीसमस्तश्रवणीं॥ ब्राह्मणराजेमंत्रीही॥ २३॥ वर्षतीसुमनेंसंभार॥ आकाशवाणीगर्जेथोर॥ रेरे
दुष्यंतराजेंद्रा॥ ऐकेंसादरहोउनी॥ २४॥ शकुंतळामहासती॥ अपमानितांजाणभूपती॥ क्षोभूनियांहेजगती॥ द॰
ग्धकरीलक्षणार्धें॥ २५॥ अर्धांगीबैसवीमहासती॥ भरतपुत्रधरींहातीं॥ विकारमानसींचित्तीं॥ हरिहरशचीअ
पातूज॥ २६॥ ऐसेंऐकतांउत्तर॥ झालाएकचिजयजयकार॥ मगबोलेदुष्यंतनृपवर॥ ऐकासमस्तसभाजन॥
२७॥ हेस्त्रीमाझीसत्य॥ पुत्रओळखिलाभरत॥ परिलोकमानितीअसत्य॥ यालागींकृत्रीमबोलिलों॥ २८॥

प्रथमअंगीकारकरितांजाण॥ लोकठेवितीदूषण॥ आतांईश्वरसाक्षीप्रमाण॥ अंगीकारिलीमाझीसी॥ २९॥ रा-
वझालासद्गदित॥ धांवोनिकडेघेतसुत॥ वारंवारसुखचुंबीत॥ आनंदनमावेत्रिभुवनीं॥ ३०॥ कोणाचीदृष्टीला
गेलजाण॥ ह्मणोनिउतरींनिंबलोण॥ उत्तमवस्त्रओंवाळुन॥ याचकांसदीधल्या॥ ३१॥ फोडूनभांडारेंअपार॥ वि
प्रांसह्मणेराजेंद्र॥ आवडेतितुकींसाचार॥ द्रव्यरत्नेंनेइजे॥ ३२॥ शिरींकरूनिअवग्रहण॥ दिधलेंयुवराज्यसंपूर्ण॥
सकळराजेउभेराहून॥ भरतालागींवंदिती॥ ३३॥ प्रियेसिहातींधरून॥ गेलाअंतःपुरींघेऊन॥ प्रीतिदेऊनिआलिंग
न॥ समाधानकरीतीच्चें॥ ३४॥ सत्यप्रगटावयाकारणें॥ प्रियेबोललोंनिष्ठूरवचनें॥ तुवांविषादनधरावामनें॥ मा
झीआणतुजअसो॥ ३५॥ वस्त्राभरणेंदेउनी॥ गौरविलीआपुलीराणी॥ सकेळसंपदादाउनी॥ केलीस्वामिणीराज्या
ची॥ ३६॥ बोलिल्याबोलाहूनिअधिक॥ शकुंतळेसदिधलेंसुख॥ पट्टराणीहेप्रमुख॥ जैशीभवानीशिवाची॥ ३७
दुष्यंतरायाउपरी॥ भरतपृथ्वीचेराज्यकरी॥ याब्रह्मांडमंडपाभीतरी॥ ऐसादुसरानसेचि॥ ३८॥ पंचाशतकोटीयो
जन॥ पृथ्वीहेमाद्रिशृंगापासुन॥ सकळराजांवरीशासन॥ एकछत्रीराज्यकेलें॥ ३९॥ शतक्रतूकरूनसंपूर्ण॥ सुखी
केलेसर्वब्राह्मण॥ सहस्रपद्मेंदेऊनिधन॥ कण्वऋषीपूजिला॥ ४०॥ तपस्वीयांचाशिरोमणी॥ विश्वामित्र॥ त्यासदि
लासंपत्तिसागर॥ त्याचेवंशीतुह्मीनृपवर॥ भारतीवीरह्मणवितां॥ ४१॥ संपलेंहेंशाकुंतळ॥ यावरीआख्यानरसा
ळ॥ ब्रह्मानंदअभंगनिर्मळ॥ श्रीधरवरदकरवदाता॥ ४२॥ सुरसपांडवप्रतापग्रंथ॥ आदिपर्वव्यासभारत॥ त्यांती-
लसारांशयथार्थ॥ चतुर्थाध्यायींकथियेला॥ ४३॥ इतिश्रीपांडवप्रतापग्रंथ॥ आदिपर्वटीकाश्रीधरकृत॥ शकुंत-
ळाख्यानभरत॥ राज्याभिषेचनकथनकेलें॥ ४४॥ ॥इतिश्रीमहाभारतेटीकापांडवप्रतापादिपर्वेचतुर्थोध्यायः
॥४॥ ॥श्रीकृष्णार्पणमस्तु॥ ॥ध्र॥ ॥छ॥ ॥छ॥ ॥छ॥ ॥छ॥

श्रीगणेशायनमः॥ वैशंपायनह्मणेजन्मेजया॥ श्रवणकरीपवित्रराया॥ चतुराननापासूनियां॥ दाहवाय
यातीजाणिजे॥१॥ जन्मेजयह्मणेकथासमस्त॥ ऐकावयामीआर्तभूत॥ कर्णझालेक्षुधित॥ श्रवणभोजनदेइं
जे॥२॥ वैशंपायनह्मणेसावधान॥ देवांदैत्यांवैरसुळींहुन॥ इंद्रपदध्यावयाहिरोन॥ नानाउपायनिर्मिले॥३॥ यु
द्धकरितांअद्भुत॥ निर्जरजर्जरझालेसमस्त॥ अपारमृत्यूपावतीदैत्य॥ नाहींगणितसर्वथा॥४॥ जपूनमंत्रसं
जीवनी॥ शुक्रउठवीतेचक्षणीं॥ विबुधपडतीसमरंगणीं॥ त्यांचाउपायचालेना॥५॥ अमृतसंजीवनीपाहीं
बृहस्पतीसमंत्रनाहीं॥ पाकशासनाचेहृदयीं॥ चिंतारोगमवर्तला॥६॥ मगबृहस्पतीचापुत्र॥ कचनामाअ-
तिपवित्र॥ सद्गुणनिधीपरमचतुर॥ कार्यसाधनीनेटका॥७॥ त्यानेंएकांतींनेउनी॥ सांगतेझालेकुलिशपाणी॥
ह्मणेतूंशुक्रापासींजाउनी॥ संजीवनीसाधींकां॥८॥ थोरपणअभिमान॥ मीजाणतासर्वज्ञ॥ मीएकदेवगु
रुनंदन॥ हेंसर्वसोडूनदे॥९॥ परमप्रीतीधरूनिजीवीं॥ शत्रूचीमैत्रीकरावी॥ शुक्रासप्रार्थूनिविद्याध्यावी॥
अनालस्येंकरूनी॥१०॥ गुरुशुश्रूषाकरूनअपार॥ विद्यासाधितीचतुर॥ कींपुष्कळधनदेऊनिसाचार॥ वि
द्यासमुद्रशिष्यहोती॥११॥ अथवाआपलीविद्यागुरूसदेती॥ दुसरीत्यापासूनिसाधिती॥ याहूनिउपायनि-
श्चिती॥ विद्यासाधनींअसेना॥१२॥ नरीप्रेमभावेंकरून॥ कचीसनिघावेंतुवांशरण॥ नानाकष्टपीडासोसु
न॥ आपलेंकार्यसाधावें॥१३॥ तूंचातुर्यसिंधूयथार्थ॥ तुजकायशिकवावेंबहुत॥ आदित्यासप्रभाअत्यंत॥
पाडींह्मणावेंनलगेपैं॥१४॥ रंभेचेअंगींअद्भुत॥ पहिलाचसुवासअत्यंत॥ चंदनादिसुगंधबहुत॥ साह्यन
लगेदुसरेंपैं॥१५॥ नैसातूंचातुर्यभांडार॥ तुजनसांगणेंवारंवार॥ मगवाचस्पतीसकरूनिनमस्कार॥ आ-
ज्ञाघेतलीशक्राची॥१६॥ कचजातलरेंकरून॥ मार्गींझालेदिव्यशकुन॥ दैत्यपुरींतयेऊन॥ निःशंकमनचा-
लिला॥१७॥ सभाघनवटलीअपार॥ मुख्यवृषपर्वादैत्येंद्र॥ पूज्यत्याचागुरुशुक्र॥ उंचस्थळींबैसविला

॥१८॥ त्यासभेसकचयेऊन॥ जयजयकारमुखेंकरून॥ घालिनाझालालोटांगण॥ आदरेंकवीसनेधवां॥१९॥
उभाठाकलाकरजोडून॥ ह्मणेमी आहेंदेवगुरुनंदन॥ आलोंनिष्कपटतुजशरण॥ तनमनधनेंकरूनियां॥२०
मीविद्यार्थीतुझादीन॥ नीचसेवाअसेलपूर्ण॥ तीसांगावीकृपाकरून॥ आलोंशरणयालागीं॥२१॥ ब्रह्मच
र्यवानप्रस्थ॥ सहस्त्रवर्षेपरियंत॥ सेवाकरीननिश्चित॥ अनालस्येंप्रीतीने॥२२॥ विरोधअसेलवडिलांसी॥ तो
संमंधनाहींमजसी॥ मीनिष्कपटमानसीं॥ शरणकवीसपातलों॥२३॥ शरणआलोंजाणतुज॥ उपेक्षितांजाई
ललाज॥ मजदेवांसीनाहींकाज॥ पुत्रतुझामी आहें॥२४॥ कवीविचारीमनांत॥ हामनाच्यानिर्मळदिसत॥
येणेंसेवाकरितांअद्भुत॥ बृहस्पतीशिष्यआसुचा॥२५॥ पितातोचिपुत्र॥ येथेंनाहीं अन्यविचार॥ हीश्लाघ्यता
आह्मासथोर॥ शिष्यगुरुसुतआमचा॥२६॥ मगह्मणेवत्सापाहीं॥ ममगृहींतूंअवश्यराहीं॥ विद्याअभ्या
सीसर्वही॥ दुर्लभजीकांत्रिभुवनीं॥२७॥ दुर्वासुमनेंअग्रोदक॥ जळकाष्ठेंसमिधादेख॥ फळमूळपर्णादि
क॥ आणूनदेतनित्यपैं॥२८॥ सडासंमार्जनपादप्रक्षालन॥ वस्त्रेंधुणेंअंगमर्दन॥ व्यंजनपीकपात्रधरुन॥
उभाजवळीसर्वदा॥२९॥ वेदशास्त्रचर्चागहन॥ स्तुतिवादेंतोषवीमन॥ देवयानीनेंदेखोन॥ मित्रत्ववाढ-
वीकचासीं॥३०॥ भोजनतांबूलफळाहार॥ कचावेगळीनकरीसाचार॥ स्नेहवाढवीअपार॥ कोठेंदूरजाऊं
नेदी॥३१॥ पांचशतसंवत्सर॥ चढतीसेवाकरीगुरुपुत्र॥ देवयानीचीप्रीतीअपार॥ कचावरबैसली॥३२॥
धेनूघेउनीवनापाहीं॥ आचार्यआज्ञेंनित्यजाई॥ तोंदुष्टदैत्येंलक्षलाही॥ एकलावनींलक्षिला॥३३॥ ह्मण
तीहादेवगुरूचासुत॥ महाकपटीअसेधूर्त॥ संजीवनीसाधूंआलायेथ॥ लटिकेंसाधुत्वदाखवितो॥३४॥ म
गतीक्षणखड्गधारीं॥ मारूनटाकिलावनांतरीं॥ मांसभक्षिलेंवनचरीं॥ वृकव्याघ्रींजंबुकीं॥३५॥ अस्ताजातांग
भस्ती॥ धेनूपातलीगृहाप्रती॥ कचनदेखोनिचित्तीं॥ देवयानीकायकरी॥३६॥ पितयासीह्मणेदेवयानी॥

वनीं कचमारिलादैत्यांनी ॥ मीप्राणदेईनयेचक्षणीं ॥ कचमाझानभेटतां ॥ ३७ ॥ भृगुविचारीमनीं ॥ तोंकचमारि
लादैत्यानीं ॥ मांसभक्षिलेंश्वापदांनीं ॥ सर्वज्ञानींसमजलें ॥ ३८ ॥ मगसंजीवनीस्मरोनी ॥ ह्मणेवत्सायेधांवो
नी ॥ तोंअकस्मातकचयेउनी ॥ धरीचरणगुरूचे ॥ ३९ ॥ मंत्रासिनेजअद्भुत ॥ श्वापदउदरींचींखंडेंसमस्त ॥ ज-
डोनदेहझालापूर्ववत ॥ धन्यसामर्थ्यशुक्राचें ॥ ४० ॥ कचसांगेकविलागुनी ॥ दैत्यींमजवधिलेंवनीं ॥ दैत्यगुरू
ह्मणेतेचक्षणीं ॥ श्रमलासीबहुवत्सा ॥ ४१ ॥ सुमनेंआणावयागुरुसुत ॥ एकलागेलावनांत ॥ दैत्यदेखोनह्म
णत ॥ उठविलाकींकवीनें ॥ ४२ ॥ ह्मणेपुनःनउठेपुढती ॥ ऐसीकरावीआतांयुक्ती ॥ दैत्यींमारूनमागुती ॥ श-
रीरकेलेंभस्मत्याचें ॥ ४३ ॥ भस्मअस्थीकरूनिचूर्ण ॥ मद्यामाजीमेळऊन ॥ शुक्रासकरवितीप्राशन ॥ अतिमधु
रह्मणोनी ॥ ४४ ॥ दैत्यआनंदलेसंपूर्ण ॥ कचउठवावयाखुंटलायत्न ॥ देवांचेंबळझालेंक्षीण ॥ घेऊंहिरोनिइं-
द्रपद ॥ ४५ ॥ मावळलावासरमणी ॥ कचनदेखेदेवयानी ॥ पितयापासींयेउनी ॥ शोककरीबहुतपें ॥ ४६ ॥
शुक्रह्मणेमारिलादैत्यानीं ॥ मद्यांतघातलाघोंटुनी ॥ पुढतीनउठेमागुतेनी ॥ देवयानीरडेतेव्हां ॥ ४७ ॥ शुक्रह्म
णेरेवत्सा ॥ कोठेंआहेसबाळाकचा ॥ येरूह्मणेमीपुत्रसाचा ॥ नवउदरींवसतसें ॥ ४८ ॥ मीभाग्याचानिःशेष ॥ नव
उदरींझालावास ॥ ठावनाहींबाहेरयावयास ॥ विपर्यासकेलादैत्यीं ॥ ४९ ॥ कवीह्मणेकन्येलागुन ॥ कचउठवि-
तांमजलामरण ॥ मीवांचलीयाकचदर्शन ॥ नव्हेकदांतुजलागीं ॥ ५० ॥ तुजआवडेकोण ॥ मजसांगेंखरितवच
न ॥ देवयानीह्मणेहेंकठिण ॥ नव्हावेंमरणदोघांस ॥ ५१ ॥ आतांएककरींताता ॥ संजीवनीदेईगुरुसुता ॥ तोबा
हेरयेऊनितत्वता ॥ पुनःतुजलाउठवील ॥ ५२ ॥ शुक्रविचारीमनांत ॥ कचझालामाझासुत ॥ विद्याहेअद्भुत ॥
करावीप्राप्ततयातें ॥ ५३ ॥ कचनउठतांजाण ॥ देवयानीदेईलप्राण ॥ आतांसंजीवनीमंत्रसंपूर्ण ॥ शिकवावाक
चातें ॥ ५४ ॥ मगह्मणेगुरुतनुजाममसुता ॥ न्यासबीजासहितआतां ॥ संजीवनीमंत्रघेतत्वता ॥ अवश्यताताक

चह्मणे ॥ ५५ ॥ ब्रह्महत्याकरचांडाळ ॥ दैत्यक्षयपावतीसकळ ॥ मगकवेंद्रहोउनीदयाळ ॥ एकांतींसांगेसंजी
वनीं ॥ ५६ ॥ तुवांसेवाकेलीबहुत ॥ त्याचेंफळहेंतुजप्राप्त ॥ माझीविद्यासुफळहोसमस्त ॥ प्रेतेंउठवीदेवांचीं
॥ ५७ ॥ भगवतीउदरींदेख ॥ जैसाउपदेशिलाशुक ॥ कींगर्भींदैत्यबाळक ॥ नारदेंत्यासउपदेशिलें ॥ ५८ ॥ तैसी
संजीवनीतेसमयीं ॥ प्रतिष्ठिलीकचहृदयीं ॥ कींप्राणसखयाचेगृहीं ॥ ठेवणेंआपलेंदाविलें ॥ ५९ ॥ विद्यादिध
लीसमस्त ॥ ह्मणेकचाबाहेरयेत्वरित ॥ उठवींतूंमाझेंप्रेत ॥ संजीवनीजपोनी ॥ ६० ॥ मगबाहेरयेहृदयभेदुन ॥
उदयपावेरोहिणीरमण ॥ तैसाप्रगटलागुरुनंदन ॥ कवीअचेतनपडियेला ॥ ६१ ॥ कचसद्गदिततेवेळीं ॥ ह्मणे
धन्यतूंगुरुमाउली ॥ मगमंत्रजपोनितेकाळीं ॥ कविरावउठविला ॥ ६२ ॥ निद्रिस्थउठेअकस्मात ॥ तैसाउठिलागु
रुत्वरित ॥ कचधांवोनिचरणधरित ॥ प्रेमेंक्षालितनयनोंदकें ॥ ६३ ॥ उभाठाकलाकरजोडोन ॥ आरंभिलेंगु
रुस्तवन ॥ ह्मणेत्रिभुवनीचेंगुरुत्वसंपूर्ण ॥ एकवटलेंतुझ्याठायीं ॥ ६४ ॥ सकळगुरुरत्नपदक ॥ त्यांतवरिष्ठ
तूंमध्यनायक ॥ द्वादशगुरुत्वें असतीदेख ॥ स्वामीतूंऐकेंअनुक्रमें ॥ ६५ ॥ धातुर्वादीगुरूप्रथमजाण ॥ दुसरा
गुरूजाणिजेचंदन ॥ तिसराविच्यारगुरुपूर्ण ॥ अनुग्रहगुरूचवथापैं ॥ ६६ ॥ परिसगुरूपांचवा ॥ कश्यपजाणि
जेसाहवा ॥ सातवाचंद्रगुरूवोळखावा ॥ दर्पणआठवाजाणिजे ॥ ६७ ॥ नववाजाणिजेछायानिधी ॥ दाहवा
नादनिधीत्रिशुद्धी ॥ क्रौंचपक्षिणीऐसारूपानिधी ॥ अकरावातोवोळखें ॥ ६८ ॥ सूर्यकांतकापसीप्रकार ॥
हाबारावाशेवटींनिर्धार ॥ याचाअर्थसाचार ॥ अनुक्रमेंजाणिजे ॥ ६९ ॥ धातुर्वादीगुरूकोण ॥ शिष्याहातीं
करवीतीर्थाटण ॥ नानासाधनेंसाधून ॥ शेवटींज्ञानप्राप्तहोय ॥ ७० ॥ एकअभक्तासदूरकरून ॥ भक्तांसतारी
समागमेंपूर्ण ॥ जैसामलयागिरीचंदन ॥ सुवासिककरीवृक्षसर्व ॥ ७१ ॥ परिहिंगणआणिवंश ॥ यांसनकरीसु
वास ॥ तैसाअभक्तत्यागीभक्तांस ॥ तारीपुरुषसाचतो ॥ ७२ ॥ विचारगुरूसारासारपद्धती ॥ श्रवणकरवीशिष्य

ह्यातीं॥ शेवटींसाक्षात्कारपावती ॥पिपीलिकामार्गेंपैं॥ ७३॥ एकअनुग्रहगुरूदेत॥ त्याचेंमतापेंज्ञानवाढत
॥सायासनलागतीतेथ॥ ऐसेंसामर्थ्यएकाचें॥७४॥ पांचवागुरूपरिसजाण॥ स्पर्शेंलोहाचेंकरीसुवर्ण॥ तैसें
त्याचेंस्पर्शेंकरून॥ दिव्यज्ञानसाधेकां॥ ७५॥ कश्यपगुरूतोचिपाहें॥ रूपावलोकनेंलवलाहें॥ विलोकितांचज्ञा
नहोय॥ कूर्मिणीपाहेपिलींजैसीं॥ ७६॥उदयापावतांचंद्र॥चंद्रकांताफुटेपाझर॥ दयावंतहोतांअंतर॥ दुरले
साचारशिष्यतरती॥ ७७॥ आठवागुरूदर्पण॥ दर्शनेंहोयस्वरूपज्ञान॥ ऐसेंएकाचेंसामर्थ्यपूर्ण॥ सायासकांहीं
नलागती॥ ७८॥ छायानिधीपक्षीअवधारी॥ तोगगनींवास्तव्यकरी॥ त्याचीछायापडतांशिरीं॥ पृथ्वीपतीहो
यतो॥ ७९॥ तैसेंत्यापुरुषाचेंदुर्लभदर्शन॥ अवचितकृपाकरलागतांजाण॥ कैवल्यप्राप्तीदिव्यज्ञान॥ स्पर्शमा
त्रेंचहोयपैं॥ ८०॥ आतांनादनिधीमहामणी॥जाधातूचीध्वनींपडेकानीं॥ दृष्टीनदेखतांस्वस्थानीं॥ सुवर्ण
धातूसर्वहोती॥ ८१॥ तैसीत्यापुरुषाचीकरणी॥ ऐकतांमुमुक्षाकारुण्यवाणी॥ दर्शनहोतांतेचस्थानीं॥ दि
व्यज्ञानप्रगटावें॥ ८२॥ आतांजैसीक्रौंचपक्षिणी॥ समुद्रतीरींपिलींठेउनी॥ चाराद्यावयालागुनी॥ दूरदेशा
प्रतीजात॥ ८३॥ षडमासपर्यंतक्रमित॥ पिलींइकडेकैसींजित॥ क्षणाक्षणाआठऊनिमनांत॥ बाहेऊर्ध्वमु
खकरूनी॥ ८४॥ त्याचस्नेहेंनिश्चिती॥ पिलींतेथेंपुष्टहोती॥ तेविंतोजासआठवीचित्तीं॥ तेतरतीस्वस्थानीं
॥ ८५॥ सूर्यदर्शनींसूर्यकांत॥अग्निपडेअकस्मात॥ कार्पासतत्काळदग्धहोत॥ इच्छानसतांसूर्याची॥८६
तैसीइच्छानधरितांअकस्मात॥ त्याचीदृष्टीजिकडेझळकत॥ तोपुरुषविदेहहत॥ पावेतत्काळतेथेंची॥
॥८७॥ ऐसींद्वादशगुरूलेंपूर्ण॥ वोंवाळावींतुजवरून॥ ऐकतांकचाचेंवचन॥ कविश्रेष्ठसंतोषले॥८८॥ कचा
सिदिधलेंआलिंगन॥ करेंकुरवाळिलेंवदन॥ ह्मणेचांडाळदैत्यदुर्जन॥ तुजमारूनटाकिले॥८९॥ मद्यामा
जीघालूनितुज॥ दुर्जनींपाजिलेंमज॥ विष्णुहस्तेंनिर्लज्ज॥ संहारतीलसर्वही॥ ९०॥ आजपासूनिमद्यपान

कोणी करील जो ब्राह्मण ॥ तो नीच अनामिका हून ॥ नर्क दारुण भोगील तो ॥ ९१ ॥ ती शुक्राज्ञा अवधारा ॥ नमो
डवे हरिहरा ॥ मद्यपान करितां विप्रा ॥ प्रायश्चित्त तत्काळ ॥ ९२ ॥ असो सहस्र वर्षें झालीं पूर्ण ॥ कचास ह्मणे भृगु
नंदन ॥ आतां स्वस्थळास जाऊन ॥ श्रम त्वरें करी दूर ॥ ९३ ॥ नमस्कारूनि कवि चरण ॥ निघता झाला गुरुनंदन
॥ तों देवयानीनें येऊन ॥ पदरीं स्नेहें धरियेला ॥ ९४ ॥ ह्मणे म्या तुझी धरली आस ॥ तूं सुंदर निर्दोष पुरुष ॥ असु
रीं मारूनि निःशेष ॥ दोन वेळा टाकिला ॥ ९५ ॥ म्या शुक्राचार्यास बोधिलें ॥ दोन वेळ तुज जन्मविलें ॥ मानस नव
पदीं गुंतलें ॥ वरीन वेगें तुजलागीं ॥ ९६ ॥ विद्याविनयसंपन्न ॥ तुजसारिखा नाहीं अन्य ॥ मजसारिखी दुसरी
कामिन ॥ त्रिभुवनांत असेना ॥ ९७ ॥ अमृतसंजीवनी पूर्ण ॥ तुज प्राप्त जाहली माझेन ॥ मजवरितां भृगुसज्ञा
न ॥ स्नेह वाढवी अपार ॥ ९८ ॥ कच बोले आदरें ॥ तुह्मी आह्मी एकोदरें ॥ बंधु भगिनी निर्धारें ॥ नाहीं दुसरें
सापत्न ॥ ९९ ॥ तुज मज जननस्थान ॥ कवींद्राचें उदर पूर्ण ॥ ज्येष्ठ भगिनी मातेसमान ॥ ह्मणी वचन बोलसी ॥
॥ १०० ॥ मग देवयानी बोलत ॥ कचा तूं नष्ट परम धूर्त्त ॥ माझेन पुरविसी मनोरथ ॥ कपट साधुत्व तुझें रे ॥ १ ॥
संजीवनी मंत्र निर्मळ ॥ होईल तुझा निर्फळ ॥ बीजें व्यर्थ गेलीं सकळ ॥ समयीं फळ न देती ॥ २ ॥ कच ह्मणे देव
यानीसी ॥ विचार न करितां मज शापिसी ॥ तूं ब्रह्मकन्या निश्चयेसी ॥ क्षत्रियासी वरिसी तूं ॥ ३ ॥ कदां न वरी-
ब्राह्मण ॥ तुज शाप नेदी कठिण ॥ तूं स्नेह केला आशा धरुन ॥ गुरुनंदिनी विशेष ॥ ४ ॥ मज मंत्र न फळे निःशेष
॥ तरी उपदेशीन दुजयास ॥ कार्य चालेल विशेष ॥ गुरुप्रसादें करूनी ॥ ५ ॥ ऐसें बोलूनि तारास्कंत ॥ शक्रपदा
सपावला त्वरित ॥ समोर येऊनि शचीनाथ ॥ सन्मानुनी गुरुसुता ॥ ६ ॥ देऊनियां क्षेमालिंगन ॥ दिव्य यानीं
बैसऊन ॥ वाद्यगजरें करून ॥ मिरवित नेला स्वस्थाना ॥ ७ ॥ वंदूनियां गुरुचरण ॥ समीप बैसऊनि सहस्रन
यन ॥ सांगीतलें वर्तमान ॥ शक्र ऐकोनी तोषला ॥ ८ ॥ सबीज मंत्र ते वेळां ॥ कचें गुरूस सांगीतला ॥ प्रतीतीस

मवेतफळाआला ॥ आनंदलादेवराव ॥ ९ ॥ दिव्याभरणीं दिव्यवसनीं ॥ गुरुकच पूजिलेदोनी ॥ देवसमस्तला
गतीचरणीं ॥ धन्यकरणीकचाची ॥१०॥ इकडेशुक्रशिष्यवृषपर्वा ॥ जोदैत्यांमाजी ह्मणेमघवा ॥ दैत्यसमुदा
यआघवा ॥ आज्ञाशिरींवंदित ॥ ११ ॥ तोंशर्मिष्ठादैत्यकुमरी ॥ लावण्यसमुद्रींचीलहरी ॥ देवांगनानपावतीस-
री ॥ आवडेसुंदरपितयातें ॥१२॥ शुक्रकन्यादेवयानी ॥ सौंदर्यरत्नदिव्यरवाणी ॥ वनक्रीडेसदोघीजणी ॥ नि
घत्याझाल्याएकदां ॥१३॥ परिचारिकादाहासहस्र ॥ स्त्रियांचासर्वदळभार ॥ शर्मिष्ठादेवयानीसुंदर ॥ परस्परें
प्राणसख्या ॥१४॥ देखतीरमणीकउद्यान ॥ नंदनवनीहूनसुंदरगहन ॥ त्यांतसरोवरनिर्मळजीवन ॥ मराळती
रींक्रीडती ॥१५॥ शर्मिष्ठाआणीदेवयानी ॥ तीरींवसनेंभूषणेंठेउनी ॥ सखियांसमवेतनग्नहोउनी ॥ सरोव
रींक्रीडती ॥१६॥ कमळेंतोडोनिकरींघेती ॥ परस्परेंजळशिंपिती ॥ नानाकुसरीगायनकरिती ॥ दिव्यजैशाअ-
प्सरा ॥१७॥ सेनेंसहितपुरंदर ॥ मार्गेंजातांदळभार ॥ स्त्रियाक्रीडतीसत्वर ॥ वायुवेगेंसोडिला ॥१८॥ अनिलवेगें
करूनी ॥ वस्त्रेंजातगुंडाळूनी ॥ दूरऐकतांपुरुषवाणी ॥ धावन्याकामिनीधांवल्या ॥१९॥ शर्मिष्ठेचेंदिव्यवस्त्र
भार्गवीनेसलीसत्वर ॥ तिचेंक्षीरोदकपवित्र ॥ राजकन्यावोढितसे ॥ २० ॥ दूरगेलेनिर्जरभार ॥ मगसा
वधहोऊनिसमग्र ॥ अंबरेंआपलींसत्वर ॥ परस्परेंलक्षिती ॥२१॥ क्रोधायमानदेवयानी ॥ शर्मिष्ठेसबो
लेकठोरवाणी ॥ तूंपरमदुष्टराजनंदिनी ॥ नेसलीसवसनमाझें ॥२२॥ तूंअपवित्रपरमनिषिद्ध ॥ पितृभाग्या
चाचढलामद ॥ माझापिताशुक्रप्रसिद्ध ॥ त्याच्यावरदेंराज्यतुह्मां ॥२३॥ माझेपितयाचेंपादोदक ॥ शिरींवंदीतु
झाजनक ॥ राज्यभोगितांसाम्यक ॥ शुक्रप्रसादेंकरूनी ॥२४॥ ऐकतांकोपलीराजकुमरी ॥ तूंआश्रितकन्या
दरिद्री ॥ तुझाताठानमायेअंबरीं ॥ तोंडआवरीशतमूर्खे ॥२५॥ तुझाबापभिक्षुक ॥ ठाउकाआहेपरान्नभ
क्षक ॥ माझाजनकदेतोभीक ॥ मातलीसभक्षुनी ॥२६॥ आपणअयोग्यबुद्धिमंद ॥ पंडितासींकरीवाद ॥

आपणनिःशस्त्रीधरूनमद॥ धांवनरणशूरावरी॥२७॥ आपणमागणारभिकारी॥ दातयासांगे आपुलीथोरी
॥नूंतैसीमूढनिर्धारी॥विप्रभिकारीपितातुझा॥२८॥ शर्मिष्टेनेंदासीलाउन॥ मुष्टिघातेंरष्टीमर्दुन॥ वनींकूपामा
जीटाकून॥ आपणगेलीस्वधामा॥२९॥ निःशेषनिमालीदेवयानी॥ शर्मिष्टागेलीसंतोषमानुनी॥ तोंययातीरा
ववनीं॥ मृगयामिषेंपातला॥३०॥ अश्वारूढएकला॥ दळभारदूरराहिला॥ तृषेनेंपरमव्यापला॥ शोधित आ-
लाकूपासीं॥३१॥ तोंत्यांतस्वल्पोदक॥ आंतइंदिरासमानस्फुरेरव॥ ललनाकरीपरमशोक॥ दीर्घस्वरेंरडतसे॥
॥३२॥ ययातीबोलेवरूनी॥ कोणाचीनूंसुंदरकामिनी॥ कुमारीकींसुवाशिणी॥ यास्थळींपडलीसकां॥३३
॥ह्मणेदैत्यांचाप्राणदाता॥ आहेकवीमाझापिता॥ शर्मिष्टाजीराजदुहिता॥ तिणेंयेथेंघातलें॥३४॥ नूंकोण
सांगमजप्रती॥ येरूह्मणेसीययाती॥ देवयानीह्मणेधरीहातीं॥ बाहेरकाढींराजेंद्रा॥३५॥ नूंपवित्रनृपती
कुळवंत॥ मीब्रह्मकन्यावंद्यअत्यंत॥ माझाधरावयाहात॥ योग्यहोसीराजेंद्रा॥३६॥ ययातीह्मणेहीथोरय
थार्थ॥ देऊंनियानिलाहस्त॥ बाहेरकाढिलीत्वरित॥ स्वरूपअद्भुतनवर्णवे॥३७॥ रक्तोत्पलसकुमार॥ तैसे
करतलपरमसुंदर॥ परमआरक्ततेजागार॥ नक्षत्रमणीतैसेझळकती॥३८॥ आकर्णनेत्रलावण्यखाणी॥
उपमेसरंभामेनिकाउणी॥ अंगींचासुवासवनीं॥ बहकतसेचहूंकडे॥३९॥ साधकांसाधेनिधान॥ रंकासांप
डेधन॥ कींजन्मांधाआलेनयन॥ तैसारावसंतोषला॥१४०॥ ह्मणेगृहासस्कुमारेजांई॥ स्नेहअसोंदेतवहृ
दयीं॥ शुक्लपक्षींलवलाहीं॥ जैशीवाढेशशिकळा॥४१॥ येरीह्मणेमनींचेअर्थ॥ पुरविणाररमाकांत॥ पुसो
नगेलानृपनाथ॥ भार्गवीजानस्वग्रामा॥४२॥ नगरासमीपजाऊनित्वरित॥ वृक्षाखालींबैसलीरडत॥ घू
र्णिकादेखोनसांगत॥ वर्तमानसर्वही॥४३॥ पितयासजाऊनत्वरेंसांग॥ नीचदैत्यांचासांडावासंग॥ नान-
रीकरीनदेहत्याग॥ जिव्हाआसडूनआपली॥४४॥ सांडूनदुष्टहेसकळ॥ शिष्यकरावादेवपाळ॥ परमसत्व

मूर्तीसुशील्ड॥ वधीलसकळदैत्यांसी॥ ४५॥ घूर्णिकाधांवलीत्वरित॥ शुक्रासजाणवीमात॥ शर्मिष्ठेनेंकेलाघात ॥मरूनवांचलीदेवयानी॥४६॥ वर्तमानऐकनआद्यंत॥ शुक्रआलाधांवत॥ कंठींधांवोनिमिठीघालित॥देवयानीपितयाच्या॥४७॥भिजलीकंचुकीचीर॥तुटूनगेलेमुक्तहार॥रडेआक्रोशेंसकुमार॥शुक्रशांतवीतयेला॥ ॥४८॥कायजाहालेंसांगवहिलें॥मजशर्मिष्ठेनेंमारिलें॥वनींघोरकूपींढकलिलें॥प्राणजावाम्हणोनी॥४९॥ नहुषपुत्रययाती॥तोपातलामृगयेप्रती॥तेणेंमजधरूनहातीं॥कूपाबाहेरकाढिलें॥५०॥मारऊनलोटिलेंकूपांत॥याचाखेदनमनींकिंचित॥परीदुष्टउत्तरेंबहुत॥तेंनवदवेमाझेनें॥५१॥ वोखटेंबोलतांउत्तर॥तुटेबहुकाळाचामित्र॥ दुग्धींकांजीपडतांबिंदुमात्र॥घटनासेदुग्धाचा॥५२॥तप्तशस्त्राचेघायतीक्ष्ण॥त्याहूनिशब्दघावदारुण॥त्रिभुवनींवंद्यतुझेचरण॥तुजदूषणलाविलें॥५३॥ शांतऊनदेवयानी॥ शुक्रपावलादैत्यस्थानीं समस्तठाकलेतेचक्षणीं॥आचार्यचरणवंदावया॥५४॥ पूजासनींनबैसेकवी॥ ह्मणेमजआज्ञाद्यावी॥मजविणसुखेंभोगावी॥आचार्यपदवीआसुरी॥५५॥ ऐसेंबोलतांभृगुनिश्चित॥ दैत्यांसवाटलाकल्पांत॥ वृषपर्वापायधरित॥एकघालीपोटांतडोई॥५६॥ ऋणानुबंधतुटलासंपूर्ण॥भाक्तनाचेंविचित्रविधान॥नेईलनिकडेजावेंयेथुन॥ ईश्वरसंकल्पअगाध॥५७॥ अपराधझालाकाय॥तोसांगालवलाहें॥आह्मांसमारूनियांजाय॥सर्वासहीयेकाळीं॥५८॥तुझेबळेंनिर्धारीं॥शक्रप्रतिमाघातलीतोडरीं॥विष्णुप्रतिमावाणिजेसर्वत्रीं ॥आह्मींमानूतृणप्राय॥५९॥प्राणसख्यानेंविषघातलें॥मातेनेंबाळकआपटिलें॥तारकेंस्वदीनासांडिलें॥ तेथेंयत्लनचलेकीं॥१६०॥रक्षककरूंइच्छीतघात॥दाताभिकेसदवडित॥कुमार्गेगुरूचालवित॥येथेंयत्लनचलेकीं॥६१॥ आह्मा अंतरतांतुझेचरण॥तत्काळचहोयमरण॥अपराधतरींकोण॥करीविदितस्वामियां ॥६२॥ शुक्रबोलेतयेक्षणीं॥ तुझेशर्मिष्ठेनेंदेवयानीं॥ नाडणकरूनकाननीं॥ कूपामाजींलोटिली॥ ६३॥

नहुषपुत्रें काढिली बाहेरी ॥ नयेक दां नगराभीतरीं ॥ देहत्याग करील निर्धारीं ॥ तुमचे संगें राहतां ॥ ६४ ॥ दैत्य ह्मणे
आचार्यश्रेष्ठा ॥ तुझ्या पादुका परम वरिष्ठा ॥ वोंवाळून टाकीन शर्मिष्ठा ॥ देवयानी वरूनी ॥ ६५ ॥ आज्ञा दीजे निश्चि
त ॥ घेईन देहांत प्रायश्चित्त ॥ राज्य वोंवाळीन समस्त ॥ तुझे पादुके वरूनी ॥ ६६ ॥ देवयानी तुझें बाळक ॥ आह्मी को
णाचे सकळिक ॥ पितयाहूनि गुरु अधिक ॥ श्रुती शास्त्रें बोलती ॥ ६७ ॥ देवयानीचा अपमान ॥ तेणें शिणलें तुझें म
न ॥ देव आह्मास करिती दीन ॥ तोही अपमान तुझाकीं ॥ ६८ ॥ आतां अन्याय घाल पोटांत ॥ चरण धरिती दैत्य सम
स्त ॥ क्षमा ह्मणसी तरी उठों सत्य ॥ ना तरी पडूं असेची ॥ ६९ ॥ शुक्र ह्मणे जाऊनि वना ॥ देवयानीची करा प्रार्थना ॥
॥ ती समजल्यास माझें मना ॥ समाधान सहजची ॥ ७० ॥ शुक्र वृषपर्वा नाथ ॥ आले देवयानी असे जेथ ॥ चरण वं
दिती समस्त ॥ क्षमा अपराध ह्मणती माते ॥ ७१ ॥ इच्छिसी तें देऊं समस्त ॥ सुरां दुर्लभ ते पुरऊं पदार्थ ॥ देवयानी
ह्मणे त्वरित ॥ देऊं इच्छितां मज जरी ॥ ७२ ॥ दाहा सहस्र दासींसहित ॥ शर्मिष्ठा दासी माझी निश्चित ॥ जेथें मज
देईल तात ॥ तेथें यावें तयेनें ॥ ७३ ॥ ऐसें ऐकतां वृषपर्वा ॥ शेवक पाठऊन तेव्हां ॥ दासींसमवेत सुदैवा ॥ शर्मिष्ठा ल
रें आणविली ॥ ७४ ॥ पिता ह्मणे शर्मिष्ठेसीं ॥ आसुरें कुळ जरी वाढविसी ॥ तरी तूं होय देवयानीची दासी ॥ न क
री मानसीं खेद कांहीं ॥ ७५ ॥ येरी ह्मणे तूं नांद अक्षयी ॥ या परता मज लाभ नाहीं ॥ रायें कर धरूनि ते समयीं ॥ देव
यानी सदा धली ॥ ७६ ॥ असो देवयानी शर्मिष्ठे सहित ॥ तात सदनीं प्रवेशत ॥ दैत्य स्वगृहीं समस्त ॥ नांदूं लागले
ते धवां ॥ ७७ ॥ सवें घेऊनि शर्मिष्ठेसी ॥ देवयानी गेली वनक्रीडेसी ॥ पावली पूर्वस्थळासी ॥ खेळे मानसीं आनंदें
॥ ७८ ॥ तों मृगयामिषें ययाती ॥ पावला त्याच स्थळाप्रती ॥ तों देखिल्या बहु युवती ॥ दोघी जणी श्रेष्ठ त्यांत ॥ ७९
शर्मिष्ठा आणी देवयानी ॥ देखोनि राव निवाला मनीं ॥ ह्मणे सकळ तरुणींच्या स्वामिणी ॥ दोघी जणी सत्यपें ॥
॥ १८० ॥ राव बोले मधुर वचन ॥ मी नहुषपुत्र ययाती जाण ॥ सोमवंशध्वज पूर्ण ॥ संतती अत्रिऋषीची ॥ ८१ ॥ देव-

यानी ह्मणे तयासीं ॥ शर्मिष्टा होय माझी दासी ॥ मी शुक्रात्मजा जाण निश्चयेसीं ॥ बोळख मानसीं असेल ॥ ८२ ॥ तुवां
मज कूपांतुनीं ॥ काढिलें रूपा हस्त देऊनी ॥ मी होईन तुझी पट्टराणी ॥ पाणिग्रहण यथोक्त ॥ ८३ ॥ राजा ह्मणे ब्रह्मकुमरी
परम कोपिष्ट त्याही वरी ॥ समर्थ पिता निर्धारी ॥ शुक्राचार्य असुरगुरु ॥ ८४ ॥ त्यासन कळतां लग्न ॥ कैसें करावें अप्रमाण
येरी ह्मणे माझें वचन ॥ परम मान्य पित्यासीं ॥ ८५ ॥ मग दाया पाठविल्या सत्वर ॥ कवीस सांगीतला समाचार ॥ परम आनं
दले भृगुवर ॥ आले सत्वर त्याठाया ॥ ८६ ॥ आले देखोन कवेंद्र ॥ नमन करी राजेंद्र ॥ मनोरथ परिपूर्ण साचार ॥ बोले गुरु
वर दैत्यांचा ॥ ८७ ॥ देवयानी बोले वचन ॥ पितयात व उदरींचें रत्न ॥ त्यास ग्राहक नहुषनंदन ॥ घ्यावया लागीं पातला
॥ ८८ ॥ कवें दिधलें शापवचन ॥ दुसरें ब्रह्मसूत्र प्रमाण ॥ तरी नकरितां अनुमान ॥ करी दान माझें आतां ॥ ८९ ॥ आनंदले
भृगु आपण ॥ सकल संपत्ती तेथें आणोन ॥ यथासांग केलें लग्न ॥ देत आंदण बहुसाल ॥ ९० ॥ शुक्र ह्मणे ययातीस ॥ तु
ज सांगणें एक रहस्य ॥ तुवां रेत दान शर्मिष्ठेस ॥ सहसाही न करावें ॥ ९१ ॥ ही राजतनया निश्चयेसीं ॥ परी मम कन्येची हो
य दासी ॥ ईस भोगितां निश्चयेसी ॥ शापशस्त्रें ताडिन ॥ ९२ ॥ कदां न घडे ह्मणें ययाती ॥ द्विज ह्मणे माझे पायशिव ह्मा
तीं ॥ मग प्रमाण करी नृपती ॥ शुक्र चित्तीं आनंदले ॥ ९३ ॥ मग शर्मिष्टेसहित देवयानी ॥ ययाती निघाला घेउनी ॥
जामातासीं बोळवूनी ॥ शुक्र गेला स्वस्थाना ॥ ९४ ॥ आपुलें नगरा लागुन ॥ मिरवित आला नहुषनंदन ॥ भार्गवी
चें वचन प्रमाण ॥ ययाती राव मानित ॥ ९५ ॥ शृंगारवनीं नेउनी ॥ शर्मिष्टा ठेविली ते क्षणीं ॥ विश्रामसदन बांधोनी
॥ दासी दिधल्या सेवेतें ॥ ९६ ॥ पतिसंग वेगळा करूनी ॥ सकळ भोग पुरवी देवयानी ॥ शय्या शृंगार भोजनीं ॥ आ
पणा समान मान देत ॥ ९७ ॥ देवयानीचे संगती ॥ परम सुखावे ययाती ॥ तुच्छ मानी अमरावती ॥ नाहीं गणतीं आ
नंदा ॥ ९८ ॥ यदु आणि पूर्वस ॥ पुत्र जाहाले कवेंद्र कन्येस ॥ बत्तीस लक्षणी डोळस ॥ रूपें विशेष न वर्णवे ॥ ९९ ॥ शृं
गारवनीं राजसुता ॥ सकळ ही भोग भोगितां ॥ परी पतिवीण तळमळतां ॥ खदिरांगारासमान ॥ २०० ॥ ह्मणें कर्माची

गतीगहन॥नसुटेकदांभोगिल्याविण॥मीदास्यलपावल्येंपूर्ण॥पतिसंगनेणेची १ पतिविणभोगशृंगार
वाटतीजेसेंविरवार॥निद्रानलागेअनुमात्र॥विकळशरीरपडतसे॥२॥जीवनावीणकासार॥दीपावीण
व्यर्थमंदिर॥फळाविणतरुवर॥तेविंशरीरव्यर्थमाझें॥३॥तोंमृगयामिषेंययाती॥पातलात्यावनाप्रती॥
बहुतश्रमलाविश्रांती॥पावावयानेथें आला॥४॥प्रधानासह्मणेनृपवर॥आजियेथेंराहावेंसाचार॥अव
श्यह्मणोनदळभार॥केलास्थीरत्यास्थानीं॥५॥शर्मिष्ठेसआनंदबहुत॥बाहेरआलीअचळरुळत॥तिचें
सौंदर्यपाहातांरतिकांत॥भुलोनवेडाहोयपैं॥६॥भोंवत्यातिच्यासहस्त्रदासी॥सदांतिष्ठतिसेवेसी॥उद-
कघेउनीरायासी॥अभ्यंगकरवीशर्मिष्ठा॥७॥आपणस्वहस्तेंकरुन॥करीरायासतैलमर्दन॥मार्जनझा-
ल्याभोजन॥देतआपणशर्मिष्ठा॥८॥राजेंद्राचेभाळीं॥मृगमदटिळकरेखीवेल्हाळी॥दिव्यचंदनउटीदि
धली॥हारघालीस्वहस्तें॥९॥ऐसास्वगुणेंकरून॥मोहिलानहुषनंदन॥राजाह्मणेमाझेंमन॥तुझासंगइ
च्छीतसे॥२१०॥परीकोपेलदेवयानी॥कायकरूंसांगयेक्षणीं॥येरीह्मणेमीराजनंदिनी॥वरिलेंमनींपूर्वीं
चमी॥११मनसुमनाचीमाळा॥तुझेकंठीं घातलीनृपाळा॥तिचेंमनराखिसीस्फशीळा॥माझीउपेक्षाकरू-
नियां॥१२॥एकचिसुधारसपूर्ण॥प्राशनकरितीदोघेजण॥एकाचेंचुकलेंमरण॥एकामृत्युनसोडी॥१३॥
भागीरथींतस्नान॥समेमेंकरितीदोघेजण॥एकाचेंपापगेलेंजळोन॥एकतैसाचीराहिला॥१४॥परिसदे
वानिश्चिती॥लोहभक्तदृढभेटती॥एकाचीजाहालीसुवर्णकांती॥एकतैसाचीराहिला॥१५॥सुवर्णलति
कागुणेसमान॥कवळीस्फरद्रुमालागुन॥एकसफळझालीपूर्ण॥दुजीनिर्फळझालीकां॥१६॥एकहस्तेंझां
कूननयन॥एकचक्षुनेंकीजेअवलोकन॥हेंचतुरांसनव्हेभूषण॥लागेदूषणतत्वता॥१७॥असोचातुर्य
सुमनेंकरून॥तिणेंपूजिलानहुषनंदन॥पंचबाणेंतयाचेंमन॥भेदिलेंपूर्णनाटोपे॥१८॥क्षेमालिंगनचुं

बनं॥परस्परेंदेतांपूर्ण॥सुरतानंदेंकरुनीनिमग्न॥दोघेंजाहालीतेधवां॥१९॥भोगदेऊनितेक्षणीं॥रायवनि
घेवेगेंकरुनी॥जरीकळेलदेवयानी॥तरीअनर्थकरील॥२२०॥परीशर्मिष्ठाझालीगरोदर॥नवमासभर-
लेसत्वर॥आवळेजावळेदोघेपुत्र॥द्रुह्यअणुनामेंजाहाले॥२१॥देवयानीचिंतातुर॥ह्मणेकैसीप्रसवलीदो
घेपुत्र॥लोटल्याएकसंवत्सर॥तयावनापातली॥२२॥ह्मणेकैसेजाहालेहोपुत्र॥शर्मिष्ठाबोलेचतुर॥ए
कअकस्मातआलाऋषेश्वर॥तेणेंभोगदीधला॥२३॥त्याचेप्रसादेंकरुन॥झालेदोघेनंदन॥देवयानी-
बोलेवचन॥नामगोत्रकायत्याचें॥२४॥येरीह्मणेमीभुलल्यें॥पुसावयाविसरल्यें॥येरीह्मणेऐसेंजरीजा
हलें॥तरीमीसंतुष्टसदांतुजवरी॥२५॥घरागेलीदेवयानी॥परीसचिंतसौदामिनी॥तोंआणिकनृपसंगेंक
रुनी॥पुत्रकन्याजाहाली॥२६॥पुरुषमाधवीनिर्दोष॥कन्यापुत्रनामेंविशेष॥तोंदेवयानीआलीवनास॥शर्मि
ष्ठेसपुसतसे॥२७॥बत्तीसलक्षणीसयुक्त॥राजबीजतेजाद्भुत॥तुजकैसेंहोताऩस्फुत॥ऋषिपासूनिनेणेमी २८
देवयानीसंगातें॥ययातीआलाहोतातेथें॥देवयानीबोलवीबाळकातें॥पुढेंतिघेंघेउनी॥२९॥पुसेबाळकांला
गुन॥तुमचापितादारववाकोण॥तंवतिघेंहीतर्जनीउचलोन॥रायाकडेदाखविती॥३०॥सवेंचउठलींतिघेंज
ण॥बैसतीराजअंकींजाउन॥गळांमिठीघालून॥फळेंमागतीभक्षावया॥३१॥तेंदेखोनिदेवयानी॥क्रोधेंसंत
प्तझालीतयेक्षणीं॥ह्मणेराजालागुनी॥पुत्रत्रयतुजजाहले॥३२॥राजानेंदीप्रतिवचन॥पाहेखालींअधोव
दन॥जैसातस्करआणिलाधरुन॥बोलवितांनबोले॥३३॥ह्मणेतूंशर्मिष्ठेदासी॥चोरूनभोगिलेंरायासीं॥
संपादणीकरित्येसी॥मजभेटलाऋषेश्वर॥३४॥असत्यबोलसीवचन॥तुझीजिव्हाकरीनखंडण॥तूंअसु
रीकपटीण॥वशीकरणजाणसी॥३५॥शर्मिष्ठाह्मणेमीतुझीभगिनी॥मीराववरिलामनीं॥पितृवचनेंकरू
नी॥दासीतुझीह्मणविल्यें॥३६॥देवयानीह्मणेरायासी॥मीजात्येंकवेंद्रापासीं॥तूंभोगीशर्मिष्ठेसी॥करी

ह्मणेव्यासातें॥महाप्रळयनदेखवेमाते॥मीयेईनतुजसांगातें॥सार्थकआपुलेंकरावया॥५६॥उभयस्नुषाहातींध-
रून॥पुसेभीष्मविदुरासयेउन॥व्याससंगेंकरून॥बदरीवनींसुखीराहूं॥५७॥सत्समागमेंशास्त्रश्रवण॥आच
रूंखडतरतपपूर्ण॥साधूंपरत्रसाधन॥नराहूंआतांक्षणभरी॥५८॥भविष्यजाणोनसमग्र॥आज्ञादेतभी-
ष्मविदुर॥व्याससंगेंतिघीसत्वर॥बदरिकाश्रमींगेलिया॥५९॥श्रवणमनननिदध्यास॥साक्षात्कारेंजाला
समरस॥गंगेंतशरीरठेऊननिर्दोष॥कैवल्यपदपावल्या॥६०॥यावरीप्रज्ञाचक्षुराजेश्वर॥कौरवआणिपंडु
कुमर॥मौंजीबंधनवेदसंस्कार॥करीततेव्हांसर्वांसी॥६१॥भोजनपानेंभूसुरांवाढिती॥वस्त्राभरणेंमि
रवती॥दिवसेंदिवसवाढती॥शुक्लशशीसारिखे॥६२॥नानायानींआरूढती॥लोकफिरतांविलोकिती॥॥
कुमारदशेचेखेळखेळती॥नानागतीविचित्र॥६३॥दक्षपांडवआगळेहोती॥डावमात्रेंकौरवहरती॥जैसा
नाजुकअजांतऐरावती॥भीमसेनतेविंदिसे॥६४॥पळतांअवघेमागेंसांडी॥झोंबींतअवघ्यांएकलापाडी
मुष्टीनेंताडीतांतडी॥शिवोनिहारीआणित॥६५॥आणीकगोटियारत्नकंदुक॥भोंवरेचक्रेंविटियासुरेख
सर्वखेळींहारीआणीअधिक॥अजाशब्देंवाहेनयां॥६६॥ऐसाकरूनभीमसेन॥शकुनीदुर्योधनकर्ण॥दुः
शासनादिकमिळोन॥हस्तपादकवळिती॥६७॥मुसांडीघेऊनप्रबळ॥मस्तकेंफोडूनपाडीसकळ॥चरण
करखुळेकेवळ॥अंगेंचूरकरीत्यांचीं॥६८॥एकाझुगारीतगगनीं॥एकासआपटीतमेदिनीं॥बाहींबहुसा
लकवळुनी॥अगाधडोहींबुडवित॥६९॥नाकींतोंडींपाणीभरत॥मगबाहेरटाकीप्रेतवत॥वृक्षावरीकौर
वचढत॥फळेंतोडितांदेखिलें॥७०लत्ताप्रहारेंवृक्षमोडी॥एकदांचतितुकेखालेंपाडी॥टेकावरूनबकेंवो
टी॥पाठीखरडीसर्वांच्या॥७१॥आपणयेडकाहोत॥थडकाकौरवांसदेत॥धर्मासराजाकरित॥आपणहोत
कुंजरपुढें॥७२॥चोरकरूनकौरव॥आपुलेचरणीबांधीसर्व॥शिळेवरतीघेतधांव॥तेव्हांमस्तकेंफुटतीहे

॥७३॥ कौरवांसह्मणेअवधारा ॥ असंख्यमुष्टीघातेंमजमारा ॥ मगतीमूर्खेंआठवूनवैरा ॥ ह्मणतांमागेंनपाहती ॥
७४॥ हणतांभागतीत्यांचेकर ॥ मगत्यांसह्मणेवृकोदर ॥ आपुलेंउसणेंघ्यासमग्र ॥ व्याजासहितयेधवां ॥७५॥ म-
गमुष्टिप्रहारेंहाणीबळी ॥ तेणेंकुंभिनीडळमळी ॥ मूर्छितपडतीकौरवसकळी ॥ उसणेंदेतांनयाचें ॥७६॥ उसणेंघे
नाहांस्मतो ॥ देतांकांरेअवघेरडतां ॥ मगह्मणेउठआतां ॥ रडीखेळतांनकाखेळूं ॥७७॥ धर्मासभवानीकरित ॥ कौ
रवओढूनआणीवस्त्र ॥ नरखेळनांबडवित ॥ सोडवीतधर्मतेव्हां ॥७८॥ विशाळगर्नाकरूनी ॥ आपणबैसेअनुष्ठानी
कौरवआहुतीमानुनी ॥ अग्नींतढकलीबळानें ॥७९॥ मत्स्यावतारहोयभीमसेन ॥ ह्मणेशंखासुरहादुःशासन ॥ म-
त्स्याकारनळपोन ॥ पाईधरूनवोढीतयां ॥८०॥ कूर्मएष्टीकरूनआपुली ॥ ह्मणेमुष्टीघातेंमारासकळी ॥ मारितां
मुष्टीफुटल्यानेवेळीं ॥ परिसहसाडळमळीनां ॥८१॥ आपणवराहहोत ॥ ह्मणेहेहिरण्याक्षसमस्त ॥ त्यांचेदंदई
बळेंबहुत ॥ सुसंडीघेतनाटोपे ॥८२॥ आपणनरसिंहहोत ॥ दुःशासनासआडवेंघेत ॥ ह्मणेनखेंपोटफोडूंएथ
किंवापुढेंविदारूं ॥८३॥ आपणत्रिविक्रमदुःशासनबळी ॥ ह्मणेआतांघालितोंपाताळीं ॥ आपणभार्गवहोऊन
ह्मणेसकळी ॥ कौरवक्षत्रियमारीन ॥८४॥ आपणराघवहोयदेखा ॥ जयद्रथाकरीशूर्पनखा ॥ पार्थहालक्ष्मण
सखा ॥ नासिकाछेदीलपुढेंहा ॥८५॥ कृष्णावतारींचाखेळ ॥ माजेलजेव्हांरणमंडळ ॥ तेव्हांदाखऊंसकळ ॥ रथींघ
ननिव्वांबैसऊनी ॥८६॥ तेरावर्षेंपर्यंत ॥ बौद्धरूपधरूंयथार्थ ॥ पुढेंकलीमाजीसमस्त ॥ कौरवम्लेच्छसंहारूं ॥८७
ऐसाभीमखेळखेळत ॥ कौरवविषादपावतीसमस्त ॥ बळनचालेपाहतीतटस्थ ॥ नदाखवितीबोलोन ॥८८॥ दु
र्योधनसंतापत ॥ शकुनीससंकेतदावित ॥ येरूत्याचाहस्तदडपित ॥ याचेंउसणेंपुढेंघेऊं ॥८९॥ कौरवजाऊन
अंधाससांगती ॥ निजांगींचांक्षनेंदाविती ॥ नखेंळूंह्मणतांआह्मांप्रती ॥ ओढूननेतोभीमसेन ॥९०॥ धृतराष्ट्रास-
शकुनीसांगत ॥ आतांनवांचतीतुझेसुत ॥ खेळतांमेलेकांजीत ॥ भीमसेननपाहे ॥९१॥ धृतराष्ट्रेंनआणीमना ॥

ह्मणेपंडुगेलास्वर्गभुवना॥विपरीतबोलतांजना॥माजींभेददिसेल॥९२॥मनांतह्मणेदुर्योधन॥हाएकमारावा
भीमसेन॥मगउरलेचौघेजण॥यांचालेखाकायसा॥९३॥दुर्योधनकर्णदुःशासन॥चौथाशकुनीएकांतींबसुन॥
ह्मणतीनानाउपायकरून॥भीमसेनमारावा॥९४॥एकह्मणतीपाशघालावे॥दुजाह्मणेविषचालवावें॥एकह्म
णेमहासर्पआणावे॥करवावेदंशबळानें॥९५॥शकुनीह्मणेप्रगटनहोय॥ऐसाकरावाकांहींउपाय॥भीमास
मोदकवाटतीप्रिय॥विषमिश्रितकरावेते॥९६॥वनक्रीडेसजाऊनियां॥त्यासद्यावेभक्षावया॥अवघ्यांमानलीहे
क्रिया॥ह्मणतीप्रगटबोलूंनका॥९७॥सूत्रधाराससांगेसुयोधन॥गंगातीरींनिर्मावेंदिव्यसदन॥गुप्तवोंवऱ्यानि
द्रास्थान॥माड्याबहुतनिर्माव्या॥९८॥सांगीतल्याहूनिविशेषसूत्रधारीं॥क्रीडाधामरचिलेंगंगातीरीं॥सुयो
धनविनवीजोडल्याकरीं॥ह्मणेचलाजळक्रीडे॥९९॥अजातशत्रुधर्मराज॥अवश्यह्मणोनउठलेतेजःपुंज॥
बंधूचौघेसहज॥समागमेंचालती॥१००॥षड्रसचतुर्विधान्नें॥सर्वेंघेतलींसुयोधनें॥विषमोदकभीमाकार
णें॥अतिप्रयत्नेंकरविले॥१॥बचनागसोमलअहिफेण॥जेपाळराजविषेंदारुण॥ज्यांचावासयेतांपूर्ण॥
तत्काळमरणजीवासी॥२॥ऐसींविषेंमेळऊनदेख॥भीमालागींवळिलेमोदक॥इकडेसेनेसहितसकळिक
गंगातीरापातले॥३॥नानायानींबैसले॥फेरूनवाहनेंश्रमले॥मगजळक्रीडेप्रवर्तले॥कौरवपांडवतेधवां
॥४॥परस्परेंजळसिंपिती॥अगाधनीरींबुड्यादेती॥एकासएकशोधिती॥हांकाफोडितीआवेशें॥५॥भी
मासबुडवावयाजळीं॥कौरवझोंबतीसकळी॥येरूएकांघेऊनबळी॥वारणापरीपोहत॥६॥नानाजळच
रेंधरिती॥वोढूनबाहेरकाढिती॥तोंअस्तापावलागभस्ती॥कडेसयेतीसर्वही॥७॥परमस्नेहाळूदुर्योधन॥
वस्त्रेंओपीपांडवांकारणें॥सकळपरिवारगौरऊन॥अन्नपानेंसुरवीकेले॥८॥यावरीएकांतस्थानीं॥पांड
वकौरवबैसलेभोजनीं॥सुवर्णनाटेंझळकतीसदनीं॥रत्नवाटियाप्रकाशती॥९॥सुस्वादन्नेंनेवेळां॥एक

पंक्तीवाढिलीसकळां॥ जयासजोंपदार्थआवडला॥ तोतोवाढिलासाक्षेपें॥ १०॥ आपुलेहस्तेंदुर्योधन॥ भीमसेनावा
ढीतअन्न॥ असंख्यमोदकवाढून॥ मधुरान्नानेंभक्षवी॥ ११॥ तृप्तहोऊनभीमसेन॥ एकांतसदनींकेलेंशयन॥ अर्ध
निशालोटतांपूर्ण॥ सर्वगात्रींभेदलेंविष॥ १२॥ उठोनगेलेंसर्वस्मरण॥ एकवटलेपंचप्राण॥ सुयोधनकर्णशकुनीदुःशा
सन॥ जवळीआलेतेधवां॥ १३॥ दृढलत्ताप्रहारबहुत॥ करूनबांधलेमाघारेहस्त॥ कंठचरणासीगांठीदेत॥ केली-
मोटसर्वांगाची॥ १४॥ चौघेमिळोननेवेळां॥ सबळशिळाबांधलीगळां॥ गंगाजळींबुडविला॥ मध्यभागींनेउनी॥
१५॥ वाहवतगेलाभीमसेन॥ परमआनंदलासुयोधन॥ इकडेप्रवाहेंजातकुंतीनंदन॥ समुद्रजीवनींमिळाला
॥ १६॥ तोंबहुतविखारींजळींचोढून॥ पाताळीनेलाभीमसेन॥ सर्पदंशेंसंपूर्ण॥ विषआंगींचेंउतरलें॥ १७॥ गंगाज
ळेंजालाशीतळ॥ विखारीं विषशोषिलेंसकळ॥ सावधजालाकुंतीबाळ॥ तोडीतसेपाशबंधनें॥ १८॥ देखतांभी
माचेंपरमबळ॥ दंशूनसर्पपळालेसकळ॥ वासुकीसजाणवितीतत्काळ॥ प्रचंडपुरुषएकआला॥ १९॥ बांधूनगं
गाजळींटाकिला॥ प्रेतत्वजाऊनसावधजाहला॥ वासुकीपरिवारेंनिघाला॥ तेथेंआलापहावया॥ २०॥ सावध
देखूनभीमसेन॥ ह्मणेमहापुरुषातूंआहेसकोण॥ कोण्यादुर्जनें तुजमारुन॥ गंगाजळींटाकिलें॥ २१॥ येरू-
ह्मणेमीपंडुनंदन॥ वासुकीदेतआलिंगन॥ बोलेतूंश्रीकृष्णप्रियपूर्ण॥ चालआमुच्यासदनासी॥ २२॥ मगगृहास
नेऊन॥ नागराजकरीपूजन॥ ह्मणेमहाविषेंसंपूर्ण॥ अंगतुझेंजळतसे॥ २३॥ एलापत्रह्मणेवासुकीस॥ त्या-
सपाजावासुधारस॥ समयोचितदेणेंनिर्दोष॥ महायशजोडेतेणें॥ २४॥ कन्यादानतरुणास॥ मिष्टान्नवाढिजे
अरोगियास॥ द्रव्यवोपिजेदरिद्रीयास॥ महायशजोडेयेणें॥ २५॥ नाननरीकामातुरासंन्यासदेणें॥ क्षुधातुरा
सउपवासकरविणें॥ धालियासदिव्यान्नवाढणें॥ समयोचितहेंनव्हे॥ २६॥ तृषाक्रांतासघृतपान॥ नवज्वरि-
तासदुग्धार्पण॥ शीतेंपीडल्यासलांवणेंचंदन॥ समयोचितहेंनव्हे॥ २७॥ तरीयाससुधारसपान॥ यासमयींउचि

नपूर्ण॥ मगवासुकीभीमासनेऊन॥ अमृतकुंडेंदावित॥ २८॥ अष्टकुंडेंभरलींअमृतें॥ भीमहळुहळुनेलातेथें॥ वि
कळशरीरजालेंहोतें॥ सर्पेंधरिलेंसांवरून॥ २९॥ एककुंडदाविलेंभीमास॥ ह्मणतीप्राशींकांसुधारस॥ तोंआठ
हींकुंडेंसावकाश॥ शोषिलींक्षणनलगतां॥ ३०॥ समाचारसांगतीसेवक॥ आश्चर्यकरीभोगीनायक॥ ह्मणेया-
सबळचढलेंअधिक॥ पहिल्याहूनशतगुणीं॥ ३१॥ तृप्तजाहलाधर्मानुज॥ मगशेजेवरीनिजवीनागराज॥ भी-
मचिंतारहितसहज॥ काळजीकांहींअसेना॥ ३२॥ इकडेकौरवउठोनप्रातःकाळीं॥ स्नानेंकरूनगंगाजळीं॥ द
ळसमवेतसकळी॥ नगरामाजीप्रवेशती॥ ३३॥ आनंदपरमकौरवमानसीं॥ मगबोलतीयेरयेरांसी॥ पांडवबं
धूहोतीआह्मांसी॥ परिमांशीस्नेहनसे॥ ३४॥ भावंडेटाकूनमागेंसमस्त॥ आपणएकलागेलानगरांत॥ भीम
निष्ठुरअत्यंत॥ सुहृदसंगनावडे॥ ३५॥ आसुचेंमनयावरीबहुत॥ याचेंआह्मांकडेनाहींचित्त॥ चतुरपणेंडोल
तबहुत॥ कर्णयथार्थह्मणतसे॥ ३६॥ ऐशाकपटयुक्तीबोलूनजाणा॥ जाणवितीधर्मार्जुना॥ तेनदेतीप्रतिवच
ना॥ चिंताक्रांतमानसीं॥ ३७॥ जैसेंदीपावीणसदन॥ तैसेंम्लानदिसतीचौघेजण॥ हृदयजाहलेंउद्विग्न॥ प
रिबोलूननदाखविती॥ ३८॥ वहनेंधांवडीततेवेळे॥ कौरवस्वसदनींप्रवेशले॥ इकडेधर्मदुःखेंतळमळे॥ भी
मसेनाआठउनी॥ ३९॥ धर्मपुसेकुंतीप्रत॥ भीमआलाकायगृहांत॥ कींकांहींकार्यार्थ॥ तुवांप्रेरिलासांगपां
॥ ४०॥ माताह्मणेनाहींआला॥ धर्माचाकंठदाटला॥ अश्रुधारास्रवतीडोळां॥ धनंजयाच्यातेधवां॥ ४१॥ न
कुळसहदेवतळमळती॥ भीमातुझीकायजाहलीगती॥ घातकेलाअर्धरात्रीं॥ अंधपुत्रेंवाटतें॥ ४२॥ जननी
पिटीवक्षस्थळ॥ शोकेंआंगटाकीविकळ॥ विदुरपातलातत्काळ॥ स्थीरस्थीरह्मणतसे॥ ४३॥ यादवीविदुरास
ह्मणत॥ दुर्योधनेंकेलाघात॥ येरूह्मणेनबोलेंमात॥ करतीलनिःपातउरलियांचा॥ ४४॥ धीरधरूनियांचित्तीं॥
हृदयींचिंतींकमळापती॥ स्वस्तिक्षेममागुती॥ भीमभेटेलतुजला॥ ४५॥ त्रिकाळज्ञानीमहाराजविदुर॥ त्याचे

वचनेंराहिलेस्थीर ॥ इकडे वासुकीसदनीं वृकोदर ॥ अष्टदिवसनिद्रिस्थ ॥ ४६ ॥ उदयाचळींउगवेतरणी ॥ भीम
तैसाबैसलाउठोनी ॥ वासुकीह्मणेसखयायेक्षणीं ॥ सोयराहोईआमुचा ॥ ४७ मगआपुलीकंन्यापद्मावती ॥ दिध
लीभीमसेनाप्रती ॥ तिचेंस्वरूपरतिपती ॥ देखूनियांतटस्थ ॥ ४८ ॥ बहुतदेऊनआंदण ॥ गौरविलाभीमसेन ॥
वासुकीह्मणेत्वरेंकरून ॥ हस्तिनापुराजाइजे ॥ ४९ ॥ माताबंधूविदुरभक्त ॥ तुजकारणेंपरमदुःखित शोकसमुद्रांतू
नत्वरित ॥ काढीसत्वरजाउनी ॥ ५० ॥ भीमासकरऊनमज्जन ॥ दिधलेंदिव्यान्नभोजन ॥ अलंकारवस्त्रेंदेऊन ॥ गौरऊन
बोळविला ॥ ५१ ॥ सांगातेंदेऊनरक्षकसर्प ॥ पावविलागजपुरासमीप ॥ भीमनिर्भयनिःशंक ॥ नगरामाजीप्रवे
शला ॥ ५२ ॥ अवघीबैसलींचिंताग्रस्त ॥ तोंभीमदेखिलाअकस्मात ॥ हर्षेंआंगींरोमउभेठाकत ॥ माताबंधूधांव
लीं ॥ ५३ ॥ साष्टांगेसींनमस्कार ॥ कुंतीसघालीवृकोदर ॥ वसुदेवभगिनीसत्वर ॥ गळांमिठीघालीतेव्हां ॥ ५४ ॥ वि
दुरआणिधर्म ॥ यांसीसाष्टांगेंनमीभीम ॥ आवडीदिधलेंक्षेम ॥ नमायेप्रेमदशदिशा ॥ ५५ ॥ पार्थूननकुळसहदे
वराय ॥ वंदितीतेव्हांभीमाचेपाय ॥ कंठींमिठीघालूनमोह ॥ प्रेमेंकरूनीस्फुंदत ॥ ५६ ॥ सकळांबैसऊनवृकोदर ॥ वि
दितकेलासमाचार ॥ वासुकीकृपाळूथोर ॥ उपचारकेलातेणेंमज ॥ ५७ ॥ कुंतीवांचलाह्मणून ॥ भूषणेंटाकीवोवा
ळुन ॥ करूनियांअपारदान ॥ याचकब्राह्मणसुखीकेले ॥ ५८ ॥ विदुरमतेंकुंतिनंदन ॥ सदावर्ततीसावधान ॥ न
करितीकौरवांसीभाषण ॥ संगेंगमनसोडिलें ॥ ५९ ॥ पांचजणसदाएकेठाईं ॥ वेगळेनहोतीकदाही ॥ सखोल
बुद्धीसर्वदाही ॥ मर्यादेनेंवर्तती ॥ ६० ॥ कृष्णाचरित्रकरितीश्रवण ॥ सदाकृष्णमूर्तीचेंभजन ॥ अखंडकृष्णनाम
स्मरण ॥ सदाध्यानकृष्णाचें ॥ ६१ ॥ कृष्णप्रतिमाकरून ॥ त्रिकाळपूजितीपांचहीजण ॥ कृष्णमंत्राचेंअनुष्ठान ॥
करितीगायनकृष्णाचें ॥ ६२ ॥ नानाकळाराजयुक्ती ॥ विदुरशिकवीधर्माप्रती ॥ बहुभाषासंकेतरीती ॥ पढवीत
त्यांतेंतेधवां ॥ ६३ ॥ स्वदेशभाषादुर्जनांत ॥ बोलावयाशंकावाटत ॥ यालागींबर्बरभाषाशिकवित ॥ विदुरतेव्हां

पाचांतें ॥ ६४ ॥ यावरी पुढें ऐका कथा ॥ अंधमनांत होय कल्पिता ॥ धनुर्वेद शिकवावा यांस मस्तां ॥ राजगुरू ठेउनी ॥ ६५ ॥ शत कौरव आणि वेश्यासुत ॥ कर्ण पांडवां सहित एक शें सात ॥ इतक्यांस कृपाचार्य शिकवित ॥ धनुर्वेद सवेदा ॥ ६६ ॥ कृपाचार्य गौतम पुत्र ॥ शरस्तंभीं जन्मला पवित्र ॥ राजा ह्मणे तें चरित्र ॥ वैशंपायना सांगें कां ॥ ६७ ॥ वक्ता ह्मणे सत्य ऋषींत ॥ गौतम मुनी परम विख्यात ॥ तप रवडतर आचरत ॥ जान्हवीतीरीं सर्वदा ॥ ६८ ॥ मुखीं चतुर्वेदांचें पारायण ॥ पृष्ठीस सदां धनुष्यबाण ॥ क्षत्रियधर्म ब्राह्मणपण ॥ शापें शरें समर्थ जो ॥ ६९ ॥ जैसा धनुर्धर भार्गवराम ॥ तैसाच जाणिजे गौतम ॥ मग भयाभीत परम ॥ तपा हानी करूं इच्छी ॥ ७० ॥ धनुष्यबाण घेउनी ॥ विपिनीं हिंडे गौतम मुनी ॥ ज्वाळावती कन्या निर्मुनी ॥ अमरनाथें पाठविली ॥ ७१ ॥ तिचें विलोकितां वदन ॥ आंगीं द्रवला मीनकेतन ॥ शापशर भाता गळोन ॥ भूमीवरी पडियेला ॥ ७२ ॥ वीर्य द्रवलें अद्भुत ॥ शरस्तंभावरी पडत ॥ दोन भाग झाले रेत ॥ कुमर कुमरी जन्मली ॥ ७३ ॥ इंद्रें ठकविलें परम ॥ जाणोन तपा गेला गौतम ॥ मृगयामिषें राजोत्तम ॥ शंतनू तेथें पातला ॥ ७४ ॥ अग्निहोत्रपात्रें टाकुनी ॥ गेला तेथें गौतम मुनी ॥ कुमर कुमरी तान्ही ॥ शंतनू राव देखता ॥ ७५ ॥ ब्रह्मवीर्य हें अद्भुत ॥ कृपें राव दोघां उचलित ॥ कृपा कृपी नांव ठेवित ॥ पालन करीत दोघांचें ॥ ७६ ॥ वर्तमान जाणून गौतम मुनी ॥ रायास भेटला येउनी ॥ मग द्रोणाचार्या लागुनी ॥ कृपया दिधली संभ्रमें ॥ ७७ ॥ कृपाचार्य आपुला सुत ॥ शस्त्रविद्या दिधली बहुत ॥ धनुर्वेद शिकवीत ॥ मंत्र अस्त्रविद्येसीं ॥ ७८ ॥ कृपया द्रोणाची रामा ॥ तीसी पुत्र झाला अश्वत्थामा ॥ पुढें ऐकें राजोत्तमा ॥ कथा कैसी वर्तली ॥ ७९ ॥ कृपाचार्य गुरु कृपार्णव ॥ विद्या शिकती कौरव पांडव ॥ आणि कही राजकुमर सर्व ॥ देशोदेशींचे पातले ॥ ८० ॥ भीमार्जुनाची प्रज्ञा फार ॥ कृपाचार्य सांगे अणुमात्र ॥ जैसा बहुत क्षुधातुर ॥ अल्प त्यासी वाढिजे ॥ ८१ ॥ शिष्याची प्रज्ञा गाढी ॥ गुरूची सर्वज्ञता थोडी ॥ तरी विद्याब्धीची पैलथडी ॥ सर्वथा हीन देखिजे ॥ ८२ ॥ तो निज-

भाग्येंअकस्मात॥ द्रोणाचार्यआलेनेयँ॥ त्याद्रोणाचीकथाकिंचित॥ ऐकरायाआदरें॥ ८३॥ तपियांशिरोमणी
भारद्वाजपूर्ण॥ गंगाद्वारींकरीअनुष्ठान॥ तोंघृताचीदेवांगनाजाण॥ पर्वकाळींआलीस्नाना॥ ८४॥ स्नानक
रूनहेमवसन॥ नेसतांदेखेभारद्वाजपूर्ण॥ हृदयींचेतलामीनकेतन॥ अहीरववळेज्यापरी॥ ८५॥ सुरता
नंदआठवित॥ अधोमुखेंचालिलेंरेत॥ ऋषिपर्णद्रोणींधरित॥ तेथेंचद्रोणजन्मला॥ ८६॥ पितयापासूनसंस्का
र॥ वेदशास्त्रपढलासमग्र॥ अग्निवेषनामाअग्निकुमर॥ धनुर्वेदपढेतेथें॥ ८७॥ तोंतेथेंरावद्रुपद॥ पढूनशि
कलाधनुर्वेद॥ गुरुबंधूजोडलाप्रसिद्ध॥ पांचाळरायासारिखा॥ ८८॥ दोघांविद्याजाहलीपूर्ण॥ द्रुपदगेलाआ
ज्ञामागुन॥ तोंगुरुबंधूबोलिलाद्रोण॥ द्रुपदाप्रतीतेधवां॥ ८९॥ जनकेंराज्यदेवोपितांतूतें॥ सांभाळावेंआह्मा
तें॥ द्रुपदह्मणेगुरुबंधूतें॥ विसरूंसर्वथानघडेहें॥ ९०॥ अहिछत्राद्रुपदगेला॥ पितात्याचापरत्रपावला॥ द्रुप
दराज्यकरूंलागला॥ पितयाऐसेंसर्वही॥ ९१॥ कृपयेचेपोटींजन्मलासुत॥ जन्मकाळींटाहोफोडित॥ उच्चैश्रवा
जैसागर्जत॥ देवसर्वतापले॥ ९२॥ तोरुद्राचाअंशपूर्ण॥ विद्यासमुद्रबळगहन॥ अश्वत्थामाअभिधान॥ देवीं
ठेविलेंतेधवां॥ ९४॥ चिरंजीवकेलापूर्ण॥ विद्याअपारशिकवीद्रोण॥ तोंपरशुरामेंनिःक्षत्रियकरून॥ पृथ्वीब्रा
ह्मणादिधलीकीं॥ ९५॥ सभाग्यकेलेब्राह्मण॥ हेंऐकोननिघालाद्रोण॥ महेंद्रपर्वतींजाउन॥ भार्गवरामाभेट
ला॥ ९६॥ कल्याणरामपुसत॥ कायइच्छाआहेमनांत॥ येरूह्मणेदरिद्रेंसंतप्त॥ कुटुंबासहितजाहलों॥ ९७॥
भार्गवह्मणेसर्वही॥ ब्राह्मणासदिधलीमही॥ पूर्वींतुह्मीआलांनाहीं॥ आतांकायदेऊंतुह्मा॥ ९८॥ सकळपृथ्वी
भाग्यभरून॥ कश्यपासदिधलीदान॥ आतांशरअस्त्रविद्यापूर्ण॥ उरलीजाणमजपासीं॥ ९९॥ दोंहींतजेंआ-
वडे॥ तेंचमागारोकडें॥ येरूह्मणेअस्त्रविद्येचेंगाढें॥ भाग्यदेवोपींमजलागीं॥ २००॥ अवश्यह्मणेरेणुकानंदन॥
मगशिष्यकेलाद्रोण॥ अस्त्रविद्यासर्वपूर्ण॥ हृदयाकाशींउजळला॥ १॥ ह्मणेक्षत्रियआणिब्राह्मण॥ वानून

विद्यानसांगेकोणा ॥ मगद्रोणेंघेऊनिआज्ञा ॥ निजाश्रमापातला ॥ २ ॥ पीडलादारिद्र्यें करून ॥ जवळीधनवंताचे
नंदन ॥ सुवर्णवाटींतक्षीरपान ॥ स्वेच्छाकरितीकौतुकें ॥ ३ ॥ तेदृष्टींदेखोन ॥ अश्वत्थामाकरीरुदन ॥ ह्मणेमज
करवींक्षीरपान ॥ ह्मणोनिआळीघेतली ॥ ४ ॥ मगपिष्टोदकशर्करा करून ॥ मातापाजीतयालागुन ॥ मीदुग्धप्रा
शिलें ह्मणउन ॥ अश्वत्थामानाचतसे ॥ ५ ॥ तेंदेखोनहृदयांत ॥ द्रोणदुःखेंदाटलाबहुत ॥ ह्मणेमीदरिद्रीअ
त्यंत ॥ पिष्टोदकबाळप्यालें ॥ ६ ॥ आपुलेंकुटुंबदरिद्रेंकष्टी ॥ मीचपाहतोंआपुलेदृष्टी ॥ हेशिवहेपरमेष्ठी ॥ का
यसंसारींघातलें ॥ ७ ॥ मगआठविलेंमनांत ॥ द्रुपदाचेंदर्शनघ्यावेंत्वरित ॥ बाळकासीक्षीरपानार्थ ॥ धेनूएक
मागावी ॥ ८ ॥ मगनिघेवेगेंकरून ॥ पांचाळपुरायेऊन ॥ सभेसबैसलाद्रुपदपूर्ण ॥ तोंद्रोणतेथेंगेला ॥ ९ ॥ उत्साहें
रुनिःशेष ॥ महाराजऋषिअग्निवेष ॥ तूंगुरुबंधूहोसीनरेश ॥ नोळखसीराजेंद्रा ॥ ११ ॥ दरिद्रेंबहुकेलेंकष्टी ॥
ह्मणोनआलोंबंधूचेभेटी ॥ द्रुपदह्मणेतुजदृष्टी ॥ देखिलेंनाहींकधींमी ॥ १२ ॥ मीरावद्रुपदजाण ॥ तूंभिकारीए
कब्राह्मण ॥ तुझेंबंधुत्वआह्मालागुन ॥ घडेलकैसेंसांगपां ॥ १३ ॥ गुरूकेंचातूंकोण ॥ बोलसीअवघेंकृत्रिमवचन ॥
मूर्खाशंकानाहींतुजलागुन ॥ मित्रह्मणसीभूपातें ॥ १४ ॥ द्रुपदमातलामदेंकरून ॥ ह्मणेमाघाराजायएथून ॥ ना
हींतरीदूतलाऊन ॥ बाहेरघालीनक्षणार्धें ॥ १५ ॥ परमअपमानलाद्रोण ॥ मागेंफिरलातेथुन ॥ ह्मणेरायाधन्यतु
झेंवचन ॥ ऐकोनमननिवालें ॥ १६ ॥ अंतरींयथार्थजाणसी ॥ ऐश्वर्यमदेंमातलासी ॥ मजद्रोणासअपमानिसी ॥ फ
ळपावसीशेवटीं ॥ १७ ॥ एकाशिष्यासांगोन ॥ तुजबांधोनमीनेईन ॥ तरीचमीहोईनद्रोण ॥ कौतुकेंदावीनया
वरी ॥ १८ ॥ ऐसेंबोलूननिघाला ॥ विषादसंगातीहृदद्याला ॥ हस्तिनापुराप्रतीआला ॥ खेदेंजालाक्षीणबहु ॥ १९ ॥ हा
तींधरिलीगौतमीदारा ॥ पाठीबांधिलेंसेकुमारा ॥ गजपुरांतयेऊनसत्वरा ॥ वस्तीसराहिलेगुप्तरूपें ॥ २० ॥ धृतरा

भृगंगात्मजजाण॥ यांचेंघेऊंइच्छीदर्शन॥ तोंअकस्मातनंदन॥ बाहेरआलेखेळावया॥२१॥ नगराबाहेरभूमि-
कासमान॥ तेथेंखेळतीविठेघेउन॥ दुरूनपहातसेद्रोण॥ कौतुकराजपुत्रांचें॥२२॥ खेळतांविटाउसळला॥ कूपा
माजीजाऊनपडला॥ राजकुमारांचापाळा॥ कूपाभोंवतापहात॥२३॥ कूपअवघडआंतअंधार॥ तटस्थपहाती
राजकुमर॥ तोंमुद्रिकागळोनसत्वर॥ धर्महस्तींचीपडियेली॥२४॥ तेथेंपातलेद्रोण॥ ह्मणेक्षत्रियतुह्मीराजनंद
न॥ व्हावेंअसाध्यवस्तुसाधन॥ ऐसागुरुकेलानाहीं॥२५॥ दर्भमंत्रूनटाकिला॥ विठातत्काळकाढिला॥ सवेंच
धनुष्याबाणलाविला॥ सोडूनदिधलाकूपांत॥२६॥ धर्ममुद्रिकासुखीधरून॥ परतोनवरताआलाबाण॥ राजकु
मरधरितीचरण॥ धर्मभीमेअर्जुनादि॥२७॥ ह्मणतीचलाराजमंदिरा॥ आवडीभेटऊंराजेश्वरा॥ द्रोणह्मणेआ
धींश्रुनकरा॥ गंगात्मजाजाउनी॥२८॥ पुढेंकथारसाळगहन॥ सादरपरिसोतपंडितजन॥ ब्रह्मानंदेंकरून॥ श्री
धरविनवीसमस्तां॥२९॥ सुरसपांडवप्रतापग्रंथ॥ आदिपर्वव्यासभारत॥ त्यांतीलसारांशयथार्थ॥ अष्टमा-
ध्यायींकथियेला॥३०॥ ॥इतिश्रीआदिपर्वभारतटीकापांडवप्रतापादिपर्वेअष्टमोऽध्यायः ८॥ ॥
॥छ॥ ॥छ॥ ॥छ॥ ॥छ॥ ॥छ॥ ॥
ओव्या २३०॥ ॥छ॥ ॥छ॥

श्रीगणेशायनमः॥ ॥भीष्मधृतराष्ट्राप्रति॥ कौरवपांडवआदरेंसांगती॥ विद्यासमुद्रजैसाबृहस्पती॥ धनुर्वेद
जाणता॥१॥ पूर्वींभार्गवकींरघुवीर॥ तैसाचिहानिसराधनुर्धर॥ वीरेंसुद्रिकासत्वर॥ कूपांतूनकाढिली॥ २॥ द्रो
णाचार्यनामतया॥ सत्वरशिबिकापाठऊनियां॥ मानेंआणूनआचार्या॥ सर्वोपचारेंतोषवावें॥ ३॥ भीष्मेंपाठवो
नयान॥ आणविलेंमानेंकरून॥ श्रेष्ठासनींबैसऊन॥ वस्त्राभरणींपूजिलें॥ ४॥ भीष्मह्मणेआजिसुदिन॥ झा
लेंस्वामीचेंदर्शन॥ कीर्तिऐकोननृसश्रवण॥ दर्शनेंनेत्रआजिधाले॥ ५॥ कायकार्यार्थकल्पून॥ स्वामीचेंझालेंआ
गमन॥ मगबोलेगुरुद्रोण॥ ऐकसर्वज्ञाशुभदा॥ ६॥ पीडिलोंदरिद्रेंकरून॥ पुत्रमागतांक्षीरपान॥ पिष्टोदकशु
भ्रकरून॥ पाजितांतृप्तमानसीं॥ ७॥ चित्तासवाटलाखेद॥ गुरुबंधूआसुचाद्रुपद॥ पूर्वबोलखसंबंध॥ धरू
नगेलोंत्यापाशीं॥ ८॥ तेणेंकेलाअपमान॥ ह्रदयींचेतलाचिंताग्न॥ तूंमेघउदारकुरुभूषण॥ ह्मणोनआलोंद
र्शना॥ ९॥ भीष्मबोलेनेमवचन॥ हेंराज्यतनुमनधन॥ तूजकेलेंसमर्पण॥ वोंवाळूनटाकावें॥ १०॥ तुजऐसें
निधान॥ जोडेलपूर्वभाग्येंसंपूर्ण॥ शरीरसांडणेंकरून॥ तुवरूनटाकावें॥ ११॥ तूंसर्वज्ञगुरुमूर्ति॥ हेंचिमाग
णेंतुजप्रति॥ आयुष्यसरेतोंवरीप्रीती॥ संरक्षूनअसावें॥ १२॥ विशाळपाहोनराजसदन॥ सर्वसंपत्तीआंतभ
रून॥ धनधान्यवस्त्रेंपूर्ण॥ दासदासीअपार॥ १३॥ अश्वशाळारथकुंजर॥ गाईह्मैशीखिल्लारेंअपार॥ रत्नजडि
तशिबिकासुंदर॥ गुरुलागींबैसावया॥ १४॥ आपुलेसंपत्तीसमान॥ घरभरूनदिधलेंदान॥ परमआनंदला
द्रोण॥ ह्मणेधन्यकुरुवर्या॥ १५॥ कुटुंबीआनंदभरित॥ वस्त्राभरणेंमंडित॥ पाहूनभीष्मेंशुभमुहूर्त॥ राजकु
मरआणिले॥ १६॥ पूजाकरूनविधियुक्त॥ कौरवपांडवसमस्त॥ पांयांवरीघालूनगंगासुत॥ हातींदेतद्रोणा-
च्या॥ १७॥ सकळांससांगेद्रोण॥ विद्याझालियासंपूर्ण॥ एकइच्छीनसेमन॥ कामनामाझीपुरवावी॥ १८॥ ऐसेंबो
लेनभारद्वाजकुमर॥ दुर्योधनादिराजसुतसमग्र॥ खालेंपाहातीउत्तर॥ नदेतीतेकोणीही॥ १९॥ गर्जोनबोले

फाल्गुन॥ जेंशक्रासदुर्घटआचरण॥ तेंसिद्धीसनेईनपूर्ण॥ चरणप्रतापेंतुमचेमी॥ २०॥ ऐसेंऐकतांवचन॥ द्रोणें-
हृदयींधरिलाअर्जुन॥ ह्मणेहोतुजकल्याण॥ विजयनामसफळहो॥ २१॥ अवघ्रहणूनमस्तक॥ शिरींठेविलाव-
रदहस्तक॥ श्रेष्ठपट्टशिष्यदेख॥ पार्थकरूनठेविला॥ २२॥ अश्वत्थाम्यासांगेद्रोण॥ तुजहोनमजप्रियअर्जुन॥
विद्याहोईलयासपूर्ण॥ ऐक्येंस्नेहेंवर्ततजा॥ २३॥ ऐसेंबोलोनद्रोण॥ शस्त्रेंआणिधनुष्यबाण॥ करूनत्याचेंपूज
न॥ आरंभकेलासांगावया॥ २४॥ धनुर्वेदअन्नसत्र॥ भारद्वाजेंघातलेंपवित्र॥ देशोदेशींचेराजपुत्र॥ विद्यार्थी-
क्षुधितपानले॥ २५॥ सूर्याचीप्रतिमादुसरी॥ तोकर्णउदारअभ्यासकरी॥ पार्थजिंकावासमरीं॥ कौरवांसिमि-
त्रत्वकरित॥ २६॥ शस्त्रास्त्रविद्याअभ्यासित॥ अवघेचझालेपरांगत॥ परिअवघ्यांतआगळापार्थ॥ शस्त्रास्त्र-
निघेमाझारी॥ २७॥ समस्तांससांगेद्रोण॥ अंधारींनकरावेंभोजन॥ अवश्यह्मणेअर्जुन॥ आज्ञाप्रमाणस्वामी-
ची॥ २८॥ रात्रौंकरितांभोजन॥ दीपगेलावारालागोन॥ अर्जुनेंअग्निमंत्रस्मरोन॥ दीपतत्काळलाविला॥ २९॥ ये-
कदांगुरूआज्ञाकरित॥ आंधारांतजेवासमस्त॥ पात्रींवाढूननानापदार्थ॥ पुढेंआणूनठेविले॥ ३०॥ समस्तीआव-
रिलेहस्त॥ अर्जूननिःशंकजेवित॥ पदार्थांवरीहस्तपडत॥ चळणनोहेसर्वथा॥ ३१॥ दीपलाविलेतेथ॥ तोंजेऊ-
नबैसलापार्थ॥ ह्मणेहालक्षनचुकेयथार्थ॥ अचूकहातनिश्चयें॥ ३२॥ वरकडांचीपात्रेंपाहत॥ तोंउगेचबैस-
लेतटस्थ॥ कोणीविदारिलेपदार्थ॥ एकांनएकमेळविती॥ ३३॥ गंगेंतस्नानकरूनद्रोण॥ वेगेंपरतलाशिष्य-
घेऊन॥ वटवृक्षाखालेंयेऊन॥ उभाठाकलाक्षणेक॥ ३४॥ अग्रोदकआणिझडकरी॥ अर्जुनाचेकरींदेतझारी॥-
येरूआलागंगातिरीं॥ तोंमागेंकायवर्तलें॥ ३५॥ द्रोणासह्मणेदुर्योधन॥ येकेबाणेंसमस्तशिरेंजाण॥ छेदावींहें
नकळतांपार्थासपूर्ण॥ मजलागींशिकवाहें॥ ३६॥ अवश्यह्मणेद्रोण॥ त्याहातींमांडविलेंठाण॥ ह्मणेदृढधरूनि-
संपूर्ण॥ पर्णेंवटाचींछेदीकां॥ ३७॥ दुर्योधनेंसोडिलाबाण॥ किंचितपर्णेंगेलींझडोन॥ गुरूह्मणेनसाधेसंधान॥

व्यर्थश्रमकरूंनको॥३८॥गुरूपुढेंगेलातेथुन॥तोंवढारखालेंआलाअर्जुन॥देखिलेंगुरूचेंठाण॥पूर्णविलोकून
वरपाहे॥३९॥तोंकोठेंवटपत्र॥झडलीदीसतीअणुमात्र॥ह्मणेहेंसंधानशर॥भेदूनपाहूंकैसेपां॥४०॥बाणाव
रीठेऊनझारी॥ऊर्ध्वपाठवीअंबरी॥देंटरारवोनपर्णेंधरित्री॥छेदूनपाडिलींएकसरें॥४१॥तोंधावपुरोनउत
रलीझारी॥पार्थेंझेलिलीवरिच्यावरी॥पुढेंजाऊनझडकरी॥दिधलीकरींगुरूच्या॥४२॥ह्मणेकांउशिरलाग-
ला॥येरेंवर्तलावृत्तांतकथिला॥द्रोणवढारवालेंआला॥आश्चिर्यकरीमानसीं॥४३॥अर्जुनासह्मणेअग्रोद-
कझारी॥तुवांकेशीठेविली भूमीवरी॥येरूह्मणेधाडिलीअंबरी॥इतुक्यांतपत्रेंछेदिली॥४४॥मागुतीझा
रीभरून॥पूर्ववतकरींह्मणेद्रोण॥देंटअवघेछेदून॥पाडींआतांधरणीवरी॥४५॥झारीधाडिलीअंबरांत॥
तोंदेंटतोडूनसमस्त॥झारीझेलूनठेवित॥मस्तकगुरूपदाब्जीं॥४६॥गुरूनेंहृदयींधरिलाअर्जुन॥अश्रुधारें
स्रवतीनयेन॥सव्यसाचीसअभिषेचन॥प्रेमोदकेंगुरूकरी॥४७॥बापबापवीरपार्थ॥ह्मणोनपाठीथापटि
ता॥पदककंठींचेंघालित॥अर्जुनाचेगळांतेव्हां॥४८॥अर्जूनभांडारींविद्याधन॥अवघेंमाझेंसांठवीन॥दु-
र्योधनदुःशासन॥अधोवदनेंपाहती॥४९॥ह्मणेयालोकत्रयांत॥समर्थएकवीरपार्थ॥ऐसेंकरीनयथार्थं॥
तरिचद्रोणनाममाझें॥५०॥रथकुंजरअश्वयानीं॥बैसोनकैसेफिरवावेसमरंगणीं॥तेंसमस्तांसीफेरूनी॥
अश्वत्थामाशिकवीत॥५१॥सिंहव्याघ्ररीसगज॥वृकनक्रउरगसतेज॥शरभवानरांसींसहज॥युद्धकरूं
शिकवीत॥५२॥झोंटधरणीयुद्धकरणें॥जळांतअंतरिक्षींजुंझणें॥वज्रठाणनहालणें॥रणांगणींसर्वथा
॥५३॥अस्त्रेंशस्त्रेंनानाविध॥मल्लमेषवृषभयुद्ध॥हैसेसूकरमुसांडीस्फबद्ध॥चुकवूनयुद्धकरावें॥५४॥शू
लतोमरगदाशक्ति॥चक्रलहुडीपाशगती॥खड्गमुद्गलवज्रपाशपती॥विद्यासांगेगुरूतेव्हां॥५५॥लक्षभे
दूनशर॥परतोनयावासत्वर॥जळसिंधूचेपैलतीर॥छेदूनमागुतीपरतावें॥५६॥उदारधनीकदारींयेऊन॥

मिळतीजैसेंयाचकजन॥ तैसेदेशोदेशींचेराजनंदन॥ द्रोणापासींसर्वदा॥ ५७॥ हिरण्यधन्वीयाचासुत॥ एक
लव्यमहाकिरात॥ विद्याशिकावयाअद्भुत॥ गुरूजवळीपातला॥ ५८॥ राजकुमरह्मणत॥ आह्मांक्षत्रियांनहा-
किरात॥ योग्यनव्हेयथार्थ॥ ह्मणवूनियांदवडिला॥ ५९॥ तेणेंवंदूनगुरुचरण॥ हृदयींरेखिलेंतेंचध्यान॥ महा
वनींप्रवेशोन॥ मूर्तीकेलीद्रोणाची॥ ६०॥ सरोवरनिरींउद्यान॥ वंशजाळीपरिघघालून॥ मृत्तिकेचिगुरुप्रतिमाक
रून॥ भावेंकरूनविद्याशिके॥ ६१॥ धन्यकोळियाचाभाव॥ विद्यासाधलीत्यासर्व॥ अर्जुनाहूनविशेषवैभव॥
विद्येचेंत्यासलाधलें॥ ६२॥ पूर्वींविद्याव्हावयाप्रास॥ सुरव्यभांडवलभावार्थ॥ नयाविणेंसर्वव्यर्थ॥ साधनसंभा
रकायसें॥ ६३॥ एकलव्यपारधीसी॥ एकदांआलामहावनासि॥ तोंद्रोणशिष्यभारेंसि॥ त्याचिवनापातले॥ ६४॥
एककरितीअचुकसंधान॥ श्वापदेंपाडितीविंधोन॥ एकाचेचुकतीबाण॥ हांसतीएकदेखोनत्यातें॥ ६५॥ इकडेकि
रानफिरलावनी॥ येतआश्रमालागुनी॥ तोंसारमेयवदनपसरुनी॥ पुढेंधांवेत्वरेनें॥ ६६॥ एकलव्येंसोडूनबा-
ण॥ सारमेयाचेंरेखिळिलेंवदन॥ तोंमागेंयेतांपरतोन॥ कौरवपांडवींदेखिले॥ ६७॥ ह्मणतीकोण्यावीराचेंसंधा-
न॥ खिळिलेंग्रामसिंहाचेंवदन॥ मुखामाजीभरलेबाण॥ आंगासदकानलगतां॥ ६८॥ अर्जुनचकितपाहात॥
तोंपुढेंदेखिलाकिरात॥ त्यासअर्जूनपूसत॥ गुरूतुझाकोणअसे॥ ६९॥ येरूह्मणेगुरुद्रोण॥ अर्जुनमाघारापर-
रतोन॥ जाननरयानींबैसोन॥ भारद्वाजतेथेंपातला॥ ७०॥ ह्मणेमजहूनविशेष॥ विद्यादिधलीकिरातास॥
गुरूह्मणेचालवनास॥ दावींआह्मांसकिराततो॥ ७१॥ आलेतयाच्याआश्रमा॥ तोंगुरूदेखेआपुलीप्रति
मा॥ एकलव्यानावरेप्रेमा॥ लोटांगणींयेतसे॥ ७२॥ घालूनियांतृणासन॥ प्रेमेंकरीचरणक्षालन॥ फळेंपु
ष्पेंआणून॥ गुरूअर्चनकरीतसे॥ ७३॥ गुरूह्मणेतूंमाझानंदन॥ देयाक्षणींअंगुष्ठछेदुन॥ येरेंनकरितांअनु-
मान॥ उतरूनपुढेंठेविला॥ ७४॥ तीआज्ञाअजूनचालत॥ जितुकापृथ्वीतकिरात॥ तिहींबोटींचोढितीशीत॥

अंगुष्ठनलावितसहस्राही॥ ७५॥ संतोषलेगुरुद्रोण॥ एकलव्यासवनींस्थापून॥ एवंविशेषकेलाअर्जुन॥ को
ळियाहूनजाणिजे॥ ७६॥ असोअवघेराजनंदन॥ झालेधनुर्वेदनिपुण॥ द्वंद्वयुद्धींसुजाण॥ दुर्योधनभीमसेन॥ ७७॥
धनुर्वेदाविषयींकर्ण॥ अर्जुनासनोराहावीपूर्ण॥ शकुनीखड्गधरून॥ सहदेवाशीईर्षाकरी॥ ७८॥ नकुळासियु
द्वत्वरित॥ करूंइच्छीशकुनीसुत॥ रथारोहणींधर्मसमर्थ॥ शल्यभावीभिडावया॥ ७९॥ असोपरीक्षापहावया
स॥ वटवृक्षींउभविलावंश॥ त्यावरीकाष्ठकीरविशेष॥ सुरंगकरूनस्थापिला॥ ८०॥ शिष्यांससांगेद्रोण॥ कीर
पाडारेविंधोन॥ पंडूचाज्येष्ठनंदन॥ धर्मराजउठिला॥ गुरुह्मणेपाहेन्याहाळून॥ वरीकायदिसतेंसांगरवूण॥ येरू
ह्मणेवंशीकीरपूर्ण॥ दृष्टीमाजीभासतसे॥ ८२॥ गुरुह्मणेनसाधेसाधन॥ ठेवीरवालेधनुष्यबाण॥ दुर्योधनादि
राजनंदन॥ ऐसेंचकरूनराहती॥ ८३॥ मगउठिलाअर्जुन॥ चापासलाविलाबाण॥ मगह्मणेगुरुद्रोण॥ कायदि
सतेंसांगपां॥ ८४॥ येरूह्मणेकीराचेकंठी॥ तीनरेषादिसतीदृष्टी॥ आज्ञाद्यावीमजश्रेष्ठी॥ मध्यरेषाभेदितो॥ ८५
हूंह्मणतांचगुरुवर॥ अर्जुनेंतत्काळसोडिलाशर॥ मध्यरेषाभेदूनकीर॥ धरणीवरीपाडिला॥ ८६॥ संधानीबैं
सलाहस्त॥ देवव्रतगुरुआलिंगित॥ बापबापवीरपार्थ॥ पाठथापटीसंतोषें॥ ८७॥ गंगेंतस्नानकरितांद्रोण॥ ज
ळचरेंधरिलेंचरण॥ कंठपर्यंतगिळिलाजाण॥ सर्वांप्रतीगुरुसांगे॥ ८८॥ ह्मणेशिष्यहोमगरमारूनयेधवां॥ पु
त्रहोमजसोडवा॥ ऐसेंसमस्तऐकतीतेधवां॥ परिकोणीजळींनजाय॥ ८९॥ एककौरवआडपळती॥ एकतें
थेंचशस्त्रेंसांडिती॥ मगहाकमारीगुरुमूर्ती॥ धांवेअर्जुनासोडवीं॥ ९०॥ घेऊनियांधनुष्यबाण॥ सांवरूनआ
लाअर्जुन॥ उदकांतबुडीदेऊन॥ अधोभागछेदिला॥ ९१॥ गुरुसदकानलागतांपूर्ण॥ तिळाचभेदलेपंचबाण॥
दृष्टीसघेऊनगुरुद्रोण॥ जळाबाहेरआणिला॥ ९२॥ गुरुह्मणेधन्यकुंतीमाउली॥ तुजचिएकाप्रसवली॥ गजें
द्रासंसोडवीवनमाळी॥ केलीतैसीख्यातीतुवां॥ ९३॥ प्रसन्नझालागुरुद्रोण॥ ब्रह्मनामाभिधान॥ सबीजमंत्र

सांगोन॥ अस्त्रदीधलेअर्जुना॥ ९४॥ जाचेंप्रतापतेजबहुत॥ साहूंनशकेरूतांत॥ ब्रह्मांडयासीलसमस्त॥ क्षणमा त्रनलगतां॥ ९५॥ द्रोणह्मणेतेक्षणीं॥ वीरचक्रचूडामणी॥ हेंअस्त्ररक्षीप्रयत्नीं॥ सोमवंशविजयध्वजा॥ ९६॥ पार्था सकरींधरून॥ सभेसआलेगुरुद्रोण॥ भीष्मधृतराष्ट्रांलागुन॥ आज्ञापीततेधवां॥ ९७॥ विद्याकुमरांझालीपूर्ण॥ याचीपरीक्षापहावेसोन॥ रंगागारनिर्मून॥ समस्तमिळाएकदां॥ ९८॥ प्रधानासांगूनगंगाकुमर॥ चतुरबोलावि लेसूत्रधार॥ रंगधामनिर्मिलेसुंदर॥ विद्यापरीक्षापाहावया॥ ९९॥ पुढेंवृक्षगुल्मेंतोडून॥ भूमिकाकेलीसमान॥ भूमीदेवतेंशांतवून॥ बळिदानेंअर्पिलीं॥ १००॥ रथगजतुरंगसबळ॥ फेरावयाकेलेंस्थळ॥ विद्युल्लतेसारिखेच पळ॥ तळपतीवीरतेथें॥ १॥ चंदनकर्पूरकस्तूरीचूर्ण॥ मृत्तिकेंतमिश्रकरून॥ स्रुवासीककेलीपूर्ण॥ बाहूसलाऊ नपिदावया॥ २॥ नवरत्नमंडीतमंडपगुणीं॥ उंचनिर्मिलीशतखणी॥ ऋषिराजेप्रजायेउनी॥ पाहावयासीबेसती॥ ३॥ सोमकांतसूर्यकांतपाषाणी॥ सभारचिलीतेक्षणीं॥ शोभतीस्फटिकांच्याश्रेणी॥ झळकतीसूर्यरश्मीजशा॥ ४ सुवर्णाचीतुळवटे॥ हिऱ्यांचेस्तंभसकटे॥ गरुडपाचूचेदांडेनीटे॥ किलच्यातेथेंमणियांच्या॥ ५॥ असोदिव्यास्त रणेघालून॥ सुमुहूर्तेबेसलेयेऊन॥ प्रज्ञाचक्षूगंगानंदन॥ रूपाचार्यशिष्येंशीं॥ ६॥ वाल्मीकआणिविदुर॥ व्या संवेशिंपायनशक्रकेंद्र॥ जयमिनीसंजयब्रह्मपुत्र॥ नारदस्वामीबेसले॥ ७॥ तोंअकस्मातश्यामवर्ण॥ शुभ्रयज्ञो पवीतशुभ्रवसन॥ श्वेतपुष्पमाळाघालून॥ शुभ्रचंदनचर्चिला॥ ८॥ शुभ्रहिऱ्यांचेंपदक॥ शुभ्रमुक्तमाळाडोल तीदेख॥ शिष्यांसहीतसुरेख॥ द्रोणाचार्यपातले॥ ९॥ धृतराष्ट्रगंगानंदन॥ उठोनिदेतीअभ्युत्थान॥ श्रेष्ठासनीबेस ऊन॥ केलेंपूजनतेधवां॥ १०॥ कुंतीगांधारीअसंख्यस्त्रिया॥ सभापाहूंआल्यासदया॥ जेथेंलाविल्यामुक्तजाळि या॥ आडबेसतीपाहावयास॥ ११॥ गजपुरींच्याप्रजाबहुत॥ नारीनरपातलेतेथ॥ देशोदेशींचेनृपधांवत॥ परि वारेंशींपाहावया॥ १२॥ बहुतऋषींचेसंभार॥ बेसतीएकपंक्तीसमग्र॥ ब्राह्मणक्षत्रियवेश्यशूद्र॥ चारीवर्णपाह्या

नी॥१३॥तंतविततंघनसुस्वर॥गर्जतीवाद्यांचेगजर॥पातलेमहावीरांचेभार॥शस्त्रास्त्रींसिद्धहोउनी॥१४॥कडाडिल्या
महाशक्ति॥नडकयंत्रांच्याध्वनीहोती॥महावीरहाकादेती॥बाहूपिटितीसत्राणें॥१५॥बळेंठोकिल्याराजभेरी॥नाद
नमायेअंबरीं॥उर्वीमंडळथरारि॥धाकेअंतरींभोगेंद्र॥१६॥नमूनियांगुरुद्रोण॥शस्त्रेंपूजिलींसंपूर्ण॥आरक्तपु
ष्पमाळाघालून॥रक्तचंदनचर्चिलें॥१७॥आचार्याचीआज्ञाघेऊन॥दावितीशस्त्रविद्यासाधन॥आवेशेंकरिती
वीरगर्जन॥नादगगनींनसमाये॥१८॥अचूकवीरांचेंसंधान॥संकेतेंपाडिती विंधोन॥एकझाकूनियांनयन॥म
गलक्षभेदिती॥१९॥एकपाठीमोरेविंधिती॥लक्षभेदीतनेमस्त॥अस्त्रमात्राचासमस्त॥विद्यादावितीखेळोनी॥
॥२०॥यमदंष्ट्रानितीक्ष्ण॥तैसेभालेकाढियाजाण॥कौंतेयशक्तीदारूण॥खंडीबाणसुऱ्यांशीं॥२१॥दशघ्नी
शतघ्नीतिधारेंपाशफपत॥परशफपट्टिशदुधारेंतळपत॥पाशलहुडीवज्रतोमरझळकत॥ ॥चक्रेंचेंडूमुद्ग
लगदा॥२२॥खड्गचर्मलोहार्गळा॥हस्तपाषाणलोहशंखळा॥लौहदृश्वीककंटकमाळा॥उल्हाटयंत्रेंअंचुक
पैं॥२३॥अस्त्रेंसोडूनिआवरिती॥जेंशस्त्रधरिलेंहातीं॥त्याचअभिमानेंतेंचतळपती॥गतिदावितीविशेष॥
२४॥हयकुंजरींरथींबैसती॥अलातचक्रवत्‌फेरिती॥एकचरणेचचमकती॥दावितीगतीअनेक॥२५॥एवं
जेरीअनिवार॥करींकदानधरीशस्त्र॥शस्त्रासहितकर॥मोडितीअकस्मातयेउनी॥२६॥पक्ष्यासारिखेंये
उनी॥अंगेंटाकितीमोडुनी॥अस्त्रेंन्यावींहिरोनी॥मनगटेंत्वरेंमोडूनियां॥२७॥महाराजआचार्यद्रोण॥शि
कविलेंनानाशस्त्रसाधन॥वीररसमाजलापूर्ण॥दिवसरजनीआठवेना॥२८॥तोंहांकवाजलीअत्यद्भुत॥हृ
दयींद्वचकेकृतांत॥सभाझालीभयाभीत॥हाकेसरसीतयाच्या॥२९॥कींदोघेआलेऐरावती॥कींसिंहचिदो
घेगर्जती॥ऐकोनआरोळीचित्ती॥वीरमहात्रासले॥३०॥तोंभीमआणिदुर्योधन॥प्रचंडगदाहातींघेऊन॥वि
चित्रमांडलेंठाण॥बळेंपरजितीहस्तकीं॥३१॥मुखेंगर्जनाकरून॥महीवरीपिटितीचरण॥हुंकारेंउफाळती

पंचानन॥ तेसे दोघे अनिवार॥ ३२॥ दशनीं दाबिती अधर॥ आरक्तवर्ण झाले नेत्र॥ श्मश्रू पिळून सत्वर॥ पुढें पुढें ठाक
ती॥ ३३॥ एकएकाचे प्राण॥ घ्यावया सिद्ध गदा उचलून॥ तों हाहाःकार झाला पूर्ण॥ महावीर गजबजिले॥ ३४॥ ए-
क वर्णिती दुर्योधन॥ एक ह्मणती धन्य भीमसेन॥ कृतांतही येऊन॥ उभा न राहे यापुढें॥ ३५॥ द्रोणें स्वपुत्रास सांगो
ना॥ दोहीं करीं दोघे धरून॥ आचार्यपदाची आण घालून॥ युद्ध त्यांचें वारिलें॥ ३६॥ विद्यापरीक्षा पाहावयालागुन
॥ सभारंग केला ह्मणऊन॥ तों तुह्मीं मोडिलें निर्वाण॥ प्राण घेऊं इच्छितां॥ ३७॥ चातुर्याविण विद्या सकळ॥ क्ष-
णांत होऊनि जाय विकळ॥ समय पाहून भूपाळ॥ कार्य आपुलें साधिती॥ ३८॥ एकामंत्रें करून॥ दोन भुजंग आ
कर्षिले दारुण॥ तैसे सुयोधन भीमसेन॥ आचार्य सत्वें वारिले॥ ३९॥ तों त्या रणांत अकस्मात॥ जडित मुकुट शि
रीं तळपत॥ जडीत कुंडलें वोप देत॥ विद्युल्लते सारिखीं॥ ४०॥ रत्नमंडीत आभरणें॥ कंठीं मेखळे वरी दिव्य रत्नें॥
कनकवर्ण दिव्य वसनें॥ उजेड पडे सभेवरी॥ ४१॥ रत्नजडीत धनुष्य परिकर॥ शरें दाटलें रत्नजडित तूणीर॥ अंगीं
कवच तेज अपार॥ प्रळय चपळे सारिखें॥ ४२॥ अकस्मात उगवे सहस्रकिरण॥ तैसा आला वीर अर्जुन॥ करीत आ
वेशें गर्जन॥ ऐकतां वीर खळबळले॥ ४३॥ धडकती वाद्यांचे कल्लोळ॥ संपूर्ण भरला ब्रह्मांडगोळ॥ पार्थाचें प्रतापब-
ळ॥ भाग्य वर्णिती गर्जोनी॥ ४४॥ धृतराष्ट्र पुसे विदुरालागुन॥ गर्जत जैसा पंचानन॥ वाटे डळमळिलें त्रिभुवन॥ वी
र हा कोण सांग पां॥ ४५॥ विदूर ह्मणे तुझा नंदन॥ कुंतीबाळ धनंजय जाण॥ येरू ह्मणे वंशभूषण॥ भीमार्जुन धन्य-
हो॥ ४६॥ यानंतर वीर पार्थ॥ शस्त्रास्त्रविद्या दावित॥ अग्न्यस्त्रें त्वरें सोडित॥ शांतवीत पर्जन्यास्त्रें॥ ४७॥ वरुणास्त्रें-
जळलोट॥ वातास्त्रें प्रभंजन धुंडाट॥ भौमास्त्रें भूमीचें पोट॥ रथाशीं जावें भेदुनी॥ ४८॥ काळरात्री आंधार विशेष॥
सूर्यास्त्रें पाडी प्रकाश॥ सर्पास्त्रावरी खगेश॥ सोडून निवटी प्रतापें॥ ४९॥ त्रिविक्रमातुल्य दिसे अर्जुन॥ सर्वांच हो-
य जेविं वामन॥ सर्वांचि दिसे सर्षपप्रमाण॥ अगोचर होय क्षणांत॥ ५०॥ पाताळा जाय क्षणांत॥ सर्वांचि भूमंडळीं उ

मटत॥ क्षणानंरथावरीबैसत॥ तुरंगींचढननकळेकेव्हां॥ ५१॥ केव्हांबैसलाकुंजरीं॥ हस्तीसनयेझडकरीं॥ अला-
तचक्राचेपरी॥ कोणेदिशेंगेलानकळे॥ ५२॥ लोहस्तंभावरीवराहफिरत॥ दंतांतजिव्हालळलळित॥ खालेंपाहोन
अकस्मात॥ जिव्हाछेदीतपार्थपैं॥ ५३॥ पुढेंपाहोनखालेंविंधी॥ खालेंनिरखूनवरीभेदी॥ शृंगारदेऊनगुणछेदी॥
मुद्रेतूनबाणवोंवी॥ ५४॥ वामसव्यउभयहस्तकें॥ संधानचालेसमानसारिखें॥ आंधारींजेथेंशब्दऐके॥ शरमा-
रीतेचठायीं॥ ५५॥ एकेबाणेंकरून॥ वटपत्रेंपाडीछेदून॥ कार्यसाधूनबाण॥ परतोनआणीमाघारे॥ ५६॥ सेवकधुं
डितीजैसेनरस्कर॥ तेविशत्रूशोधीतशर॥ असोविधिनेंनिर्मिलेंअस्त्रमात्र॥ अर्जुनेंतींपरणिलीं॥ ५७॥ ऐसेंअर्जुना
चेंसंधान॥ तटस्थपाहतीसभाजन॥ तोंरूतांतकिंकाळीसमान॥ हाकबाहेरगाजली॥ ५८॥ डळमळिलेंभूमंडळ॥
वाटेतडकलाकनकाचळ॥ कींआटलेंससुद्रजळ॥ मेघदचकेअंतरीं॥ ५९॥ उर्वीडळमळेक्षणोक्षणीं॥ उभेरांहोनशके
कोणी॥ हाहाःकारजाहलातेक्षणीं॥ एकावरीएकपडले॥ ६०॥ महाधोंकडउन्मत्त॥ रंगींयेऊनलोळत॥ दोर्दंडपिटि-
तांलोकभावित॥ वीजआलीसभेवरी॥ ६१॥ बंधूसमवेतसुयोधन॥ सामोरूनजानउठोन॥ जैसामाध्यान्हींचंडकी
र्ण॥ तैसाकर्णसभेसदिसे॥ ६२॥ सूर्यपुत्रकर्णउदार॥ स्वरूपेंउणापंचशर॥ किरीटकुंडलेंतेजाकार॥ वंदनचंद्र-
नवर्णवे॥ ६३॥ सौंदर्यसिंधूहेलाचळापूर्ण॥ तैसारणांगणींउभाकर्ण॥ कृपाचार्यद्रोणचरण॥ वंदूनउभाराहिला
॥ ६४॥ सभारंगपुनःदाटत॥ जैसामेघवोसरोनवर्षत॥ तैसापार्थापेक्षांअद्भुत॥ कर्णेंरंगभरियेला॥ ६५॥ कर्णह्म-
णेतेवेळां॥ रेरेअर्जुनाकुंतीबाळा॥ तुवांविद्यादाविल्यासकळा॥ त्यानेचौगुणेंदावीनमीं॥ ६६॥ श्लाघ्यताधरूंन
कोअंतरीं॥ गर्वसोडींयेअवसरीं॥ अभिमानेंतत्रशरीरनिर्धारीं॥ पायांतळींमाझिया॥ ६७॥ अर्जुनेंविद्यादाखवि-
ली॥ त्याहोनकर्णेंविशेषकेली॥ सुयोधनाआनंदतेकाळीं॥ गगनमंडळींनसमाये॥ ६८॥ कर्णाचियेकंठीं॥ दुर्योध-
नेंघातलीमिठी॥ ह्मणेप्राणसखयागोष्टी॥ आज्ञापीतमजआवडेती॥ ६९॥ येरूह्मणेवाटतेंमनीं॥ पार्थासिभिडा

वेंसमरंगणीं॥ सुयोधनह्मणेकाळेंकरूनी॥ इच्छापूर्णहोईल॥ ७०॥ करूनराज्याचाअर्धभागसमान॥ तुजंम्यांदीध
लाप्रीतीकरून॥ सुत्हदांच्यामाथापायदेऊन॥ भोगभोगीमजऐसे॥ ७१॥ कोधेंबोलनअर्जुन॥ तोपुरुषशतमूर्खपूर्ण॥
जोइर्षावादवीकार्याविण॥ धरूनमानबोलेजो॥ ७२॥ पंचाननासन्मूखहस्ती॥ कुंभस्थळींचींमुक्तेंदाविती॥ कस्तूरी-
सुवाससमिरविती॥ हरिणाजैसेंव्याघ्रपुढें॥ ७३॥ मद्यपीशस्त्रझाडित॥ आपलेंअंगआपणछेदित॥ तैसेंअहंकारेंउ-
न्मत्त॥ क्षीणतुह्मींचव्हालपैं॥ ७४॥ आह्मावरगोष्टघालून॥ कपटेंबोलतांतीक्ष्ण॥ परिक्षणांतमस्तकेंछेदूनधरात
ळींपाडीनमी॥ ७५॥ ऐसेंबोलतांअर्जुन॥ युद्धासउभाठाकलाकर्ण॥ तोंपांडवपांचहीजण॥ सिद्धझालेजुंझावया॥
॥ ७६॥ दुर्योधनबंधूंसहित॥ कर्णाचेपाठीसींउभाठाकत॥ द्रोणकृपाचार्यगंगासुत॥ पांडवांकडेजाहले॥ ७७॥ स
भादोनभागहोत॥ तोंभास्करआणिपुरंदर॥ अंतरिक्षकौतूकविलोकित॥ निजपुत्राचेंतेधवां॥ ७८॥ युद्धासकर्ण-
अर्जुन॥ उभेठाकलेजाणुन॥ कुंतीत्हदयींचिंताग्न॥ परमदारुणपेटला॥ ७९॥ मनझालेंव्याकुळ॥ नेत्रींवाहेअश्रूज
ळ॥ मूर्छायेततत्काळ॥ विदुरतेव्हांसांवरी॥ ८०॥ ह्मणेचिंतानसेकांहीं॥ स्वस्थहोऊनकौतुकपाहीं॥ इकडेकृपाचा
र्यतेसमयीं॥ कायगर्जोनबोलत॥ ८१॥ सोमवंशसुगुटावतंस॥ पंडूविख्यातनिर्दोष॥ त्याचापुत्रअर्जूनविशेष॥
सर्वलक्षणींपुरता॥ ८२॥ कुंतीमातावसुदेवभगिनी॥ आतह्मणेचक्रपाणी॥ किरानहाकर्णऐशीवाणी॥ ऐकतीक-
र्णीसमस्त॥ ८३॥ समानयोग्यनाबळ॥ अर्जुनासींमांडिलेंसकळ॥ ऐकतांकर्णतत्काळ॥ तेजहीनजाहला॥ ८४॥ म-
गबोलेसुयोधन॥ शौर्यबळेंआगळापूर्ण॥ कायकुळासींकारण॥ विद्याभूषणकायआहे॥ ८५॥ सुकुलीनपरीवि
द्याहीन॥ कायव्यर्थतोवांचोन॥ कृपाचार्याविपरीतवचन॥ चडिलतूंबोलसी॥ ८६॥ राजानव्हेकर्ण॥ जरीह्मणे-
लअर्जुन॥ तरिअंगदेशींचासंपूर्ण॥ राजाकरीनहाआतां॥ ८७॥ सकळसामग्रीआणुन॥ कर्णरत्नपीठींबैसऊन॥
समस्तराजचिन्हेंदेऊन॥ अभिषेकिलातेधवां॥ ८८॥ मांडलीकरायांसह्मणेसुयोधन॥ मजसमानमानूंकर्ण॥

मेदिनीहानेंस्पर्शोन॥करानमनउटाआनां॥८९॥समस्तकरितीनमन॥मगबोलेउदारकर्ण॥सुयोधनाभागमज
लागुन॥कांहींनरीयेवेळें॥९०॥सुयोधनह्मणेराजोत्तमा॥जोंवरीआयुष्यआहेतुह्मांआह्मां॥तोंवरीमैत्रीस्नेहप्रे
मा॥दिवसेंदिवसवादवीं॥९१॥अवश्यह्मणेकर्ण॥सव्यहस्तउचलून॥देनइदभाषदान॥तोंराधारमणपातला
॥९२॥राज्यआलेंपुत्रासि॥ह्मणोनपातलावेगेंसि॥कर्णेंउठोनत्यासि॥नमस्कारिलेंतेवेळे॥९३॥मस्तकअवघ्राह-
णून॥पुत्रासदिधलेंआलिंगन॥तोउगानराहेभीमसेन॥कायगर्जोनबोलत॥९४॥ह्मणेरथसारथीकिरात॥त्याचा
तूंकेवळकर्णसुत॥आजिकळलेंनिश्चित॥उभयकुळींअशुद्धतूं॥९५॥तुवांहीरथसारथ्यकरावें॥क्षत्रियकर्मका-
सयाव्हावें॥अर्जुनाशींद्वंद्वयुद्धकरावें॥मनींधरिशीमतिमंदा॥९६॥राजहंसाशींकागदेख॥कींश्रोत्रियासमोरहिं
सक॥कींमहेशापुढेंमशक॥अर्जुनापुढेंतैसातूं॥९७॥तूजकासयाराज्यासन॥योग्यनव्हेशीअवर्ण॥नटसन्या
सीझाला एकक्षण॥परीकोणीवंदीना॥९८॥ऐसेंबोलतांभीमसेन॥करकरांदांतखायकर्ण॥अवलोकूनचं-
डकिर्णा॥कुंतीकडेपाहत॥९९॥ह्मणेसभेंतबैसून॥कोणाकायबोलावेंवचन॥हेंज्यासनकळेंपूर्ण॥कोणमनु
ष्यबोलेतया॥२००॥ऋषीनदीनृपशूर॥याचाशोधनकीजेसत्वर॥सुरवेंनिंदाकरीतोनिर्धार॥महाकंटकजा
णावा॥१॥वृक्षमूळींदृष्टीनघालून॥फळींदेविचित्रपूर्ण॥मिलिंदकर्दमसोडून॥सुवासघेनकमळाचा॥२॥
केसरीजन्मलाअजेचेपोटीं॥हेकाळत्रयींनघडेगोष्टी॥हनुमंतकेवळधूर्जटी॥तोकायवानरह्मणावा॥३॥मुं
गीचियाविवरांत॥कैसासामावेलऐरावत॥तैसानीचक्षेत्रींमीसूर्यसुत॥निपजेनकैसानेणातुह्मी॥४॥स
मुद्रचळयांकिनधरणी॥वोवाळावीनरवावरूनी॥तेथेंअंगराजासकोणगणी॥नेणामनींसूर्यवहो॥५॥ऐसें
बोलतांकर्ण॥गदासांवरीभीमसेन॥तोंसभाखळबळलीसंपूर्ण॥हाहाःकारजाहला॥६॥अर्जुनाचेभयें-
करून॥कौरवउभेकर्णासवेष्टून॥तोंवरुणादिग्बंधूचेंसदन॥सहस्रकिरणप्रवेशला॥७॥संध्याकाळजा-

णून॥ तेसंधीनंउठलेगुरुद्रोण॥ कर्णआणिभीमसेन॥ दोघेवारिलेदोंपक्षीं॥ ८॥ प्रळयींफुटेसमुद्र॥ तैसीसभाउठि
लीसमग्र॥ आपुलाल्यास्थळासत्वर॥ नरनारीजातीनिघोनी॥ ९॥ एकह्मणतीधन्यदुर्योधनकर्ण॥ एकह्मणतीधन्यभी-
मार्जुन॥ एकह्मणतीकलहदारूण॥ होतहोतांवारला॥ १०॥ कुंतीत्हृदयीआनंदपूर्ण॥ कलहवारलाह्मणोन॥ वंदी
विदुराचेचरण॥ ह्मणेधन्यज्ञानीतूं॥ ११॥ गुरूसदक्षणायथार्थ॥ देईलआतांवीरपार्थ॥ धरून आणीलनृपनाथ॥
द्रुपदपांचाळदेशींचा॥ १२॥ तेपंडीतचतुरजन॥ ब्रह्मानंदेंकरोतश्रवण॥ श्रीधरसंतांचादीन॥ चातुर्यसाहित्यनें-
णेचि॥ १३॥ परिदयाळब्रह्मानंदसत्य॥ तेणेंमस्तकींठेविलाहस्त॥ त्यावरदें श्रीधरबोलत॥ सत्यसत्यत्रिवाचा॥ १४
सुरसपांडवप्रतापग्रंथ॥ आदिपर्वव्यासभारत॥ त्यांतीलसारांशयथार्थ॥ नवमोध्यायींकथियेला॥ १५॥ इति-
श्रीपांडवप्रतापग्रंथ॥ आदिपर्वटीकाश्रीधरकृत॥ विद्यापरीक्षासमस्त॥ कर्णाभिषेचनकथियेलें॥ १६॥ ॥ इ-
तिश्रीमहाभारतटीकापांडवप्रतापादिपर्वेनवमोध्यायसंपूर्णमस्तु॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु॥ ॥ ९॥

श्रीगणेशायनमः॥ समस्तांसह्मणेद्रोण॥विद्याझालीतुह्मांपूर्ण॥तरिगुरुदक्षिणाप्रीतीकरून॥आनांदिधली-
पाहिजे॥१॥समरंगणींजिंकुनी॥द्रुपदआणावाबांधुनी॥महानहस्तीवोपाइतुकेनि॥आचार्यदक्षणापावली॥
अवश्यह्मणोनितेअवसरीं॥ठोकिल्यासंग्राममसंकेतभेरी॥कौरवपांडवगजरीं॥निजभारेसींचालिले॥३॥प्रळ
यींफुटेजैसासागर॥तैसेचालिलेचतुरंगभार॥महावाद्यांचागजर॥तेणेंअंबरकोंदले॥४॥पुढेंधांवलेहेर॥ह
डबडिलेंपांचाळपुर॥राजाप्रधानआणिकुमर॥नगराबाहेरधांवले॥५॥चित्तीअभिमानधरून॥कौरवपुढेंजा-
तीधांवोन॥द्रोणासह्मणेअर्जुन॥कौतुकपाहूंक्षणएक॥६॥पांचाळाचेंदळदुर्धर॥फुटलाजैसाप्रळयसमुद्र॥यु-
द्धमांडलेंधुरंधर॥परस्परेंझगटले॥७॥गजासींगजभीडती॥स्वारांसस्वारहाणिती॥रथीयाशिरथीझगटती॥
एकवटतीपायदळें॥८॥कौरवांचीसबळपृतना॥तृणवत् वाटेपांचाळनंदना॥बाणचापर्जन्यजाणा॥दोनीद-
ळेंवर्षती॥९॥अनिवारद्रोपदाचामार॥कौरवसेनाकेलीजर्जर॥सांडूंपाहतीधीर॥कर्णदुर्योधनतेधवां॥१०॥कौ
रवांसह्मणेद्रुपदराज॥द्रोणासमानमानूनिमज॥शस्त्रेंटेऊनसतेज॥दंडवतघालणें॥११॥माझागुरुबंधूद्रोण॥
त्याचेशिष्यतुह्मींसंपूर्ण॥विद्याअसेलअपूर्ण॥तीशिकवीनयेथेंआतां॥१२॥अलातचक्रफिरत॥तैसेद्रुपदाचे
चापझळकत॥बाणसोडिलेसंख्यारहित॥सुटलाकंपकौरवांसी॥१३॥अनिवारद्रुपदाचामार॥पळोंलागले
धार्तराष्ट्र॥पाठीधांवतीद्रुपदभार॥सेनासमग्रलुटिती॥१४॥नगरवासीलोकबहुत॥पाठीधांवती घ्या घ्याह्म
णत॥अष्टदिशानींपळत॥कौरवसेनात्वरेनें॥१५॥कर्णविकर्णसुयोधन॥दुःशासनशकुनीआदिकरून॥वे
गेंपळतीउठोन॥सकळराजयासहित॥१६॥टाळीपिटूनपांचाळहांसत॥आडमार्गेंपळतीअंधसुत॥अभय
देऊनसमस्त॥नीटवाटेलावाकां॥१७॥धापेंदाटलेकौरव॥ह्मणतीभीमार्जुनाधांव॥सेनापराभविलीसर्व॥नि
र्वाणकायपाहातां॥१८॥ऐसेंऐकतांभीमार्जुन॥द्रोणचरणाकरूनिनमन॥रथारूढहोऊन॥मनोवेगेंधांवती॥

॥१९॥रथारवालेंउतरोन॥भीमधांवेगदाघेऊन॥वीजहक्षींपडेंकडकडोन॥तेविपरच्चमूंतमिसळला॥२०॥कुंजरां-
च्याथाटींबहुत॥गदाघायेंनिवटित॥मस्तकसुक्तेविखरत॥वाटेनक्षत्रदृष्टीने॥२१॥मुसळघायेंमृद्दृढचूर्ण॥ते-
विकुंभस्थळेंजातीफुटोन॥संहारिलेगजसंपूर्ण॥ह्मणतीप्रळयमांडला॥२२॥अश्वरथीयावरीपार्थ॥धांवलाप्र
ळयशरसोडित॥नागरीकदीनेंझालींसमस्त॥दांतींधरतीतृणतेव्हा॥२३॥त्यांसनमारितीभीमार्जुन॥ह्मणतीन-
गरांतजापळोन॥इकडेपुरंदरनंदन॥अर्थपुरवीगुरूचे॥२४॥लक्षूनद्रुपदाचारथ॥चाललादळासंसंहारित॥रक्त
नद्याधांवतीबहुत॥वाटपुसतीसिंधूची॥२५॥मुगुटासहितशिरेंउडवित॥शस्त्रासहितछेदिलेहस्त॥शिरकमळ-
लाखोल्याबहुत॥भूलिंगाससमर्पिल्या॥२६॥रक्तगंगासंगेंकरूनियां॥प्रेतेंजातीसिंधूसभेटावया॥उरलेतेपाठी
देऊनियां॥पळतीतेव्हांदशदिशा॥२७॥द्रुपदेंसोडिलेसहस्त्रबाण॥तेपार्थवीरेंपाहोन॥लक्षबाणेंकरून॥पांचा
ळरावरिविळियेला॥२८॥इतुक्यांतधांवलासत्यजित॥तेणेंयुद्धकेलेंअपरिमित॥पार्थाचेंयुद्धअद्भुत॥दुरूनपाह-
तभीमतेव्हां॥२९॥सत्यजिताच्याअश्वासहीनरथ॥बाणेंचूर्णकेलाक्षणांत॥हाकफोडूनियांत्वरित॥सत्यजीत
पळाला॥३०॥पुढेंपांचाळसोडीबाण॥तेकदांनलेखीअर्जुन॥जैसेंमतवादियाचेंभाषण॥वेदांतज्ञानीमानीना॥३१
गांडीवधनमंडळअद्भुत॥बाणधारावर्षेजीमूत॥पांचाळमनींभाविना॥आलामृत्यूयावरी॥३२॥ध्वजछत्रचाप-
बाणतूणीर॥तत्काळछेदूनकेलेंचूर॥अश्वसारथीसत्वर॥प्रेतेंकरूनपाडिले॥३३॥समुद्रांतदेऊनिबुडी॥विना
यकजैसामच्छकाढी॥तेविंपार्थउतरूनप्रौढी॥स्वबाहीकवळीद्रुपदाते॥३४॥बळेंउचलोनतत्काळ॥स्यंदनावरी-
घातलापांचाळ॥तेव्हांकौरवबंधूसकळ॥जयजयकारेंगर्जती॥३५॥चौपारीफुटेतडागजळ॥तैसेंपळालेंपांचा-
ळदळ॥ग्रामलुटावयातात्काळ॥कौरववीरधांवती॥३६॥अर्जुनेंधांवडिलादूत॥प्रजापीडणेंहेंअनुचित॥द्रोणा
चागुरुबंधूपांचाळनाथ॥वंद्यहोयआह्मातें॥३७॥जिंकिलाजोकांद्रुपदवीर॥द्रोणाचेंहेंराज्यसमस्त॥अभिलाषि

नांसत्वर॥ दोषांनबुडालपैं॥ ३८॥ दूतआज्ञेवरून॥ फिरलेसमस्तकौरवजन॥ पार्थेंदूतपाठऊन॥ प्रधानधरिलेद्रुपदा
चो॥ ३९॥ नेहीद्रोणापाशीयेऊन॥ उभेठाकलेकरजोडुन॥ त्याचापुत्रआणुन॥ गुरूपुढेंउभाकेला॥ ४०॥ पार्थह्मणेद्रोणा-
सि॥ भेटवींआतांगुरूसि॥ मगहास्यमुखेंद्रुपदासि॥ भारद्वाजबोलत॥ ४१॥ तूंराजामींब्राह्मणदीन॥ मित्रत्वनव्हेचि
समान॥ बोलिलासजेंवचन॥ मनामाजीआठवीं॥ ४२॥ अधोवदनेंद्रुपदबोलें॥ अज्ञानापासूनअंतरपडलें॥ सज्ञा-
नेंक्षमाकरावेंवहिलें॥ थोरपणनरिचहो॥ ४३॥ ऐसेंबोलतांवृषानंदन॥ कृपेनेंआलिंगीगुरुद्रोण॥ ह्मणेमनांतभय-
नधरींपूर्ण॥ आनंदघनअसावें॥ ४४॥ आह्मींतुह्मींबाळमित्रविशेष॥ असोअग्निवेषाचेंशिष्य॥ केलाविद्याअभ्यास
॥ तोआठवमजआहे॥ ४५॥ म्यांकेलापुरुपार्थ॥ तुझेंराज्यघेतलेंसमस्त॥ दक्षिणेसमजदेतपार्थ॥ तुजसहीतसाधू
नियां॥ ४६॥ त्यांतअर्धविभागराज्यपूर्ण॥ मीदेतोंसंतोषेंकरून॥ वैरभावटाकून॥ तेत्वांभोगूनअसावें॥ ४७॥ ऐ-
सेंबोलोनिद्रोणें॥ स्वस्थळींधाडिलेंबहुमानें॥ परितोअपमानकृशानेंदुःखेंदग्धझाला॥ ४८॥ मनांतह्मणेनृपवर॥
प्रसन्नकरूनअपर्णावर॥ अयोनिजन्ममागेनकुमर॥ द्रोणालागींमारीऐसा॥ ४९॥ असोइकडेकौरवपांडव॥ हस्तना
पुराआलेसर्व॥ धृतराष्ट्रासीद्वेषभाव॥ दिवसेंदिवसवाढविती॥ ५०॥ लोटलियाएकवर्ष॥ बळबुद्धिविवेकविशे-
ष॥ भीष्मेंजाणूनिधर्मास॥ युवराज्यदिधलें॥ ५१॥ सुहृदसेवकप्रजासकळिक॥ सुखीकेलेधर्मेंबहुत॥ जेते-
धर्मासस्तविती लोक॥ राजायोग्यहोयहा॥ ५२॥ विद्यानिपुणभीमसेन॥ तरिगुरूकरूनरेवतीरमण॥ गदायुद्धींपू-
र्ण॥ कृष्णाग्रजेंतोकेला॥ ५३॥ हेंदेखोनदुर्योधन॥ अच्युताग्रजापाशींजावोन॥ भीमाचेईर्षेनेंपूर्ण॥ गदायुद्धशि
कला॥ ५४॥ राजधर्मींसंपूर्ण॥ युधिष्ठिरझालानिपुण॥ गदायुद्धींभीमसेन॥ निवडलाअर्जूनशस्त्रास्त्रीं॥ ५५॥
नीतिज्ञानींचतुरकुशळ॥ परमविवेकीझालानकुळ॥ रणपंडीतधर्मशीळ॥ सेवेसिंसादरधर्माचो॥ ५६॥ भूतभ
विष्यवर्तमान॥ क्षत्रधर्मीसहदेवनिपुण॥ पांचहीविद्यागुणबळेंसंपूर्ण॥ जनह्मणतीजाहले॥ ५७॥ एकांतींपार्थ

सि ह्मणे द्रोण॥ त्यांनूं जविद्या दिधली संपूर्ण॥ अगस्ती महामुनीचा शिष्य जाण॥ माझा गुरू अग्निवेश॥ ५८॥ तेणें अस्त्र
सांगीतलें पूर्ण॥ तें जैसें तेजाळ विष्णु सुदर्शन॥ सोडितां ब्रह्मांड संपूर्ण॥ निमिषार्धें जाळील॥ ५९॥ तें कोणा न सांगा
वें॥ भलनियावरी न घालावें॥ मग तें पर ब्रह्मास्त्र बरवें॥ अर्जुनास उपदेशिलें॥ ६०॥ अर्जून घाली लोटांगण॥ ह्मणे
एं वदें द्यावें मज लागुन॥ सकळ रायादेखतां दारूण॥ युद्ध करावें मज शीं॥ ६१॥ तथास्तु ह्मणे द्रोण॥ यावरी भीम नकु
ळ सहदेव घेऊन॥ पूर्व पश्चिम उत्तर दक्षण॥ दिग्विजय केला अर्जुनें॥ ६२॥ समस्त जिंकून नृपवर॥ द्रव्यें भरलें हस्तिना
पुर॥ हें परिसतां चि धृतराष्ट्र॥ चिंतार्णवीं पडियेला॥ ६३॥ ह्मणे पांडव झाले बळवंत॥ राज्य घेती लक्षणांत॥ अभा
गी माझे सुत॥ भिक्षा मागती वाटतें॥ ६४॥ मग कणींक नामा प्रधान॥ आदरें आणिला बोलाउन॥ धृतराष्ट्राचा सख
निर्वाण॥ दीर्घद्रष्टा नष्ट तो॥ ६५॥ अंध एकांतीं त्यासी सांगत॥ पांडव झाले बळवंत॥ माझ्या पुत्रांचा मनोरथ॥ पु
ढें निर्फळ दिसतो॥ ६६॥ तो सकळ कुटिळा माजी श्रेष्ठ॥ खळ दुर्जनांत वरिष्ट॥ कुबुद्धी सागर पापिष्ट॥ कापट्य वेषी
धूर्त तो॥ ६७॥ ह्मणे राया ऐकें सावधान॥ पुढें आहे बहुत दिवस मरण॥ तरि त्याचा विचार जाण॥ अवश्य आतां करा
वा॥ ६८॥ वैरी पादोदर कृशान॥ सर्वथा ह्मणूं नये लहान॥ त्याचें निर्मूळ करावें पूर्ण॥ सकळ कार्य टाकोनियां॥ ६९॥ गो
त्रज सर्पा तुल्य भूपती॥ न कळे कोणे काळीं डंकिती॥ सर्प कांतीं तरि दृष्टी पडती॥ गोत्रज पीडिती पादोदरीं॥ ७०॥ कृत्रीम
मैत्री करून॥ घ्यावा वैरियाचा प्राण॥ आपुलें गुह्य न सांगोन॥ वर्म लक्षावें शत्रूचें॥ ७१॥ धरावे बहुतांचे मनोरथ॥ आ
पुलें न सांगावें ह्रद्गत॥ कुंडाग्नी आराध्य दैवत॥ परि तो जाळील क्षणार्धें॥ ७२॥ सूर्य नारायण दैवत पाहीं॥ परि मंड
ळ कोणा न धरवे ह्रदयीं॥ गुरू सुजाण सर्वही॥ त्यास ही मिन चि भजावें॥ ७३॥ स्वर्गींहून आले पितृगण॥ तरि त्यांस
ही शमीपत्र प्रमाण॥ पिंड दर्भ देऊन॥ बोळवावे थोडक्यांत॥ ७४॥ माता पिता बंधू॥ आगळे वाटतां करावा वधू॥
धूर्त कुटिळ कपट सिंधू॥ राजगृहीं असावें॥ ७५॥ क्षेत्रालागीं कंटक जाण॥ पांयांस रक्षक उपान॥ आप्त सुह्रद दां-

चे घ्यावयाप्राण॥ विषजवळीअसावें॥ ७६॥ तस्करधरावयाश्वान॥ मच्छआकळावयाजाळेंजाण॥ शोधावयाशत्रू-
चेन्यून॥ खळकपटीअसावे॥ ७७॥ स्तंभओदितांपडेमंदिर॥ सुख्यातेडितांउपडेतरुवर॥ शत्रूचेंन्यूनअहोरात्र॥ ल-
क्षितांक्षयसहजचि॥ ७८॥ भुजंगाचेदंतपाडुन॥ आधीनगारोडीकरितीदीन॥ किंवाउन्मत्तगजजाण॥ अंकुशेंक्षीण
करितीपैं॥ ७९॥ आधीसुखेंनाडावाभुजंग॥ मगचूर्णकरावेंअंग॥ वृश्चिकाचेंपुच्छसवेग॥ ठेंचूनक्षीणकरावा॥ ८०
सामदंडभेदकरून॥ घ्यावाशत्रूचाप्राण॥ आमताहेटाकुन॥ क्षावेंकरंडीणकाळवत्॥ राजाह्मणेकर्णिकासुमती॥
त्वांकथिल्यामानल्यायुक्ती॥ परीप्रस्तूतकैसीरिती॥ करावीतेंसांगपां॥ ८२॥ पोटासआलारोग॥ तोकायमाना-
वापुत्रसांग॥ प्राणातेंहरणारवेग॥ तोछेदूनआधीकाढावा॥ ८३॥ कर्णीकह्मणेहेंचप्रमाण॥ बाहेरदाऊनभलेप-
ण॥ घ्यावेशत्रूचेप्राण॥ विचारअन्यअसेना॥ ८४॥ बाह्यनम्रताबहुत॥ अंतरींत्यांचाकरावाघात॥ बळिष्ठदेखो
नअत्यंत॥ लीनतातेथेंधरावी॥ ८५॥ द्रव्यलुब्धासिदेऊनधन॥ वश्यकरावेंनलगतांक्षण॥ जोअसेलआपणासमा
न॥ त्यांसींस्पर्धाकरावी॥ ८६॥ शत्रूदुर्बळहोऊन॥ जरीआलाआपणासशरण॥ त्याचेंनकरितांपालण॥ घ्यावाप्राण
नकळतां॥ ८७॥ जरीनाटोपतीजागेपणीं॥ तरीनिजलियालावावाअग्नी॥ किंवाफलतांबूलभोजनीं॥ विषप्रयोग
करावा॥ ८८॥ हारीआणावीखेळोनी॥ भाकेगोंवावेसत्यवचनीं॥ पांडवमाहींतअवनी॥ ऐसेंकरूनदाकावें॥ ८९
पांडवअसतांजीत॥ नवांचतीतुझेसुत॥ हाचिजाणमुख्यार्थ॥ फारकायबोलूंसी॥ ९०॥ इकडेपांडवांचीवर्तणु-
क॥ देखोनस्वच्छप्रजालोक॥ ह्मणतीउदयलाआमचाभाग्यार्थ॥ धर्मराजाहोईलकीं॥ ९१॥ सकळांमाजीविद्याअ
द्भुत॥ पार्थाचेठायींबिंबत॥ बळाधिक्यभीमहोत॥ नकूळसहदेवतैसेचि॥ ९२॥ परमविवेकीनिपुण॥ धर्मराजध-
र्मपरायण॥ ऐसेंदेखूनप्रजासंपूर्ण॥ ह्मणतीधर्मासराज्यद्यावें॥ ९३॥ हेवार्ताहिरसुखेंसमस्त॥ दुर्योधनश्रवणक
रित॥ मनींहोऊनीसंतप्त॥ पितयाजवळीयातला॥ ९४॥ ह्मणेप्रजाहोऊनएकचित्त॥ राज्यधर्मासदेऊंपाहात॥ तुज

चक्षुहीनह्मणतीसमस्त॥राज्याधिकारतुजनाहीं॥९५॥द्रोणाचार्यगंगासुत॥तेहीत्यांसमिळालेयथार्थ॥मजव
धितीलसमस्त॥अतिअनर्थवोढवला॥९६॥कोणाच्यावीर्यापासून॥पांडवझालेनिर्माण॥हेदूरदेवावेआपणा-
पासुन॥तरिचकल्याणकांहींएक॥९७॥आदरेंबोलाऊनपांडवांप्रति॥ह्मणेतुह्मींराहावेंवरुणावती॥बैसऊन-
दिव्यरथीं॥आतांचशीघ्रजाइजे॥९८॥तेंहीराज्यआसुचें॥कौतुकपाहावेंतेथींचें॥मनासरुचेलसाचें॥तरितेथें
चीराहावें॥९९॥धर्मह्मणेगुरूपितापूर्ण॥तुझीआज्ञामजप्रमाण॥आतांचजातोंह्मणोन॥वंदिलेचरणअंधाचे॥
१००॥भीष्मद्रोणविदुर॥यांसवंदीयुधिष्ठिर॥तोंदुर्योधनेंविचार॥एकांतींदृढमांडिला॥१॥कर्णिकशकुनीकर्ण॥दुः
शासनादिखळमिळोन॥जैसेंवृकाचेसदनीचेंश्वान॥प्रधानत्वकरितीपैं॥२॥यवनज्ञातीपुरोचन॥महाखळदुष्ट-
दारुण॥तोंमूंछबोलावून॥दुर्योधनेंकंठींधरियेला॥३॥ह्मणेवरुणावतीसजाऊन॥घेऊनसमस्तप्रजाजन॥पांड-
वांसदिसेबहुतमान॥ऐसेंसदननिर्मावें॥४॥लाक्षाराळकर्पूर॥त्याचेंरचावेंमंदिर॥वंशीनेलकाष्ठेंअपार॥त्यां-
चेथाटबांधावे॥५॥वंशाचेनळेसंपूर्ण॥भरीदीपनद्रव्येंकरून॥वारवसणसूत्रेंजाण॥ठाईंठाईंद्यावेंअळें॥६॥का
र्पासवंशपात्रेंसनकाडिया॥येणेंवरीआडेंगुंडोनियां॥कापूरनवनीतकालऊनियां॥भिंतीसमग्रलिंपिजे॥७॥त्या
वरीमृत्तिकेचालेपअनुमात्र॥देऊनभिंतीघोटींवसमग्र॥वरीचित्रेंकाढावीविचित्र॥मनोहरचहूंकडे॥८॥अतसी
चूर्णघालून॥भूमीकरावीसमान॥रमणीकनिर्मावेंसदन॥शक्रदेखोनभुलेत्यातें॥९॥भरूनसकळसंपत्ती॥भ
गदेईपांडवांप्रति॥बहुतनम्रताधरूनचित्तीं॥शत्रूनतथेंहोमावे॥१०॥आह्मींजेवेळेकरूंश्रुत॥तेवेळेअग्नीलावा
वात्वरित॥पळनलगतांसमस्त॥गृहासहीतभस्मकरीं॥११॥कोणासकळोंनेदीमात॥वैरीहोमीअकस्मात॥
मगतोयवनउठत॥अवश्यह्मणोनतेधवां॥१२॥रथासीरासभलाऊन॥पुढेंधांवलातोदुर्जन॥सर्वेचनिघाले-
पंडुनंदन॥करीतरुदनजनसर्व॥१३॥वनासनिघतांरघुवीर॥अयोध्याजनरडतीसमग्र॥कींमथुरेसजातांयाद

वेद्र॥ गौळीजन चडफडती॥ १४॥ तैसेच गजपुरींचे जन॥ शोक करिती दारुण॥ प्रजा समस्त मिळोन॥ पाठीं धांव
तो धर्मानें॥ १५॥ सकळ प्रजांचें समाधान॥ धर्मराज करी आपण॥ मी सत्वर येतों परतोन॥ मनीं अन्य न धरावें॥ १६
बोळऊन आले कौरव समस्त॥ विदुर द्रोण गंगासुत॥ प्रजेचा प्रेमा देखोनि तुकिन॥ मान सुयोधन तेधवां॥ १७॥ अ
सो प्रजेचें करून समाधान॥ रथीं बैसती पंडुनंदन॥ विदुरास ह्मणे दुर्योधन॥ तुह्मीं निरोप मागा आतां॥ १८॥ त्रिका
ळ ज्ञानी विदुर भक्त॥ कापट्य जाणून मनांत॥ धर्मास जाणऊं पाहे मात॥ परि दुर्जन भोंवताले॥ १९॥ मग म्लेंछ
भाषा जी विबर्बर॥ त्या शब्द संकेतें बोले विदुर॥ हूं हूं ह्मणे युधिष्ठिर॥ श्रवण करीत उगाचि॥ २०॥ तुजलागीं पीडा
आली परम कठीण॥ अहोरात्र सावधान॥ गृहस्वरूपें केवळ अग्न॥ चतुरें पूर्ण वोळखीजे॥ २१॥ अमित्राचा गो
ड शब्द॥ केवळ जाणिजे विषकंद॥ जैसें गोड बोलोन मैंद॥ पाश घालिती न कळतां॥ २२॥ विषरूप जाणिजे अ-
न्न॥ गृहस्वरूपें स्मशान॥ कथिलें जें वर्तमान॥ पंच प्राणास विदित असे॥ २३॥ कुबेर दिशा पाठीसीं घालून॥ सुमि-
त्र दिशा पुढें लक्षून॥ विजयी होईल वायुनंदन॥ दुसरेनें पुढती॥ २४॥ हृदयीं स्मरतां कंसारी॥ कदा दुःस्वन बाधीसं
सारीं॥ अपायनें उपाय निर्धारीं॥ सर्वांपरी जाणिजे॥ २५॥ पुढें होईल गुरुदर्शन॥ विजयश्री वरील पूर्ण॥ सकळ
विघ्नें निवटून॥ भक्त पावती निजपदा॥ २६॥ विदुर ह्मणे गा रूप मनीं॥ अर्थ धरिला कीं सर्व चित्तीं॥ धर्म सद्गद होऊ
न प्रीती॥ ह्मणे धन्य सुज्ञाना॥ २७॥ असो समस्तांस दाकून॥ वरुणावतीं चालिले पंडुनंदन॥ मार्गीं माता पुसे ध-
र्मालागुन॥ विदुरें काय जाणविलें॥ २८॥ धर्म सांगे मातेचे कर्णीं॥ पूर्वीं विष घातलें भीमालागुनी॥ आतां वरुणा-
वतीस नेउनी॥ जाळूं पाहती गृहांत॥ २९॥ असो वरुणावती जवळी पांडव॥ आले ऐकून प्रजा सर्व॥ पुरोचन करी-
महोत्साह॥ सामोरा येन धर्मानें॥ ३०॥ द्रव्य वस्त्रें अळंकार॥ उपायनें देती जन समग्र॥ पुरोचनें जीर्णशाळा सत्वर॥
नगरवस्तीस स्थान दाविलें॥ ३१॥ नित्य नैमित्तिक कर्माचरण॥ नित्य पंक्तीस ब्राह्मणभोजन॥ सर्वही पुरवी पुरो

चन॥ जेंजेंलागेंधर्मातें॥ ३२॥ कापट्यगृहनिर्मून॥ धर्मासविनवीपुरोचन॥ तुह्मालागींनिर्मिलेंसदन॥ तेंयेऊनअवलो
कावें॥ ३३॥ म्याकष्टकेलेबहुन॥ तेंसार्थककरावेंसमस्त॥ अवश्यह्मणोनत्वरित॥ पांचजणेंउठिले॥ ३४॥ उपरमाडि
यागोपुर॥ भिंतीस्तंभचित्रविचित्र॥ देखतांजनभुलतीसमग्र॥ ह्मणतीधन्यकर्त्याची॥ ३५॥ जैसेविषयदृष्टीदेखुनी॥
भुलतीसंसारिकप्राणी॥ परीसाधूतत्काळविटेमनी॥ क्षणीकअसत्यह्मणोनियां॥ ३६॥ तैसागृहस्वरूपेंकेवळअ-
न्न॥ एकधर्मराजजाणेआपण॥ जैशीबकाचीशांतिगहन॥ कींसाधुपणमैंदाचें॥ ३७॥ भीमह्मणेधर्माअवधारीं॥
सदनपरीक्षाबरीकरीं॥ उदकशिंपूनभिंतीवरी॥ सुवासघेऊनपाहेंकां॥ ३८॥ धन्यधन्यमहाराजविदूर॥ गोष्टीप्र-
त्ययाआल्यासमग्र॥ मगह्मणेवृकोदर॥ तरीकांराहावेंयेथें॥ ३९॥ धर्मह्मणेआह्मासपथ॥ देईलयेथेंद्वारकानाथ॥
परिपुरोचनासिमैत्रीबहुत॥ करूनियांवर्तावें॥ ४०॥ असोकरूनगृहप्रवेश॥ केलीपुरोचनासिमैत्रीविशेष॥ दिव
साजातीमृगयेस॥ कीर्तनघोषरात्रीकरिती॥ ४१॥ असोइकडेविदुराचेंज्ञानीं॥ प्रगटोनियांचक्रपाणी॥ ह्मणेखनका
सपाठऊनी॥ विवरकरवींसत्वर॥ ४२॥ समाधीविसर्जूनविदुर॥ खनकआपुलाप्राणमित्र॥ कृष्णउपासकपवित्र॥
साधूआणिनिर्लोभी॥ ४३॥ त्यासविदुरेंबोधुनी॥ पाठऊनदिल्हेंतेक्षणीं॥ तोंएकांतींजाउनी॥ धर्मरायासभेटला॥
॥ ४४॥ विदुरांचीसांगतपूर्ण॥ तोषलेंधर्माचेंमन॥ ह्मणेतूंगुरूआह्मासिपूर्ण॥ सन्मार्गदावणार॥ ४५॥ मगएकां
तींगृहांतजाऊन॥ खनकेंविवरकोरिलेंपूर्ण॥ वरुणावतीबाहेरसमयोजन॥ द्वारकेलेंउमटावया॥ ४६॥ ध-
र्मभीमासविवरदाऊन॥ द्वारीलाविलेप्रचंडपाषाण॥ ह्मणेबाहेरनिघोनसाहिजण॥ विवरद्वारबुजवावें॥
४७॥ ह्मणेकृष्णपक्षीच्चतुर्थीचेदिवशीं॥ पुरोचनअग्नलावीलगृहासी॥ सावधअसावेंसुगुणोत्वरेसी॥ ख
नकगेलानिजपुरा ४८॥ तोंजवळीआलीचतुर्थी॥ पुरोचनाचाप्राणहर्ती॥ बैसऊनब्राह्मणाच्यापंक्ती॥ भोजन
दिधलेंधर्मराजें॥ ४९॥ पंचपुत्रेंसीनिषादतेदिवशीं॥ येऊनिराहिलीवस्तीसी॥ कुंतीनेंभोजनदिल्हेंत्यासि॥ तीस

वकाशीनिजेली॥५०॥पांडवपंक्तीआधीबैसून॥पुरोचनेंसारिलेंभोजन॥तोंद्वादशघटिकारात्रपूर्ण॥झाली-
जाणतेदिवशीं॥५१॥निद्रेचेंभीषघेऊनी॥भीमसावधपाहेनयनीं॥तोंपुरोचनेंचुडीपाजळोनि॥मंदीरद्वारापात
ला॥५२॥तोंभीमसावधहोय॥बोलेपुरोचनाकरितोसकाय॥तोबोलेलवलाहें॥शीतबहुतवाजतें॥५३॥म्ह-
णऊनपाजळीकृशान॥लटिकाचतापेपुरोचन॥मागुतीनिद्रेचेंभीषघेऊन॥भीमसेनपाहातसे॥५४॥घटिका
एकझालीपूर्ण॥मागुताउठेलावावयाअग्न॥तोंभीमबैसलाउठोन॥कांरेकृशानलाविनोसि॥५५॥तुंजशीत-
वाजतेंबहुत॥तरिशेकितोनेऊनिसदनांत॥मगतोयवनबांधूनत्वरित॥गृहामाजीटाकिला॥५६॥भीमसेनेंतं
त्काळ॥गृहाचहोंकडेलाविलेंजाळ॥बंधूमाताघेऊनसकळ॥विवरमार्गेंचालिला॥५७॥तेलदीपिकापाजळू
न॥साहीजणेंचालिलीतेथून॥जयजयरुक्मिणीरमण॥वारंवारस्मरताति॥५८॥श्रीकृष्णकृपेकरून॥विवर
मार्गेंगेलेंक्रमून॥भीमसेनेंद्वारबुजवून॥तत्काळचिटाकिलें॥५९॥तोंमागेंपेटलाप्रळयाग्न॥कींमांडलेंलंका
दहन॥घोरसुसाटेंभरलेगगन॥नगरजनहडबडिले॥६०॥वंशनळेनडनडांउडती॥लक्षानुलक्षगगनीजाती॥
लाक्षारसाचेपूरधांवती॥वासयेतीऔषधीचे॥६१॥निषादपंचसुतांसहित॥पुरोचनभस्मझालागृहांत॥लो
कहाहाःकारकरित॥महाशब्दासीनातीनाहीं॥६२॥मस्तकआपटितीनगरजन॥वक्षस्थळेंघेतीबडवून॥
आठऊनपांडवांचेगूण॥मूर्छायेऊनऊठती॥६३॥म्हणतीधृतराष्ट्रचांडाळयथार्थ॥तेणेंअग्नीलाविलात्वरि
त॥तुझाहीकुळक्षयसमस्त॥ऐसाचहोईलदुर्जना॥६४॥इकडेभीमसवेंकांसघालून॥चौघेबंधूमाताजाण॥
खांदाआपलेबैसऊन॥दक्षीणपंथेंजातसे॥६५॥वरुणावतीहूनधांवलेदूत॥गजपुरींजाऊनसांगतीमात॥ऐ
कोनधृतराष्ट्रशोककरित॥कौरवविलपतीलटकेचि॥६६॥दुर्योधनकरीहाहाःकार॥म्हणेविदुराकेसाकरावा
विचार॥तंवतोंपरमचतुर॥मनांतहासेलटिकाचि॥६७॥म्हणेनकळेईश्वरकळा॥पुढेंकायदेखूंडोळां॥चिरं

जीवभूमंडळा॥ वरीकोणझालासे॥ ६८॥ ज्याचेंकर्मत्यासबद्धकजाण॥ एकापुढेंएकामागेंमरण॥ तुह्मींआह्मीं
क्षेमकल्याण॥ वांचोंकायदिवसबहु॥ ६९॥ पांडवदग्धझालेगृहांत॥ उरलेतेनाशिवंत॥ कौरवस्नानकरूनसमस्त
॥ उत्तरक्रियासारिती॥ ७०॥ वरुणावतीदूतधाडिले॥ पांडवजेस्थळींनिमाले॥ तेथेंवृक्षलावावहिले॥ मठमंडपनिर्मू
नी॥ ७१॥ येरींइकडेभागीरथीचेंनीर॥ पांडवपावलेसमग्र॥ नमनकरीयुधिष्ठिर॥ भागीरथीसनेधवा॥ ७२॥ पावा
वयापैलपारास॥ नाहींनौकाअथवामनुष्य॥ तोंकर्णधारत्यासमयास॥ विदुरेंसत्वरपाठविला॥ ७३॥ तोंनौकाघे
ऊनसत्वर॥ पांडवांपाशींआलाकर्णधार॥ विदुराच्यारवुणासमग्र॥ पूर्वापारसांगत॥ ७४॥ साहीजणेंउतरोनी॥ पर
पारानेलीतेक्षणीं॥ धर्मेंत्यासआलिंगुनी॥ अश्रूनयनींआणिले॥ ७५॥ ह्मणेतुझानविसरेंउपकार॥ संकटींरक्षी-
तोगुरुनर॥ अन्नदाताभयत्रातासाचार॥ तोहीगुरूह्मणावा॥ ७६॥ विदुरआणियदुवीर॥ रवणाकआणितूंकर्णधार
॥ पांचवापंडुराजनिर्धार॥ पांचहीसमानमजलागीं॥ ७७॥ असोतोतारकधर्मासवंदून॥ गजपुरागेलानलगतांक्ष
ण॥ इकडेभागीरथीचेंस्नान॥ पांडवकरितीआनंदें॥ ७८॥ स्वर्धुनीचेंस्तवन॥ करितीतेव्हांपांडवजाण॥ जीचेंकरितां
पयपान॥ रोगहरणतत्काळ॥ ७९॥ जयजन्हुकुमारीअघसंहारिके॥ भागीरथीत्रिविधतापमोचके॥ कमळभव
भवानीसुरवदायके॥ कींज्ञानप्रदेजान्हवि॥ ८०॥ पद्मनाभचरणोद्भवजननी॥ त्रिपथगामिनीमंदाकिनी॥ व्यो
मकेशमस्तकविलासिनी॥ सीतस्मनहारापके॥ ८१॥ जलजासनप्रियदोषनिवारिणी॥ काशीतळवाहिनी॥
सागरकुळतारिणी॥ मणिकुंडलगर्भिणी॥ त्रिदशमुनीतोषके॥ ८२॥ अलकनंदनेजनपावनी॥ ज्ञानगंगाक
नककुंडलगर्भिणी॥ सहस्त्रवदनदुःरवहारिणि॥ शुभकारकेशुभसलिले॥ ८३॥ हिमनगपाषाणभेदिनी॥
परमपददायकेदेवव्रतजननी॥ चिंतनींदर्शनींस्पर्शनी॥ होतीप्राणीपावन॥ ८४॥ तवसलिलींदेंविनांकलेवर॥
पुनरपीनाहींसंसारशरीर॥ मातृपयोधरपानसाचार॥ सर्वथाहीनकरीतो॥ ८५॥ तोझालाजन्मरहित॥ शरी

रथरीअकस्मात॥शंखचक्रादिआयुधेंसमस्त॥तोपहुडताभोगेंद्रावरी॥८६॥उरगरिपूवरीबैसोन॥हिंडोनलो
ककरीपावन॥ऐसेंभागीरथीचेंस्तवन॥पृथानंदनकरितेझाले॥८७॥नित्यनेमसारुनी॥भीमरुकंदीघेवस्रुदेवभ
गिनी॥नामेंरूपेंझांकुनी॥घोरकाननीप्रवेशती॥८८॥पुढेंकथारसभरित॥सुधारसाहोनगोडबहुत॥श्रीधरमु
खेंपंढरीनाथ॥अतिसुरसवदवील॥८९॥बाळकाचाधरूनहात॥स्वयेंचलिहीजैसापंत॥त्याचपरीरुक्मि-
णीकांत॥अर्थसहीतसर्वकर्ता॥९०॥तोभीमातीरदिगंबर॥श्रीधरहृदयकल्हारमधुकर॥यतिवर्यब्रह्मानंदउद
र॥अभंगसाचारनविटे॥१९१॥सुरसपांडवप्रतापग्रंथ॥आदिपर्वव्यासभारत॥त्यांतीलसाशंशयथार्थ॥दशा-
मोध्यायीकथियेला॥१९२॥इतिश्रीपांडवप्रतापग्रंथ॥आदिपर्वटीकाश्रीधरकृत॥गुरुप्रतिज्ञाझालीसफळित॥
पांडवमोचनलाक्षागृहीं॥१९३॥ ॥इतिश्रीपांडवप्रतापादिपर्वेदशमोध्यायः संपूर्ण॥ ॥श्रीकृष्ण॥ ॥

श्रीगणेशायनमः॥ स्कंदींवाहूनिवसुदेवभगिनी॥ कडियेजावळेबंधूघेउनी॥ धर्मार्जुनासितेक्षणीं॥ मार्गदावीत
जातसे॥१॥ निबिडवृक्षवनींलागलें॥ कींभूमीवरीआलीमेघपडळें॥ भीमभेदीनचालेबळें॥ थोरसामर्थ्यह्मणो·
नी॥२॥ माजीनदिसेसूर्यकीर्ण॥ भयंकरबाहातीश्वापदगण॥ सरितामाळवोलांडुन॥ महापर्वतलंघितां॥३॥ वि
सावानाहींक्षणेक॥ नसेवितीफळमूळउदक॥ सप्तप्रहरपर्यंतदेख॥ मार्गअपारचालिले॥४॥ एकयामउरलीयावि
नी॥ तोंतृषाक्रांतजाहलीजननी॥ ह्मणेभीमाउतरींयेक्षणीं॥ विसावाघेईनावेक॥५॥ तोंन्यग्रोधवृक्षतेथेंदेखा॥
भूमीपर्यंतलवल्याशाखा॥ पारंबियासुरेखा॥ गगनचुंबीतदीसती॥६॥ पक्वफळेंविखुरलींधरणी॥ जैसेंपसरले
प्रवाळमणी॥ पक्षीकरितीनानाध्वनी॥ वटींयक्षिणीवसतीत्या॥७॥ तेथेंमातावंधूनिजवोनी॥ उदकशोधूंगेलावि
पिनीं॥ वनकर्दळीचाद्रोणकरूनी॥ तडागजीवनीभरियेला॥८॥ जवळीकांहींनसेपात्र॥ भिजवोनघेतलेंउत्तरी·
वस्त्र॥ परतोनिआलासत्वर॥ तंवतीभूतळींलोळती॥९॥ तेंदेखोनभीमसेन॥ शोकसमुद्रींगेलाबुडोन॥ ह्मणेरेरेचतु
रानन॥ कायसंसारींघातलें॥१०॥ त्रैलोक्यनाथचक्रपाणी॥ त्याचेजनकाचीहेभगिनी॥ महाराजपंडुरायाचीपत्नी॥·
स्नुषाविचित्रवीर्याची॥११॥ आह्लादरिद्धीयांचीजननी॥ प्रेतवतपडलीसेधरणी॥ अजातशत्रुपुण्यखाणी॥ धर्मराज
धर्मात्मा॥१२॥ अनाथभणगदीन॥ तैसेंभूमीकेलेंशयन॥ शोधितांब्रह्मांडसंपूर्ण॥ उपमादुजीअसेना॥१३॥ विद्या·
सागरअर्जून॥ उपमेभार्गवकींजानकीजीवन॥ दीनवदनेंकरून॥ भूमीवरीपहुडला॥१४॥ दिव्यस्वरूपपाहुन॥ सु
रललनाजातीभुलोन॥ चातुर्यज्यांचेंदेखोन॥ सरस्वतीतटस्थ॥१५॥ तेहेनकुळसहदेवनिश्चिती॥ जैसेकौस्तुभ·
आणिसीमंत॥ आह्मानेभूमीलोळत॥ भीमकरीशोकऐसा॥१६॥ असोभीमखेदकरित॥ तोंहिडंबराक्षसआला·
तेथ॥ साहाजणादेखोनबोलत॥ हिडिंबेसीतेधवां॥१७॥ हींसाहीजणेंमारुनी॥ शीघ्रभक्षावयाआणि॥ हिडंबा·
धांवलीतेक्षणी॥ तोंभीमसेनदेखिला॥१८॥ देखोनीस्वरूपसुंदर॥ मदनेंव्यापिलेंतिचेंशरीर॥ ह्मणेयाचेपाडें·

नीवर॥ तुळणेउणावाटतो॥ १९॥ यासिमींभ्रतारकरीन॥ चिरकाळसुखभोगीन॥ व्यर्थचियांसमारून॥ मांसभ
क्षणकरीनमीं॥ २०॥ ऐसातिणेंविचारकरून॥ राक्षसीरूपपालटोन॥ रंभेऐशीजाहलीकामिन॥ मधूरवचनबोल
त॥ २१॥ तुह्मींकोदीलकोणसकुमार॥ दिसतासभाग्यराजकुमर॥ नगरस्यागोनिवनघोर॥ कायनिमित्यसेविलें॥-
॥ २२॥ परमदुर्घटहेंहिडंबवन॥ देवांसयेथेंनघडेआगमन॥ तेथेंतुह्मींमानवहोऊन॥ निर्भयनिःशंकपहूडलां॥ २३
हिडंबराक्षसमहादारूण॥ तुह्मांभक्षीनलागतांक्षण॥ तुजमींबळेंवांचवीन॥ भ्रतारहोईमाझातूं॥ २४॥ तूंजमींट-
ष्टीसपाहून॥ हीपांनरासरूखंनेईन॥ यापांचासिभक्षून॥ हिडंबतृप्तहोईल॥ २५॥ मीराक्षसाचीबहीण॥ परिनिः
कपटतुजशरण॥ यापांचांचीआशासोडून॥ मजवरावेंसुंदरा॥ २६॥ यावरीबोलेभीमसेन॥ हिडंबासमींक्षणांतमा
रीन॥ जेसारगडिजेमत्कुण॥ नेविंमर्दीनक्षणार्धें॥ सोडूनिबंधूजननी॥ तुजवरूंराक्षसिणी॥ कोल्यावधीराक्षसया
वनीं॥ हिडंबाऐसेमारीन॥ २८॥ ऐशींउभयतांचींवचनेंनेकाळीं॥ वृक्षावरूनहिडिंबेंऐकिलीं॥ दांतखाऊनमहाब
ळी॥ हांकफोडीआक्रोशें॥ २९॥ उडीघालीखालींसत्वर॥ खदिरांगारवतकेलेनेत्र॥ विक्राळवदनविशाळशरीर॥
कपाळींशेंदूरचर्चिला॥ ३०॥ कज्जलपर्वताकारथोर॥ बाहेरदाढादिसतीशुभ्र॥ ऐसातोयेतअसुर॥ तंवहिडिंबा-
बोलेभीमासिं॥ ३१॥ उठवींआपुलींबंधूजननी॥ वाहोननेत्येक्षणांतगगनीं॥ भीमह्मणेपडलींश्रमोनी॥ नउठवीं
मींसर्वथा॥ ३२॥ यांचीनिद्रानमोडतांजाण॥ हिडंबमारूनकरीनचूर्ण॥ तोंराक्षसक्रोधायमान॥ भगिनीप्रतिबोल
त॥ ३३॥ दैवेंआहारदिधलापाठउन॥ त्यासतूंपापिणीकरिशीविघ्न॥ तूंकेवळआहेसजारीण॥ कैंचाभ्रतारमेळवि
ला॥ ३४॥ आतांसाहीजणेंमारून॥ नंतरघेईनतुझाप्राण॥ वृक्षविशाळउपटून॥ भीमावरीधांवला॥ ३५॥ बळेंवृ-
क्षभोवंडून॥ भीमावरघालीउचलोन॥ तेणेंप्रचंडपाषाणघेऊन॥ ह्रदयावरीताडिला॥ ३६॥ राक्षसरववळलाअ
द्भुत॥ भीमाचेकंठींमिठीघालित॥ मल्लयुद्धएकघटिकाहोत॥ दोघेसबळसारिखे॥ ३७॥ मुष्टिप्रहारहाणिती॥ ते-

पेंदृयाणीतक्षिती॥ लत्ताप्रहारेंताडिती॥ थडकादेतीपरस्परें॥ ३८॥ राक्षसधांवेमूरवपसरून॥ ह्मणेकंठफोडीनरों
ऊनिदशन॥ भीमेंहाणोनिचडकण॥ दंतपंक्तीपाडिल्या॥ ३९॥ हिडिंबासभीमह्मणत॥ शब्दनकरींचांडाळाबहुत॥
माताबंधूसमस्त॥ श्रमेंनिद्रिस्थजाहाली॥ ४०॥ दणाणऐकतांकानें॥ जागींजाहलींपांचहीजणें॥ सिंहनादकरितां
तेणें॥ गेलेप्राणपशुपक्षी॥ ४१॥ झगटतीदोघेऐरावत॥ कींपडतीपर्वतावरीपर्वत॥ तोंचापासिवायलाऊनपार्थ॥
असुरांवरीधांवला॥ ४२॥ नकुळसहदेवघेऊनखड्गें॥ राक्षसावरीचालिलावेगें॥ हिडिंबचहूंकडेरागें॥ पर्वतपा-
षाणभिरकावि॥ ४३॥ भीमबंधूंसवारित॥ तुह्मींअसावेंस्वस्थचित्त॥ धर्मापाशीबैसोनकौतुकार्थ॥ पाहाआतांक्ष
णभरी॥ ४४॥ बंधूथोंपऊनक्षणभरी॥ भीमअसुरांचेचरणधरी॥ उचलोनियांअंबरीं॥ भूमीवरीआपटिला॥ ४५॥
सर्वेंचहस्तचरणगोंऊन॥ मोटकेलीगळांबांधोन॥ बळेंआकाशीनेऊन॥ शिळेवरीआपटिला॥ ४६॥ भरला-
मृद्घटपडतांनिश्चिती॥ बहूनतुकडेंजेसेहोती॥ तैसाहिडिंबपडतांक्षिती॥ गतःप्राणजाहला॥ ४७॥ जयजयकार-
करून॥ सुमनेंवर्षतीसुरगण॥ कुंतीमाताधर्मार्जुन॥ नकुळसहदेवआनंदती॥ ४८॥ मातेसनमस्कारीभीम॥ बं-
धूआनंदेंदेतीक्षेम॥ तंवहिडिंबीपुढेंसकाम॥ उतावीळवरावया॥ ४९॥ भीमह्मणेतूंअसुरी॥ मींकदांहीतुजनवरीं॥
बंधूचेंवैरअंतरीं॥ स्मरोनकरिसीघाततूं॥ ५०॥ कुंतीचेचरणीमाथाठेऊन॥ हिडिंबीबोलेनिश्चयवचन॥ मींराक्ष
सीह्मणोन॥ उपेक्षामाझीकरूंनका॥ ५१॥ साहीजणांसपृष्ठींवाहोन॥ नेईनदुस्तरवनवोलांडुन॥ महाविघ्नेंनिव-
टून॥ सूरवदेईनसमस्तां॥ ५२॥ माझेपोटींहोईलसुत॥ तोशत्रूसंहारीलसमस्त॥ साक्षठेऊनिरुक्मिणीकांत॥ प्रा
णरक्षीलअर्जुनाचा॥ ५३॥ आजआपलेहस्तेंकरून॥ मसीभीमासीलावींलग्न॥ कुंतीह्मणेधर्मालागुन॥ विचारम
नासआणिजे॥ ५४॥ कापट्यकिंवाशुद्धमन॥ धर्मरायेंजाणोन॥ पुढीलभविष्यार्थसंपूर्ण॥ विदीनकैलासवंतिं॥
॥ ५५॥ भीमासह्मणेसर्वज्ञ॥ इजपासोनअपायनव्हेपूर्ण॥ अवश्यलावींइसीलग्न॥ मनींआननधरावें॥ ५६॥

धर्मह्मणेहिडंबेपाहीं॥ तूंदिवसासुखेंभीमनेईं॥ रात्रिहोतांआणोनदेईं॥ रक्षावयाआज्ञानें॥५७॥ तोंभीमबोलेउ-
त्तर॥ एकजाहालियातुजकुमर॥ मगसंबंधसाचार॥ माझातुजशीं घडेना॥५८॥ येरीअवश्यह्मणोनितत्काळ॥
भीमाचेगळांघातलीमाळ॥ भीमासपृष्ठींवाहोनिसबळ॥ क्रीडावनाप्रतिगेली॥५९॥ पर्वतमौळीगंगाजळीं॥
रमणीकउद्यानेंएकांतस्थळी॥ सुरवेंसदांसुखरतमेळीं॥ भीमासिक्रीडाकरीतसे॥६०॥ मानससरोवरीमेरूचेशि-
रीं॥ हिमाचळींसोमकांतकांसारीं॥ द्रोणाचळींचंद्राचळीं झडकरी॥ नेऊनिसुखेंक्रीडत॥६१॥ षड्रसान्नभोज-
न॥ नानापरींचेरसकामवर्धन॥ अमृतासमानफळेंभक्षून॥ सुखशयनींपहूडनि॥६२॥ लोटतांएकसंवत्सर॥
जन्मलाघटोत्कचकुमर॥ पित्यातुल्यबळशरीर॥ महावीरभैमीतो॥६३॥ उपजतांचशस्त्रास्त्रीप्रवीण॥ भेट-
लाधर्मासयेऊन॥ कुंतीपितृजननी अर्जुन॥ नकुळसहदेववंदिले॥६४॥ ह्मणेसंकटपडतांपूर्ण॥ माझेंतुह्मींकरितां
स्मरण॥ राक्षसदळअसंख्यघेऊन॥ शत्रूनिवटीनसंग्रामीं॥६५॥ हिडंबीसवेंतेंप्रार्थिन॥ संकटींयेईनपुत्रासहि-
त॥ क्षोभलीयाहिडंबात॥ पाचीलोटीनमाघारा॥६६॥ ऐसेंबोलूनघेतलीआज्ञा॥ नमस्कारूनसाहीजणा॥ पुत्रा-
सहमहावना॥ उत्तरपंथातीगेली॥६७॥ कर्णप्रेरीलशक्रशक्ति॥ अर्जुनासतेनेंरक्षावयाअमरपती॥ भीमजन्म
विलानिश्चिती॥ भविष्यार्थजाणोनी॥६८॥ धर्मह्मणेयेथुनी॥ निघावेंहेंवनत्यागोनी॥ भीमकुंतीसस्कंदीघेउनी
॥ निघताजाहलातत्काळ॥६९॥ जटावल्कलेंवेष्टित॥ अजिनांबरेंपांघरत॥ नानावनेंविलोकित॥ दर्शनेंघेतसंतां-
चीं॥७०॥ ऋषिआश्रमीराहाती॥ वेदशास्त्रेंअभ्यासिती॥ चौसष्टकळाप्रवीणहोती॥ आकळितीचौदाविद्या॥
॥७१॥ रात्रदिवसकृष्णस्मरण॥ सदांकरितीकृष्णकीर्तन॥ रुक्मिणीवल्लभाचेंपूजन॥ येणेंकरूनकाळक्रमिती
॥७२॥ पुढेंजातीवेगेंकरून॥ तोंअकस्मातकृष्णद्वैपायन॥ व्यासजाहलाभाग्येंदर्शन॥ दयासिंधूचेंजाहलें॥७३॥
साहीजणेंनमस्कार॥ साष्टांगघालूनजोडितीकर॥ जयजयसद्गुरोजगदोद्धार॥ करावयाजन्मलासि॥७४॥ एका

ननतूंसत्यलोकेश॥ द्विभुजपरिरमाविलास॥ अभाळलोचनव्योमकेश॥ आल्हादीनारक्षिसी॥ ७५॥ मगबो-
लेवेदव्यास॥ यावन्शत्रूपावतीनाश॥ कल्याणआहेतुह्मास॥ भाग्यविशेषप्रगटेलपैं॥ ७६॥ विजयश्री धा-
लीलमाळ॥ पाढीरारवीलश्रीघननीळ॥ एसेंबोलोनतत्काळ॥ व्यासगुप्तजाहाले॥ ७७॥ एकचक्रनामेंनगरी॥
साहीजणेनेअवसरीं॥ एकाब्राह्मणाचेघरीं॥ गुप्तरूपेंराहिली॥ ७८॥ बोलणेंकोमळविनयता॥ स्नेहेंकरोनकेली
आप्तता॥ सत्यप्रियआणिनम्रता॥ त्यासवश्यसर्वप्राणी॥ ७९॥ सहनशीळव्रत॥ तेणेंजिंकिलेंविश्वसमस्त॥
एवंगुणीपांडवभरित॥ ह्मणोनवंद्यसर्वांतें॥ ८०॥ सर्वभूतींदयासमान॥ देवहीवंदितीत्याचेचरण॥ वृत्तीजाह
लीनिराभिमान॥ नरितोमान्यहरिहरां॥ ८१॥ पांचहीभिक्षाकरूनी॥ कुंतीपाशींदेतीआणोनि॥ त्यांतअर्धवोपी
भीमालागुनी॥ स्थूळोदरह्मणोनी॥ ८२॥ उरल्यांतआपणचौघेस्त्रत॥ क्षुधानळकरितीशांत॥ तोंब्राह्मणगृहीं अ
कस्मात॥ शोकध्वनीऐकिला॥ ८३॥ गृहस्वामीभार्याकन्यासुत॥ एकाचेगळांएकपडत॥ दीर्घस्वरेंकरूनिरडत॥
तोंकुंतीपुसेतयांसीं॥ ८४॥ ह्मणेदुःखअसेलजरीदारुण॥ तरिक्षणांतपरिहारिन॥ गृहींवसलोंबहुतदिन॥ होऊं
उत्तीर्णउपकारा॥ ८५॥ गृहस्थशोकेंव्याकूळपूर्ण॥ ह्मणेमीबकारण्यांतजाईन॥ कन्याआणिपुत्रसंतान॥ करींपा-
लनययांचें॥ ८६॥ स्त्रीह्मणेमीजाईन॥ कन्याह्मणेमींदेहसमर्पीन॥ तोंकुमरबोलेवचन॥ देईनपूर्णदेहमाझा॥
॥ ८७॥ कळवळलेंकुंतीचेंमन॥ मगह्मणेत्यागृहस्थालागुन॥ कायसंकटसांगापूर्ण॥ परिहारीनक्षणार्धें॥ ८८॥
द्विजह्मणेएथेलागुन॥ आमुचेंसंकटपरमदारूण॥ आतांजेहरिहराचेन॥ नकळेमायेंआलेंतें॥ ८९॥ नगराबाहे
रदोकोसांत॥ बकराक्षसअसेवसत॥ त्यासनगरलोकींसमस्त॥ भक्षभागनेमिला॥ एकरथभरींअन्न॥ वरीए
कमासाळपुरूषबेसऊन॥ महिषमहिषीलाउन॥ रथालागींचालविती॥ ९१॥ साठीखंड्यांचेंअन्ननित्य॥ दाहाखं
ड्यात्यावरीपिष्टान्न॥ शताचींशतेंअजाबस्त॥ पुरुषएकत्यावरी॥ ९२॥ जेदिवशींचुकेलहानेम॥ तेव्हांतोभक्षील

सर्वग्राम॥ आजिआसुत्वेघरचीपाळीदुर्गम॥ आलीप्राणघ्यावया॥ ९३॥ गृहाप्रमाणआलीपाळी॥ तीनतुकेक
दाकाळीं॥ कुमरासबाळदशाकोमळी॥ कैसादेऊंतयांते॥ ९४॥ जरीआतांमीचजाईन॥ तरिहीतिघेमरतीलअ
न्नेंविण॥ स्नेहभरीततूंमाउलीपूर्ण॥ सांगकेसेंकरूंआतां॥ ९५॥ कुंतीह्मणेरखेदटाकीसमस्त॥ माझाबलाढ्यद्वि
तीयसुत॥ त्यासमींदेइयेंयथार्थ॥ मारीलसत्यबकातें॥ ९६॥ सर्वारिष्टाचीकरूनशांती॥ विजयरूपयेईलमागु-
ती॥ ब्राह्मणासभंरवसाचित्तीं॥ सहसाहीनवाटे॥ ९७॥ बकासुरशहूनबळगहन॥ सहस्त्रराक्षसमर्दून॥ पुत्र-
माझायेईलपरतून॥ कुंतीसांगेएकांतीं॥ ९८॥ लोकांतप्रगटनकरींमात॥ विप्रकुंतीचेचरणधरित॥ तोंभिक्षा
करूनअकस्मात॥ पांचहीआलेगृहातें॥ ९९॥ कुंतीसांगेगुप्तरहस्य॥ भीमह्मणेतेंमजअवश्य॥ धर्मह्मणेपुण्य
विशेष॥ परोपकारकरावा॥ १००॥ असोअन्नेंभरिलारथ॥ सामग्रीघेऊनत्वरित॥ भीमत्यावरीबैसत॥ हर्षयुक्त-
निर्भयें॥ १॥ लोकसर्वआश्चर्यकरित॥ हानिर्भयआनंदभरित॥ आपुलेहस्तेंरथपिटित॥ गेलातेव्हांबकारण्या
॥ २॥ रथसोडिलाअरण्यांत॥ महिषमहिषीअजाबस्त॥ ग्रामपंथेंपिटिलीसमस्त॥ आलींपळतनगरासि॥ ३॥ का
ळाचेमनीबैसेदचक॥ ऐशीभीमेंफोडिलीहांक॥ ह्मणेकोणबकीकींबक॥ दावींमूखकाळेंतुझें॥ ४॥ हेंअन्नग्रास-
नाहींतुजप्रति॥ तुझेमुखांतपडलीमाती॥ ग्रासहीनलाभेनिश्चिती॥ पावसीहातेंमृत्यूमाझा॥ ५॥ पूर्वींचजाहलें-
संध्यास्नान॥ भीमजेऊंलागलाअन्न॥ परमस्वादिष्टरुचिघेऊन॥ उपचारेंसिसेवित॥ ६॥ ऐकतांभीमाचीथोरहां
क॥ क्रोधेंधांवेअसुरबक॥ तोंअन्नभक्षीतनिःशंक॥ मागेंपुढेंनपाहे॥ ७॥ ह्मणेमहिषपशूदवडुन॥ माझेंभक्षितो
ससर्वअन्न॥ आतांमीतुजग्रासीन॥ शिरछेदीनक्षणार्धें॥ ८॥ ह्मणेतूंआहेसकोण॥ प्रत्योत्तरनेदीभीमसेन॥ उगा-
चजेवींधरिलेंमोन॥ परतोननपाहेत्याकडे॥ ९॥ निंदकनिंदितांअपार॥ नचळेसाधूचेंअंतर॥ तैसावल्गनाकरीब-
कासुर॥ परीवृकोदरनगणीच॥ १०॥ बकासूरपर्वताकार॥ विक्राळवदनभाळीशेंदूर॥ हांकदेऊनपरमक्रूर॥ दांत

खाऊन धांवला॥११ वज्रमुष्टीवळोन॥ पृथ्वीवरताडिला भीमसेन॥ जैसा पंचानना प्रतिजाऊन॥ ताडी कुंजर शुंडे नें॥१२॥ चूर होती महापर्वत॥ ऐसे मारी मुष्टिघात॥ रुचीघेऊन जेवित॥ भीमसेन अन्नातें॥१३॥ विशाळ वृक्ष बकें घेतला॥ पृष्ठीवरी भीमाचे मोडिला॥ परी न बैसे उगला॥ ग्रास घेतां न राहे॥१४॥ मग घेऊन महापाषाण॥ घाली बहूत उचलोन॥ कोंपरखळिया गुडघे जाण॥ मारितां हीन हाले॥१५॥ माझें भक्षिलें सर्व अन्न॥ चांडाळा तूं आहेस कोण॥ शंखकेलिया भीमसेन॥ सहसा ही न बोले॥१६॥ मग भीमाचे दोनी हस्त॥ बकधरावया धांवत॥ येरें पसरोन दोनी हस्त॥ दोनी कर धरी त्याचे॥१७॥ सव्य हस्तें जेवित॥ उरों नेदी अन्न किंचित॥ ह्मणे भोक्ता रमा कांत॥ रुक्मिणीपती श्रीकृष्ण॥१८॥ भोजन जाह्लें संपूर्ण॥ मग उभा ठाकला भीमसेन॥ ह्मणे तुझें सामर्थ्य गहन॥ दावीं कैसे राक्षसा॥१९॥ नगरीक भक्षिलें त्वां बहुत॥ त्यांचें उसणें घेऊन येथ॥ राक्षसे थडक अद्भुत॥ दिधली ते व्हां भीमसेना॥२०॥ ह्मणे माझें अन्न भक्षिलें बहु॥ यावरी मी काय मृत्तिका खाऊं॥ राक्षसें पसरोन बाहू॥ भीमा सकट कवळूं पाहात॥२१॥ भीमें लात हाणोनि जाणा॥ बक पाडिला उताणा॥ मग पाषाण घेऊन त्याक्षणा॥ असंख्य टाकी राक्षस॥२२॥ सहस्र वृक्ष उपडिले॥ राक्षसें भीमावरी टाकिले॥ परि जैसें ऐरावतें गणिलें॥ पुष्पभार टाकितां॥२३॥ मग वामहस्तें केश धरूनी॥ कटिप्रदेशीं सव्यहस्त देउनी॥ माज मोडितां ते क्षणीं॥ हांक मारी बकासुर॥२४॥ मयूरें सर्प द्विखंड केला एक॥ कीं इक्षुदंड मोडिला देख॥ तैसा द्विखंड केला बक॥ प्राण गेले निघोनियां॥२५ अस्थिजाळ जाह्लें चूर्ण॥ बाहेर पडले उभय नयन॥ बकसेना प्राणदान॥ भीमास मागती ते धर्वा॥२६॥ भीम ह्मणे मनुष्यें भक्षितां॥ बका ऐसें मारीन तत्वता॥ तों ते ह्मणती याचरआतां॥ सर्वथा ही न भक्षूं॥२७॥ करीं निक्रियाप्रमाण॥ व्रत धरिती भय येंकरून॥ मनुष्यांची मैत्रिकी साधून॥ नगरांत हिंडूं लागले॥२८॥ बकासुराचें नव द्वारीं॥ रक्त वाहे पृथ्वीवरी॥ प्रेत वोढून एकचक्र नगरीं॥ महाद्वारीं टाकिलें॥२९॥ भीमें कर पाद प्रक्षाळुन॥ त्रिप-

द्विजपककरून॥ येऊनवंदीमातृचरण॥ बंधुवर्गीभेटला॥ ३०॥ घरचागृहस्थांससांगत॥ स्वामीप्रगटोनद्यावीहेमात॥
तोंजाहालीप्रभात॥ नारीनरऊठत्ती॥ ३१॥ नगरद्वारीपडलें प्रेत॥ लोकधांवतीअसंख्यात॥ समस्तजाहलेआनंदभरि
त॥ ह्मणतीअद्भुनवर्तलें॥ ३२॥ कोणेंमारिलानिशाचर॥ बोलेएकचक्रीचानृपवर॥ ज्याचीपाळीत्यासविचार॥ जाहा
लाकैसापुसावा॥ ३३॥ बोलाऊनपुसतीब्राह्मण॥ येरूह्मणेमीघेऊनगेलोंअन्न॥ तोंएकतपस्वीबळवान॥ अवचित
तेथेंपातला॥ ३४॥ तेणेंमोक्षूनिउदकाक्षणमात्रेंमारिलाबक॥ सर्वेचगुप्तजाहलादेख॥ मजदेखतांरायातो॥ ३५॥
तुह्मीस्वरवीनांदावेंसर्वत्रीं॥ राक्षसमारिलातेणेंरात्रीं॥ प्रेतटाकिलेंनगरद्वारीं॥ कळावयातुह्मांतें॥ ३६॥ राजाह्मणे
अत्यद्भुत॥ नकळेईश्वराचेंकर्तृत्व॥ असोभीमासरावपूजित॥ विप्रविजयीह्मणोनियां॥ ३७॥ भीमपरतोनसदनाजा
त॥ हर्षयुक्तगृहींचागृहस्थ॥ मगवैशंपायनह्मणत॥ परमाद्भुतचरित्रहें॥ ३८॥ हेंऐकितांवाचितांबकाख्यान॥ कुळीं
राक्षसपीडानहोयपूर्ण॥ भूतप्रेतपिशाचजाण॥ सर्वथाहीनबाधी॥ ३९॥ पुढेंकथाऐकागहन॥ कोणीएकआलाब्राह्म
ण॥ कुंतीसराहावयालागुन॥ ठावमागेवस्तीसी॥ ४०॥ धर्मेंतयाससन्मानुन॥ राहविलातोब्राह्मण॥ निशीमाजी
चरण॥ पार्थंपुशीतयाचे॥ ४१॥ विप्रासपुसेअर्जुन॥ इकडेकोठवरीआहेगमन॥ तोह्मणेपृषदपुत्रद्रुपदजाण॥ अ
हिक्षेत्रीराज्यकरी॥ ४२॥ द्रुपदरायाचीकुमरी॥ याज्ञसेनीपरमसुंदरी॥ जन्मलीअग्निमाझारी॥ अयोनिजासुलक्ष
णा॥ ४३॥ कुमरआणिकुमरी॥ प्रगटलीहोमामाझारी॥ धर्मह्मणेतेअवसरीं॥ समूळकथासांगाहे॥ ४४॥ विप्रह्म
णेऐकासादर॥ द्रोणेंगांजिलाद्रुपदवीर॥ पांडवींहरिलेंराज्यसमग्र॥ त्याचदुःखेंआरंबळला॥ ४५॥ राज्यसांडूनिल
ज्जित॥ वनींहिंडतांनृपनाथ॥ गंगातीरींअकस्मात॥ ऋषिमंडळीदेखिली॥ ४६॥ त्याहीमाजीश्रेष्ठद्विज॥ दोघेबं
धूयाजउपयाज॥ ज्याचेंअगाधतपोतेज॥ महाराजतपस्वी॥ ४७॥ ब्रह्मांडजाळीलज्याचाविषाद॥ कृपाळुत्वेंदेतीसु
रेशपद॥ ऋद्धिसिद्धिअगाध॥ दासीतिष्ठतीजवळिकी॥ ४८॥ वडिलयाजवसेवनांत॥ उपयाजआश्रमींराहात॥-

त्यासि द्रुपद लोटांगण घालित॥ बद्धहस्त उभा पुढें॥४९॥ उपयाज ह्मणे पृषदनंदना॥ काय सांग तुझी वासना॥ समरीं संहारिल द्रोणा॥ ऐसा पुत्र देईं का॥५०॥ इंदिरा किंवा गौरी॥ जीचे उपमेस न तुळती निर्धारीं॥ ऐशी देईं एक कुमरी॥ पार्थासि नोवरी होईल ते॥५१॥ पूर्ण होतां ऐशी कामना॥ इच्छित त्याहून देईल धना॥ यावरी आवडेल जें मना॥ तें तें सर्व पुरवीन॥५२॥ एक वर्ष पर्यंत॥ सेवा करी द्रुपद अत्यंत॥ याज उपयाज प्रसन्न होत॥ ह्मणती इच्छित दीधलें॥५३॥ सर्व सामग्री घेऊनी॥ वना आली द्रुपद पत्नी॥ हवनद्रव्य तेक्षणीं॥ उपयाजें मंत्रिलें॥५४॥ याज ऋषी करीत हवन॥ पूर्णाहुती होतां जाण॥ कुमर निघाला धृष्टद्युम्न॥ हेमकवचमंडीत॥५५॥ किरीटकुंडलेंसहित॥ जैसा उगवला बालादित्य॥ दिव्य खड्ग हस्तमंडित॥ रथासहीत निघाला॥५६॥ तों वेदीमधूनि ते अवसरीं॥ निघाली अकस्मात कुमारी॥ पुरंदरवनिता न पवे सरी॥ प्रत्यक्ष निर्धारीं अपर्णा ते॥५७॥ नीलोत्पलदलवर्णी॥ वोतिली इंद्रनीळ गाळुनी॥ आंगींचा सुवास धांवे वनीं॥ कोश एक निर्धारें॥५८॥ दिव्य हिरे झळकती॥ नेत्र शाल रवलस्वी तदंतपंक्ती॥ सुवासा कारणें धांवती॥ मिलिंद चक्रें त्या ठाया॥५९॥ ऐशी प्रगटतां याज्ञसेनी॥ गाजली नव्हां आकाशवाणी॥ सकळ स्त्रियांची स्वामिणी॥ मनुष्य लोकीं अवतरली॥६०॥ इचा योगें क्षत्रियांस अंत॥ भूभार उतरेल समस्त॥ साह्य ईस श्रीभगवंत॥ प्रज्ञावंतपुरुषइचे॥६१॥ पुत्र झाला जो तुजलागुनी॥ द्रोणा समारील समरंगणीं॥ ऐसें ऐकतां द्रुपदाचे मनीं॥ परमानंद जाहला॥६२॥ बोलिल्या होन चतुर्गुणी॥ याज उपयाज गौरविले दोनी॥ कुमर कुमरी संवें घेउनी॥ राजा आला स्वनगरा॥६३॥ उपवर जाहाली पांचाळी॥ द्रुपद सचिंत हृदयकमळीं॥ अर्जुना घालीन हे बाळी॥ नेम केला राजेंद्रें॥६४॥ पांडव जोहरांत दग्ध जाहाले॥ द्रुपदें ऐसें कर्णीं ऐकिलें॥ रायें शोक समुद्रीं पेणें केलें॥ श्वासोश्वास घालित॥६५॥ पांचाळी देखोन सुंदर॥ मागों येती सकळ नृपवर॥ परि अर्जुनाविणें वर॥ मनाभ येनृपाच्या॥६६॥ पुरांहीत सांगती मान॥ पांडववांचले जोहरांत॥ ऐसें ऋषि बोलिले ध्वनित॥ सत्यमिथ्य

नेणवे॥ ६७॥ संशयींपडलानृपनाथ॥ मगविचारकरीमनांत॥ घोषेंमहीगाजऊंसमस्त॥ स्वयंवरहोतह्मणऊनी॥
॥ ६८॥ जरीपांडवअसतीलनिर्धारीं॥ तरिप्रगटतीलस्वयंवरीं॥ पार्थासतेनोवरी॥ धांवीहाहूननिश्चया॥ ६९॥ शृं
गारिलेंपांचाळनगर॥ अमरावतीहोंनिसुंदर॥ मिळालेपृथ्वीचेनृपवर॥ सकळऋषेश्वरबोलिले॥ ७०॥ छपन्न
कोटीयादवांसहित॥ आला तेथेंरुक्मिणीकांत॥ कौरवपातलेसमस्त॥ दुर्योधनकर्णआदि॥ ७१॥ पांडवआहेत
कीमेले॥ हेंईश्वरीकर्तृत्वनकळे॥ द्रुपदाचेंचित्तव्याकूळजाहालें॥ नयाकारणेतत्वता॥ ७२॥ द्रौपदीचेपाठीको
णबैसेल॥ कोणासभाग्यामाळघालिल॥ तोमहोत्साहपाहावयाउताविळ॥ मीजानसेंखरेनें॥ ७३॥ राजावांटी
लबहुनधन॥ दरिद्रमाझेंहोईलविच्छिन्न॥ तुह्मीपंचबंधूसहस्रकीर्ण॥ केवळमजदीसना॥ ७४॥ मजवाटनेंम
नांत॥ तुह्मींस्वयंवरायावेंतेथ॥ नकळेईश्वरीकर्तृत्व॥ तेथेंकायवर्तेल॥ १७५॥ शुद्धसप्तमीफाल्गुनमास॥ आ
जपासोनसातदिवस॥ अर्जुनकळावयाविशेष॥ पणकेलापांचाळें॥ १७६॥ लोहधनुष्यचढवून॥ मच्छयंत्रींभे
दावाबाण॥ नलिकायंत्रामधून॥ लक्षसंधानयोजावें॥ ७७॥ कुंतीसह्मणेगृहींचीब्राह्मणी॥ तुझियातृतीयपु
त्रालागुनी॥ गमेवरीलयाज्ञसेनी॥ सकळरायांदेखतां॥ ७८॥ उदयाद्रीवरीआलेंरविचक्र॥ बोलतांऋमिलीनि
शासमग्र॥ आज्ञामागोनतोविप्र॥ पांचाळपुराप्रतगेला॥ ७९॥ पांडवांसिह्मणेवसुदेवभगिनी॥ आतांनिघावें
येथुनी॥ बकमारिलायेस्थानीं॥ बहुतदिवसनराहावें॥ ८०॥ शत्रूसप्रगटनहोतांमात॥ पांचाळनगराजावेंत्व
रित॥ मगगृहस्थासिप्रेमयुक्त॥ विचारूननिघतीसाहीजणें॥ ८१॥ परमनिर्भयमनांत॥ मार्गरात्रदिवसचालत॥
भीमस्कंदींपृथाविराजत॥ जेवींनंदीवरीअपर्णा॥ ८२॥ सायंकाळींसंध्यासारून॥ तोंउगवलारोहिणीरमण॥
अर्धरात्रींहोतांजाण॥ सीतकिरणमावळला॥ ८३॥ काळपुरुषेंकांबळी॥ ब्रह्मांडावरीघातली॥ कींनक्षत्रमुक्त
जाळीलेइली॥ आकाशदेवीनावेक॥ ८४॥ ब्रह्मांडकरंडांभरलेंकाजळ॥ विश्वलोचनलेऊनिपुष्कळ॥ कींमा

यामोहेंसबळ॥ अंजन केलें जननेत्रा॥ ८५॥ तैलकाष्ठदीपिकातेथ॥ पुढें पाजळून चालेपार्थ॥ त्याप्रकाशेंसर्वचा-
लत॥ तों जान्हवीवाटे लागली॥ ८६॥ अंगारपर्णगंधर्वपती॥ स्त्रियांसमवेतनग्नरात्री॥ स्वेच्छाजळक्रीडाकरि-
ती॥ शब्दबोलती कौतुकें॥ ८७॥ तों मार्गीं जातां पांडव॥ उग्रवचनें बोलेगंधर्व॥ सरामाघारे नातरी सर्व॥ मी दंडी
नस्वहस्तें॥ ८८॥ दिवसामनुष्यांचा संचार॥ यक्षगंधर्वनिशीतव्यग्र॥ आपलेप्राणरक्षून समग्र॥ पळा आतां मा
घारे॥ ८९॥ पार्थदेत प्रतिवचन॥ पामरामनुष्यांसभूमीवरीगमन॥ यक्षराक्षसांगगन॥ शून्यपंथें नेमिला॥ ९०
स्फुरगंगाभागीरथी॥ सर्वांसिव्य अहोराती॥ तूं तस्कर बैसलास पंथीं॥ सोड मार्ग जाऊंदे॥ ९१॥ गंधर्वें रथीं बै-
सोन॥ पार्थावरटाकिले सहस्त्रबाण॥ अग्निअस्त्र श्वेतवाहन॥ सोडिता जाहला ते वेळे॥ ९२॥ रथ अश्व गेले
जळोन॥ खालीं पडला अंगारपर्ण॥ अर्जुनें केशीं धरून॥ खड्ग काढिलें वधावया॥ ९३॥ गंधर्वस्त्रीमुख्य कुंभि-
नी॥ धांवोनि लागे धर्माचे चरणीं॥ ह्मणे पुण्यपवित्र शिरोमणी॥ पतीदान दे आह्मा॥ ९४॥ धर्में अर्जुनास बोधून॥
सोडविला अंगारपर्ण॥ तो स्त्रियांसह करजोडून॥ स्तुति वादें गर्जतसे॥ ९५॥ मी कुबेरमित्र जाण॥ हें वनमाझें क्री-
डास्थान॥ अंतरपडलें मजपासून॥ निशीमाजी न कळतां॥ ९६॥ आतां मज स्वरूप कळलें॥ नारदें मज पूर्वीं सां-
गीतलें॥ कुरुकुळीं अवतरले॥ पांच अवतार देवांचे॥ ९७॥ आजिपासोन अंगारपर्ण॥ सोडोनि दिधलें नामा-
भिधान॥ चित्ररथ हें येथुन॥ लोकत्रयांत प्रगटेल॥ ९८॥ तरि हें अग्निअस्त्र देईं मज॥ मी चाक्षुषी विद्या समर्पीन
तुज॥ नरऋषी स्फुरराज॥ त्यांसि विद्या दुर्लभ हे॥ ९९॥ जें जें कौतुक जेथें पाहीं॥ तें विलोकावें बैसले ठाईं॥ हे वि-
द्या शिष्यपद नाहीं॥ द्वादशवर्षवरी न कळे तें॥ २००॥ पार्था तुझी बुद्धी तीक्ष्ण॥ तूं जन तें विद्या शिकवीन॥ चंद्रें वि-
श्वावसूलागुन॥ विद्या दिधली पूर्वीं ही॥ १॥ विश्वावसूनें मज॥ उपदेशिली सतेज॥ पार्थ ह्मणे अग्निअस्त्र तेजः
पुंज॥ बृहस्पती सांगे भरद्वाजा॥ २॥ भारद्वाज अग्निवेशा देत॥ अग्निवेश द्रोणा सांगत॥ द्रोणाचार्य कृपावंत॥

तेणेंमजदीधलें॥ ३॥ अग्निअस्त्रगंधर्वआकळी॥ चक्षुषीविद्यापार्थकवळी॥ आणीकगंधर्वेनेवेळीं॥ उचितदेत-
पांडवां॥ ४॥ वृत्रासुराचाहस्ती॥ वज्रेंछेदितांअमरपती॥ वज्रधारेंखंडेंनिश्चिती॥ परमतेजाळउडालीं॥ ५॥ त्यांचे
वज्रप्रायतुरंग॥ मनोवेगीजाहालेअभंग॥ इंद्रेंमजदिधलेसुरंग॥ पंचशततेजस्वी॥ ६॥ तेंमीतुह्मासदेईन॥ ऐकतां
तोषलेपंडूनंदन॥ ह्मणतीआह्मीपावल्यास्वस्थान॥ मगधाडूनदेइजो॥ ७॥ आतांआह्मींगुप्तवनीं॥ नष्टचर्यभोगि-
तोंयेक्षणीं॥ स्वराज्यासगेलियापुण्यखाणी॥ अश्वमागोंपाठवितों॥ ८॥ चित्ररथगेलाआज्ञाघेऊन॥ पुढेंचालि-
लेपंडुनंदन॥ लंघितांवनेंगहन॥ तोंवेदव्यासभेटला॥ ९॥ साहीजणेंसाष्टांगनमिती॥ वृक्षानळींएकांतींबैसती॥
वनपुष्पेंफळेंआणोनप्रीती॥ जगद्गुरूपूजिला॥ १०॥ बोलेकृष्णद्वैपायन॥ पांचाळपुरातुह्मींजाऊन॥ द्रुपदसभेस-
बैसोन॥ साधाकारणआपुलें॥ ११॥ पांचाळीनेंपंचभ्रतारां॥ पूर्वींचिमागीतलेपंचवक्त्रा॥ नेसतीपरमपवित्रा॥ भा
र्याहोईलपांचांतें॥ १२॥ मीहीतेथेंप्रगटेन॥ साधूनदेईनहेंकारण॥ ऐसेंबोलोनकृष्णद्वैपायन॥ अंतरधानपावला॥
॥ १३॥ पुढेंद्रौपदीस्वयंवर॥ कथासुरसरसाळफार॥ ऐकतांहोयपापसंहार॥ शत्रूसमग्रनासती॥ १४॥ महाराजभा
रतग्रंथ॥ प्रयागतीर्थराजयथार्थ॥ भक्तिज्ञानवैराग्ययुक्त॥ वाहेनिश्चीतत्रिवेणी॥ १५॥ सप्रेमहाचमाघमास॥ मु
मुक्षूस्नानालोटतीतापस॥ अभाविकआणिदोषियास॥ बिंदूयेथिंचास्पर्शेना॥ १६॥ पांडुरंगपूरविलासिया॥ ब्र-
ह्मानंदायतिवर्या॥ जगद्गुरूपंढरिराया॥ पांडवजनपाळका॥ १७॥ ब्रह्मानंदश्रीधरवरद॥ ठेविलेंनांवसांभाळींबि
रुद॥ पांडवप्रतापग्रंथविशद॥ शेवटासपाववीजे॥ १८॥ सुरसपांडवप्रतापग्रंथ॥ आदिपर्वव्यासभारत॥ त्यांती
लसारांशयथार्थ॥ एकादशोध्यायींकथियेला॥ १९॥ ॥ओंव्या २१९॥ ॥श्रीकृष्णार्पणमस्तु॥ ॥ छ॥

श्रीगणेशायनमः ॥ करितांधर्माचेंवर्णन ॥स्वधर्महोयवर्धमान ॥सकळपापेंजळती जाण॥भीमसेनवर्णितां॥१
पार्थकीर्तीवर्णितांविशेष ॥दुर्जनपराजयशत्रुनाश ॥वर्णितांनकुळसहदेवास ॥सकळरोगांक्षयहोय॥२॥कृष्णाह्मपेनें
बळअद्भुत ॥दुःस्वनपावतीकदांभक्त ॥लाक्षागृहांतूनमुक्त॥ पांडव पूर्वीजाहले ॥३॥ हिडंबबकमारुन ॥विजयी-
जाहलाभीमसेन ॥पंथेंजातांकृष्णाद्वैपायन ॥भेटोनीगुजसांगीतलें॥४॥वल्कलेंवेष्टितजटाधारी ॥दिव्यविभूती
चर्चिलीशरीरीं ॥जैसेशशीमित्रअंबरीं ॥जलदजाळेंझांकिलें॥५॥ अवतरलेपंचदेव ॥पांचाळपुराआलेपांडव
तोंछपन्नदेशींचेनृपराव॥स्वयंवरासीपातले॥६॥ पांचाळनगराभोंवतेपाहून ॥द्वादशयोजनेंपर्यंत॥राजयांच्या
पतनाअद्भुत ॥स्वयंवरासिउतरल्या॥७॥नगटकनकांबरशिबिरें॥उभविलींझळकतीअपारें॥ यावेगळीं दिव्यचं
दनागारें॥द्रुपदेंदीधलींमूर्धजां॥८॥लक्षावधीकळसझळकती॥ चपळेऐसेध्वजनळपती॥बंधूंसहितदुर्योधन
कुमती॥स्वयंवराआलाअसे॥९॥ यादवांसहयादवेंद्र॥ भक्तवत्सलकरुणासमुद्र॥पश्चिमेउतरलारुक्मिणीव
र ॥दळभारनवर्णवे॥१०॥सप्तपुन्यासप्तद्वीपांहुन॥नवखंडींचेआलेब्राह्मण॥असोद्रुपदसभेसिअवघेजन॥
राजेऋषीमिळाले॥११॥कुंतीसकुलालगृहासठेउन॥सभेसिपातलेपांचजण ॥विप्रसभेंतवेशपालटुन॥जावो-
नियांबैसले॥१२॥मनांतभावितीपांडव ॥आजशैल्यआणिकौरव॥याचेउतरोनियांगर्व॥निस्तेजकरूंनिर्धारें॥
१३॥रायेंउभविलेंयंत्रपूर्ण॥भेदितोकोणपाहूंबाण॥ कर्णाचेकर्णउघडून ॥टाळेंमोकळेंकरूंआजी॥ १४॥पांडवीं
वल्कलेंवेष्टुन॥केलेंअसेभस्मोद्धारण॥ परीतींदिव्यस्वरूपेंपूर्ण॥पंचआदित्यदिसती॥१५॥ द्रुपदह्मणेपुत्रासी
आतांद्रौपदीआणासभेसी॥जोभेदीलयंत्रासी॥तोद्रौपदीसिवरिल॥१६॥म्यांपूर्वीइच्छिलाअर्जुनजामात॥
परिलाक्षागृहींपांडवजाहलेगुप्त॥किंवाआहेतपृथ्वींत॥नकळेकोठेंविचरती॥१७॥असोहस्तिणीवरिबैसोनी
द्रौपदीलावण्यरत्नखाणी॥सभेसआणिलीनयेक्षणी॥आकर्णनयनीश्यामलांगी॥१८॥कृष्णासारिखीश्या

मवर्ण॥ ह्मणोनकृष्णानामाभिधान॥ आंगींचासुवासपूर्ण॥ एकक्रोशधांवत॥१९॥ सभेसराजेबैसलेसमस्त॥धृष्ट
द्युम्नद्रौपदीसदावित॥ नामाभिधानेंसमस्त॥ यथानुक्रमेंसांगतसे॥२०॥ धृष्टद्युम्नबोलेगर्जोन॥ चक्ररंध्रभेदोनबाण
जोउडवीलमत्स्यनयन॥ त्यासहेंरत्नप्राप्तहोय॥२१॥ ऐशीपरिसतांमात॥ समस्तराजेभयाभीत॥ ह्मणतीधनुष्य
हेंअद्भुत॥ प्रथमचिनुचलेकोणाशी॥२२॥ मायंत्रभेदीलकोण॥ परिसोनिउठिलाकर्ण॥ जैसाजनकसभेसरावण
गर्वेंकरूनधांवला॥२३॥ नैसाकर्णबोलेनेक्षणी॥ द्रौपदीमाझीपट्टराणी॥ पणभेदितोंपहानयनीं॥ समस्तरायादे
खतां॥२४॥ शिवकोदंडातुल्यचाप पूर्ण॥ उचलावयागेलाकर्ण॥ जानुपर्यंतउचलितांजाण॥ कासावीसजाह
ला॥२५॥ धापंदाटलाकर्णवीर॥ निस्तेजजाहलेंशरीर॥ उलथेजैसातरुवर॥ तैसापडलाभूमीवरी॥२६॥ मुगु
टउसळूनपडलाक्षिती॥ पदकेंरत्नहारतुटती॥ हाहाकारकौरवकरिती॥ तोंद्रौपदीबोलत॥२७॥ येणेंयंत्रभेदि
लेंआतां॥ तरीमीयासनवरींसर्वथा॥ हाअवर्णकुलहीनपाहतां॥ माळनघालींसहसाही॥२८॥ परमअपमा
नलाकर्ण॥ स्वस्थळींबैसलाजाउन॥ तोंद्रुपदबोलेगर्जोन॥ पृथ्वीनिःक्षत्रीजाहली॥२९॥ तंवविप्रसभेमधुन॥ उ
ठिलेतेव्हांभीमार्जुन॥ गिरिदरीमधूनपंचानन॥ तैसेदोघेउठती॥३०॥ जैसेचंद्रआणिसूर्य॥ पावलेएकदांचउदय
द्रुपदचकितहोऊनपाहे॥ सकळरायासमवेत॥३१॥ एकह्मणतीहेब्राह्मण॥ कैसाभेदितीलनकळेपण॥ ईश्वरी
कौतुकविचित्रपूर्ण॥ नकळेकाहींकोणासी॥३२॥ एकलाब्राह्मणपरसुधर॥ निःक्षत्रीकेलीधरासमग्र॥ कींबळि
चेघरींवामनविप्र॥ पदेंत्रिभुवनआटिले॥३३॥ घटोद्भवाचीतनूधाकुटी॥ येरेंसमुद्रसाठविलापोटीं॥ एकसूर्य
सर्वसृष्टी॥ उजेडपाडिप्रतापें॥३४॥ धनुष्याजवळीआलाअर्जुन॥ पाठींउभाभीमसेन॥ कर्णशैब्यदुर्योधन॥
देखतांबळहीनजाहले॥३५॥ तंवतोमहावीरपार्थ॥ धनुष्यासीप्रदक्षिणाकरित॥ क्षणनलागतांचढवित॥ का
र्मुकहेळामात्रेंची॥३६॥ स्मरोनियांरुक्मिणीरमण॥ वेगेंघेतलेपंचबाण॥ प्रथमशरेंयंत्रभेदुन॥ मत्स्यनयनउडविला

॥ ३७ ॥ जाहलाएकचिजयजयकार ॥ विमानीहूनिपुरंदर ॥ वर्षतसुमनसंभार ॥ होतगजरदुंदुभीचा ॥ ३८ ॥ त
वतेंद्रौपदीपद्मनयनी ॥ करिणीरवालींउतरोनी ॥ पार्थाचेगळांनेउनी ॥ दिव्यमाळघातली ॥ ३९ ॥ द्रुपदपरिवारांस
आज्ञाकरी ॥ ब्राह्मणांसरक्षावेबरव्यापरी ॥ राजेउठतीलजुंझारी ॥ अनर्थपुढेंदिसतसे ॥ ४० ॥ पार्थह्मणेधर्मासी ॥
द्रौपदीन्यावीकुंतीपाशी ॥ नकुळसहदेवबळराशी ॥ याज्ञसेनीसनेतेजाहले ॥ ४१ ॥ तोंउठावलेनृपवर ॥ ह्मणती
छेदाद्रुपदाचेंशिर ॥ अपमानूनराजकुमर ॥ भणगासनवरीदीधली ॥ ४२ ॥ अवचितयंत्रींभेदिलाबाण ॥ आ-
ह्मींनह्मणूंहेंशरसंधान ॥ आतांजुंझोनिनिर्वाण ॥ हिरोनघ्यावीनोवरी ॥ ४३ ॥ कौरवांसक्रोधथोर ॥ सोडितीश
रांचापूर ॥ ह्मणतीराजकन्यानेतीविप्र ॥ लाजगेलीआमुची ॥ ४४ ॥ द्रुपदराजाभयाभीत ॥ ब्राह्मणसभेसलपत
विप्रथरथरांकांपत ॥ वाटनाहींपळावया ॥ ४५ ॥ हांसोनिबोलेभीमसेन ॥ स्वस्थअसासकळब्राह्मण ॥ सुखवेंक
रावेंवेदाध्ययन ॥ निश्चिंतमनकरोनी ॥ ४६ ॥ विशाळवृक्षातळींबैसलेब्राह्मण ॥ तोचवृक्षभीमेंउपडोन ॥ कल्पां
तकळींसमहाकदेउन ॥ झाडूनघेतलाखांद्यावरी ॥ ४७ ॥ मनांतह्मणेपांचाळ ॥ हाकेवळदिसतोकाळ ॥ भीमासम
सबळ ॥ हनुमंतचिप्रगटला ॥ ४८ ॥ पांडववांचलेलाक्षासदनीं ॥ किंचितध्वनींऐकिलीकर्णीं ॥ ब्राह्मणह्मणती
मौनधरूनी ॥ उगेचपाहावेंनावेक ॥ ४९ ॥ धनुष्यासबाणलावुन ॥ वैरियासपाचारीअर्जुन ॥ तोंबळिरामासश्रीकृष्ण
संकेतखुणादावित ॥ ५० ॥ ह्मणेहापार्थपाठिसीभीमसेन ॥ पैलधर्मनकुळसहदेवजाण ॥ हेंदेखिलेमागुत्यान ॥ ध
न्यधन्यआजिजाहलों ॥ ५१ ॥ आतांयापांडवाहातीं ॥ निःकंटककरवीनक्षिती ॥ येथेंआलियानिश्चिती ॥ लाभहाच
आह्माजाहला ॥ ५२ ॥ यांसएकांतींभेटावेंजाउन ॥ तोंयेथेंमांडिलेंघोररण ॥ मुकुंदआणिरेवतीरमण ॥ कौतुकपा
हतीदुरोनियां ॥ ५३ ॥ तोंक्रोधेंबोलेदुर्योधन ॥ जिवेंमाराहेदोघेब्राह्मण ॥ द्रुपदआणिधृष्टद्युम्न ॥ शिरेंछेदावींय
यांचीं ॥ ५४ ॥ भोंवतेवेढिलेभीमार्जुन ॥ सोडितीशक्तीशस्त्रेंबाण ॥ चातुरंगदळघेउन ॥ आलेतेव्हांदोघांवरी ॥ ५५

वृक्षघेऊनवृकोदर॥ करीतउठिलासंहार॥ कोट्यानकोटीअश्वकुंजर॥ वृक्षघायेंमारिले॥५६॥ पायदळआणि
रथ॥ वृक्षघायेंचूर्णकरित॥हाहाःकारजाहलातेथ॥ ह्मणतीकृतांतक्षोभला॥५७॥ कौरवभारगेलेसंहारून॥
तोंशरसोडीतधांवलाकर्ण॥ देखोनिपार्थेंमांडिलेंठाण॥ वर्षेपर्जन्यबाणाचा॥५८॥ एककाळएककृतांत॥
कींएकविष्णुएकउमाकांत॥ आमुचेगर्वहरावयासमस्त॥ येणेरूपेंअवतरले॥५९॥ बाणत्रयसोडुन॥हृदयीं
रिवळिलावीरकर्ण॥ देखोनिपार्थाचेंसंधान॥ गर्वहरलाकौरवांचा॥६०॥ मगबोलेवीरकर्ण॥ ब्राह्मणातुझा
गुरूकोण॥ भार्गवकिंवाजानकीजीवन॥ द्रोणकींअर्जुनसांगपां॥६१॥ कृत्रिमवेषधरून॥ फिरताहोऊनब्राह्म
ण॥ सत्यबोलावेंवचन॥ ऐकतांअर्जुनहांसत॥६२॥ ह्मणेरेयुद्धसांडोनिगोष्टी॥ मांडिलीयारणतळवटीं॥गु
रुप्रसादेंसृष्टी॥ निःकंटककरितोंआतां॥६३॥ द्रोणेंतुजविद्यादिधलीपाहीं॥तोझाडादेआजिलवलाहीं॥ऐ
सेंऐकतांहृदयीं॥ कर्णवीरदचकला॥६४॥ मेतकळातेअवसरीं॥ आलीकौरवांचेमुखावरी॥ रथमुरडिले
झडकरी॥ सिबिराकडेतेधवां॥६५॥ तोंयेरीकडेंतेअवसरी॥ शैल्यधांवलाभीमावरी॥ शूळटाकिलाझ
डकरी॥ हृदयावरीआदळला॥६६॥ भीमेंनकुवरभोंवंडिला॥ शैल्याचेपृष्ठीवरीमोडिला॥ मगमल्लयुद्धतें
वेळां॥ चारघटिकाजाहलें॥६७॥ मगभीमसेनेंअद्भुतकेलें॥ तयासिबळेंउचलिलें॥ गगनींउडऊनटाकिलें
पृथ्वीवरीपडलातो॥६८॥ भूमीवरीउताणापडत॥ भीमेंवक्षस्थळीदिधलीलात॥ मागुतीउचलोनिपुसत
॥ब्राह्मणासिवृकोदर॥६९॥ याचायेऊंआजिप्राण॥ किंवादेऊंजीवदान॥ विप्रह्मणतीदेसोडुन॥ धर्ममा
शैल्यासीपुढें॥७० मगलातदेउनपृष्ठीवरी॥ भीमेंसोडिलातेअवसरी॥ पाठीदेऊनशैल्यझडकरी॥कौरव
भारींमिळाला॥७१॥ पांचाळपूरसोडुन॥एकयोजनावरीराहिलेजाउन॥ ह्मणतीब्राह्मणआहेतकोण॥
मनाआणोनिमगजाऊं॥७२॥वरकडआलेहोतेनृपती॥ तेतेआपुलेदेशींजाती॥ ह्मणतीपांडवचिहेहोती॥

एवढीशक्तीआणिकाकोणा॥७३॥ असोपांडवघेऊनद्रौपदीसी॥ येतेजाहलेकुंतीपाशीं॥ ह्मणतीउत्तमभिक्षा
आह्मासी॥ मातेमिळालीजाणणं॥७४॥ माताह्मणेवांटुन॥ पांचहीजणेंघ्यासमान॥ बाहेरपाहेजंवयेउन॥ तंव
याज्ञसेनीदेखिली॥७५॥ ह्मणेनकळतबोलिलेंवचन॥ मगह्मणेपुत्रांलागुन॥ माझेंवचननमानावेंप्रमाण॥ द्रौ
पदीअर्जुनवधूवरें॥७६॥ अर्जुनह्मणेमातेप्रती॥ तुझीअसत्यनव्हेवचनोक्ती॥ यावरीव्यासदेवयेती॥ तेकरि
तीतेंप्रमाण॥७७॥ तंवसंकर्षणआणिश्रीपती॥ उभेठाकलेयेऊनयेकांतीं॥ पितृभगिनीसिवंदिती॥ आलिंगि-
तीपांचाजणा॥७८॥ धर्मासिह्मणेद्वारकाधीश॥ तुह्मीभोगिलेबहूतक्लेश॥ परीदुर्जनपावतीनाश॥ तुह्मीस्व-
स्थानाजालसरवें॥७९॥ ऐसेंबोलूनयादवराणा॥ गुप्तरूपेंगेलास्वस्थाना॥ पांडवींकरूनभिक्षाटणा॥ भोजनके
लेंतेदिवसीं॥८०॥ तोंरात्रीमाजीगुप्तहेर॥ धृष्टद्युम्नेंठेविलेसत्वर॥ तेयेउनआलेसमाचार॥ जेंजेंबोलिलेरजनी
त॥८१॥ ह्मणतीतेनव्हतीब्राह्मण॥ महाक्षत्रीप्रळयाग्न॥ चारीप्रहरयुद्धावांचुन॥ गोष्टीनाहींऐकिल्या॥८२॥ द्रुप
दशोककरित॥ ह्मणेभणगींकन्यानेलीसत्य॥ वर्णहीनकळेयथार्थ॥ चारवर्णांतकोणताते॥८३॥ द्रौपदीऐसेंर
ल॥ भिकारीगेलेघेउन॥ लोकामाजीनिंद्यपूर्ण॥ शोकदारुणरावकरी॥८४॥ पुत्रह्मणेताताअवधारीं॥ म्यांहेर
पाठविल्याहोतारात्रीं॥ तेआहेतमहाक्षत्री॥ निर्धारआह्मींकेलाहो॥८५॥ त्याचेसंगेंआहेमाता॥ मजगमेंपां
डवचितत्वता॥ तोंद्रुपदह्मणेरेसुता॥ मजहीतेसेंचिवाटतें॥८६॥ मगधृष्टद्युम्नआणिपुरोहित॥ सवेंघेउन
अश्वगजरथ॥ कुल्लाळशाळेपर्यंत॥ महोत्साहकरितआले॥८७॥ पृथेसहपांचेजण॥ वंदीतेव्हांधृष्टद्युम्न॥ ह्म
णेरावपाहूंइच्छिचरण॥ तेथवरीचलावें॥८८॥ पांचेजणअवश्यह्मणती॥ एकारथींकुंतीद्रौपदीबसती॥ पांच
हीपांडवआरूढती॥ रहंवरींवेगळाले॥८९॥ राजद्वारापर्यंत॥ अपारठेविल्यावस्तुजात॥ नानाउद्यमीबैसत॥
वस्तूअपारदाविती॥९०॥ सकळअव्हेरोनिपंडूकुमर॥ जेथेंरचिलेहोतेशस्त्रभार॥ तेथेंनाचेकराहिलेस्थिर॥

शस्त्रपरीक्षाकरावया॥ ९१॥ धृष्टद्युम्नह्मणेक्षत्रीयसत्य॥ ब्राह्मणनव्हतीयथार्थ॥ असोपावलेराजमंदिरांत॥ भ-
द्री बैसत धर्मपैं॥ ९२॥ मर्यादाअत्यंतधरून॥ पाठीसी बंधूचौघेजण॥ भयविस्मयसंपूर्ण॥ किंचितनसेंतयांसी॥
९३॥ द्रुपदाचीसंपदाअपार॥ याचेदृष्टींतनाहींसाचार॥ गुप्तरूपेंपाहेनृपवर॥ ह्मणेनिर्धाररराजेहे॥ यावरीद्रुप
दराणी॥ मस्तकठेवीकुंतीचेचरणीं॥ द्रौपदीसहितगृहांतनेउनी॥ वस्त्राभरणेंपूजिली॥ ९५॥ मगद्रुपदराजायेउ
न॥ पांडवांसभेटेप्रीतीकरून॥ देउनियांक्षेमालिंगन॥ पांचैजणसंतोषविले॥ ९६॥ द्रुपदेंसकृहृदमेळउन॥ पांडवां
सहकेलेंभोजन॥ एकपंक्तीसारिलेंपूर्ण॥ षड्रसान्नेंयथारुची॥ ९७॥ भोजनजालियात्रयोदशगुणी॥ विडेदिध
लेसमस्तालागुनी॥ मगद्रुपदेंकरजोडोनी॥ धर्मरायाप्रतीबोले॥ ९८॥ ह्मणेकवणयातीकवणाकुळ॥ कवणदे
शकवणस्थळ॥ सांगोनियांवृत्तसकळ॥ मजमेळवाआपणांत॥ ९९॥ मगहांसोनिधर्मबोलत॥ हस्तनापुरीं
चापंडूनृपनाथ॥ तयाचाजोज्येष्ठसुत॥ धर्मराजनाणमीं १०० हेभीमाअर्जुननकुळसहदेव॥ परमपुरुषार्थीबला
र्णव॥ ज्यांसीसमरंगणीहाव॥ कृतांतहीकरूंनशके॥ १॥ धनुर्धरामाजीनिपुण॥ पूर्वीभार्गवकींरघुनंदन॥ त्याव
रीभीष्मद्रोण॥ कींपाचवाअर्जुनहा॥ २॥ श्रीकृष्णाकृपेचेंबळपूर्ण॥ पितृव्यविदुराचाप्रयत्न॥ तेणेंकाढिलेंजो
हरांतुन॥ कृपापूर्णबाळकावरी॥ ३॥ त्याविदुराचेउपकार॥ बहूतजन्मेंनपडेविसर॥ महाराजकृष्णकृपापात्र
त्रिकाळज्ञानीतोहोय॥ ४॥ कुंतीमाताहेजाण॥ आह्मींहिंडविलीवनोपवन॥ असोतुह्मापुण्यपुरुषाचेंदर्शन॥ पु
ण्येंकरूनजाहलें॥ ५॥ ऐसेंऐकतांउत्तर॥ जाहलाएकचिजयजकार॥ द्रुपदेंधावोनिचरणसत्वर॥ धर्मरायाचेवं
दिले॥ ६॥ दियलेंप्रेमेंआलिंगन॥ नेत्रींवाहेअश्रुजीवन॥ ह्मणेकौरवपरमदुर्जन॥ कापट्यसागरदुरात्मे॥ ७॥
आतांतुमचेनिमित्तेंकरून॥ जीतकौरवआणीधरून॥ क्रोधेंबोलेधृष्टद्युम्न॥ शिरेंछेदीनतयांचीं॥ ८॥ देखो
निपांडवजामात॥ द्रुपदाचाहर्षनमायगगनांत॥ मगपाहोनसकृमुहूर्त॥ लग्नतेव्हांधरियेलें॥ ९॥ धर्मह्मणेद्र

पदराया॥ आझीपांचाहीजाया॥ द्रुपदशंकल्याऐकोनियां॥ ह्मणेअघटीतकेंविघडे॥१०॥ संकटपडलेंद्रुपदाला
गुन॥ तोंकृष्णआणिकृष्णद्वैपायन॥ कृष्णापांचासिद्यावयापूर्ण॥ निश्चयकरूंपातले॥११॥ पांडवआनंदलेपूर्ण॥
धावोनीवंदितीव्यासचरण॥ सर्वेंचश्रीकृष्णावंदुन॥ आलिंगिनीप्रीतीनें॥१२॥ द्रुपदेंवंदूनिचरण॥ ह्मणेआज्ञा-
द्यामजलागुन॥ द्रौपदीसभ्रतारपांचजण॥ किंवाएकतेंसांगा॥१३॥ बोलेसत्यवतीहृदयरत्न॥ इणेंभ्रतारपांच
वेळदेह्मणोन॥ आर्जवोनियांत्रिनयन॥ पूर्वींबोलिलीतपकरितां॥१४॥ प्रसन्नजाहलाजाश्वनीळ॥ घेघेवदेपां
चवेळ॥ यालागींहेंवेल्हाळ॥ पांचाजणांअर्पावी॥१५॥ ऐसीव्यासेंआज्ञाकरून॥ सवेंचपावलेअंतर्धान॥ द्रु
पदेंमूळपाठउन॥ ब्राह्मणराजेपाचारिले॥१६॥ द्रुपदेंजाउनसत्वर॥ यादवांसहितयादवेंद्र॥ बहूकरूनआदर॥
राहविलालग्नासी॥१७॥ मगअनुक्रमेंकरून॥ पांचासिलाविलेंलग्न॥ चारीदिवससंपूर्ण॥ उत्साहजाहलाअ
द्भुत॥१८॥ साडेजाहल्यानृपवर॥ आंदणदेतपांडवांसअपार॥ ह्मणेराज्यहेंतुमचेंसाचार॥ मजसहीतसर्वही
१९॥ गजउष्ट्रभरोनियदुवीर॥ उत्तमवस्त्रेंअळंकार॥ पांडवांसअहेर॥ प्रेमभावेंअर्पित॥२०॥ पांचाजणापांच
सदनें॥ अर्पिलीतेव्हांद्रुपदानें॥ एकागृहींकृष्णार्जुनें॥ वास्तव्यकेजेअतिप्रीती॥२१॥ पांडवजोहरांतवांचले॥
द्रुपदाचेजामातजाहले॥ गुप्तहेरसांगोंगेले॥ कौरवांसिनेधवां॥२२॥ जेणेंयंत्रभेदिलेंपूर्ण॥ तोमहाराजवीरअर्जु
न॥ वृक्षयायेंभंगिलेंसैन्य॥ तोचभीमवोळखावा॥२३॥ ऐकतांचऐसीमात॥ कर्णदुर्योधनहृदयपिटित॥
शकुनीह्मणेजाहलाअनर्थ॥ आतांमरणआलेंआह्मा॥२४॥ दुःशासनरडेधायमोकलून॥ ह्मणेगळालेकर
चरण॥ आतांविचारएकपूर्ण॥ कराआधींसत्वर॥२५॥ छपन्नकोटीयादवांसहित॥ कृष्णत्यांचीपाठीराखत॥
सत्रावेळधरिलामागधनाथ॥ तोबळियाअद्भुतबळिभद्र॥२६॥ भूरिश्रवाह्मणेएकवचन॥ आतांस्नेहवाढवावा
पूर्ण॥ पांडवांसभेटावेंजाउन॥ द्रुपदासहितकृष्णासी॥२७॥ पुढेंवाढवालस्नेहआदर॥ तरीविसरतीलमागील

विचार॥ स्तुतीकरिनांनिंदाअपार ॥ नासेमागीलसर्वही ॥ २८ ॥ पांडवांसहातींधरून ॥ त्यावेहस्तनापुराला
गुन॥ राज्यविभागदेउन॥ स्नरवरूपनादावें ॥ २९ ॥ ऐकोनऐसेंवचन ॥ परमक्रोधावलाकर्ण ॥ ह्मणेगेलियाहिप्रा-
ण॥ ऐशीगोष्टघडेना ॥ ३० ॥ पांडवांचींशिरेंछेदिल्याविण॥ आह्मींकदांनजाऊंयेथुन॥ ज्यांसिभयवाटेलजाण॥
तयानींराहावेंशिबिरांत॥ ३१ ॥ कर्णवचनेंदुर्योधन॥ ह्मणेसिद्धकरासकळसैन्य॥ रथावरीबैसोन ॥ निजभारेंसि
धांवले॥ ३२ ॥ खणाणतीरणतुरेंभेरी ॥ गजबजलीपांचाळपुरी ॥ कौरवपातलेदळभारीं॥ द्रुपदासिकळलेंहें ॥ ३३
द्रुपदह्मणेधृष्टद्युम्ना॥ शालकपातलेतवदर्शना ॥ शस्त्रघायेंपृष्टीगौरऊनजाणा॥ कुंजरपुराबोळवावे ॥ ३४ ॥ पां
डवांसहितपांचाळ॥ बाहेरनिघालातात्काळ ॥ रणतुरेंवाजतांसकळ॥ कौरवऐकोनदचकले॥ ३५ ॥ दोहींसैन्या
जाहलीभेटी॥ पांडवअसतीद्रुपदाच्येपाठी ॥ क्षणएकअवलोकितदृष्टी॥ संग्रामकौतुककैसेंतें ॥ ३६ ॥ दोनींदळें
सिद्धजाहलीं॥ संग्रामाचीघाईलागली ॥ पांचाळसेनादाटिली ॥ कौरवींतेह्मांनिजबळें॥ ३७ ॥ ऐसेंदेखतान्यून
॥ मनोवेगेंधावलेपांचजण ॥ कींतेपांचप्रळयाग्न ॥ ब्रह्मांडजाळूंपातले ॥ ३८ ॥ उगवतांपंचआदित्य ॥ तेजही
नजालेकौरवखद्योत ॥ पंडीतदेखोनअद्भुत ॥ मूढजैसेदचकती ॥ ३९ ॥ प्रत्यक्षपांडवदेखोन ॥ कौरवांचामद-
गेलापळून॥ परीजयद्रथआणिकर्ण॥ पार्थावरीधांवले॥ ४० ॥ त्यादोघांचेकुमरदोन्ही ॥ तेहीपुढेंधांवलेतेक्ष-
णी॥ अर्जुनेंदोनबाणसोडुनी ॥ शिरेंछेदिलींतत्काळ॥ ४१ ॥ देखोनिपुत्राचेंमरण॥ क्रोधेंझेंपावलाकर्ण ॥ अर्जु
नेंसोडिलेनिर्वाणबाण॥ भेदिलेंहृदयकर्णाचें॥ ४२ ॥ तेणेंआलीगिरिगिरी ॥ ध्वजस्तंभीटेंकलाक्षणभरी॥ वीर
श्रीमदतेअवसरी॥ गेलासर्वदिगंतरा ॥ ४३ ॥ रथमाघाराकाढिला॥ तोंभीमेंदुर्योधनदेखिला ॥ लाक्षागृहआठ
वूनतेवेळा॥ दांतकरकरांचावित ॥ ४४ ॥ क्रोधेंवटारूनियांनेत्र॥ वेगेंउपडिलातरुवर ॥ द्विजपंक्तीनेंअधर ॥ रग-
डोनियांधांवला॥ ४५ ॥ पाठीदेऊनकौरव ॥ पळोंलागलेतेव्हांसर्व ॥ भीमपरतलाजेथेंधर्मराव॥ पांचाळ

स्वश्रूरहांसनसे॥ ४६॥ पांडवप्रतापपुरुषथोर॥ रणमदेंजाहलाकामातुर॥ कौरवसेनानववधूसाचार॥ शृं
गारोनीपातली॥ ४७॥ ननगतीधुळूसरतीजाण॥ पळालीअभिमानवस्त्रटाकुन॥ असोहस्तीवाजीशिबिरेंसो
डुन॥ कौरवसर्वपळाले॥ ४८॥ पांचाळेंसर्वलुटिलें॥ आपल्यानगराबाहेरपाठविलें॥ द्रुपदपांडवपातले॥ ये
वूनभेटलेरामकृष्णा॥ ४९॥ नगरींजाहलाजयजयकार॥ आनंदलेंनगरसमग्र॥ इकडेदीनवदनेंकौरवभार॥
हस्तनापुरापातले॥ ५०॥ ह्मणतीमरमररेपुरोचना॥ कायकार्यसाधिलेंबुद्धिहीना॥ आपणमरोनिअपेशजा
णा॥ लाविलेंआह्मासर्वांतें॥ ५१॥ ऐसेंदुर्योधनबोलत॥ कर्णशकुनीयथार्थ॥ असोविदुरासससमस्त॥ कळला
वृत्तांतजाहलातो॥ ५२॥ धृतराष्ट्रासससांगेयेउन॥ तुमचीस्नुषाजाहलीपूर्ण॥ अंधआनंदलाऐकोन॥ ह्मणेदु
र्योधनभाग्याचा॥ ५३॥ ऋषीनेंआशिर्वाददिधले॥ तेदुर्योधनाससफळजाहले॥ विदुरह्मणेऐकवहिलें॥ वर्त
मानपूर्वींचें॥ ५४॥ लाक्षागृहापासून॥ पांडववांचलेपांचजण॥ तिहींपांचाळपुरींप्रगटोन॥ द्रौपदीजिंकिली
प्रतापें॥ ५५॥ सुहूर्तएकतटस्थ॥ अंधराहिलानिवांत॥ मगह्मणेभाग्यअद्भुत॥ पांडवमाझेवांचले॥ ५६॥
आतांयाचेंत्याचेंगोड॥ विदुरातूंकरीसूघड॥ येरूह्मणेंबुद्धीसदृढ॥ हेचअसोतुझीकां॥ ५७॥ कृष्णाकृपेचा
बळेंजाण॥ शत्रूचींकृष्णाननेंकरून॥ कृष्णावरिलीहेंकथन॥ ऐकतांदोषदहनहोती॥ ५८॥ विदुरनसतांसु
योधन॥ जनकापाशीएकांतींयेऊन॥ ह्मणेविदुराचेंविचारीमन॥ नघालींतूसहसाही॥ ५९॥ घावाराज्यवि
भागधन॥ क्षणक्षणाबोधीलयेउन॥ त्यांआश्रयनघावापूर्ण॥ महाकपटीअसेतो॥ ६०॥ जोहरांतवांचलेपंडु
नंदन॥ तेआतांआह्मालावितीअग्न॥ त्यांचावधालागींप्रयत्न॥ करूंआतांअनेक॥ ६१॥ दुर्योधनासअंधह्म
णत॥ हेंचआहेमझ्यामनांत॥ मीविदुरासींबोलतांसत्य॥ लटकेंचस्तवितोंपांडवां॥ ६२॥ दुर्योधनह्मणेमंत्री-
धाडावे॥ द्रुपदयाज्ञसेनासबोधावे॥ पांडवतेथेंचठेवावे॥ कदांनआणावेगजपुरा॥ ६३॥ येथेंआणितांअपा

यनिश्चिती ॥ ऐसाधाकलागलाचित्तीं ॥ राज्यविभागनमागती ॥ ऐसेंकरूनठेवावें ॥ ६४ ॥ हळूचफोडावायाज्ञ
सैन ॥ एकेस्त्रीसभ्रतारपांचजण ॥ तेथेंकलहउपजेलपूर्ण ॥ भोगानिमित्यभांडतां ॥ ६५ ॥ दाऊनिविभागवैभ
व ॥ फोडावेनकुळसहदेव ॥ नानायत्नदाऊनभाव ॥ घातकरावातिघांचा ॥ ६६ ॥ धर्मबापुडेंनपुंसक ॥ त्याचा
नसेआह्मांधाक ॥ तेभीम बळेंदेख ॥ आह्मातृणप्रायमानिती ॥ ६७ ॥ एकमरतांभीमसेन ॥ कर्णासमगतृण
प्रायअर्जुन ॥ कृष्णाचेंकपटेंआर्जवकरून ॥ त्यागवावेपांडवां ॥ ६८ ॥ मगबोलिलाकर्ण ॥ मागेंतुह्मीकेलाप्रयत्न
तेंसर्वहीनिर्फळहोउन ॥ वाढलेंवैरशतगुणी ॥ ६९ ॥ द्रौपदीआणिपंडुनंदन ॥ कृष्णासआवडतीप्राणाहुन ॥
पांचाळआणियाज्ञसेन ॥ सर्वस्वेंसितयांचे ॥ ७० ॥ युद्धकरावेंबळेंकरुन ॥ राज्यरक्षावेंसंपूर्ण ॥ आपलाक्षात्रध
र्मसोडून ॥ अन्यधर्मनकरावा ॥ ७१ ॥ बोलउठनभीष्मद्रोण ॥ त्यांसपुसेअंबिकानंदन ॥ तेह्मणतीविरोधटाकुन
॥ पंडुनंदनआणावे ॥ ७२ ॥ स्वार्थासाठींदेख ॥ तुह्मींभोगिताऐश्वर्यसुख ॥ पांडवींमागावीभिक ॥ बरवावि
चारदिसेना ॥ ७३ ॥ आतांतरीसमजाउनी ॥ पांडवांआणापाचारुनी ॥ अर्धराज्यदेउनी ॥ सुखेंनांदासकळि
क ॥ ७४ ॥ पाठवावेचतुरप्रधानापती ॥ द्रुपदराजाघेऊनहातीं ॥ मुख्यगोष्टरुक्मिणीपती ॥ सखाकरासर्वस्वें
७५ ॥ कर्णह्मणेहेंबरवेंज्ञान ॥ गृहांतसर्पसोडावेआणुन ॥ सदनासलाउनकृशान ॥ मगसुखेंनिजावें ॥ ७६
व्याघ्रपाळावेधेनूंत ॥ मार्जारसोडावेंमूषकांत ॥ तैसेपांडवआणोनियेथ ॥ कौरवपाताळीं घालावे ॥ ७८ ॥ न्याय
निष्ठुरबोलेविदुर ॥ ह्मणेकुटिळाचेतर्कफार ॥ रायाऐकशीयांचाविचार ॥ तरीअनर्थपुढेंअसे ॥ ७९ ॥ पंडुसुतये
थेंआणतां ॥ क्षेमकल्याणतुझ्यासुतां ॥ तुझीकीर्तीनिश्चिता ॥ दिगंताप्रतिजाईल ॥ ७९ ॥ भीमेंवधिलाहिडिं
बक्रूर ॥ एकचक्रींमारिलाबकासुर ॥ स्वयंवरीराजेपाडिलेसमग्र ॥ देशिकप्रतापेंकरूनियां ॥ ८० ॥ युद्धकरितांब
ळियापुढें ॥ कांपळूनआलेइकडे ॥ तुजभोंवतेंकोडें ॥ गोष्टीसांगोनरिजविती ॥ ८१ ॥ युद्धकरितांपांडवांशी ॥ त

रीभृत्येंअवंतिलेंसर्वांसी ॥ मगधृतराष्ट्रह्मणेविदुरासी ॥ रथींबैसेसत्वर ॥ ८२ ॥ भेटोनिपांचाळनृपाप्रती ॥ धृष्टद्यु
म्नासहितनिश्चिती ॥ अहेरअळंकारसर्वांप्रती ॥ देवोनियांगौरवावे ॥ ८३ ॥ दिव्यवस्त्रेंदिव्यभूषणीं ॥ शृंगारा
वीयाज्ञसेनी ॥ सकळस्नुषांसहद्रुपदराणी ॥ गौरवावीआदरें ॥ ८४ ॥ नमस्कारूनकुंतीस ॥ स्नेहशब्देंपूजावेंती
स ॥ माझेंआशीर्वचनपांडवांस ॥ अत्यादरेंसांगणें ॥ ८५ ॥ श्रीकृष्णासभेटोन ॥ साष्टांगसांगमाझेंनमन ॥
पांडवांआणबुझावोन ॥ येथवरींदयाळा ॥ ८६ ॥ आज्ञाहोतांचविदुर ॥ रथींबैसलासत्वर ॥ पांचाळपूरमहान
गर ॥ सवेगकेलेंजवळिके ॥ ८७ ॥ दूतसांगतीपांडवाप्रती ॥ विदुरयेतोबैसोनरथीं ॥ ऐकोनियांसप्रेमचित्ती ॥
पांडवधांवतीसामोरे ॥ ८८ ॥ दूरदेखतांविदुर ॥ उचंबळतस्नेहसागर ॥ घालितीभूमीवरीनमस्कार ॥ नयनीं
नीरलोटलें ॥ ८९ ॥ रथींहूनउतरतांपांडववीर ॥ विदुरहीउतरलासत्वर ॥ आलिंगिलेपांचैपुत्र ॥ पंडुरायाचेते
धवां ॥ ९० ॥ धर्मह्मणेविदुरासी ॥ कितीआठऊंउपकारासी ॥ ठाईंठाईंतूंरक्षिसी ॥ बाळकातेंस्नेहाळा ॥ ९१ ॥
पांचाळयेऊनसमोर ॥ ग्रामामाजीनेलाविदुर ॥ उचंबळलाआनंदसमुद्र ॥ तोवर्णिलानजाये ॥ ९२ ॥ दृष्टीदे
खिलायादवेंद्र ॥ लोटांगणघालीविदुर ॥ ह्मणेजगद्गुरूतूंजगदोद्धार ॥ पांडवपाळकजगदात्मा ॥ आलिंगन
देतयदुवीर ॥ उचंबळलाकृष्णासमुद्र ॥ हृदयींधरिलानेव्हांविदुर ॥ वाटेसहसानसोडावा ॥ ९४ ॥ मगयेकां
तगृहींबैसोन ॥ विदुरेंसांगीतलेंवर्तमान ॥ चलास्वस्थानायेथोनिजाण ॥ मनीं आननधरावें ॥ ९५ ॥ धर्मह्मणे
जगजीवन ॥ तोकरीलतेंप्रमाण ॥ विदुरातुझेंवचन ॥ शिरींवंदिनवेदाऐसें ॥ ९६ ॥ कुंतीसनमीतसेविदुर ॥ द्रौ
पदीश्रृंगारिलीसत्वर ॥ वस्त्राभरणीअळंकार ॥ करीनमस्कारवडिलांतें ॥ ९७ ॥ कुटुंबसहद्रुपदनृपवर ॥ वस्त्रा
भरणींगौरवीतविदुर ॥ मगसांगेसमाचार ॥ कुंतीपांडवांलागींपैं ॥ ९८ ॥ पांडवआणीकयाज्ञसेन ॥ त्यासी
विदुरबोधीजाण ॥ चलापांडवांसघेउन ॥ स्थापूंनेऊननिजपदीं ॥ ९९ ॥ मगबोलेजगजीवन ॥ नियावेसकुसुहृर्त-

पाहून॥ मींहीसमागमेंयेईन॥ विदुरऐकोनआनंदला॥ २००॥ आपुल्यास्थळाजातील पांडव॥ तेकथाआहे॰
पुढेंअपूर्व॥ परिसोतपंडीतसर्व॥ ब्रह्मानंदेंकरोनियां॥ १॥ श्रीधरस्वामीब्रह्मानंदा॥ पांडुरंगापुंडलीकवरदा॥
रुक्मिणीहृदयाब्जमिलिंदा॥ स्वानंदकंदाजगद्गुरू॥ २॥ स्फुरसपांडवप्रतापग्रंथ॥ आदिपर्वव्यासभारत॥ त्यां
तीलसारांशयथार्थ॥ द्वादशाध्यायींकथियेला॥ ३॥ ॥ओंव्या २०३॥ ॥श्रीकृष्णार्पणमस्तु॥ ॥

श्रीगणेशायनमः॥ सुमुहूर्तेंकरून॥ निघतेजाहालेपंडुनंदन॥ संगेंघेऊनिअपारसैन्य॥ याज्ञसेननिघा ला॥१॥ द्रुपदेंदेऊनिसेनासंपत्ती॥ गौरविलेंपांडवांप्रती॥ अश्वरथभद्रजाती॥ आंदणदेतअद्भुत॥ २॥ दासदासीअपार॥ शय्यास्थानेंपृथकाकार॥ सिबिकादिवाहनेंसुंदर॥ रत्नजडितदीधलीं॥३॥ सुवर्णपा त्रेंविशेष॥ शिबिरेंरत्नगटींजडितकळस॥ सहस्रअर्बुदेंभरूनिकोश॥ द्रव्यसांगातेंदीधलें॥ ४॥ कुंती आ णियाज्ञसेनी॥ बैसतीपृथकसिबिरांतुनी॥ कनकांबरेंझांकूनी॥ मुक्तजाळ्यांतयावरी॥ ५॥ ज्याच्यावहना- पुढेंनिश्चिती॥ कनकदंडयेऊनिहातीं॥ सहस्रावधीत्वरितगती॥ वावकरितातीचालावया॥६॥ यादवेश्वर आणिपार्थ॥ एकेरथींजातीबोलत॥ इंद्रआणिअंगिरासुत॥ कींशशिआदित्यएकत्रपैं॥ ७॥ भिन्नभिन्नरथा वरी॥ चौघेबंधूझडकरी॥ नानावाद्येंप्रचंडभेरी॥ एकसरेंठोकिल्या॥ ८॥ निजभारेंसीधृष्टद्युम्न॥ पाठीसीचा- लेप्रीतीकरून॥ छपन्नकोटियादवरेवतीरमण॥ निजभारेंसीचालती॥९॥ सांगतांविसरलोंसाचार॥ जे रथीं अर्जुनजगदीश्वर॥ तेथेंचबैसलाविदुर॥ महाभक्तत्रिकाळज्ञानी॥१०॥ पांडवांसीबोळऊन॥ माघारागेला- पृषानंदन॥ इकडेगजपुरागजरेंकरून॥ पांडवआलेआनंदें॥११॥ त्वरेंयेऊनिविदुर॥ धृतराष्ट्राजाणवितीस माचार॥ मनीआनंदवाटलाथोर॥ पुढेंदळभारपाठविले॥१२॥ कर्णशारद्वतद्रोण॥ सन्मुखपातलेराजनंद न॥ नगरआनंदलेंसंपूर्ण॥ गुढियामखरेंउभविनी॥१३॥ नगरनरनारीसंपूर्ण॥ पाहावयाधांवतीवेगेंकरू न॥ मंडपघसणीझालीजाण॥ पांडववदनपाहावया॥१४॥ रत्नदीपघेउनीकरीं॥ वोवाळितीनगरनारी॥ पांडववांचलेजोहरीं॥ पूर्णभाग्येंदेखिले॥१५॥ गजरेंराजसदनांपातले॥ चरणपितयाचेवंदिले॥ अंधनय नाअश्रुआले॥ आलिंगिलेंपांचाजणा॥१६॥ ह्मणेधन्यआजिसुकृत॥ दृष्टीदेखिलेमाझेसुत॥ भीष्मद्रोणां सपांडवनमित॥ आशिर्वाददेतप्रीतीने॥१७॥ विजयसदाआनंदकल्याण॥ स्वपदींनांदावेंसुखसंपन्न॥ क्ष

णक्षणाप्रीतीकरून ॥ द्रोणआलिंगीपार्थातें ॥ १८ ॥ कर्णजयद्रथशैल्यशकुनी ॥ दुर्योधनदुःशासनादिकरु
नी ॥ निर्मत्सरसभास्थानी ॥ पांडवभेटलेआदरें ॥ १९ ॥ प्रतीपतनयबाल्हिक ॥ त्यासनमितीसकळिक ॥ गांधा
रीसनमितीनिःकलंक ॥ पांडवतेव्हांअनुक्रमें ॥ २० ॥ कुंतीआणिसौबळी ॥ स्नेहेंभेटतीत्याकाळीं ॥ प्रीती-
येऊनिपांचाळी ॥ सर्ववडिलांवंदित ॥ २१ ॥ काशीश्वराचीनंदिनी ॥ दुर्योधनाचीपट्टराणी ॥ येऊनिकुंतीपांचा
ळीचेचरणी ॥ वंदनकरीततेधवां ॥ २२ ॥ गांधारीच्याशनसुना ॥ पूजितीतेव्हांपांडवांगना ॥ देऊनियांवस्त्र
भरणा ॥ नानापरीतोषविती ॥ २३ ॥ आपुलियाराजमंदिराप्रती ॥ पांडवकृष्णाकृष्णाकुंती ॥ हर्षेस्वस्थानींप्र
वेशती ॥ दुःखेंविसरतीअवघींही ॥ २४ ॥ नित्यश्रीरंगाचेंदर्शन ॥ विदुरासिसदासंघट्टन ॥ तोसंसारनव्हेसं
पूर्ण ॥ केवळअद्वयसमाधि ॥ २५ ॥ महापुंण्याचेपर्वत ॥ अनंतजन्मींचेंतपअद्भुत ॥ तेंफळाआलेंतरीवैकुंठ
नाथ ॥ मंदिरांतसदावसे ॥ २६ ॥ जाहालेकितेकदिवस ॥ धृतराष्ट्रपाचारीधर्मास ॥ कर्णसांगेरहस्य ॥ अन्या
यनिजपुत्राचा ॥ २७ ॥ हेदुर्योधनादिदुर्मती ॥ माझेंवचननऐकती ॥ मजचक्षुहीनदेखती ॥ हेळसितीबहु
साल ॥ २८ ॥ विकल्पेंकलहकरिती ॥ महापापीशकुनीदुर्मती ॥ तरीतुह्मीघेऊनिअर्धजगती ॥ इंद्रप्रस्थींरा
हासुखें ॥ २९ ॥ त्यासीनसांगेविच्यार ॥ तुजवरीधरीनछत्र ॥ मगबोलाऊनिविदुर ॥ सर्वसामग्रीसिद्धकेली
॥ ३० ॥ अष्टोत्तरशतेंघटदेख ॥ आणवीजान्हवीचेंउदक ॥ दिव्यसुवर्णाचेसम्यक ॥ अळंकारघडविले ॥ ३१
किरीटकुंडलेंपदकमाळा ॥ मुद्राकंकणेंकटिमेखळा ॥ दिव्यवस्त्रेंतेवेळां ॥ अमोलिकआणविलीं ॥ ३२ ॥ श्वे
तसूर्यपर्णेश्वेतआतपत्रें ॥ नीळवर्णमेघडंबरें ॥ मकरबिरुदेंपवित्रें ॥ श्वेतचामरेंआणवित ॥ ३३ ॥ श्वेतह
स्तीचौदंत ॥ श्वेतहयराजवेगबहुत ॥ चतुःसमुद्रींचेंनीरआणित ॥ सप्तपल्लवपंचमृत्तिका ॥ ३४ ॥ धृतरा-
ष्ट्रासह्मणेश्रीकृष्णनाथ ॥ धन्यबुद्धीतुझीपुण्यवंत ॥ तरीयेचसमयींअसेमुहूर्त ॥ जयवारजयतिथी ॥ ३५ ॥

एकोनियांकृष्णावचन॥पाचारिलेऋषिसंपूर्ण॥महाराजसत्यवतीनंदन॥करितांस्मरणपातला॥३६ सुव
र्णपिठीं युधिष्ठिर॥धौम्यबैसविलासत्वर॥अभिषेकिलापंडुकुमर॥जयजयकारउठिला॥३७॥ दिव्यवस्त्रेंदि
व्य अळंकार॥लेइलातेव्हांयुधिष्ठिर॥दिव्यसिंहासनआतपत्र॥वाडिलेंदिधलेंधर्मासी॥३८॥धृतराष्ट्रेंविदु
रासांगीतलें॥त्याहूनिचतुर्गुणद्रव्यवेचिलें॥दानेंऋषीसुखीकेले॥धेनुवस्त्रेंअळंकारीं॥३९॥महाराजपंडू
नृपवर॥तेणेंवसुधाजिंकिलीसमग्र॥मोजूनशकेसहस्त्रवक्र॥इतुकेंद्रव्यतयाचें॥४०॥सांगोपांगयथोचि
त॥विदुरउदारसंपादित॥मगगजारूढमिरवित॥धर्मराजगजपुरीं॥४१॥सुवर्णसुमनांचेसंभार॥लोकव
र्षतीअपार॥इंद्रप्रस्थींचाराजेंद्र॥धर्मराजमिरवितो॥४२॥धर्मासिसांगेसत्यवतीनंदन॥पृथ्वीचेराजेजिंकू
न॥सर्ववशभावेंकरून॥आपणाधीनवर्त्तवी॥४३॥पुढेंकरीराजसूययज्ञतेणें॥संतोषतीपितृगण॥एक
कौरववेगळेकरून॥विश्वसुखदतूंराजा॥४४॥भीमार्जुनासीबोलाउनी॥धृतराष्ट्रसांगेकर्णी॥सहसेना-
धर्मासिघेउनी॥आतांचिजावेंइंद्रप्रस्था॥४५॥माझियापुत्रांसदुःखअपार॥हृदयींधडकेवैश्वानर॥तरी
तुह्मीयेथोनीसत्वर॥इंद्रप्रस्थआटोपा॥४६॥आज्ञासमर्थह्मणउनी॥पांचहीमस्तकेंठेवितीचरणीं॥भी
ष्मद्रोणासीनमुनी॥करितीनगरप्रदक्षणा॥४७॥स्यंदनारूढत्याक्षणा॥चालिल्याकुंतीआणिकृष्णा॥
त्रिभुवननायकयादवराणा॥सवेंघेउनीचालिले॥४८॥सर्वभावेंनमिलाविदुर॥नगरलोकराहिलेसम-
ग्र॥इंद्रप्रस्थमहानगर॥प्रवेशलेतेकाळीं॥४९॥तोंइंद्रप्रस्थींचेजन॥सामोरेयेतीत्वरेंधांवोन॥नानाउपा
यनेवस्तूआणुन॥धर्मरायाभेटविती॥५०॥शृंगारिलीसमस्तनगरी॥गुढियामखरेंउभविती द्वारीं॥प्रचं
डगर्जतीगजभेरी॥गुढियाअंबरींझळकती॥५१॥करींरत्नदीपघेनी॥नगरनारीवोवाळिती॥मुदनिंबलो
णउतरिती॥मुखावरूनपांडवांच्या॥५२॥धर्मेंदेखोनीतोसोहळा॥नगरनारीलोकांसकळां॥वस्त्रेंभूष

णेनेवेळां॥ देऊनियांसंतोषविले॥ ५३॥ कृष्णेंस्मरतांचिदेवपाळ॥ वरूनिउतरलातत्काळ॥ ह्मणेआज्ञाकरावीसमूळ॥सिद्धीपाववीनसर्वही॥ ५४॥ इंद्रिशवरइंद्रासीह्मणत॥ नवनामेहेंनगरभिरवत॥ रचनायेथेंकरावीअद्भुत॥ अमरावतीसारिखी॥ ५५॥ शक्रेंविश्वकर्म्यासीबोलाउनी॥निर्मिलीतेथेंराजधानी॥ शोधितांसमस्तअवनी॥ऐसीरचनानसेची॥ ५६॥ नलगेपातियापातें॥ तोंइंद्रप्रस्थरचिलेंतेथें॥ पाहतांतेकौशल्यरचनेतेंतटस्थसमस्तजाहाले॥ ५७॥ मनुष्यकरणीपरतीसारुन॥ रचिलेंकेवळइंद्रभुवन॥ हस्तनापूरनीचपूर्ण॥शक्रप्रस्थश्रेष्ठवरी॥५८॥समस्तदुर्गगगनचुंबित॥हुडेजैसेकनकाद्रीचेसूत॥शतखणीगोपुरेंविराजित॥जडितलेपेंझळकती॥५९॥सकळसंपत्तीभरून॥स्वस्थानागेलासहस्रनयन॥ तेथेंराज्यकरितीपंडुनंदन॥ साह्यश्रीकृष्णासर्वदां॥ ६०॥ सुखराज्यगृहपरमसुंदर॥ गृहतेथेंसंपत्तीसमग्र॥ संपत्तीतेथेंअहोरात्र॥धर्मवसेनिश्चयें॥६१ धर्मतेथेंसदादान॥दानतेथेंजनार्दन॥जनार्दनतेथेंकमळायेऊन॥चिरकाळस्थीरअसे॥६२॥ कमळातेथेंसुखविशेष॥सुखतेथेंसहजउल्हास॥उल्हासतेथेंमहापुरुष॥संतजनमिळती॥ ६३॥ संततेथेंवसेशांती॥शांतितेथेंवसेनिवृत्ती॥निवृत्तितेथेंनिश्चिती॥समाधानसर्वदां॥ ६४॥ समाधानतेथेंसमाधि॥ समाधितेथेंकैचीव्याधीव्याधिनाहींतेथेंउपाधी॥नसेमगतत्वतां॥ ६५॥ आधीतुटतांअभेद॥ अभेदतेथेंब्रह्मानंद॥ तोब्रह्मानंदकेवळगोविंद॥ पांडवांघरींवसतसे॥ ६६॥ असोनित्यनैमित्तिककर्मे॥धर्मआचरेसदानेमे॥ सकळराष्ट्रसुखागमें॥ कुंशरहितनांदन॥ ६७॥ कुटुंबासहितऋषेश्वर॥ सिद्धिसाधकयोगेश्वर॥ देऊनिसंपत्तीमंदिर॥ युधिष्ठिरनांदविन॥ ६८॥ अखंडसंतसमागमपूर्ण॥सदाकरितशास्त्रश्रवण॥नानाशास्त्राचेंअध्ययन॥पुराणश्रवणघरोघरी॥ ६९॥टाळमृदंगसंगित॥हरिकीर्त्तनेभक्तगर्जत॥देवार्चनेंशोभिवंत॥सदांहरिहरउपासना॥ ७०॥ याचकांचीइच्छापाहुन॥ तैसेंचदेतीलोकदान॥ दरिद्रदुःखरूपण॥नगरींकोणांनसेची॥ ७१॥ यथाकाळींवर्षेघन॥गा

ईसत्रिकाळदुग्धपूर्ण॥ पुष्पवृक्षासएकबंधन॥ दंडछत्रावियेपरी॥ ७२॥ असोपुसोनिपंडुनंदना॥ वासुदेवचा
लिलावसुदेवदर्शना॥ धर्मह्मणेजगन्मोहना॥ जाऊनियावेंसत्वर॥ ७३॥ राजीवनेत्रासुहास्यवदना॥ कोटिकंद
र्पविराजमाना॥ लावण्यसागरापरिपूर्णा॥ ब्रह्मानंदासुखाब्धे॥ ७४॥ तुझेंश्रीमुखसाजिरें॥ पाहतांमाजीधनी
नपुरे॥ माउलीश्रीरंगेउदारे॥ नविसरेंतुझेउपकार॥ ७५॥ तुझेंनपाहतांवदन॥ वाटतेंउन्मळतीलनयन॥ तुझ्या
नामस्मरणाविण॥ जिव्हाझडोनीजाइल॥ ७६॥ माझ्यानेजानह्मणवेजाण॥ लवकरीयावेंपरतोन॥ आह्मादि
नाचेंपालन॥ तुजवीणकोणकरी॥ ७७॥ जनकजननीबंधुभगिनी॥ तूंचिआमचीकुळस्वामिणी॥ मूळपीठद्वार
कावासिनी॥ संकटपाहोनीधांवसी॥ ७८॥ पांचपांडवद्रौपदीसती॥ भोंवतींकृष्णवदनविलोकिती॥ नयनींअ
श्रुधारास्त्रवती॥ मिठीघालितीपायांसी॥ ७९॥ नयनोदकेंकरून॥ प्रक्षालितीश्रीकृष्णचरण॥ श्रीकृष्णेंसद्गद
होऊन॥ हृदयींधरिलींसाहीजणें॥ ८०॥ ह्मणेतुह्मासनविसंबेएकक्षण॥ संकटींयेईनधांवोन॥ पांडवमाझे
पंचप्राण॥ जीवनकळाद्रौपदी॥ ८१॥ तुह्माकारणेंसाचार॥ म्याधरिलासेहाअवतार॥ उतरीनआतांभूभार
निमित्ततुमचेंकरूनियां॥ ८२॥ ऐसेंकरूनिसमाधान॥ द्वारकेनिघालेजगज्जीवन॥ छपन्नकोटीदळसंपूर्ण॥ रे
वतीरमणसमवेत॥ ८३॥ बळिरामआणिश्रीपती॥ नमस्कारितीकुंतीप्रती॥ वाद्यगजरेंदुमदुमिती॥ द्वारका
पुराप्रतीगेला॥ ८४॥ जातांसांगीतलेंधर्मातें॥ नारदआतांयेईलयेथें॥ तोसांगेलज्याबुद्धीतें॥ तेंचित्तींधरीस
वेज्ञा॥ ८५॥ देवगेलेद्वारकेसी॥ तोंसवेंचआलानारदऋषी॥ नमस्कारूनियांतयासी॥ वरासनींपूजिला॥ ८६
पांडवांसीबैसऊन॥ नारदह्मणेंऐकावचन॥ एकनारीभ्रतारपांचजण॥ विरोधाकारणनिमित्त॥ ८७॥ हिरण्या
क्षाचासुत॥ निशंभनामाविख्यात॥ संदोपसंदनिश्चित॥ त्याचेपुत्रप्रतापी॥ ८८॥ दोघांचास्नेहपरिपूर्ण॥ ए
कशय्याएकभोजन॥ त्याणींउग्रतपकरून॥ देवपळवूंइच्छिती॥ ८९॥ शिवआणिचतुरानन॥ प्रसंनजाहालेत्यां

लागुन॥ आमचेंसामर्थ्यसर्वांहून॥ चालेऐसेंकरावें॥९०॥ आह्मासनव्हावेंमरण॥ मगबोलेहंसवाहन॥
तुह्मांबंधूंतविरोधपूर्ण॥ मरणजाणातेकाळीं॥९१॥ तेह्मणतीआह्मांतविरोध॥ होईलहेगोष्टीअबद्ध॥ मग
तिहींकरूनियुद्ध॥ त्रिभुवनत्रासिलें॥९२॥ गाईब्राह्मणासवधिती॥ देवस्थानेविध्वंसिती॥ वोसपडिलीअ-
मरावती॥ बंदीनृपतीघातले॥९३॥ ऋषिदेवप्रजामिळोन॥ ब्रह्मदेवासगेलेशरण॥ तेणेंयत्नेंअवयवघालून
नारीएकरचियेली॥९४॥ तिळप्रमाणजोडनरत्नें॥ स्वहस्तेंनिर्मिलीविधिनें॥ तिळोत्तमानामयेणें॥ विंध्याच
ळापाठविली॥९५॥ संदोपसंदबैसलेसभेसी॥ तोंविद्युल्लताझळकेजैशी॥ देखतांलावण्यराशी॥ दोघेबंधू-
धांवले॥९६॥ दोघींधरिलेदोनीहस्त॥ वडिलसंदतेव्हांबोलत॥ हेमाझीस्त्रीयथार्थ॥ मातेसमानमानीतूं॥९७
उपसंदह्मणेमाझीकामिनी॥ तूंभगिनीस्नुषेसमानमानी॥ एकएकाचेंनमानी॥ गदाघेउनीउठियेले॥९८॥ यु
द्धझालेंबहुत॥ संदमस्तकींगदाघालित॥ कर्णमूळींताडित॥ उपसंदगदाघायें॥९९॥ दोघेपडिलेअचेतन॥ त
त्काळगेलेनिघोनिप्राण॥ तिळोत्तमागेलीतेथून॥ सूर्यलोकींराहिली॥१००॥ पुढेंतीसस्फुरेश्वरभोगित॥ ऐसा
हास्त्रीलोभेंअनर्थ॥ तरीद्रौपदीचेदिवससमस्त॥ वर्षवाटितोंसमान॥१॥ दोनमासद्वादशदिवस॥ पांचठायीं
नेमस्तवरुष॥ एकाचीस्त्रीअसतांचौघांस॥ संबंधनाहींतत्वता॥२॥ एकांतींनिकटअसतां॥ जोकोणीविलो-
कीअवचिता॥ त्यासगुरुतल्पकब्रह्महत्या॥ दोषहोईलमस्तकीं॥३॥ त्यासप्रायश्चित्तपूर्ण॥ द्वादशवर्षेंतीर्थाट
ण॥ भंगितांमाझेंनेमवचन॥ शापदेईनतत्काळ॥४॥ ऐसेनेमपाशेंकरुन॥ नारदेंबांधिलेपंडुनंदन॥ पांचांनीं-
करुनीनमन॥ वचनमान्यकेलेंतेव्हां॥५॥ समर्पूनपूजासंभार॥ संतोषविलाब्रह्मकुमर॥ सर्वेंचगुप्तजाहला
मुनेश्वर॥ द्वारकापुरापावला॥६॥ एकदिवसजाहालियावरी॥ राष्ट्रांतएकाब्राह्मणाचेघरीं॥ घालाघालूनि-
तस्करीं॥ सवत्सधेनूनेल्याहो॥७॥ हृदयपिटीतब्राह्मण॥ पार्थापासीआलाधांवोन॥ ह्मणेमहावीरागोधन

नस्करमाझीनेताती ॥ ८ ॥ ऐकतांउठिलापार्थवीर ॥ तोंचित्रशाळेसचापशर ॥ ठेविलींतेथेंद्रौपदीयुधिष्ठिर ॥
एकेठायींपहुडलीं ॥ ९ ॥ आठवलेंनारदाचेंवचन ॥ इकडेब्राह्मणकरीरुदन ॥ मगपार्थपाहेविच्यारून ॥ विशेषपु
ण्यगोरक्षणीं ॥ १० ॥ करीनद्वादशवर्षेंवनवास ॥ परिहरोंब्राह्मणाचेक्लेश ॥ मगचित्रशाळेकरूनिप्रवेश ॥ शस्त्रें
घेउनिधांवला ॥ ११ ॥ आटोपूनतस्करसकळ ॥ शिरच्छेदकेलेतत्काळ ॥ गोधनेंदेऊनिपुण्यशीळ ॥ ब्राह्मणपरम
संतोषविलें ॥ १२ ॥ नारदवचनस्मरोन ॥ वंदिलेतेव्हांधर्माचेचरण ॥ ह्मणेआज्ञादीजेमजलासंपूर्ण ॥ तीर्थाटणा-
जावया ॥ १३ ॥ धर्मह्मणेतेवेळां ॥ तुझानेमनाहींटळला ॥ तुवांगोवृंदसोडविला ॥ संतोषविलेंब्राह्मणां ॥ १४ ॥ पा
र्थह्मणेतेसमयीं ॥ नेमनटळेकाळत्रयीं ॥ द्वादशवर्षांनीलवलाही ॥ येतोंतुझ्यादर्शना ॥ १५ ॥ संकटजाणोनीपरम
॥ आज्ञादेततेव्हांधर्म ॥ सवेंनिघालेद्विजोत्तम ॥ पार्थासंगेंतीर्थाटणा ॥ १६ ॥ पावनतीर्थेंकरीत ॥ स्थळींस्थळींउ
त्तमदानेंदेत ॥ तीर्थमहिमापाहत ॥ गंगाद्वारापातला ॥ १७ ॥ स्नानसंध्याब्रह्मयज्ञजाण ॥ हरिचरणीद्र्वेंतसंपा
दुन ॥ बाहेरयेतअर्जुन ॥ तोंअपूर्ववर्तलें ॥ १८ ॥ तोंकौरवनागराजकुमरी ॥ उलपीवसेगंगातीरीं ॥ परमसुंदरला
वण्यलहरी ॥ शचिरतीसमान ॥ १९ ॥ तिणेधरूनअर्जुन ॥ वोढोनिनेलासदनालागुन ॥ ह्मणेतुझेंस्वरूपदेखोन ॥
मनमाझेंवेधलें ॥ २० ॥ अंगसंगेंकरून ॥ तृप्तकरीमाझेंमन ॥ मगह्मणेअर्जुन ॥ मीव्रतस्थतापसी ॥ २१ ॥ मगपद्मी
णबोलेवचन ॥ मीत्यजीनआपुलाप्राण ॥ मजरक्षितांतुझेंपुण्य ॥ वंशवृद्धीपाववीनमी ॥ २२ ॥ मीतुझीस्त्रीविशे
ष ॥ व्रतभंगितांनाहींदोष ॥ पार्थाचेगळांनिर्दोष ॥ माळघातलीप्रीतीने ॥ २३ ॥ तेथेंराहिलेएकरात्री ॥ स्मरतानंदें
दिधलीतृप्ती ॥ संतोषझालातिजप्रती ॥ तोंगर्भास्तउदेला ॥ २४ ॥ तेथोनिनिघालापार्थ ॥ पावलाहिमालयपर्व
त ॥ केदारबदरीमहातीर्थ ॥ धर्मशीळपाहातसे ॥ २५ ॥ हिरण्यबिंदुतीर्थकरून ॥ प्राचीदिशेसपातलाअर्जुन ॥
प्रवेशलानैमिषारण्य ॥ तपोधनवंदित ॥ २६ ॥ भागीरथीसव्यघालित ॥ अंगवंगादिदेशपाहत ॥ दक्षिणदिशे

सिपार्थी॥ महेंद्रपर्वतींपातला॥ २७॥ सिद्धसाधकसेविलापर्वत॥ पुढेंरत्नाकरमहोदधीदिसत॥ तेथेंपंचरात्रिपा
र्थ॥ आनंदेंक्रमितसंतसंगें॥ २८॥ तेथेंससुद्राचेतीरीं॥ मणिपुरनामनगरी॥ तेथेंराजाराज्यकरी॥ चित्रवाहननाम
तया॥ २९॥ त्याचीकन्याचित्रांगिजाण॥ लावण्यखाणीपरमसगुण॥ तीणेलक्षिलाअर्जुन॥ स्नानकरितांसिंधुजी
वनी॥ १३०॥ पितयाससांगेजाउनी॥ एकपुरुषम्यांदेखिलानयनीं॥ परमतेजस्वीजैसातरणी॥ वरकरूनिदेईतो॥
॥ ३१॥ कन्येचेंकरूनिसमाधान॥ पार्थाजवळीआलाचित्रवाहन॥ नामगोत्रकुळऐकोन॥ परमानंदजाहला॥ ३२॥
ह्मणेपार्थापंडुनंदना॥ चित्रांगीहेमाझीकन्या॥ तूंअंगिकारींशशिभानना॥ पुरवीवासनापूर्णमाझी॥ ३३॥ इचेपो
टीहोईलकुमर॥ त्यासदेईनराज्यभार॥ यावरीपंडुकुमर॥ अंगिकारीतियेतें॥ ३४॥ करूनियथाविधिपाणिग्र-
हण॥ तीनवर्षेराहिलाअर्जुन॥ चित्रांगीगरोदरहोऊन॥ बभ्रुवाहनपुत्रजाहला॥ ३५॥ संतोषलाचित्रवाहन॥ अ
पारदेतयाचकांदान॥ महाबळवंतबभ्रुवाहन॥ प्रतिअर्जुनदुसरा॥ ३६॥ अश्वमेधपर्वींपुरुषार्थ॥ त्याचावर्णिजे
लअद्भुत॥ त्यासीराज्यतेथिचेंसमस्त॥ चित्रवाहनेंदीधलें॥ ३७॥ तेथोनिआज्ञाघेऊनिपार्थ॥ पुढेंचालिलातीर्थें-
करित॥ शिवविष्णुक्षेत्रेंपाहात॥ करीविधियुक्तस्नानदान॥ ३८॥ कामिकवनींप्रवेशेपार्थ॥ तोंशिवाचेंअनुष्ठान
स्थळतेथ॥ शिवनसतांकुंतीसुत॥ जाऊनिबैसततेठायीं॥ ३९॥ अर्जुनबैसलाध्यानस्थ॥ तोंउमावरपातलातेथ
॥ तयासीदेखोनिह्मणत॥ तूंकोणयेथेंबैसलासी॥ १४०॥ मगबोलेअर्जुन॥ तुजपुसावयाकायकारण॥ शिवह्म
णेंमाझेंस्थान॥ तूंकोणयेथें बैसलासी॥ ४१॥ अर्जुनबोलेतेवेळां॥ ठावकायतुवांअंखिला॥ ऐकतांविषकंठक्षो
भला॥ ह्मणेतुजमारीनमी॥ ४२॥ अर्जुनेंकार्मुकचढविलें॥ निर्वाणबाणवरीयोजिलें॥ शिवेंपिनाकसोडिलें॥ युद्ध
मांडिलेंनिर्वाण॥ ४३॥ शिवेंअग्निअस्त्रटाकिलें॥ पार्थेंपर्जन्यास्त्रसोडिलें॥ शिवेंशक्तिअस्त्रप्रेरिलें॥ पार्थेंघातलें
कार्तिवीर्यास्त्र॥ ४४॥ असोअस्त्रेंहोतीजींजीं बहुतें॥ तितकींटाकिलींहिमनगजामातें॥ अवघींनिवारिलींपार्थें

निजसामर्थ्येंकरूनियां॥४५॥ मगसंतोषलाअपर्णावर॥ ह्मणेधन्यधन्यतूंमहावीर॥ प्रसन्नझालोंमागवर॥
नामखुणासांगतुझी॥ ४६॥ येरूह्मणेमीपंडुनंदन॥ श्रीकृष्णादासनामअर्जुन॥ मगशिवेंकवचाकिरीटकादोन
प्रसाददिधलाअर्जुनातें॥ ४७॥ मगशिवासकरूनिनमस्कार॥ पुढेंतीर्थेंकरितचालिलापंडुकुमर॥ भ्रमतआला
जेथेंरामेश्वर॥ दक्षिणसमुद्रतिकडेपैं॥ ४८॥ करूनियांस्नानदान॥ घेतलेंरामेश्वराचेंदर्शन॥ तोंतेथेंअंजनीनंदन
महावीरदेखिला॥ ४९॥ पुढेंपाहिलाअद्भुतसेतू॥ शतयोजनेलंकेपर्यंतू॥ हनुमंतासिपुसेपार्थू॥ कोणेसेतूबांधि-
लाहा॥ १५०॥ मारुतीसांगेपूर्ववर्तमान॥ यामार्गेंगेलेरघुनंदन॥ तोप्रतापीरविकुळभूषण॥ तेणेसेतूबांधिलाहा
॥ ५१॥ हांसोनिबोलेवीरपार्थ॥ आजिरामाचेंएवढेंसामर्थ्य॥ निजबाणेंकांनबांधिलासेत॥ शिळाकिंनिमित्तघात
ल्या॥ ५२॥ हनुमंतह्मणेबाणाचासेतू॥ भंगेलहेंजाणेंरघुनाथु॥ एकएकवानरजैसापर्वतू॥ कैसासेतूनगेल॥ ५३॥
पार्थह्मणेमजऐसाअसता॥ तरीशरांचासेतूबांधिता॥ तोक्रोधआलाहनुमंता॥ ह्मणेबांधीनलवतायेवेळे॥ ५४॥ मी
जरीएकलावरीचढेन॥ तरीशरांचासेतूमोडिन॥ पार्थेंथोडेंसेतूबंधन॥ करिताझालातेधवां॥ ५५॥ प्रचीतपाहाव-
यापूर्ण॥ सेतूबांधिलाएकयोजन॥ ह्मणेउडीघालीबळेंकरून॥ कैसामोडेलपाहूंबरें॥ ५६॥ अर्जुनह्मणेहेंविशफ
त॥ जरीमोडोनिपडिलासेत॥ तरीअग्निकाष्ठेंभक्षीनसत्य॥ तूंहीनिश्चितबोलेंपां॥ ५७॥ हनुमंतह्मणेमजनाहींम
रण॥ जरीसेतूनमोडेमाझेन॥ तरीमीतुझेध्वजस्तंभींबैसेन॥ तुजआधीनहोईनमी॥ ५८॥ मगपार्थेंधनुष्यचढउ
नी॥ बाणसोडिलाअभिमंत्रुनी॥ अभंगसेतूकेलातेक्षणीं॥ ह्मणेमोडोनिटाकीआतां॥ ५९॥ हनुमंतउडोनिगग
नागेला॥ सेतूवरीयेऊनपडला॥ सेतूमोडोनीचूर्णकेला॥ हनुमंतगर्जलाभुभुःकारें॥ ६०॥ सेतूमोडिलादेखोनी
पार्थेंधनुष्यबाणठेविलेधरणी॥ बहुतकाष्ठेंमेळवूनी॥ दीगकेलाअसंख्यात॥ ६१॥ जातवेदचेतविलातकाळ॥ आ
काशपंथेंधांवतीज्वाळ॥ पार्थेंस्नानविधिकरूनिसकळ॥ नेमआपलासारिला॥ ६२॥ करूनिअग्निसप्रदक्षणा॥ ह

दयीं आठविलें श्रीकृष्णाध्याना ॥ किरीटकुंडलें मंडितवदना ॥ पीतवसनाचतुर्भुजा ॥ ६३ ॥ ह्मणे हे कृष्णा द्वारकाधी
शा ॥ मधुकैटभारियाजगन्निवासा ॥ हे रमाधवक्षीराब्धिवासा ॥ मुरहराशेषशाई ॥ ६४ ॥ हे रुक्मिणीवल्लभा
जनार्दना ॥ हे कंसारे नरकासुरमर्द्दना ॥ हे मधुसूदन निजसुखवर्द्धना ॥ मन्मथजनकाश्रीरंगा ॥ ६५ ॥ हे भक्तवत्स
ला यादवेंद्रा ॥ हे केशवदुरितकानन वैश्वानरा ॥ हे दानवसमरधीरा ॥ इंदिरावराश्रीहरी ॥ ६६ ॥ हे माधवनवपंक-
जपत्राक्षा ॥ अनंतनयनाहृदयसाक्षा ॥ देववंद्याकर्माध्यक्षा ॥ कोणापरिक्षानव्हे तुझी ॥ ६७ ॥ तों द्वारकेसि जगन्ना
थ ॥ कळलें संकटीं पडिला पार्थ ॥ भक्तकैवारी रमाकांत ॥ आला धांवत सेतुबंधा ॥ ६८ ॥ द्विजवेष धरिला सर्वेशें ॥
हनुमंतालागीं साक्षे पें पुसे ॥ हा कोण अग्निप्रवेश करितसे ॥ वर्तमान कैसें सांग मज ॥ ६९ ॥ हनुमंतें कथिलें वर्तमा
न ॥ यावरी बोले ब्राह्मण ॥ या गोष्टीस साक्ष कोण ॥ मजलागून सांगतें ॥ ७० ॥ मारुती ह्मणे साक्ष नाहीं ॥ द्विज ह्मणे
असत्य पाहीं ॥ साक्ष नसतां व्यर्थ सर्वही ॥ वेद ऐसें बोलतसे ॥ ७१ ॥ तरी मज देखतां रचा सेतू ॥ वरी तूं उडी घाली अ
कस्मातु ॥ मग पार्थीं हातीं त्वरितु ॥ मागुती सेतू बांधविला ॥ ७२ ॥ गुप्तरूपें जगज्जीवन ॥ सेतूखालीं घातलें सुदर्शन
मग ऊर्ध्व उडाला अंजनीनंदन ॥ निराळपंथें तेधवां ॥ ७३ ॥ उडी घातली अकस्मातू ॥ परी तैसाचि अभंग सेतू ॥ वरी आ
दळोनि हनुमंतु ॥ एकीकडे पडियेला ॥ ७४ ॥ जैसा शिळेवरी गोटा पडे ॥ तो उसळूनि जाय एकीकडे ॥ पार्थ निरखून पा
हे ब्राह्मणाकडे ॥ तों द्वारकाधीश वोळखिला ॥ ७५ ॥ ब्राह्मण ह्मणे वायुसुता ॥ याचे ध्वजस्तंभीं बैसें आतां ॥ तेव्हां
आपुलें स्वरूप तत्वता ॥ प्रकट केलें द्वारकाधीशें ॥ ७६ ॥ अर्जुनास धरूनि वनमाळी ॥ मारुतीचे हातीं देत ते वेळीं ॥ ह्म
णे यासतूं सांभाळीं ॥ कृपा करूनी सर्वदा ॥ ७७ ॥ झाला पृथ्वीस दैत्यभार ॥ तुह्मी आह्मी आणि हा पार्थवीर ॥ करूं
दुष्टांचा संहार ॥ अकर्मा कार सर्वही ॥ ७८ ॥ रामावतारीं तुवां सेवा करून ॥ मजवरी केला उपकार पूर्ण ॥ आतां सांभा
ळीं हा अर्जुन ॥ ध्वजीं बैसोन पाठिराखा ॥ ७९ ॥ तुज जिंकी ऐसा कोणी ॥ नाहीं वीर त्रिभुवनीं ॥ हनुमंत लागला ह

शिचरणी ॥ ह्मणे आज्ञाप्रमाण तुझी ॥ ८० ॥ गुप्त जाहला भगवान ॥ आला द्वारकावतियेलागून ॥ हनुमंताची आ-
ज्ञा घेउन ॥ चालिला अर्जुन तेथोनी ॥ ८१ ॥ तों सुभद्रा श्रीकृष्णाची भगिनी ॥ देऊं केली होती अर्जुनालागुनी ॥ मग
पार्थ तीर्थें करावया मेदिनी ॥ बहुत दिवस गेला पैं ॥ ८२ ॥ त्यावरी बळिभद्रें केली विचारणा ॥ कीं सुभद्रा द्यावी दुर्योध
ना ॥ परी तें न ये श्रीरंगाच्या मना ॥ अंतरीं वासना अर्जुनाकडे ॥ ८३ ॥ बळिभद्रें निश्चय केला सत्य ॥ जों आला नाहीं वी
र पार्थ ॥ तों दुर्योधनास द्यावी त्वरित ॥ ऐसा निश्चय पूर्ण केला ॥ ८४ ॥ इच्छित श्रीकृष्णाचें मन ॥ या समयीं यावा अर्जुन
तो वैकुंठनाथ ब्रह्म सनातन ॥ इच्छामात्रें सर्व करी ॥ ८५ ॥ तों तीर्थें करूनि पार्थ ॥ द्वारकेस आला अकस्मात ॥ महाता-
पसी वल्कलें वेष्टित ॥ नोळखे निश्चित कोणा ही ॥ ८६ ॥ श्रीकृष्णासी हेर सांगत ॥ नगराबाहेर एक महंत ॥ महा तपोध
न प्रतापवंत ॥ तीर्थें करित पातला ॥ ८७ ॥ ऐसें ऐकोनि जगज्जीवन ॥ ह्मणे घेऊं महंताचें दर्शन ॥ द्वारके बाहेर येउन ॥
भेटता झाला तापसिया ॥ ८८ ॥ अंतरीं कळली सेखुण ॥ आला प्राणसखा अर्जुन ॥ बाह्यात् पुसे तुह्मी कोण ॥ को
णे आश्रमीं राहता ॥ ८९ ॥ पार्थ ह्मणे मी ब्रह्मच्यारी ॥ स्वइच्छा क्रीडतों पृथ्वीवरी ॥ हरि ह्मणे आमुचे नगरीं ॥ चातु-
र्मास करिजे ॥ ९० ॥ तापसी राहविला च्यार मास ॥ श्रीकृष्ण आले मंदिरास ॥ सांगे वसुदेव बळिभद्रास ॥ महाता
पसी आला आहे ॥ ९१ ॥ बळिराम आणि यादवेंद्र ॥ तापसीया भेटले समय ॥ परि हा वसुदेव भगिनीपुत्र ॥ न जाणती
कोणी ही ॥ ९२ ॥ पार्थूनियां रेवतीनाथें ॥ घरा आणिले महंता तें ॥ सर्व ही भजती भावार्थें ॥ नवल तेथें वर्तलें हो ९३
श्वेतपर्वतीं महाशक्ती ॥ तिचे यात्रेस यादव जाती ॥ संकर्षण आणि रमापती ॥ निघती वसुदेव उग्रसेन ॥ ९४ ॥ शृंगा
रला चतुरंग दळभार ॥ बळी यादव संपत्तिसागर ॥ वाद्यें वाजती अपार ॥ सनयासुस्वर गर्जती ॥ ९५ ॥ देवकी आणि
यादववनिता ॥ ज्या शृंगार नभींच्या विद्युल्लता ॥ चातुर्यरासी सौभाग्यसरिता ॥ दिव्ययानारूढ जाती ॥ ९६ ॥ त्यामा
जी श्रीरंगभगिनी ॥ सुभद्रादेवी लावण्यखाणी ॥ देवांगना नागिनी पद्मिनी ॥ स्वरूपावरूनि वोवाळिजे ॥ ९७ ॥ द

मयंतीसुलोचनापंचशरदारा ॥ मयकन्यारूपवंतीतारा ॥ जिच्याविलोकितांवदनचंद्रा ॥ लाजोनिजातीनक्षत्रकाळ ॥
॥ ९८ ॥ कमळभवांडमंडपशोधितां ॥ सुंदरनाहींश्रीकृष्णापरता ॥ त्याचीभगिनीवसुदेवदुहिता ॥ तीचेंस्वरूपअ-
द्भुत ॥ ९९ ॥ सघननक्षत्रेंनिर्मळनभमंडळीं ॥ तैसीमस्तकींझळकेमुक्तजाळी ॥ बिजवरामिरवेभाळीं ॥ आकर्णनेत्री
सुभद्रा ॥ २०० ॥ कविगुरुतेजासिउणेआणि ॥ तेवींमुक्तघोषडोलतीकर्णी ॥ उघडिल्यादिव्यरत्नखाणी ॥ तैसीदर्श
नींप्रभाफांके ॥ १ ॥ नेत्रींशोभेजीचेंअंजन ॥ नाचेशफरिध्वजदेखोन ॥ चपळेहुनीझळकेदिव्यवसन ॥ पायींपैंजण
नेपुरें ॥ २ ॥ असोऐसाचालिलाभार ॥ यादवललनापरमसुंदर ॥ त्यांतसुवर्णसिबिकेंतसुभद्रासकुमार ॥ आरूढो
नियांजातपैं ॥ ३ ॥ उभयकृष्णएकेरथीं ॥ चमूमाजीमिरवतजाती ॥ जेविपुरंदरआणिवाचस्पती ॥ एकासनीबैसले
॥ ४ ॥ सुवर्णयानीसुभद्रारत्न ॥ कपिध्वजलक्षीदुरोन ॥ मनासीव्यापिलेंमन ॥ वेधिलेंमनतिकडेची ॥ ५ ॥ तेंदेखो-
निहास्यवदन ॥ मन्मथजनकबोलेवचन ॥ अज्ञातटस्थद्रव्यदेखोन ॥ तैसेपाहतांकोणीकडे ॥ ६ ॥ ब्रह्मचारीतुह्मीम
हंत ॥ भलतेकडेकांगुंतलेंचित्त ॥ मगह्मणेवीरपार्थ ॥ स्थीरहोयकरीऐसें ॥ ७ ॥ राज्यभांडारींचेंरत्नतखतां ॥ केंवि
येईलदुर्बळाच्याहाता ॥ मगयावरीकमलोद्भवपिता ॥ कर्णींसांगेपार्थाच्या ॥ ८ ॥ यात्रेहूनिपरततांजाण ॥ माझि
यादिव्यस्यंदनींबैसोन ॥ हरोनियांसुभद्रारत्न ॥ पवनाहूनिजायत्वरें ॥ ९ ॥ किरीटीडोलवीतमान ॥ यावरीरैवताच-
ळाजाऊन ॥ शक्तिपूजनवनभोजन ॥ लहानथोरींसंपादिलें ॥ १० ॥ समयपाहूनिक्षिराब्धिजानाथ ॥ धनंजयासदावी
खुसंकेत ॥ तोंसुभद्रेचेंहीचित्त ॥ पार्थस्वरूपींवेधलें ॥ ११ ॥ सुभद्रामानसींभाविन ॥ पार्थाऐसादिसतोमहंत ॥ तों
तेणेंउचलोनिअकस्मात ॥ स्यंदनावरीघातली ॥ १२ ॥ तूर्दीनवाजतांअर्जुन ॥ जातसुरेशप्रस्थींचामार्गलक्षोन ॥
अश्वजातीमनोवेगेंकरून ॥ शैलसुग्रिवादिच्यारी ॥ १३ ॥ मागेंहाकगाजलीएकसरसी ॥ सुभद्राघेऊनगेला-
तापसी ॥ फुटेप्रळयींजळरासी ॥ तैसेयादवधांवले ॥ १४ ॥ प्रद्युम्नसांबादिकहरिकुमर ॥ ह्मणतीधराधरारेप

ळतोतस्कर ॥ देखोनियादवांचे भार ॥ मुरडिलारहंवरअर्जुनें ॥ १५ ॥ पार्थेंआपलेंस्वरूपप्रगटिलें ॥ जेंवस्त्राभर-
णीमिरविलें ॥ सीतासंतापहरणतेवेळें ॥ ध्वजींयेऊनिबैसला ॥ १६ ॥ अभिनवचापठणत्कारून ॥ सोडिलेबाणापा
ठीबाण ॥ जैशाधारावर्षेघन ॥ गेलेभ्रमलोनयादव ॥ १७ ॥ अर्जुनाचादारुणमार ॥ कोणीउभानराहेसमोर ॥ रेवती-
वल्लभासमाचार ॥ श्रुतजाहलासर्वही ॥ १८ ॥ तापसीनव्हेहाश्वेतवाहन ॥ समरींनाटोपेकोणालागून ॥ रणपंडीत
सुजाण ॥ यादवसैन्यमोडिलें ॥ १९ ॥ परमकोपलाबळिभद्र ॥ सांवरीमुसळनागर ॥ मनातहांसेश्रीधर ॥ यांसतोवी
रनाटोपे ॥ २२० ॥ वीरक्रोधावलेसमस्त ॥ हरीनिवांतरूपआहेनिश्चित ॥ मगहलधरबोलत ॥ कायमनांतयोजीलसा
॥ २१ ॥ हरिह्मणेतुमचासंकल्पहोता ॥ कींसुभद्राद्यावीवीरपार्था ॥ संकर्षणह्मणेरेअच्युता ॥ सर्वहीकरणेंतुझेंहें
॥ २२ ॥ हांसोनिबोलेरुक्मिणीरमण ॥ किरीटीहूनिवरश्रेष्ठकोण ॥ सुभद्रेसारिखेंरत्न ॥ नेऊनिद्यावेंमगकोणां ॥
॥ २३ ॥ निंदोनियांराजहंस ॥ मुक्ताफळअर्पावेंकायवायसास ॥ उपेक्षूनीपरीक्षकडोळस ॥ जन्मांधाहातींरत्नद्या
वें ॥ २४ ॥ पंडितसत्पात्रदवडून ॥ शतमूर्खाद्यावेंअमोल्यदान ॥ कोंदणीपाचशोभायमान ॥ चिरवलींरोवूनव्यर्थकीं
॥ २५ ॥ सांडोनिपार्थनरवरेश ॥ कोणतालक्षणयुक्तआहेपुरुष ॥ शक्राहूनिविशेष ॥ धैर्यवीर्यजयाचें ॥ २६ ॥ भा
र्गवकिंवाभ्रुजारमण ॥ तेवीधनुर्धरपंडितसुजाण ॥ तेजस्वीजैसाचंडकीर्ण ॥ खळदंडणीकृतांत ॥ २७ ॥ सौंदर्य-
तारुण्यदेखोन ॥ पाहेखालेंमीनकेतन ॥ सर्वांहुनीसुलक्षण ॥ तृतीयनंदनपंडूचा ॥ २८ ॥ त्यावरीआनकदुंदुभिभ
गिनीसुत ॥ धीरउदारप्रतापवंत ॥ ऐसाआप्तटाकोनियांपार्थ ॥ कोणासदेतासुभद्रा ॥ २९ ॥ हांसोनिबोलेजनार्द
न ॥ त्यांसजरीभिडावेंसमरींजाऊन ॥ अनिवारतोपंडूनंदन ॥ मजलाकदानाटोपे ॥ २३० ॥ यादवभारमोडिलेसक
ळ ॥ मजतोतत्काळधरूनिनेइल ॥ मगतुह्मासंसंकटपडेल ॥ सोडवावयाचेंपुढती ॥ ३१ ॥ ऐसेंऐकतांवचन ॥ उ
गाचराहिलासंकर्षण ॥ वीरश्रीअनळगेलाविझोन ॥ हरिवचनमेघवर्षतां ॥ ३२ ॥ तववसुदेवदेवकीयेऊन ॥ क

रितीबळिरामाचेंसमाधान॥ आह्मीस्रुभद्रादिधलीपार्थालागुन॥ यथाविधीलग्नकरा॥ ३३॥ ऐसेंसमाधानके
लें॥ पार्थासीबोलाऊंपाठविलें॥ रामवसुदेवपुढेंगेले॥ मिरवतआणिलेंपार्थासी॥ ३४॥ यथासांगलग्नलाविलें
॥ उग्रसेनेभांडारफोडिलें॥ च्यारदिवसगोडजाहाले॥ अंदणदिधलेंअपार॥ ३५॥ मगबोळविलाश्वेतवाहन॥
निघेसवेंस्रुभद्राघेऊन॥ एकसंवत्सरसंपूर्ण॥ पुष्करक्षेत्रींक्रमियेला॥ ३६॥ द्वादशवर्षेंसंपूर्णभरतां॥ शक्रात्मज
आलाशक्रप्रस्था॥ धर्मभीममाद्रिस्रुता॥ ब्रह्मानंदउचंबळे॥ ३७॥ धर्मासिसाष्टांगनमून॥ आदरेंदिधलेंआलिं
गन॥ जैसेरामासभरतशत्रुघ्न॥ चतुर्दशवरुषांभेटले॥ ३८॥ मघवाआलिंगीअंगिरास्रुत॥ तेविंभीमेंहृदयींधरि
लापार्थ॥ कंठजाहालासद्गदित॥ एकएकानसोडिती॥ ३९॥ गजास्यआणिषडास्य॥ यांसआलिंगीव्योमकेश॥
तैसेनकुळसहदेवास॥ पार्थभेटेप्रीतीनें॥ २४०॥ श्रीकृष्णाजनकभगिनी॥ साष्टांगनमीपाकशासनी॥ सुभद्रास
मस्तांचेचरणी॥ मस्तकठेवीआदरें॥ ४१॥ सर्ववर्तमानसांगोन॥ स्रुभद्रेसिहातींधरून॥ पांचाळीकडेगेलाअर्जु
न॥ बोलतहांसोनकायतें॥ ४२॥ अंतरींसंतोषअद्भुत॥ वरिवरीरुसोनद्रौपदीबोलत॥ आतांइकडेयावयाचा
कार्यार्थ॥ नाहींकाहींचजाणिजे॥ ४३॥ सध्यस्तसघृतसांडून॥ जुनेंयाचेंकायकारण॥ नूतनवस्त्रकेलेंप्रावर्ण॥ रा
हिलेंजीर्णसहजची॥ ४४॥ तोंकृष्णेंचियेचरणीं॥ स्रुभद्रालागलीप्रेमेंकरुनी॥ पांचाळीनेंहृदयींधरुनी॥ आलिं
गितसप्रेमें॥ ४५॥ ह्मणेभाग्यानाहींमाझियाअंत॥ आह्मीकृष्णाभगिनीदोघीविख्यात॥ आनंदलाऐकोनिवीर
पार्थ॥ हर्षगगनींनसमावे॥ ४६॥ ब्रह्मानंदमहाराजदिनमणी॥ उदयपावलाहृदयचिद्गगनीं॥ श्रीधरसूर्यकांत
अवनी॥ तेजेंअग्निप्रगटला॥ ४७॥ तेणेंजाळिलेंदुरितकानन॥ तोंरुक्मिणीचित्तचाळकघन॥ वर्षलास्वानंद
जीवन॥ शीतळहोऊनिविरूढले॥ ४८॥ पांडवपाळकापांडुरंगा॥ ब्रह्मानंदाविजयअभंगा॥ श्रीधरवरदानिः
संगा॥ कथारसिकचालवीपुढें॥ ४९॥ स्रुरसपांडवप्रतापग्रंथ॥ आदिपर्वव्यासभारत॥ त्यांतीलसारांशयथा

र्थ॥ त्रयोदशोध्यायींकथियेला॥ ५०॥ इतिश्रीपांडवप्रतापग्रंथ॥ आदिपर्वटीकाश्रीधरकृत॥ धर्माभिषेचनयात्रींपार्थ॥ वरितचित्रांगीसुभद्रा॥ २५१॥ इतिश्रीमहाभारतटीकापांडवप्रतापादिपर्वेत्रयोदशोऽध्यायः १३ श्रीकृष्णार्पणमस्तु॥ श्रीमज्जगदीश्वरार्पणमस्तु॥ ❀॥ ❀॥ ❀॥ ❀॥

श्रीगणेशायनमः॥ इंद्रप्रस्थींपंडूसुत ॥ धर्मराजराज्यकरीत॥ चौघेबंधूबळवंत॥ सदांसादरसर्वार्थी॥१॥ तोंदूत
आलेधांवत॥धर्मासजाणवितीमात॥कींयादवभारासमवेत॥रामश्रीकृष्णपानले॥२॥ छपन्नकोटीयादववीर॥
चतुरंगदळभार॥ आलेइंद्रप्रस्थाबाहेर॥ वाद्येंअपारगर्जती॥३॥ शृंगारूनियांइंद्रप्रस्थ॥पांडवसामोरेधांवत॥
रुक्मिणीनाथरेवतीकांत॥रथाखालेंउतरती॥४॥रामआणिहृषीकेशी॥ आलिंगनदेतीधर्मासी॥ भीमार्जुनामाद्रि
सुतासी॥परमानंदेंभेटले॥५॥ उद्धवसात्यकीअक्रूर॥त्यासीभेटतीपंडुकुमर॥ कृष्णाबंधूकृष्णपुत्र॥मदनसांबा-
दिभेटले॥६॥समस्तसभेसआणून॥ बैसविलेआदरेंकरून॥मुख्यस्थानींरामकृष्ण॥केलेंपूजनयथेच्छित॥ ७॥
आदरें बोलेहृषीकेशी॥सुभद्रानिरवावीतुह्मासी॥ ह्मणूनिआलोंभेटिसी॥बोळवणसोयरिके॥८॥ अपारधन
अळंकार॥ धर्मासीवोपीरेवतीवर॥वीसशेंशामकर्णसुंदर॥पांचाप्रतीसमर्पिले॥९॥रथगजदासदासी॥नानाया
नेंसुवस्त्ररासी॥जेंनगणवेशेषासी॥ इतुकेंआंदणदिधलें॥१०॥वेंचितांनसरे आसमास॥ अक्षयदिलेद्रव्यकोश॥
खिल्लारेंअर्पिलींविशेष॥नंदिनीचीपडिपाडें॥११॥ आंदणदिधलेंबहुत॥तें अंगिकारूनपंडुसुत॥पांचहीजणस्त
वित॥श्रीरंगासीतेधवां॥१२॥महाराजतूंजगज्जीवन॥भक्तकैवारीजगन्मोहन॥ आह्मीपांडवतुझेदीन॥ थोरकरि
सीआह्मातें॥१३॥ मगरामकृष्णदळासहित॥राहविलेदिनसप्त॥ भोजनादिउपभोगबहुत॥ देऊनियांगौरवि
लें॥१४॥ देऊनिवस्त्रेंअळंकार॥यादवबोळाविलेसमग्र॥ सर्वगेलेपरिश्रीधर॥ इंद्रप्रस्थींराहिला॥१५॥ पार्थप्रा
णसखाजिवलग॥ त्याचानसाहेचिवियोग॥अर्जुनापासींश्रीरंग॥ ह्मणउनीराहिलासर्वदां॥१६॥सुभद्राजाहली
गरोदर॥लोटतांएकसंवत्सर॥ उपजलाअभिमन्युकुमर॥प्रतिअर्जुनदुसरा॥१७॥कुमरसुंदरदेखोनिपाहीं॥
धर्मेंवांटिल्यासहस्त्रगाई॥ भांडारेंफोडोनीसर्वही॥याचकतृप्तकेलेपैं॥१८॥यावरीद्रुपदराजकुमरी॥गर्भसु-
क्तिकेमाझारी॥ पंचमुक्ताफळेंनिर्धारीं॥पंचवीर्येंजालीहो॥१९॥धर्मात्मजप्रतिविंध्य॥ भीमवीर्येंश्रुतसोमशुद्ध॥

पार्थात्मजश्रुतकर्माप्रसिद्ध॥शतानिकनकुळाचा॥२०॥सहदेवाचाश्रुतसेन॥पांचावर्षांतपांचजण॥भिन्नभिन्न
उपजोन॥सुखदिधलेंसमस्तां॥२१॥जातकर्मादिषोडशप्रकार॥धौम्यपुरोहितकरीसमग्र॥साहीजणझालेथोर
केलेसंस्कारअनुक्रमें॥२२॥करविलेंवेदाध्ययन॥सकळशास्त्रींझालेनिपुण॥अर्जुनापासूनिसाहीजण॥धनुर्वे
दशिकलेपैं॥२३॥हेरणपंडितमहारथी॥पुढेंसमयींवर्णिजेती॥त्यामाजीअभिमन्याचीख्याती॥परमपुरुषार्थी
आगळा॥२४॥तोकृष्णभगिनीनंदन॥त्याकडेपाहोनीअर्जुन॥सर्वदांहीआनंदघन॥विद्यासंपूर्णबिंबिली॥२५
तोमहाराजरणपंडित॥द्रोणपर्वींवर्णिजेलपुरुषार्थ॥त्याचेपोटींपरिक्षितीसुत॥तुझापिताजन्मेजया॥२६॥ऐ-
सायापरिपुरंदरप्रस्थीं॥धर्मराजकरीविदेहस्थिती॥पूर्वींहरिश्चंद्रकींभ्रूजापती॥कींचक्रवर्तीशिबिराव॥२७॥
रुक्मांगदधर्मांगदनंदनकृपाळ॥तैसाचधर्मराजदयाळ॥आपलीकायाआपणाप्रियकेवळ॥तैसाचित्तेंहाळसर्वां
भूतीं॥२८॥आज्ञानभंगितीभूपाळ॥करभारदेतीपुष्कळ॥दुष्टदंडावयामूर्तिमंतकाळ॥सेवेंतसक्तभक्तांच्या॥२९
प्राणप्रियश्रीकृष्ण॥एकजीवएकप्राण॥मृगयाभोजनपानशयन॥एकेठायींसर्वदां॥३०॥श्रीरंगासिह्मणेपार्थवीर
ग्रीष्मऋतूजाळीफार॥यमुनातीरींकरूंविहार॥अवश्यश्रीधरह्मणतसे॥३१॥सवेंसुभद्राआणिद्रौपदी॥त्यांसवें
बहुस्त्रियांचीमांदी॥षड्रसान्नेंसमृद्धी॥आणिशिबिरेंसमागमें॥३२॥कृतांतभगिनीचेतीरीं॥वरीशोभिवंनना
नापरी॥करिकनकस्तंभसिबिरेंनिर्धारीं॥उभविलीं नेथेंहो॥३३॥सुभद्राआणिद्रुपदनंदिनी॥क्रीडतीतेथेंनौका
याभिनी॥कर्णधारस्त्रियानी॥आवलिजेनआज्ञेनें॥३४॥एककरितीगायन॥एकस्त्रियाकरितीवर्तन॥एकीक-
डेकृष्णार्जुन॥यमुनातीरींक्रीडती॥३५॥कृष्णाचरणस्पर्शेंकरून॥जळचरेंजातीउद्धरोन॥यमुनाजालीनीळवर्णी
नीळगात्रेंक्रीडतां॥३६॥नीळवर्णजगदीश्वर॥अर्जुनाचीतनूगौर॥वाटेविष्णुआणिउमावर॥यमुनातीरींक्रीड-
ती॥३७॥जलक्रीडाकरून॥बाहेरआलेउभयकृष्ण॥तोंतमहाटकवर्ण॥पुरुषएकपातला॥३८॥स्मश्रुकेशपिंग

टवर्ण॥ वेष्टिलेंसे कृष्णप्रावर्ण॥ खदिरांगारतैसेनयन॥ यज्ञोपवीततेजस्वी॥ ३९॥ ऐसायेऊनिब्राह्मण॥ उभयकृ
ष्णांप्रार्थीकरजोडून॥ ह्मणेंमक्षुधितपूर्ण॥ खांडववनभोजनादिजे॥ ४०॥ मीप्रत्यक्षहुताशन॥ रोगेंजाहालोंअ
तिक्षीण॥ देतांखांडववनभोजन॥ रोगमोचनहोईल॥ ४१॥ स्वशक्तिमीजातांतेथ॥ मघवावरीमेघवर्षत॥ माझेंका
हींनचलेसत्य॥ बळक्षीणहोयमी॥ ४२॥ तुह्मींसोडूनअस्त्रजाळ॥ निवारामेघधारासकळ॥ त्यावरीतक्षकविशाळ
शतपुत्रेंसीराहातसे॥ ४३॥ तक्षकशक्राचामित्र॥ ह्मणोनिराहातोनिरंतर॥ ऐसेंबोलतांवैश्वानर॥ कृष्णार्जुनआ
वेशती॥ ४४॥ जन्मेजयह्मणेवैशंपायना॥ कांरोगेलाहिमूर्धा॥ येरूह्मणेरायासज्ञाना॥ परिसगोष्टीनावेकते॥
४५॥ श्वेतकेतराजापवित्र॥ तेणेंमांडिलेंदीर्घसत्र॥ द्वादशवर्षेंविचित्र॥ द्रव्यअपारवेंचिलें॥ ४६॥ द्वादशवर्षेंकरितां
यज्ञ॥ श्रमपावलेब्राह्मण॥ धूम्रेंआरक्तनयन॥ अश्रुस्रवतीसर्वदां॥ ४७॥ विप्रश्रमलेफार॥ रायेंराहविलाअध्वर
लोटतांद्वादशसंवत्सर॥ पुढतीयागआरंभिला॥ ४८॥ बोलावीपहिल्याऋत्विजाप्रती॥ तेश्रमलेनयेतीपुढती॥ मग
प्रसन्नकरूनिउमापती॥ ऋत्विजमागेरावतो॥ ४९॥ आपलावंशदुर्वासमुनी॥ शिवपाठवीयागालागुनी॥ तेणेंअ
नेकऋषिमेळउनी॥ यागनेलासिद्धीतें॥ ५०॥ हस्तीशुंडेप्रमाण॥ वसुधाराचालिलीसंपूर्ण॥ द्वादशवर्षेंखंडसंपूर्ण
अहोरात्रनसेची॥ ५१॥ द्वादशवर्षेंपर्यंत॥ होमद्रव्यभक्षिलेंअद्भुत॥ पूर्णाहुतीहोतांश्वेतकेत॥ परमसुखपावला
॥ ५२॥ दक्षिणादेऊनिबहुवस॥ संतोषविलादुर्वास॥ परिरागेंयज्ञपुरुष॥ क्षीणअत्यंतजाहला॥ ५३॥ कासाविस
वैश्वानर॥ हव्यवदनीअरुचीफार॥ तवअव्हेरिलेसमग्र॥ अवदानघेकोठेंही॥ ५४॥ स्वाहास्वधेचापती॥ कोणीय
ज्ञींनेघेचिआहुती॥ पंडुवर्णजाहालीकांती॥ क्षीणशक्तीसर्वदां॥ ५५॥ खांडवभक्षितांतत्काळ॥ ममरोगजाईल
समूळ॥ परितेथेंमेघवर्षतजळ॥ शक्रआज्ञेंकरूनियां॥ ५६॥ तक्षकपुत्रेंसीउद्भट॥ शिरींघेऊनिसहस्रजळघट॥
सिंपीतेणेंहव्यवाट॥ अपमानेंमावळतसे॥ ५७॥ ब्रह्मदेवासगेलाशरण॥ तोह्मणेअवतारकृष्णार्जुन॥ तेतुजदेती

लखांडवदान॥ मेघपुरुषार्थेंवारुनी॥ ५८॥ ह्मणोनियमुनातीरींयेउन॥ चित्रभानुपार्थकृष्णार्जुन॥ ह्मणेजग
न्निवासमनमोहन॥ रोगहरणमाझेकरीं॥ ५९॥ ब्रह्मानंदावनमाळी॥ मीतवमुखींज्वाळमाळी॥ माझारोगयेवेळीं
दूरकरींदयाळा॥ ६०॥ मगबोलेवीरपार्थ॥ तुजखांडववनदेईनयथार्थ॥ चालोंनेदीइंद्रसामर्थ्य॥ परिएकन्यूनये
थेंअसे॥ ६१॥ अस्त्रेंमजपासींविशेष॥ परिनाहींरथआणिधनुष्य॥ ऐसेंऐकतांयज्ञपुरुष॥ प्रसन्नजाहालाअर्जुना
॥ ६२॥ यमुनाजळींबुडीदेउन॥ पाताळींगेलाहुताशन॥ वरुणाप्रतीप्रार्थुन॥ दिव्यवस्तूघेतल्या॥ ६३॥ जैसेंशास्त्र
ज्ञसंवादिती॥ शब्दभालानखंडेकल्पांतीं॥ कींग्रंथकविचेशब्दकिती॥ नाहींगणतीनयासीं॥ ६४॥ दैत्यवधावया
लागुन॥ पूर्वींविधिनेठेविल्यानिर्मुन॥ त्याघेउनीहुताशन॥ पार्थाजवळीपातला॥ ६५॥ गांडीवचापदेतहस्तीं॥ जा
चीकल्पांतसूर्यासमानदीप्ती॥ अक्षयभाताबाणनसरती॥ सहस्त्रावधीसोडिल्या॥ ६६॥ समरींजेंजेंअस्त्रकल्पा
वें॥ तेंतेंतत्कालचिप्राप्तसवें॥ बाणसमूहनमोजवे॥ सहस्त्रवक्त्रगणितांही॥ ६७॥ सर्वेंचिवोपिलाविजयरथ॥ ध्व
जींबैसलाअंजनीसुत॥ जोभाळलोचनउमाकांत॥ अर्जुनेंपूर्वींचप्रार्थिला॥ ६८॥ उच्चैश्रवासमान॥ च्यारिवारू
क्षीरवर्ण॥ कींनवनीताचेघडिलेपूर्ण॥ कींकर्पूरचूर्णेंउटियेले॥ ६९ ॥ कींजान्हवीतोयआटूनघडिले॥ कींचंद्रकि
र्णांचेवोतिले॥ कींक्षीरसागरेंपाठविले॥ हृदयाशाळेमधूनी॥ ७०॥ चंद्रसूर्याऐसींचक्रें॥ रथाचींजडितचित्रविचि
त्रें॥ वारूहिंसतीअतिगजरें॥ मेघगर्जनेसारिखे॥ ७१॥ साक्षांततोत्रिनेत्र॥ ध्वजींबैसलासेवानर॥ ज्याचाऐकतां
भुभःकार॥ पळयवाटेशत्रूसीं॥ ७२॥ चक्रआणिगदा॥ अग्निदेततेव्हांमुकुंदा॥ अर्जुनाचेभाग्याचीमर्यादा॥
ब्रह्मादिकानव्हेची॥ ७३॥ पार्थेंनमिलाहुताशन॥ विजयरथाकेलीप्रदक्षण॥ सारथीजाहालानारायण॥ बैसे
अर्जुनमुख्यासनी॥ ७४॥ उतावेळजावयाकृष्णार्जुन॥ त्याचरथींबैसलाअग्न॥ चत्वारःशृंगत्रिचरण॥ सप्तपाणी
प्रत्यक्ष॥ ७५॥ खांडववनाजवळीयेऊनलवरां॥ ह्मणतीस्वामीवैश्वानरा॥ आर्तारोगहरणकरा॥ स्वइच्छावनभक्ष

नी॥ ७६॥ ऐसीआज्ञांहोतांनेक्षणीं॥ज्वाळधडकलेंचहूंकडोनी॥महाधूम्रभरलागगनीं॥पक्षीपळतीअसं
ख्यात॥७७॥जैसाकनकाद्रिचागोळ॥तैसेगगनीचालिलेज्वाळ॥ अग्निह्मणेवनसमूळ॥भक्षितांतृप्तहोईन
मी॥७८॥ अर्जुनह्मणेआळससोडून॥स्वइच्छाकरीवनभक्षण॥पार्थेंबाणींभरोनिगगन॥मंडपदृढपैंकेला
॥७९॥ कृष्णाचक्रभोंवतेंफिरन॥ईकडेअग्निचेतलाअद्भुत॥वनचरेंपक्षीअहळत॥तेहीभक्षितकृशान॥८०
व्याघ्रवृकजंबूकशशिक॥रीसवानरसूकरभयानक॥कस्तूरीमृगतरसचितळपाळेदेख॥भाजोनिमरतीएकस
रें॥८१॥ करीकरिणीसिंहशार्दूल॥गंडभैरवपक्षीसकळ॥भोंवताबाणाचाआवर्त्तबळ॥ठावनदिसेपळाव-
या॥८२॥ अठराभारवनस्पती॥असंख्यवृक्षविराजति॥नामेंसांगतांयथामती॥ग्रंथफारपसरेल॥८३॥विहं
गमनवलक्षजाती॥चतुष्पदतीसलक्षगणती॥अकरालक्षकीटकनिश्चिती॥ज्वाळेवतीपडियेले॥८४॥खांड
ववनजळतांतेवेळे॥सप्तहीसागरतापले॥स्वर्गासिज्वाळसंघटले॥अहळोंलागलेलोकतेव्हां॥८५॥अतिख
रेंजाऊनिनिर्जरेंद्र॥प्रळयमेघप्रेरीसत्वर॥अर्जुनेंसोडोनिवायव्यास्त्र॥बलाहकविदारिला॥८६॥विपरीतका
ळींजायभाग्य॥तैसेवितळोनगेलेमेघ॥इंद्रवज्रटाकीसवेग॥त्यासहीमार्गफुटेना॥८७॥शिळाधारींमेघवर्ष
ती॥विद्युल्लताअसंख्यपडती॥मगह्मणेजगत्पती॥गोकुळींऐसेंचिजाहालें॥८८॥मगम्याउचलोनिगोवर्द्ध
न॥रक्षिलेंगोकुळींचेजन॥पार्थह्मणेआतांकोण॥तुजवीणरक्षिताअसे॥८९॥ अमरनाथसाह्यार्थी॥धांव
तीराक्षसांच्यावळथा॥समोरयेतांपार्था॥संहारितएकबाणें॥ ९०॥ दैत्यराक्षसगंधर्वयक्ष॥धांवतीवेगेंलक्षा
चेलक्ष॥रणपंडितअर्जुनदक्ष॥संहारितसर्वही॥९१॥ अनिवारबाणांचीवृष्टी॥चक्रफिरवीकृष्णजगजेठी
॥देवेंद्रजाहालाहिंपुटी॥परिकिरीटीनावरे॥९२॥ हरीचेंसहस्रधारचक्र॥दैत्यचक्रेंसंहारीअपार॥कोट्यान
कोटीशिरभार॥पृथ्वीवरीपडियेले॥९३॥ तेतीसकोटीमिळोनिदेव॥करितीशरधारावर्षाव॥धांवलेदिग्पा

ळसर्व ॥ आठ ह्रीशस्त्रें घेउनी ॥ ९४ ॥ एकादश मित्र द्वादश मित्र ॥ अश्विनौ देव अष्टवसु रूपवित्र ॥ सहपुत्रेंसी धांवे
त्रिनेत्र ॥ परि पार्थश्रीधर नाटोपती ॥ ९५ ॥ तों गर्जत आकाशवाणी ॥ सावध होई वज्रपाणी ॥ मनी पाहे विचारूनी
॥ कृष्णार्जुन कोण हे ॥ ९६ ॥ तूं जय पावसी यथार्थ ॥ मग माघारा आला अमरनाथ ॥ अग्नि सह्मणती कृष्ण पार्थी
साव चित्त भोजन करी ॥ ९७ ॥ नाना श्वापदें भक्षून ॥ बहुत वल्लीरस प्राशून ॥ दिव्य शरीर जाहाला अग्न ॥ रोग नि
रशन जाहले ॥ ९८ ॥ मरुचा भ्राता मयासुर ॥ जो रावणाचा होय श्वशुर ॥ तो पळत होता बाहेर ॥ तंव कृष्णें चक्र स
रसाविलें ॥ ९९ ॥ पावकभयें आक्रंदोन ॥ नरनारायणा आला शरण ॥ पार्थ ह्मणे तुजलागुन ॥ न मारी मी सर्वथा ॥
॥ १०० ॥ अर्जुनें अभय देतां ॥ चक्र आवरी कमलोद्भवपिता ॥ मयासुर चतुर जाणता ॥ विश्वकर्मा दैत्यांत ॥ १ ॥ ज्या
चीचातुर्यकळा अपूर्व ॥ सभापर्वी सांगिजेल सर्व ॥ हें जाणोनि पार्थ रमाधव ॥ रक्षिते जाहाले साक्षेपें ॥ २ ॥ सुरेंद्र
मित्र तक्षक ॥ वनीं नसतां लागला पावक ॥ एक पुत्र आणि भार्या देख ॥ वनचक्रीं कोंडली ॥ ३ ॥ पावकचक्रामधून
॥ बाहेर जाऊं नेदी अर्जुन ॥ पशुपक्षी निघतां छेदुन ॥ बाणें घाली माघारा ॥ ४ ॥ कृष्णाचक्र अद्भुत ॥ भोंवती घर
टी घालित ॥ अग्नि चहूंकडे जाळित ॥ तृणमात्र राहों नेदी ॥ ५ ॥ एक वृक्ष अथवा वल्ली ॥ राहों नेदी ज्वाळमाळी ॥
तक्षकभार्या ते वेळीं ॥ पुत्र घेउनी करी शोक ॥ ६ ॥ नव्याण्णव पुत्र घेऊन ॥ तक्षक गेला येथोन ॥ मग ह्मणे पुत्रा तु
जलागुन ॥ मुखाकडोन गिळीन मी ॥ ७ ॥ मग तिणें पसरूनि वदन ॥ पुत्र गिळिला मुखाकडून ॥ सेवटीं पुच्छ ग्रा
सून ॥ गगनमार्गें उडाली ॥ ८ ॥ निघाली वनाबाहेर ॥ पार्थें सोडिला सतेज शर ॥ छेदिलें सर्पिणीचें शिर ॥ पुच्छ तुट
लें पुत्राचें ॥ ९ ॥ माता निमाली ते वेळां ॥ तक्षकपुत्र पळोनि गेला ॥ कुरुक्षेत्रास पावला ॥ तेथें भेटला तक्षक ॥ ११० ॥
सांगे पित्यास वृतांत ॥ माता निमाली तेथें वनांत ॥ माझें पुच्छ तुटलें समस्त ॥ प्राण घेऊनि येथें आलों ॥ ११ ॥ भा
र्येलागीं अती शोक ॥ करी तरडत सेतक्षक ॥ ह्मणे पार्थाच्या वंशीं देख ॥ मी भक्षीन एकांतें ॥ १२ ॥ असो इकडे अ-

घ्न॥जाळीतसमस्तहीवन॥अपारश्वापदेंभक्षून॥वल्लीरसप्राशिन॥१३॥स्तवनकरीकृशान॥पूर्वींनृपानीकेले
बहुतयज्ञ॥परिमीतृप्तनाहींहुताशन॥आजिजाहालोंमीअर्जुना॥१४॥वसतोंशिवाचियेतृतीयनयनीं॥वस्ति
माझीसहस्त्रवदनी॥कल्पांतींबैसेंसर्वभक्षूनी॥परितृप्तमीआजिजाहालों॥१५॥माझाआशीर्वादयावरी॥श
त्रूनिवटितूंधरत्री॥राज्यकरींएकछत्री॥आशिर्वादेंमाझिया॥१६॥नक्षकपुत्रमयासूर॥दोघेवांचलेसाचार॥
ऋषिआत्मजचौघेनिर्धार॥सारंगपक्षीवांचले॥१७॥तरीमंदपाळनामेंऋषी॥नपोतेजेंगेलास्वर्गासी॥पाव
ताजाहालापितृलोकासी॥मानत्यासीकोणीनेंदी॥१८॥नेदितदिव्यभोगकिंचित॥मगत्यासदेवह्मणत॥तुझेंपो
टींनाहींसूत॥कष्टप्राप्तत्याकरितां॥१९॥पुत्रहीनजोप्राणी॥त्यासयेथेंमाननेदिकोणी॥तरीतूंभलतियेयोनीं॥
पुत्रजन्मवीमंदपाळा॥१२०॥मगतोमंदपाळसुनी॥ह्मणेफारसंततीकोणेयोनी॥उतरलाखांडववनीं॥पक्षीनय
नीविलोकिती॥२१॥मगजातीचीसारंगपक्षिणी॥जरितानामेंकेलीपत्नी॥आत्मवीर्यनिक्षेपुनी॥च्यारपुत्रउप
जविले॥२२॥शृंककमित्रस्तंभद्रोण॥चहूंपुत्रांचेंनामकर्ण॥पुत्रासमवेतनीडांतजाण॥जरिताठेविलीमंदपाळें॥
॥२३॥लपितानामेंपक्षिण॥मंदपाळाचीस्त्रीदुसरापूर्ण॥आतांत्तिचेभेटीजातांजाण॥पुढेंभविष्यसमजलें॥
॥२४॥पावकजाळीलवना॥ह्मणोनिप्रार्थीहुताशना॥माझेचवघेपुत्रपांचवीअंगना॥रक्षीत्यांसवैश्वानरा॥
॥२५॥अवस्यह्मणेआनळ॥भाष्यदिधलेंतत्काळ॥ऋषिगेलामंदपाळ॥मागेंसकळजळेवन॥२६॥पक्षहीन
कोमळबाळें॥जरिताह्मणेतयेवेळें॥कनिष्ठभार्येच्याआसक्तीमुळें॥मंदपाळगेलातेथें॥२७॥जरिताह्मणेनारा
यणा॥रक्षकहोंईआमच्याप्राणा॥करुणासिंधोजगज्जीवना॥सर्वांतर्व्यापका॥२८॥बाळकह्मणतीहोमाते॥
उड्डाणकरीआकाशपंथें॥वांचवीआपल्याप्राणातें॥मोहोआमुचासांडोनी॥२९॥आह्मींआहोंबळहीन॥तूं
वांचवीआपुलाप्राण॥मंदपाळापासींजाऊन॥आणीकपुत्रउपजवी॥१३०॥पक्षिणीकरीरुदन॥तुह्माहुता

शनींवोपुन॥ ब्यांकायकरावेंवांचोन॥ देईनमाणतुह्मासवें॥ ३१॥ आनांआलादेहांत॥ बाळहोआठवारमाकांत॥ हेदीनदयाळवैकुंठनाथ॥ शरणांगतवत्सलातूं॥ ३२॥ तूंराहासीक्षीरसागरीं॥ कींअससीबळीचेद्वारीं॥ तेथूनतूंआपलाहस्तपसरीं॥ रक्षींआह्मासीदयाळा॥ ३३॥ वैकुंठपुरविलासा॥ गोकुळपाळकाजगन्निवासा॥ अग्निमहागिळोनिजगदीशा॥ गाईगोपाळरक्षिले॥ ३४॥ पांडवरक्षिलेलाक्षासदनीं॥ आह्मीदीनेंतुझीचक्रपाणीं॥ धांवधांवयेक्षणीं॥ ब्रह्मानंदाकरुणाब्धी॥ ३५॥ यावरीजरित्याबाळासह्मणात॥ मूषकबीळआहेभूमित॥ तुह्मीतेथेंराहागुप्त॥ मृत्तिकाद्वारींलावीनमी॥ ३६॥ बाळह्मणातीतेथेंराहणेंनिंद्य॥ भक्षीलएकादेंश्वापद॥ अग्नींतदेहदेविनांसिद्ध॥ स्वर्गधामपाविजे॥ ३७॥ तोंनिकटचालिलेज्वाळ॥ बाळेंअत्यंतसकोमळ॥ अग्नीचेंस्तवननिर्मळ॥ करितेजाहालेनेधवां॥ ३८॥ जयजयमहाराजहुताशन॥ तीनस्वरूपेंतूंएकअग्न॥ आदिमध्यअंतपूर्ण॥ तुजवांचोनिनव्हेचि॥ ३९॥ सकळांचेजठरींराहुनी॥ तूंचिजिवविशीसर्वप्राणी॥ सकळदेवतेंतृप्ततुझेनी॥ द्विवदनासप्तहस्ता॥ ४०॥ हारा वयान मसंपूर्ण॥ तूंचिझालासि भग्निकारण॥ ॥ मेघजालेतुजपासोन॥ विश्वसंपूर्णरक्षावया॥ ४१॥ सोळाजणेंतुझेपूजकजाण॥ अष्टाविंशतिपात्रेंकरून॥ तुझेंकरितीअर्चन॥ द्विजांसिअग्नीपूज्यतूं॥ ४२॥ तुवांरक्षिलाहनुमंत॥ प्रल्हादरक्षिलाज्वाळेंत॥ गोकुळरक्षिलेंदावाग्निंत॥ जोहरींपांडवरक्षिले॥ ४३॥ ऐकतांपक्षियांचेस्तवन॥ प्रसन्नजाहलाहुताशन॥ ह्मणेंम्यांरक्षिलेतुमचेप्राण॥ चिंतासोडूनद्याआतां॥ ४४॥ तुमचामंदपाळपिता॥ मजप्रार्थूनगेलाहोता॥ इच्छितकांहींमागाआतां॥ तेंतत्वतांदेईनमी॥ ४५॥ पक्षीह्मणतीयेऊनिमार्जार॥ आह्मामारावयाजपतीफार॥ त्यापासूनरक्षणार॥ तुजवांचोनिकोणअसे॥ ४६॥ ऐसेंऐकतांज्वाळमाळी॥ विडाळकेंजाळूनतत्काळीं॥ परमप्रतापीत्यास्थळीं॥ ऋषिबाळाशांतविंत॥ ४७॥ जरितांफरांतरुदना॥ ह्मणेस्वामीयज्ञनारायणा॥ दीनदयाळाहुताशना॥ पुत्रदानतुवांदिल्हें॥ ४८॥ लपितेसह्मणेमंद

पाळ ॥ खांडववनजळालेंसकळ ॥ तिजसहीतऋषितत्काळ ॥ जरितेजवळीपातला ॥ ४९ ॥ पाठमोरीबैसलीजरिता ॥ बाळेंनबोलतीबोलवितां ॥ स्फुंदस्फुंदेंरडेवनिता ॥ पहावया आतांआलासी ॥ ५० ॥ संकटींसांडोनिआह्मासी ॥ नूतनस्त्रियेसीभूललासी ॥ मंदपाळह्मणेअग्निसी ॥ प्रार्थूनियांगेलों होतों ॥ ५१ ॥ शांतउनीस्त्रीबाळका ॥ मंदपाळनेतवनाआणिका ॥ ऐसेपक्षीवांचलेतेथेंदेखा ॥ कुरुनायकाजन्मेजया ॥ ५२ ॥ असोदिव्यविमानीबैसोन ॥ पातलातेथेंपाकशासन ॥ आलिंगोनिकृष्णार्जुन ॥ करीस्तवनदोघांचें ॥ ५३ ॥ अचाटकेलापुरुषार्थ ॥ यज्ञझालारोगरहित ॥ यज्ञसुखेंसमस्त ॥ देवआह्मींसुखीअसों ॥ ५४ ॥ मजसेवासांगावीकाहीं ॥ मगपार्थबोलेतेसमयीं ॥ ह्मणेदिव्यशस्त्रभारदेईं ॥ कारणपाहींपुढेंअसे ॥ ५५ ॥ मगबोलेतोसुरेश ॥ प्रसन्नहोईलव्योमकेश ॥ तेव्हांदिव्यशस्त्रेंबहुवस ॥ वोपीलतुजनिर्धारें ॥ ५६ ॥ ऐसेंबोलोनिशक्रनंदन ॥ कृष्णासत्रिवारकरीप्रदक्षिण ॥ विमानींबैसलाआज्ञाघेऊन ॥ अमरावतीयेपातला ॥ ५७ ॥ संपूर्णपंचदशादिन ॥ अग्निनेंभक्षिलेंखांडववन ॥ परमतृप्तहोऊन ॥ आज्ञाघेऊनतोगेला ॥ ५८ ॥ गांडीवचापअक्षयतूणीर ॥ विजयध्वजसुंदर ॥ घेऊनियांगदाचक्र ॥ श्रीकरधरसंतोषला ॥ ५९ ॥ सवेंमयासुरासघेऊन ॥ निघालेवेगेंकृष्णार्जुन ॥ यमुनातीरींयेऊन ॥ पूर्वस्थळींराहिले ॥ ६० ॥ मारुतीजळक्रीडाकरूनिबहुत ॥ द्रौपदीसुभद्रेसहित ॥ इंद्रप्रस्थालरेंयेत ॥ वंदितधर्मकुंतीतें ॥ ६१ ॥ सांगीतलासर्ववृत्तांत ॥ धर्मभीमसंतोषत ॥ मयासुरासआदरेंबहुत ॥ पांडवकरूनिराहविती ॥ ६२ ॥ धर्मह्मणेयादवेंद्रा ॥ भक्तमानसचकोरचंद्रा ॥ दीनदयाळकरुणासमुद्रा ॥ सकळकर्त्ताकरवितातूं ॥ ६३ ॥ तुजकरितांअर्जुनासजय ॥ तुझेकृपेंप्रतापशौर्य ॥ धैर्यधारणाकीर्तीपाहें ॥ तुजकरितांश्रीरंगा ॥ ६४ ॥ एकेगृहींकृष्णार्जुन ॥ एकेशय्येसदाशयन ॥ एकेठायींभोजन ॥ सदागमनएकेरथीं ॥ ६५ ॥ दोघांचाएकविचार ॥ मेहुणेपणेंविनोदसाचार ॥ कृष्णावियोगअणुमात्र ॥ अर्जुनासीसोसेना ॥ ६६ ॥ अर्जुनाचावियोग ॥ नेणेंचिकदाश्रीरंग ॥ नरनारायणअभंग ॥ अवतरलेपृथ्वीवरी ॥ ६७ ॥ आणिकब

हुतराजकन्या॥ पांडवींकेल्याभोगांगना॥ प्रभावतीनामललना॥ नकुळेंजाऊनिवरियेली॥ ६८॥ परीसर्वांतश्रेष्ठ-
द्रुपदनंदिनी॥ कींसुभद्राश्रीकृष्णभगिनी॥ सुभद्रेहूनियाज्ञसेनी॥ आवडेमनींश्रीरंगा॥ ६९॥ येथोनिआदिपर्वस
माप्त॥ पुढेंसभापर्वरसअद्भुत॥ चवदाअध्यायपर्यंत॥ आदिपर्वजाहालें॥ ७०॥ शास्त्रामाजीवेदांत॥ कींदेवामाजी
वैकुंठनाथ॥ आनंदवनक्षेत्रांत॥ पर्वांतआदिपर्वतैसें॥ ७१॥ शस्त्रामाजीसुदर्शन॥ नवग्रहांतसूर्यनारायण॥ कीं-
विष्णुक्षेत्रांतजाण॥ पंढरीपावनजैसीकां॥ ७२॥ तैसेंपर्वांतआदिपर्व॥ नवरसिकअतिअपूर्व॥ महाराजव्यासदेव॥
तेणेंपूर्वींकथियेलें॥ ७३॥ व्यासभारताचेअध्यायविशेष॥ दोनशतांआगळतिस॥ अवघेमिळोनिश्लोकसुरस॥
कितीमर्यादाऐकातें॥ ७४॥ अठरासहस्रनवशत॥ चौऱ्याशींश्लोकविशेषपरिमित॥ इतकीगणनानेमस्त॥ वैशंपा-
यनेंकेलाअसे॥ ७५॥ इतुक्याचेंमथ्थांतसुरस॥ श्रीधरेंअध्यायकेलेचतुर्दश॥ पंढरीनगरींविशेष॥ आदिपर्वसंपवि
लें॥ ७६॥ पुढेंसभापर्वरसगहन॥ जेभक्तिप्रेमवृक्षउद्यान॥ तेथिंचेछायेसपंडितजन॥ सर्वदाहीबैसोतकां॥ ७७॥
ब्रह्मानंदस्वामीपिता॥ सावित्रीनामेंमाझीमाता॥ श्रीधरेंवंदोनिउभयतां॥ आदिपर्वसंपविलें॥ ७८॥ पुंडरीकवर-
दापांडुरंगा॥ रुक्मिणीहृदयारविंदभृंगा॥ श्रीधरवरदाअभंगा॥ ब्रह्मानंदअक्षयतो॥ ७९॥ सुरसपांडवप्रतापग्रं
थ॥ आदिपर्वव्यासभारत॥ त्यांतीलसारांशयथार्थ॥ चवदावेअध्यायींकथियेला॥ १८०॥ इतिश्रीपांडवप्रताप
ग्रंथ॥ आदिपर्वटीकाश्रीधरकृत॥ जलक्रीडाखांडवदहनसमस्त॥ आदिपर्वसंपविलें॥ १८१॥ इतिश्रीमहाभा
रतटीकापांडवप्रतापादिपर्वेचतुर्दशोऽध्यायः १४ ॥श्रीकृष्णार्पणमस्तु॥ ॥ ॥

अध्याय १८



श्रीगणेशायनमः॥ जयजयसद्गुरूब्रह्मानंदा॥पांडुरंगापुंडरीकवरदा॥विद्वज्जनहृत्पद्ममिलिंदा॥आनंदकंदा
जगत्पते॥१॥निकटभीमातटविहारा॥आदिपुरुषादिगंबरा॥सनकसनंदनचित्तपंजरकीरा॥निर्विकारानिर्द्वंद्वा २
आनंदकंदा अध्वरपाळका॥अनंतवेषाआर्त्तनायका॥अनादिसिद्धासुखदायका॥खगवरकेतनाहृषीकेशा॥३॥मन्म
थजनकामनोहरा॥सौख्यसिंधूनीलगात्रा॥सुहास्यवदनाशतपत्रनेत्रा॥विचित्रलीळादाविसी॥४॥गोपीमानस
राजहंसा॥स्वानंदक्षीरसागरविलासा॥पूतनाप्राणशोका अविनाशा॥वर्णितांशेषा अगंम्य॥५॥कंसच्याणूरप्राण
हरणा॥मंदारोद्धारकागोवर्द्धनोद्धारणा॥कर्ममोचकाकाळियामर्दना॥पांडवपाळकापंढरीशा॥६॥दशावतारचरि
त्रचाळका॥गोपीमानसआल्हादकारका॥तुझीलीळाविश्वव्यापका॥बोलवींकथायेश्रुती॥७॥पांडवप्रतापग्रंथ
सुरस॥सभापर्वबोलिले व्यास॥सूत्रधारकतूंहृषीकेश॥कथासुरसचालवी॥८॥मागेंसंपलें आदिपर्व॥पुढेंसभाप
र्वअपूर्व॥चातुर्याचाअभिनव॥जलार्णवभरलाहा॥९॥नवरसाचेंभांडार॥रणशूरआणिनृपवर॥त्यासवीररस
अपार॥असंभाव्ययेथेंअसे॥१०॥जेपंडीतवेदविदुष॥त्यांसवेदांचाचसारांश॥समाधिस्फुरखपरमहंस॥श्रवणेंभो-
गितीयेथेंची॥११॥भक्तांसदाटेप्रेमरस॥विलासियाशृंगारस्फुरस॥युक्तिवंनाबुद्धिविशेष॥येथेंप्रगटेश्रवणेंची
॥१२॥भक्तमुमुक्षुसाधकसंत॥त्यांसविश्रांतीयेथेंअद्भुत॥एवंनवहीरससमस्त॥विराजितयेथेंची॥१३॥व्यास
भारतसुवर्णसुंदर॥त्याचेप्राकृतहेअळंकार॥लेवोतपंडीतचतुर॥निर्मत्सरहृदयजाचें॥१४॥अक्षरप्रबंधस्फुर
स॥कर्त्तास्वामीवेदव्यास॥लिहिणारतेथेंगणेश॥अतिविशेषरसपाहा॥१५॥त्यांनीलसारांशसाचार॥वटबीजव
तूअनुमात्र॥ब्रह्मानंदश्रीधर॥कथासारवर्णित॥१६॥भारतरत्नाचापर्वत॥भाग्येंदेखिलापरमाद्भुत॥तुचलवेचि-
समस्त॥पाहेंतटस्थउगाची॥१७॥मगत्यांनीलरत्नेंवरिष्ठ॥उचलेंऐशीबांधिलीमोट॥ग्रंथवादवितांअचाट॥मा
नितीलवांटपंडितपैं॥१८॥संकोचितबोलतांसाचार॥हेंहीनमानीचतुर॥अर्थरसकथासार॥साहित्यरसेंबोला

वी॥१९॥शौनकादिकादिऋषिपंक्ती॥नैमिषारण्यीं एकांतीं॥सूतमुखें श्रवणकरिती॥ब्रह्मानंदें सर्वदा॥२०॥तें
चि जन्मेजय करी श्रवण॥वक्ता निपुण वैशंपायन॥ह्मणे नृपती सावधान॥उघडी कान सर्वांगाचे॥२१॥आदिपर्व सं
पतां पूर्ण॥सांगीतलें खांडवदहन॥मयदैत्यास प्राणदान॥देऊनि सोडिला कृष्णपार्थें॥२२॥तो उपकारें दाटोन॥
प्रीतीनें स्तविले कृष्णार्जुन॥ह्मणे मी आहें विद्याप्रवीण॥होईन उत्तीर्ण काहीं एक॥२३॥मयास ह्मणे फाल्गुन॥कृष्णा
र्जुनें दिधलें प्राणदान॥सर्वांपासीं करिसी वर्णन॥नृप्त इतुकेन आह्मां असों॥२४॥तरीं सखया जाईं निजमंदिरा॥सुख
देईं दारापुत्रा॥स्नेह वाढवीं पवित्रा॥क्षणक्षणा भेटोनी॥२५॥उपभोगें काया वाढत॥वण व्यालागीं वात लागत॥शु
क्लपक्षीं रोहिणीकांत॥कळा वाढत ज्यापरी॥२६॥धरितां शुचिनेम असुप॥विशेष वाढे जैसें तप॥सत्समागमें वाढे रो
प॥दयेचें जैसें सर्वदा॥२७॥पुण्य वाढे करितां दान॥पराक्रमें प्रताप वाढे पूर्ण॥अत्यादर धरितां अनुदिन॥मैत्री वाढे
अपार॥२८॥मग बोले जगन्मोहन॥तूं शिल्पिशास्त्रीं परमप्रवीण॥तरी सभा एक निर्मून॥करीं अर्पण धर्मातें २९
तरि मयासुरा तूं मित्र॥करूं भाविसी उपकार॥तरी मी सांगेन इंदिरावर॥तेंचि सिद्धी पाववीं॥३०॥ऐसें बोलतां जग
दीश्वर॥मयासुरें केला नमस्कार॥ह्मणे माझे मनींचा आदर॥जाणोनि आज्ञा दीधली॥३१॥जगन्निवासा पुरु-
षोत्तमा॥दैत्यामाजी विश्वकर्मा॥सभा रचीन जिची सीमा॥त्रिभुवनांत असेना॥३२॥नलगतां मृत्तिका पाषाण॥
मणिमय रचीन सभास्थान॥शचिवराचें ही भुलेल मन॥स्वर्ग टाकून तेथें बसावें॥३३॥ऐसी रचीन दिव्य सभा॥त्रि
भुवनींची आणीन शोभा॥इतुकी सामग्री पद्मनाभा॥कोठून आणीन ऐकातें॥३४॥पूर्वीं क्षीरोदमंथनीं रमाधव॥नि
र्मूळ करितां दैत्य सर्व॥वृषपर्वा दानवराव॥तेणें संपत्ती लपविल्या॥३५॥मेरूचे उत्तरेसी अपार॥भरला आहे बिंदु
सरोवर॥पर्वत जे थें मयनाक थोर॥रत्नांचा पार नाहीं तेथें॥३६॥यक्षराक्षस रा घेऊन सांगातें॥क्षणांत सामग्री आ
णीन येथें॥वाहतां वर्षें शतानुशतें॥सामग्री ते सरेना॥३७॥जेथें गांबुन दांचे तुळवट॥जेथें हिऱ्याचे खांब सधट

आणिकवस्तुतेथेंवरिष्ट॥दोनअसतीआणीनत्या॥३८॥चूर्णहोतीगिरीसकळ॥ऐसीगदातेथेंआहेसबळ॥जेकन
कोदकेंरेखिलीविशाळ॥दिव्यरत्नबिंदुवरी॥३९॥मुष्टिमाजिधरितेठाईं॥दिव्यरत्नेंजडिलींपाहीं॥तेभीमासदेईनस
र्वही॥शत्रुदळेंनिवटावया॥४०॥शंखएकदेवदत्त॥जाच्यानादेंशत्रुसमस्त॥ऐकतांहोतीभयाभित॥दुंदुभितेंत्रिभु
वन॥४१॥तोदिव्यशंखआणुन॥पार्थाप्रतीदेइन॥त्यावरीमयआज्ञाघेऊन॥गेलाबिंदुसरोवरा॥ ४२ ॥समस्तां
प्रतीपुसोन॥द्वारकेसिगेलेजगज्जीवन॥दिव्यस्यंदनावरीबैसोन॥दारुकसारथीविराजे॥४३॥असोइकडेमया
सुर॥वेगेंपावलाबिंदुसरोवर॥जेथेंरत्नाचेपर्वतअपार॥स्कवर्णाचळतैसेची॥४४॥जेथेंकल्पवृक्षाचेंवन॥धनरत्न
राशीपडिल्यापूर्ण॥ऋषिनेंदक्षिणानेतांउबगोन॥ठांयींठायींटाकिल्या॥४५॥इंदिरेसहितश्रीधर॥तपतेथेंआचर-
लाथोर॥दिव्यसहस्त्रवर्षेंदीर्घसत्र॥हरिनेकेलेंतेठायीं॥४६॥भगीरथतेथेंआचरलातप॥चतुराननेंतेथेंअमुप॥
यागकेलेस्करवरूप॥इंद्रादिकींसमस्तीं॥४७॥जेथेंतपयागविशेष॥स्वयेंकरीव्योमकेश॥दक्षिणादिल्हीतेनिःशेष॥
शेषावर्णननकरवे॥४८॥तेथिचीसामग्रीघेऊनअपार॥आठलक्षयक्षनिशाचर॥शिरींवाहुनीसमग्र॥शक्रप्रस्था
आणिले॥४९॥भीमासगदादिल्हीदेख॥पार्थाससमर्पिलाशंख॥सुहूर्तपाहोनीस्करेख॥सभामंडपमांडिला॥५०॥
आठलक्षबळीराक्षस॥सामग्रीदेतीविशेष॥दाहासहस्त्रहस्तचौरस॥सभामंडपरचियेला॥५१मनींकल्पिलेंतै
सेंतुळ्वट॥नवरत्नाचेखांबसधट॥स्वयंभूजाणअविट॥हिरियाचेआणियेले॥५२॥मयास्करपाडवांचामित्र॥
जोदैत्यामाजीविधिचाअवतार॥तेणेंतेसभारचिलीसुंदर॥जेअनुपम्यत्रिभुवनीं॥५३॥सभाअत्यंतवर्णिलीयेथं॥
ह्मणोनिसभापर्वह्मणतीपंडित॥तेथिचीरचनाअद्भुत॥नभूतोनभविष्यती॥५४॥सभारचिलीयेवेळी॥आठही-
आयसाधिलेतळीं॥अष्टदिग्पाळमहाबळी॥पायाचेमूळींस्थापिले॥५५॥विद्रुमशिळाआरक्तवर्ण॥तेणेंपायाआ
णिलाभरून॥स्फटिकशिळाशभ्रवर्ण॥त्याचींपोंवळींलखलखित॥५६॥सप्तरंगीपाषाण॥चक्रेंझळकतीआं-

तून ॥ अंतर्बाह्यदिव्यजाण ॥ पाहातांजनविस्मित ॥ ५७ ॥ शेषफणाची आकृती ॥ चर्याजडितझळकती ॥ जे
वीं उगवलेगभस्ती ॥ बैसलेपंक्तीएकदां ॥ ५८ ॥ इंद्रनीळाचेवारण ॥ हिऱ्याचेद्विजसतेजपूर्ण ॥ तेरवालतेजडोन ॥
वरीमंडपरचियेला ॥ ५९ ॥ तळींपद्मरागाचेताळंबेसबळ ॥ वरिहिऱ्याचेखांबविशाळ ॥ नीळयाचींउथाळींसु-
ढळ ॥ तेजाचेकल्लोळदीसती ॥ ६० ॥ सुवर्णाचेतुळवटअखंड ॥ माणिकांचेदांडेप्रचंड ॥ गरुडपाचूच्याकिलचाउ
दंड ॥ अभेदपणेंजडियेल्या ॥ ६१ ॥ पेरोजाचेंउंबरेतळवटी ॥ पुष्कराजाच्याचौकटी ॥ गजास्यजडिलेमध्यपिठी ॥
आरक्तवर्णमाणिकांचे ॥ ६२ ॥ घोंटीवजेमार्गजपाषाण ॥ तेणेंसाधिलेंमंडपांगण ॥ वरीकनकवर्णीवृक्षरेखुन
तटस्थनयनपाहतां ॥ ६३ ॥ हिऱ्याचामजलसाविशाळ ॥ त्यावरीमोतियाचेमराळ ॥ वदनींविद्रुमतेजाळ ॥ अति
चपळदिसताती ॥ ६४ ॥ नीळरत्नाचेंशिखरसाजिरें ॥ गरुडपाचूचेकीरबरे ॥ रत्नमणियाचींसुंदरें ॥ जांबुळमु
खींआकर्षिली ॥ ६५ ॥ धन्यमयासुराचीकरणी ॥ शुकपाचूचेबोलतीक्षणक्षणी ॥ मयूरनाचतीआनंदोनी ॥
पुतळ्याखणोखणीखेळताती ॥ ६६ ॥ प्रत्यक्षरत्नपुतळेबोलती ॥ सभेसिआल्याबैसाह्मणती ॥ कितीपुतळे
आनंदेंगाती ॥ पुरेह्मणतांहोतीनटस्थ ॥ ६७ ॥ नवलकर्त्याचीकरणी ॥ पुढेंसेवकजोडोनिपाणी ॥ धांवाह्म-
णतांसभाजनी ॥ चपळचरणींधांवती ॥ ६८ ॥ मेषकुंजरएकसरी ॥ आज्ञाहोतांघेतझुंजारी ॥ टाळमृदंगवाज
विती कुसरी ॥ रागोद्धारकरितीपैं ॥ ६९ ॥ घटिकेनेंघटिकाभरतांदिवस ॥ एकपुतळेवाजवितीतास ॥ देवांगना
चींरूपेंविशेष ॥ नृत्यकरितीसांगतां ॥ ७० ॥ हिरियाचेस्तंभांतरीं ॥ नृसिंहमूर्तीगर्जतीहुंकारी ॥ कौस्तुभमणि
झळकतीएकसरीं ॥ स्तंभांप्रतिजडियेले ॥ ७१ ॥ कोठेंजडिलेसीमंतकमणी ॥ कींएकदांचउगवलेतरणी ॥ दि
वसकिंवायामिनी ॥ तेस्थानींनकळेकोणा ॥ ७२ ॥ एकावरीएकशतखण ॥ मंगळतुरेंअनुदिन ॥ लेपेंवाजवि
तीनवलाविंदान ॥ कर्तयानेंदाविलें ॥ ७३ ॥ चपळानळपतीएकसरी ॥ नेंशापताका झळकती अंबरीं ॥ कळ

सजडिननानापरी ॥ ह्मिणाविनीभणंगानें ॥ ७४ ॥ गरुडपाचुचीजोती ॥ चित्रशाळेविचित्रदिसती ॥ गोळांगुळें
साळयाउडत्ती ॥ जीवनसतांचपळत्वें ॥ ७५ ॥ चतुर्दशफ्फवनेंनृपांसहित ॥ भिंतीवरीपुतळेरत्नजडित ॥ ज्यांचीजै
सीआकृतीसत्य ॥ प्रत्यक्षतैसेचिकाढिले ॥ ७६ ॥ इंद्रअग्नियमनैरृत्यीवरुणसोमकुबेरउमापती ॥ ज्याचेतनुची
विशेषदीप्ती ॥ प्रत्यक्षमूर्तीदिग्पाळांच्या ॥ ७७ ॥ मित्ररोहिणीवरभूमीस्रुत ॥ सोमस्रुतगुरुशुक्रशनिसहित ॥
राहुकेतूनवग्रहमूर्तिमंत ॥ पाहातांतटस्थजनहोती ॥ ७८ ॥ मत्स्यकूर्मवराहनृसिंहमूर्ती ॥ वामनभार्गवराघवा
कृती ॥ कृष्णबौध्यकलंकिअवतारस्थिती ॥ चरित्रेंसमवेतप्रत्यक्षपैं ॥ ७९ ॥ अतळस्रुतळवितळ ॥ शेषवासु
कीफणीपाळ ॥ सप्तपाताळेंनिर्मळ ॥ लोकांसहितरेखिलीं ॥ ८० ॥ सप्तद्वीपेंनवखंडें ॥ छपन्नदेशकाननेंप्रचं
डें ॥ सरितासागरतीर्थेंउदंडें ॥ पापसंहारकरेखिलीं ॥ ८१ ॥ शिवचरित्रेंविष्णुचरित्रें ॥ शक्तिआख्यानेंअतिप
वित्रें ॥ सोमकांतिभाषाणेसरोवरें ॥ सोपानेस्रुंदरेंबांधिलीं ॥ ८२ ॥ शीतोष्णउदकाच्यापुष्करिणी ॥ मंगळस्ना
नेंकरितांजनी ॥ तनुवरीराजकळायेतनत्क्षणीं ॥ नवलकरणीमयाची ॥ ८३ ॥ स्फटिकमूर्तीदेखोन ॥ भुलती
पाहातांनयन ॥ कींभरलेंयेथेंजीवन ॥ वस्त्रेंसावरोनीचालती ॥ ८४ ॥ जेथेंभरिलेंअसेजळ ॥ तेंभूमीऐसेंदिसे
केवळ ॥ वस्त्रेंसांवरितीअतिकुशळ ॥ तोंसभासकळहांसेबरी ॥ ८५ ॥ अंतर्बाह्यनिर्मळदिसती ॥ सतेजका-
श्मिराच्याभिंती ॥ मार्गह्मणोनीसरळधांवती ॥ तोंतेआपटतीभिंतीवरी ॥ ८६ ॥ हिरेयांचींकवाडेंकडोविकडी
झांकिलींकींनकळतीउघडीं ॥ प्रवेशतांसंशयींपाडी ॥ मगहस्तेंकरूनिचांचपिती ॥ ८७ ॥ सरोवरींस्रुवर्णकम
ळेंस्रुवास ॥ हेकळादाविताविशेष ॥ वरीनीळयाचेभ्रमरसावकाश ॥ रुंजीघालितीआनंदें ॥ ८८ ॥ हिरियाचे
मत्स्यतळपती ॥ पाचुचींकांसवेंअंगलपविती ॥ काश्मिराचेबकधांवती ॥ मत्स्यधरावयाकारणें ॥ ८९ ॥ त्रिभु
वनसौंदर्यएकवटलें ॥ तेंमयसभेवरीवोतिलें ॥ तेंसभास्थळज्याणेविलोकिलें ॥ तेणेंदेखिलेंब्रह्मांड ॥ ९० ॥

सभेसिजातांमार्गींभ्रले॥ चंदनाचेसडेघातले॥ पुष्पभारविखुरले॥ मृगमदेंलिंपिलेभिंतिभाग॥ ९१॥ सभासौं
दर्यह्माविसमुद्र॥ पाहातांनयाचेंचक्षुपोहणार॥ तेनपवतीपैलपार॥ आलीकडेंचबुचकळती॥ ९२॥ कींसभा
सागराचेंपैलतीर॥ मनविहंगमचपळथोर॥ पावावयानाहींधीर॥ तेजआवर्तींपडे पैं॥ ९३॥ जाजापदार्थाकडे
पाहातीप्राणी॥ तिकडेचित्तजायजडोनी॥ दिवसकिंवाआहेरजनी॥ पाहेतयासीसमजेना॥ ९४॥ स्वर्गमृत्य
पाताळशोधितां॥ ऐसीसभानाहींतत्वतां॥ धन्यतोमयासुरनिर्मितां॥ विरंचीअंशसत्यपैं॥ ९५॥ आरक्तपटा
चेचांदवेदिसती॥ मुक्तघोसभोंवतेशोभती॥ दिव्यअस्तरणेंपसरिलींक्षिती॥ गाद्याझळकतीचित्रविचित्र॥ ९६
पिकदाणेऊर्ध्वमुखें॥ तांबुलपात्रेंअतिसुरेखें॥ परिमळद्रव्येंमृगमदादिकें॥ पेट्याझळकतीतयाच्या॥ ९७॥ क
नकवेलीरेखिल्या॥ वाटतीरत्नस्तंभींचढल्या॥ देवद्रुमाच्यादाटीझाल्या॥ कळिपुष्पेंझळकती॥ ९८॥ लवंगां
चेवेलशोभती॥ नानावृक्षविराजती॥ मलयागरचंदनपुष्पजाती॥ सुवासेंठकतीनवलहें॥ ९९॥ भरतांमास
चतुर्दश॥ पूर्णसभेचाजाहालाकळस॥ मयह्मणेधर्मास॥ सभादृष्टींअवलोकिजे॥ १००॥ बंधुकुमरप्रधान
सवेंअपारमुनिजन॥ इष्टआप्तसंगेंघेउन॥ युधिष्ठिरसभेपातला॥ १॥ सभास्थानींप्रवेशले॥ बळिदानआ
धींसमर्पिलें॥ वस्त्रेंअळकारतेवेळे॥ अपारदिधलींविप्रांसी॥ २॥ सभापाहातांसंपूर्ण॥ विसरलेअवघेभूक
तान॥ मननिघेनेथुन॥ वर्षानुवर्षेंपाहतां॥ ३॥ धन्यधन्यतोसूत्रधार॥ ईश्वरिअंशमयासुर॥ धर्मेंदेऊनि
वस्त्रेंअळंकार॥ प्राणसखागौरविला॥ ४॥ निरोपघेऊनिस्वस्थळा॥ मयासुरतत्काळगेला॥ देशोदेशींचेनृ
पाळतेवेळां॥ येतीसभापाहावया॥ ५॥ लक्षब्राह्मणासभोजनें॥ सभेदिधलींकुंतीनंदनें॥ सुधारसाहुनीगो
डअन्नें॥ वर्णितांग्रंथवाढेल॥ ६॥ कळापात्रेंबहुतयेती॥ मयसभेसीवोळगती॥ नानाशास्त्रचर्चाहोती॥
धर्मसभेसींसर्वदां॥ ७॥ अपारऋषिजनवसती॥ धर्माचेसंगतीसुखभोगिती॥ त्यांचींनामेनानारीती॥

बोलिजेती पुढें हो ॥ ८ ॥ नानादेशींचे राजस्कृत ॥ धर्मापासीं सदा तिष्ठत ॥ असंख्य यवनगण बळवंत ॥ धर्मराया
पुढें सदा ॥ ९ ॥ द्वादशजातीचे यादव ॥ पृष्णा अंधकादि सर्व ॥ सारणभोज अक्रुर उद्धव ॥ पार्थसंगीं वसती हो
॥ ११० ॥ यादवांचे सकळस्कृत ॥ शाणवकुळींचे समस्त ॥ पार्थापासीं सिकत ॥ धनुर्वेद सर्वही ॥ ११ ॥ साठल
क्ष कृष्णकुमर ॥ प्रद्युम्नसांबादिक समग्र ॥ त्यांसि किरीटी गुरु चतुर ॥ विद्या अपार देतसे ॥ १२ ॥ गंधर्वराजा
चित्रसेन ॥ किन्नर अप्सरा अनुदिन ॥ तुंबर स्वर्गवास सांडोन ॥ मयसभेसी गातसे ॥ १३ ॥ तों उदय पावला सु
कृतमित्र ॥ पांडवांचें भाग्यचरित्र ॥ तो अकस्मात विधिपुत्र ॥ नारदस्वामी पातला ॥ १४ ॥ व्यास वाल्मीक ध्रुव प्र
ल्हाद ॥ जयाचे शिष्य जगद्वंद्य ॥ चौदा विद्या चारी वेद ॥ मुखोद्गत जयासी ॥ १५ ॥ चौसष्टि कळा शास्त्रें बहुत ॥ जा
चे मुखें विस्तारलीं समस्त ॥ नारदनारायण यथार्थ ॥ परमाद्भुत महिमा ज्याची ॥ १६ ॥ दिव्य सुमनें दिव्य गंध ॥ सु
रगणी पूजिला विविध ॥ जाचें सामर्थ्य अगाध ॥ ब्रह्मादिकां नेणवे ॥ १७ ॥ हें ब्रह्मांड मोडून ॥ दुसरें करील निर्मा
ण ॥ अन्याय विलोकितां पूर्ण ॥ शिक्षा करील इंद्रादिकां ॥ १८ ॥ ऐसा महाराज नारदमुनी ॥ युधिष्ठिरें दृष्टीं देखो
नी ॥ समोर आला त्वरें करुनी ॥ साष्टांग नमन करीतसे ॥ १९ ॥ दिव्यासनीं बैसविला ॥ रत्नाभिषेक धर्में केला ॥
पूजा अर्पुनी ते वेळां ॥ बद्धहस्त उभा पुढें ॥ २० ॥ धर्मासि ह्मणे नारद ॥ नामासारिखी करणी शुद्ध ॥ तुजपासीं
आहे कीं विषद ॥ धर्मात्मजा धर्मराया ॥ २१ ॥ पृथ्वीचें राज्य आलें समस्त ॥ धर्मावरी असावें सदा चित्त ॥ काम
ना बुद्धि टाकूनि यथोचित ॥ कृष्णार्पण करिसी कीं ॥ २२ ॥ कुळशीळ विद्याधन ॥ राज्य तप रूप यौवन ॥ या अष्ट
मदें करून ॥ भुललें नाहीं चित्त कीं ॥ २३ ॥ सर्वज्ञत्व आगीं असोन ॥ निरभिमान असे कीं पूर्ण ॥ ऐश्वर्य असोन उ-
दासमन ॥ धर्मराया आहे तुझें ॥ २४ ॥ प्रज्ञा आगीं बहुत ॥ परि भोळेपण न सांडित ॥ अंतरीं बहु उदारत्व ॥ सु
हृद ऋषिसीं आहे कीं ॥ २५ ॥ श्रेष्ठाचा मूळ आचार ॥ तोचि आचरसि कीं सादर ॥ अविहित कर्म अनाचार ॥

नावडेकींसर्वज्ञा ॥ २६ ॥ इंद्रियें आहेत आधिन ॥ नित्यनैमित्तिकवर्तमान ॥ निषिद्धकर्मसंपूर्ण ॥ लोटिसीकीं
पातल्या ॥ २७ ॥ भाग्यआलेंअकस्मात ॥ भोगिसीकींसुहृदासमवेत ॥ शमदमादिसाधनेंयथार्थ ॥ बुद्धींसदांव
सेकीं ॥ २८ ॥ विकळपडतांप्राक्तन ॥ स्वधर्मीराहाटेकींमन ॥ कामक्रोधादिशत्रुसंपूर्ण ॥ केलेआधीनतुवांकीं
॥ २९ ॥ पापपुण्यघडलेंकिती ॥ विचारिसीकींअहोरात्री ॥ स्मरणेंपूजनेभावभक्ती ॥ वशश्रीपतीअसेकीं ॥ ३०
संतासिसदांमैत्री ॥ दानदेसीसत्पात्रीं ॥ धर्मकरितांअपात्रीं ॥ सुकृतहानीहोतसे ॥ ३१ ॥ परस्त्रीसीकामनि
षिद्ध ॥ ब्राह्मणावरीनसावाक्रोध ॥ सुहृदयातिसीमद ॥ सहसाहीनकरावा ॥ ३२ ॥ सर्वभूतींनसावामत्सर ॥
साधुसंतविप्रपवित्र ॥ यांसीदंभअणुमात्र ॥ सर्वथाहीनसावा ॥ ३३ ॥ कर्त्तासर्वईश्वर ॥ ह्मणोनिनधरावाअ
हंकार ॥ आपलेंसुकृतआचार ॥ स्वमुखेंतोनबोलावा ॥ ३४ ॥ सकळगुणमंडितपूर्ण ॥ तुझेअसतीकींप्रधान
तुझीआज्ञाशिरींधरून ॥ कापट्यभावनसेकीं ॥ ३५ ॥ विश्वासिकजैसेप्राण ॥ जवळीआहेतकींसेवकजन
स्वामिकाजींवोवाळून ॥ देहटाकितीआपुले ॥ ३६ ॥ भक्षूनराजवेतन ॥ इतरद्रव्यतुजसमान ॥ ऐसेव्यापारी-
सुजन ॥ सेवकतुझेआहेतकीं ॥ ३७ ॥ वृषलीपुत्रासअमात्यपद ॥ पवित्रासससेवानिषिद्ध ॥ अपमानुनीसंतवृ
द्ध ॥ नभजसिकीं अपात्रें ॥ ३८ ॥ आपुलेकाजीं वेचिलेप्राण ॥ त्यांचींकरिसीकुटुंबेंपालन ॥ स्वस्त्रीटाकुनीमन
परविषयींनभरेकीं ॥ ३९ ॥ बाळमैत्रभेटोंआले ॥ दृष्टीदेखतांसभाग्यकेले ॥ वोळखीनेदोनीदवडिले ॥ ऐसेंहो
तनाहीकीं ॥ ४० ॥ परगुणपरिक्षाउत्तम ॥ जाणसिकींविद्येचेश्रम ॥ पराचेंधनदेखतांपरम ॥ मनतुझेंसांकळे
कीं ॥ ४१ ॥ सर्वांभूतींद्यावेंअन्न ॥ पूजाकरावीसत्पात्रपाहुन ॥ मागेंनबोलावेंदुसऱ्याचेंन्यून ॥ हेंलक्षणअसे
कीं ॥ ४२ ॥ सेवककैसेवर्त्तती ॥ यशकिंवाअपेशदेती ॥ हेंमुख्य अहोरात्रीं ॥ चित्तींसर्वहीआणावें ॥ ४३ सुख
सारनेमस्तघेऊन ॥ करावेंप्रजेचेंपालन ॥ त्यासपीडाकरितांसेवकप्रधान ॥ पदावेगळेकरावे ॥ ४४ ॥ देवाची-

पूजाकरितीसांग ॥ तैसादेईनराजविभाग ॥ प्रजावर्ततीकीं अव्यंग ॥ स्वधर्मेसी आपुल्या ॥ ४५ ॥ घडिघडि
आपलेनेत्र ॥ कृपादृष्टीपरमपवित्र ॥ लेंकुराऐशाप्रजासमग्र ॥ विलोकिसीसुज्ञाना ॥ ४६ ॥ मार्गपाडकचोरनि
षाद ॥ यांचाकरावातत्कालवध ॥ यात्रानागवितीमैंद ॥ त्यांचें हननकरिसीकीं ॥ ४७ ॥ दुर्बळासिक्लेशहोय ॥ तो
द्वारींयेऊनउभाराहे ॥ त्यासीजवळीबोलाऊनलवलाहें ॥ क्लेशातीतकरिसीकीं ॥ ४८ ॥ ब्राह्मणप्रजामैत्रस्ने-
हाळ ॥ त्यांसींनकोंडितीहोद्वारपाळ ॥ दुष्टदुर्जनखळ ॥ आंतयेऊंनदेतीकीं ॥ ४९ ॥ परराज्यजातांघ्यावया ॥ सै
न्ययेतेंझुंझावया ॥ त्यासिजिंकोनिलुटावेंराया ॥ ग्रामप्रजारक्षूनी ॥ ५० ॥ आपलियाग्रामांत ॥ दीनजनहोती
दुःखित ॥ तेंतुजहोउनियांश्रुत ॥ क्लेशत्यांचेहरिसीकीं ॥ ५१ ॥ मातापितयाचेंभजन ॥ पुत्रकरितीकींअनुदिन
हेंस्वग्रामांतीलवर्तमान ॥ तुजलागींश्रुतव्हावें ॥ ५२ ॥ शिष्यगुरूआज्ञापाळिती ॥ स्त्रियाभ्रतारासीभजती ॥
सेवकस्वामीद्रोहनकरिती ॥ ऐसीचस्थितीअसेकीं ॥ ५३ ॥ सासूसासऱ्याचीसेवा ॥ सूनाकरितीकींनरपार्थिवा
॥ रात्रींचोरसूदेवा ॥ नगरामाजीनफिरतीकीं ॥ ५४ ॥ सात्विकब्राह्मणनिर्द्धन ॥ त्याचेंदूरकरिसीकींदैन्य ॥ रोगेंपि
डिलींअत्यंतक्षीण ॥ त्यांचेंपालनकरविसीकीं ॥ ५५ ॥ दरिद्रीब्राह्मणतरुण ॥ गेलापरदेशालागुन ॥ तरुणस्त्री
भ्रतारेंवीण ॥ तळमळीतवाटपाहे ॥ ५६ ॥ तींदोघेंएककरून ॥ नांदवीदेऊनिधन ॥ मृगयाकरूनीवनपालन ॥
दुष्टश्वापदेंवधावीं ॥ ५७ ॥ सज्जनेघेतलेंदुष्टाचेंऋण ॥ तोकरूनेदीत्यासिभोजन ॥ परमपीडितोहेंऐकून ॥ ऋण
मोचनकरावें ॥ ५८ ॥ क्षुधार्थतृषितघरायेती ॥ सोईराऐसीत्यांवरीप्रीती ॥ पुत्राहूनिस्नेहरीती ॥ संतावरीक
रिसीकीं ॥ ५९ ॥ आश्रितउपाध्येऋत्विजब्राह्मण ॥ सांगकरितीकींअनुष्ठान ॥ जपयागपुरश्चरण ॥ कोठेंन्यून
नपडेकीं ॥ ६० ॥ वसूधाराअसिधारा ॥ दानोदकधारावाक्धारा ॥ पंचामृतधाराअभिषेकधारा ॥ चालतीउदा
रासनतेजकीं ॥ ६१ ॥ आपुल्याहातानेंवर्षासन ॥ देईउनिसूखीरक्षिसीब्राह्मण ॥ क्षत्रियांसीनांदऊन ॥ समाचार

घेसी कीं ॥ ६२ ॥ दुष्टनवग्रहांचें पूजन ॥ करूनि करिसी प्रसन्न ॥ गणक ज्योतिषी शास्त्रनिपुण ॥ निकट सदां अ-
सती कीं ॥ ६३ ॥ वैद्य चिकित्सक पवित्र भले ॥ नाडिज्ञानी चातूर्य आगळे ॥ ते जवळी सदां ठेविले ॥ राहाती कीं राजें
द्रा ॥ ६४ ॥ कोशगृहीं चे रक्षक ॥ ते आहेत कीं निरपेक्षक ॥ अंतःपुरीं नपुंसक ॥ किंवा वृद्ध आहेत कीं ॥ ६५ ॥ पवि
त्र विश्वासू आणि चतुर ॥ पाककर्ते असावे साचार ॥ जाणती जे सूपशास्त्र ॥ ते चि तुवां रक्षिले कीं ॥ ६६ ॥ नापिक-
अंगमर्द्दक ॥ उदक देणार हुजरे देख ॥ हे निकट असणारे सेवक ॥ विश्वासूक आहेत कीं ॥ ६७ ॥ अविचार अनि-
वार शूर ॥ ते युद्धांत ठेवावे साचार ॥ स्थीरबुद्धि धैर्य थोर ॥ ते दुर्गगदीं ठेवावे ॥ ६८ ॥ बृहस्पती ऐसे चतुर पंडित ॥
बं ॥ लोंजाणती समयोचित ॥ वेधिती शत्रुस निश्चित ॥ ऐसे शिष्ट असती कीं ॥ ६९ ॥ समय पाहुनी त्रिशुद्धी ॥ तुज
सिकविती कीं सुबुद्धी ॥ अनर्थी पडों ने दिती कधीं ॥ ऐसे निकट असती पैं ॥ ७० ॥ पिशुन शठ दुष्ट दुर्जन ॥ निष्ठुर-
वादक पाहाती न्यून ॥ सत्पात्राचा करिती अपमान ॥ ते सभास्थानीं वर्जिले किं ॥ ७१ ॥ जनीं वसे जनार्दन ॥ करिती
निंदा किं वास्तवन ॥ मोक्ष नरकाचें चिन्ह ॥ येथें पुरें जाणसी कीं ॥ ७२ ॥ शत्रु जिंकावे समरीं ॥ जिंकिले ते पाळावे च
तुरीं ॥ शरणागत बरव्या परी ॥ अहोरात्रीं रक्षावे ॥ ७३ ॥ दुर्ग गिरी पर्वतीं ॥ नूतन धान्यें वर्षांतीं ॥ जुनी काढोनि श्रु
ढती ॥ बहु साल भरावीं ॥ ७४ ॥ गड दुर्गांच्या भिंती ॥ जीर्ण होतां कोसळती ॥ ठायीं ठायीं रचाव्या पूढती ॥ शिल्पख
णक असती कीं ॥ ७५ ॥ मठ धर्मशाळा प्रासाद ॥ वापी तडागें सुबद्ध ॥ हीं खचली करूनि सिद्ध ॥ जीर्णोद्धार कर
सी कीं ॥ ७६ ॥ नैवेद्य दीप ठायीं ठायीं ॥ चालविसी कीं देवालयीं ॥ वर्षाकाळीं पीडती पशु गाई ॥ त्यांस गोठाणें बां
धविसी कीं ॥ ७७ ॥ वृद्ध दरिद्री अशक्त ॥ यति तपस्वी अतिथ ॥ हे वर्षाव काळीं पंथ ॥ न चालती ऐसे करिसी कीं
॥ ७८ ॥ गोत्रज वृद्ध तापस ॥ तुझा न घेती कदां त्रास ॥ श्रेष्ठ येती दर्शनास ॥ अपमानीत कोणी नाहीं कीं ॥ ७९ ॥ पु
रोहित प्रधान पंडित ॥ आपुलें शून्य होईल महत्व ॥ भल्याचे अपमान सत्य ॥ न करिती कीं सर्वथा ॥ ८० ॥ उदयास्त

मानींशयन॥ व्रतपर्वकाळींमैथुन॥ पंक्तीभेदएकल्याचें भोजन॥ तुजघडतनाहीं कीं॥ ८१॥ च्यारीवर्णआप
ल्यास्थता॥ विद्यापढवितीकींनरनाथा॥ बहुमूर्खंदवडोनीएकपंडिता॥ धनमानेंरक्षिसीकीं॥ ८२॥ एकांतवि-
च्यारगुह्यसमस्त॥ प्रगटतनाहींकींजगांत॥ मंत्रआयुष्यवित्त॥ नसांगसीकोणातें॥ ८३॥ एकप्रकटलोकींबो
लावें॥ एकसाधुकर्णींचसांगावें॥ एकमनींचगुह्यठेवावें॥ हेतूंबरवेंजाणसिकीं॥ ८४॥ शत्रुकायकरितीविच्या
र॥ क्षणक्षणाआणविजेसमाचार॥ सत्यवादीहेरचार॥ धनदेऊनरक्षावे॥ ८५॥ तुजसींस्नेहदावितीबहुत॥ श
त्रुसीसमाचारकरितीश्रुत॥ तेंवोळखोनमनांत॥ सावधानअससीकीं॥ ८६॥ वार्ताआलीअकस्मात॥ तीनवेळ
पाठवावेदूत॥ अल्पयत्नलाभबहुत॥ तेथेंत्वराकरिसीकीं॥ ८७॥ अल्पयशासमोटीहानी॥ नधरावीतीगोष्टी
मनीं॥ दानमानस्वकृतजनीं॥ प्रकटकदानकरावें॥ ८८॥ अल्पराज्यरक्षकरणशूर॥ त्याचेंवेतनद्यावेंसमय॥ त्या
सिकष्टीकरितांनिर्धार॥ अनर्थहेजाणसीकीं॥ ८९॥ आजिकायसांचलेंधन॥ वेंचिलेंकितीपत्रींलिहून॥ सा
यंकाळींआणून॥ लेखकहेदावितीकीं॥ ९०॥ वस्त्राभरणेंलेऊन॥ दर्शनायेतीसमस्तजन॥ सुहृदरणशूर हो
ऊन॥ उभयभागींबैसतीकीं॥ ९१॥ आरक्तवस्त्रेंशस्त्रेंअळंकार॥ अवघेसारिखेचरणशूर॥ अश्वगजयानींस
मग्र॥ सतेजसदांअसतीकीं॥ ९२॥ सत्पात्रींधनदेतांबहुत॥ नाहींवारितकींपुरोहित॥ विघ्नकरितीतेपदाती
त॥ तत्काळचीकरावे॥ ९३॥ गोष्ठाचेकींजेग्राम॥ ग्रामाचींपट्टणेंउत्तम॥ पर्वतवनवसवोनिपरम॥ मार्गचालते-
करिसीकीं॥ ९४॥ नपडेजरीजळदजाळ॥ विशाळतडागेंपाटस्थळ॥ शालीवनेंपिकतीपुष्कळ॥ ऐसीभर
तीअसेकीं॥ ९५॥ प्रजाकोणीअत्यंतदीन॥ त्यासिदेऊनिधनधान्य॥ करूनिसभाग्यपूर्ण॥ मगराजधनघे-
सीकीं॥ ९६॥ प्रजापीडकहिंसक॥ अतताईइतरदेख॥ त्याचावधतात्काळिक॥ करिसीकींराजेंद्रा॥ ९७॥ क्षु
धेपीडितदुष्काळांत॥ उत्तमेंचोरीकेलीअकस्मात॥ धरूनिआणितांराजदूत॥ तत्काळमुक्तकरिसीकीं॥ ९८॥

अंतर्बाह्यरक्षण ॥ स्त्रीयांसीकरूनिपूर्ण ॥ अष्टभोगद्यावेजाण ॥ गुह्यभाषणनबोलावें ॥ ९९ ॥ परराज्यघेतांसत्य ॥
जासिजेजेलाभेवस्त ॥ तेत्यासीकरूनमुक्त ॥ संतोषवितीतयासीं ॥ १०० ॥ युक्तआहारयुक्तनिद्रा ॥ युक्तमैथुनजाण
नरेंद्रा ॥ मृगयाद्यूतव्ययचतुरा ॥ युक्तचिन्हेंकरिसीकीं ॥ १ ॥ सेवूनिऔषधरसायण ॥ करिसीकींशरीररक्षण ॥ भ
जनपुजनहरिकथाश्रवण ॥ साधुमुखेंकरिसीकीं ॥ २ ॥ शब्दबोलसीजोयथार्थ ॥ तोनचळेकींजैसापर्वत ॥ हितसांग
तीसाधुसंत ॥ हृदयींदृढधरिसीकीं ॥ ३ ॥ गुरुवृद्धदेवब्राह्मण ॥ प्रासादगायवृंदावन ॥ यज्ञमंडपसमाधिस्थान ॥ देखे
निनमनकरिसीकीं ॥ ४ ॥ अश्वभांडारगज ॥ पवित्रभूमीदेवध्वज ॥ गंगातीर्थेंदेखतांसहज ॥ नमनयांसीकरिसीकीं
॥ ५ ॥ कार्यसाधितीसेवक ॥ त्यांचेंस्तवनकरिसीसम्यक ॥ सभामंडपीमानदेख ॥ गौरवितआहेसकीं ॥ ६ ॥ अचाट
कार्यअद्भुत ॥ करूनिआलाजोभृत्य ॥ वेतनावेगळेंअपरमित ॥ द्रव्यवस्त्रेंदेसीकीं ॥ ७ ॥ परखंडीचावस्तुअद्भुत ॥ व
णिजआणितीइच्छूनिस्वार्थ ॥ नविकेतरीसमस्त ॥ द्रव्यदेऊनघेसीकीं ॥ ८ ॥ कोणीआणितीवस्तुउचित ॥ त्याचेगु
णेंनरनाथा ॥ द्रव्यदेऊनतत्वता ॥ बोळविसीकींआदरें ॥ ९ ॥ देशावरदेऊनिअपरमित ॥ स्वदेशाधाडिसिकींविद्यावं
त ॥ तेतुझीकीर्तीसांगत ॥ थोरसभेसीजाणपां ॥ १० ॥ उत्तमवस्त्रेंअळंकार ॥ सत्पात्रींदेतांकीर्तीफार ॥ स्थळींस्थळीं
मिरवतांथोर ॥ यशप्रगटेनरेंद्रा ॥ ११ ॥ भोजनतांबूलसुमनचंदन ॥ वस्त्रेंऔषधउदकपान ॥ इतक्यांतविषघालून ॥
द्वेषीप्राणघेतीलपैं ॥ १२ ॥ येविषयींसदासावधान ॥ निद्रेचेंअसावेंदृढस्थान ॥ रात्रींकरावेंजागरण ॥ सेवकजनसमवे
त ॥ १३ ॥ पुण्यवंतासदोषीह्मणती ॥ दुर्बळाधनिकलावस्थापिती ॥ दुरात्म्याचेदोषलपविती ॥ नाहींरीतीऐसीकीं ॥
॥ १४ ॥ धनीनकरितादान ॥ दरिद्रीनकरीतीर्थाटण ॥ त्यादोघांसहीसांगोन ॥ हितकार्ययोजावें ॥ १५ ॥ बाहेरदाऊन
आचार ॥ आंतअवघाअनाचार ॥ व्यभिचारकर्मेंअपार ॥ करितीत्यांसीदंडिसीकीं ॥ १६ ॥ मातापितागुरुसांडून
करूंधांवेतीर्थाटण ॥ त्यासहीरायादंडून ॥ भजनमार्गीलावावें ॥ १७ ॥ बाहेरयोगियाचेंचिन्ह ॥ पोषितीउदरऔ-

णिशिष्य॥ अग्निहोत्रनघेवेदज्ञ॥ तरीपठणव्यर्थतें॥१८॥ त्याचेठायींमन॥ नलागेकींतुझेंअनुप्रमाण॥ एवंसर्ववि
षयींसावधान॥ नृपवर्याअसावें॥ १९॥ ऐसेहेकथितप्रश्न॥ नारदेंपुसिलेधर्मालागुन॥ जन्मेजयकरीश्रवण॥ वैशं
पायनसांगत॥२०॥ हेंजोनित्यऐकेपदे॥ त्यासनपडेकदांसांकडें॥ अंतींहरिपदजोडे॥ यशमिळेसर्वदां॥ २१॥ पुढेंश्र
वणकीजेसावधान॥ एकाहूनिएकअध्यायगोडपूर्ण॥ आदरधरोतविचक्षण॥ ब्रह्मानंदेंकरूनियां॥ २२॥ रसिक-
साहित्यचातुर्यवाणी॥ ब्रह्मानंदेंवंदोनी॥ श्रीधराचीवाग्भवानी॥ गोंधळघालीलस्वानंदें॥ २३॥ त्यारंगामाजीचतुर
पंडित॥ आनंदेंडोलतीलसमस्त॥ भक्तमुमुक्षुसाधकसंत॥ सुखदुःखसमानची॥ २४॥ जयजयभीमातटविला-
सा॥ ब्रह्मानंदापंढरीशा॥ श्रीधरवरदाआदिपुरुषा॥ अविनाशादिगंबरा॥ २५॥ सुरसपांडवप्रतापग्रंथ॥ सभा
पर्वव्यासभारत॥ त्यांतीलसारांशयथार्थ॥ पंचदशोध्यायींकथियेला॥ २६॥ इतिश्रीपांडवप्रतापग्रंथ॥ सभापर्व-
टीकाश्रीधरकृत॥ मयसभेचीरचनासमाप्त॥ नारदनीतीकथियेली॥ २२७॥ इतिश्रीपांडवप्रतापसभापर्वेपंचदशो
ऽध्यायः॥१५॥ श्रीकृष्णार्पणमस्तु॥ ७॥ ७॥ ७॥ ७॥

श्रीगणेशायनमः ॥ नारदाचेश्रीचरण ॥ धर्मराजेंप्रेमेवंदुन ॥ ह्मणेतुझ्यामुखेंकरून ॥ दिव्यनिरोपणऐकिलें ॥ १ ॥
तरीमयसभेसमानपाहे ॥ आणिकस्थानींकोठेंआहे ॥ तीसांगावीलवलाहें ॥ गुरुवर्यायोगेंद्रा ॥ २ ॥ नारदह्मणेतूंब
हुश्रुत ॥ ऐकेंसांगेनयथार्थ ॥ इंद्रसभाएकसत्य ॥ वरुणसभादूसरी ॥ ३ ॥ तिसरीकुबेरसभाजाण ॥ यमसभाचवथी
पूर्ण ॥ पांचवीब्रह्मसभापूर्ण ॥ धर्मसभासाहावीतुझी ॥ ४ ॥ पुष्करसभामालिनीजाण ॥ इंद्रसभेचेंनामखुण ॥ जीश-
तयोजनेविस्तीर्ण ॥ उंचजाणतितुकीच ॥ ५ ॥ गगनचुंबितमणिस्तंभ ॥ पाचूचेतुळवटस्वयंभ ॥ सूर्यप्रभेसन्निभ ॥ जे
दुर्लभमनुष्यां ॥ ६ ॥ तेथेंनाहींरात्रदिवस ॥ सदाअखंडएकप्रकाश ॥ चंद्रसूर्याचेंनिःशेष ॥ कार्यतेथेंनसेची ॥ ७ ॥ क्षु-
धातृषारोगमृत्य ॥ नाहींतेथेंधर्मासत्य ॥ इच्छिलेभोगबहुतु ॥ चिंतितांसर्वपाविजे ॥ ८ ॥ षड्विकारतापत्रय ॥ नाहीं
शोकमोहभय ॥ महत्पुण्यगांठीहोय ॥ त्यासीसभापडेदृष्टी ॥ ९ ॥ महापुण्यवंततेथेंचढती ॥ तेथेंबैसल्याऋषिपंक्ती
अष्टनायकानृत्यकरिती ॥ गातीगंधर्वकिन्नर ॥ १० ॥ तैसीचयमसभाजाण ॥ शतयोजनेविस्तीर्ण ॥ जांबूनदसुवर्ण ॥
नवरत्नखचितजें ॥ ११ ॥ शक्रसभेहूनिअधिक ॥ यमधर्मसभासुरेख ॥ ऋषिराजयांचापंक्तीदेख ॥ असंख्यातविराज
ती ॥ १२ ॥ सगरभगीरथदशरथ ॥ हेराजेवसतीजेथ ॥ महोत्साहपाहतांअद्भुत ॥ रात्रदिवससमजेना ॥ १३ ॥ वरुण
सभापरमसुंदर ॥ सहस्रउगवलेरोहिणीवर ॥ दिव्यमुक्ताफळेंअपार ॥ कमाऊनरचियेली ॥ १४ ॥ रोगमृत्यूआणि
शोक ॥ नाहींचतेथेंनिःशंक ॥ दिव्यद्रुमदिव्यफळेंदेख ॥ सदाफळेंविराजती ॥ १५ ॥ महत्पुण्यहोयगांठी ॥ तेव्हांतीस
भापडेदृष्टी ॥ सकळनागदेवसृष्टी ॥ विराजतीसर्वदा ॥ १६ ॥ मूर्तिमंतसप्तसमुद्र ॥ भागीरथीमूर्तिमंतपवित्र ॥ कृष्णा
गोदावरीसरितासमग्र ॥ मूर्तिमंतबैसल्या ॥ १७ ॥ कालिंदीनर्मदाभागीरथी ॥ तापीपयोष्णीसरस्वती ॥ सावित्रीका
वेरीगोमती ॥ विराजतीमूर्तिमंत ॥ १८ ॥ आठनद्यामूर्तिमंत ॥ सकळतीर्थेंवसतीतेथें ॥ नामेसांगतांबहुत ॥ वाढे-
लग्रंथजाणिजे ॥ १९ ॥ जळचरेंदशलक्षजाती ॥ तींमंगळराघवसेवाकरिती ॥ वारुणीअर्धांगीमहासती ॥ सिं

हासनींवरुणशोभे ॥ २० ॥ आतांकुबेरसभासुंदर ॥ तेहितैसीचसविस्तर ॥ शतयोजनेंपरिकर ॥ सुवर्णभूमी
सभोंवती ॥ २१ ॥ अष्टमहासिद्धीनवनिधी ॥ मूर्तिमंततेथेंवर्तनिविधी ॥ पृथ्वीचाधनाचीसमृद्धी ॥ धनेश्वराआ
धिन ॥ २२ ॥ सौदामिनीगाळूनिबहुत ॥ चित्रेंरेखिलींपैंतेथ ॥ मुक्ताचेरसेंअद्भुत ॥ राजहंसकाढिले ॥ २३ ॥ नीळर
सगाळूनिकाढिलेमयूर ॥ गणगंधर्वकिन्नर ॥ पाचागाळूनिकेलेकीर ॥ धनेशसभेविराजती ॥ २४ ॥ साठकोटिगण
सहित ॥ तेथेंबैसलाउमाकांत ॥ सकळराक्षसांसहित ॥ बिभीषणतेथेंसेवाकरी ॥ २५ ॥ मेरूहिमाचळपर्वत ॥ रत्न
शिखरेंजातीअमित ॥ कुबेरासनमस्कारित ॥ मूर्तिमंतपैंतेथें ॥ २६ ॥ आतांत्रिलोकीं दुर्लभदेख ॥ तीब्रह्मसभाध-
र्मऐक ॥ प्रकाशलेसहस्त्रार्क ॥ प्रभादेखत्याहुनी ॥ २७ ॥ तेसभेचेंसौंदर्य ॥ पाहूंनशकेदृष्टीसूर्य ॥ देवेंद्रएवढाआर्य
॥ नयनत्यांचेझांकती ॥ २८ ॥ स्तंभाविणेंसभाजाण ॥ श्रेष्ठाचीतेश्रेष्ठपूर्ण ॥ सकळआनंदाचेंसदन ॥ दुःखशोकनसे
ची ॥ २९ ॥ त्रिदशासहितइंद्र ॥ चौदामनुपितृगणसमग्र ॥ एकादशरुद्रद्वादशमित्र ॥ हस्तजोडूनपुढेंउभे ॥ ३० ॥ अ
मृताहूनिकोटिगुणदेख ॥ गोडतेथीलउदक ॥ वृक्षछायेचेंपाहातांसुख ॥ ब्रह्मानंदउचंबळे ॥ ३१ ॥ चंद्रसूर्यकृशा-
न ॥ विद्याधरअप्सरासंपूर्ण ॥ तेथिचेंवर्णितांमहिमान ॥ सहस्त्रवदनमौनावे ॥ ३२ ॥ तेथिंचापाहातांपरिमळ ॥ ला-
ळघोंटीमलयाचळ ॥ वसंततेथेंसर्वकाळ ॥ प्रदक्षणाकरीतसे ॥ ३३ ॥ सिंहासनींकमळासन ॥ मानसपुत्रसप्तजाण
पुढेंउभेकरजोडोन ॥ पाडकायइतरांचा ॥ ३४ ॥ अपारऋषीचेभार ॥ वेदघोषगर्जतीनिरंतर ॥ पुढेंउभेसनत्कुमार
करजोडूनसर्वदा ॥ ३५ ॥ च्यारीसभाकथिल्याजाण ॥ तेथीलस्वामीयेथेंयेउन ॥ कुबेरयमइंद्रवरुण ॥ सेवाकरि
तीनीचळें ॥ ३६ ॥ पंचभूतेंगुणत्रयें ॥ मूर्तिमंततेथेंपाहे ॥ पंचप्राणदशेंद्रियें ॥ मूर्तिमंततेठायीं ॥ ३७ ॥ च्यारीवेदश
स्त्रेंपुराणें ॥ मूर्तिमंतदेखिलींनयनें ॥ चौदाविद्यांचींतेथेंस्थानें ॥ चौसष्टिकळामूर्तिमंत ॥ ३८ ॥ ओंकारसहितमा
तृका ॥ सप्तकोटिमंत्रदेखा ॥ छंदरहस्येंबिजेंऐका ॥ मूर्तिमंततलेंपैं ॥ ३९ ॥ इतुक्यानानागोष्टीबोलून ॥ रंजविती

कमळासन॥ गायत्री मूर्तिमंतपूर्ण॥ वाचाजाणप्रत्यक्षपैं॥ ४०॥ दयाक्षमा आणिशांती॥ मूर्तिमंततेथेंवर्तती॥
दिवसपक्षअयनेंवसती॥ ऋतुसंवत्सरमूर्तिमंत॥ ४१॥ नक्षत्रेंवारतिथी॥ मासमुहूर्तघटिकावर्तती॥ कल्पमहा
कल्पवसती॥ मूर्तिमंततेथेंपैं॥ ४२॥ लक्ष्मीसहितनारायण॥ उमेसहितत्रिनयन॥ वसतीतेथेंअनुदिन॥ गजान
नसरस्वती॥ ४३॥ अठ्यासीसहस्रऋषेश्वर॥ जितुकेआकारा आलेसमग्र॥ तितकेतेथेंसाचार॥ मूर्तिमंतवर्तती॥
॥ ४४॥ परनारीमातेसमान॥ परद्रव्यजैसेंतृण॥ परनिंदानाहींमनींहुन॥ प्राणीसत्यलोकातेंजाती॥ ४५॥ जन्मादा
रभ्यसत्यवंत॥ वेदरतगायत्रीभक्त॥ सदाचारीशुचिष्मंत॥ ब्रह्मसभेवसतीते॥ ४६॥ जेपूर्णब्रह्मचारी॥ छळितां-
नयेतीक्रोधावरी॥ जेंवेचलेंपरोपकारीं॥ तेचिअधिकारीसभेचे॥ ४७॥ गोरक्षणींवेचितीप्राण॥ ब्राह्मणकार्यीदे
हदान॥ प्रयागींपावलेमरण॥ तेचितेथेंपावती॥ ४८॥ जेअनन्यगुरुभक्त॥ जेमातापित्यासीभजत॥ शांतदांतेवि
रक्त॥ सत्यलोकवासीते॥ ४९॥ साधुसंतब्राह्मण॥ यांसआदरेंदेअभ्युत्थान॥ परोपकारावेचितीधन॥ बैसती
जाणसभेसिते॥ ५०॥ अन्नसत्रउदकदान॥ दरिद्रीयाचेंघडवितीलग्न॥ सदासुखींहरिस्मरण॥ सत्यलोकींराहाती
॥ ५१॥ ऐशापांचहीसभावर्णुन॥ नारदपावलाअंतर्धान॥ धर्मह्मणेधन्यधन्य॥ नारदस्वामीजगद्गुरू॥ ५२॥ जन्मे
जयासीहेपावन॥ कथासांगेवैशंपायन॥ बरेंऐकसावधान॥ कथापुण्यश्लोकाची॥ ५३॥ कमलोद्भवनंदननारद
ऋषी॥ एकदांआलायमसभेसी॥ सूर्यसुतेंसन्मानुनीत्यासी॥ पूजाकेलीआदरें॥ ५४॥ तोंयमसभेसपंडुराज॥
नारदेंदेखिलातेजःपुंज॥ जोपुण्यपावोनीसहज॥ सुखरूपबैसलासे॥ ५५॥ पंडुराजह्मणेनारदासी॥ जरीस्वामी
मृत्युलोकाजासी॥ तरीशक्रमस्थांममपुत्रासी॥ इतुकीचआज्ञासांगिजे॥ ५६॥ जरीकरालराजसूययज्ञ॥ तरीइं
द्रसभेमीबैसेन॥ यमकरितोमजबहुमान॥ परिमाझेंमनविटेतें॥ ५७॥ येथेंजीवासिजाचणीहोत॥ कुंभिपाका-
दियातनाबहुत॥ तेणेंखेदपावतसदांचित्त॥ नघडेपरमार्थसाधन॥ ५८॥ जरिराजसूययज्ञपुत्रकरी॥ तरीपुरंदर

आपणासेजारीं ॥ ठावदेऊनिनिर्धारी ॥ नानापरीसुखदेत ॥ ५९ ॥ मगबोलेविरिंचीनंदन ॥ अवश्यमीधर्मासांगे
न ॥ तत्काळउठिलातेथुन ॥ वीणावाहूनिऊर्ध्वपंथें ॥ ६० ॥ मस्तकींशोभेजटाभार ॥ गौरवर्णजैसाशीतकर ॥ यज्ञो
पवीतरुळेसुंदर ॥ उत्तरीवस्त्रझळकतसे ॥ ६१ ॥ क्षीरसमुद्रींधूतलें ॥ तैसेंशुभ्रवस्त्रदिव्यशोभलें ॥ द्वादशटि
ळेसतेजभिरवले ॥ सिद्धपताकापदयुगलीं ॥ ६२ ॥ दिव्यगंधदिव्यसुमनीं ॥ जोसदापूजिजेदेवगणीं ॥ ऐसामहा
राजनारदमुनी ॥ शक्रप्रस्थाप्रतीआला ॥ ६३ ॥ धर्मेंदेखिलानारदमुनी ॥ साष्टांगेंनमिलाप्रेमेंकरुनी ॥ दिव्यसिंहा-
सनींबैसउनी ॥ षोडशोपचारेंपूजिला ॥ ६४ ॥ जोडूनियांदोनीकर ॥ धर्मउभाराहिलासमोर ॥ ह्मणेआजिमाझेंभा
ग्यथोर ॥ दृष्टींदेखिलानारदमुनी ॥ ६५ ॥ नारदह्मणेतेवेळां ॥ मजपंडुराजस्वर्गीं भेटला ॥ तेणेंनिरोपतुह्मासांगीत
ला ॥ राजसूययज्ञकरावेगीं ॥ ६६ ॥ त्यापुण्येंकरूनिसहज ॥ शक्रसेजारींबैसेपंडुराज ॥ तुह्मीपुत्रत्याचेतेजःपुंज
करावेंकाजएवढें ॥ ६७ ॥ ऐसेंधर्मरायाससांगोन ॥ ऊर्ध्वपंथेंगेलाब्रह्मनंदन ॥ धर्मराजबंधूंसबोलाऊन ॥ वि-
चारकरीतबैसले ॥ ६८ ॥ ह्मणेसफळनहोतांपितृवचन ॥ व्यर्थकायमगवांचून ॥ त्याचेंवृथागेलेंधर्मदान ॥ तपा
चरणकायसें ॥ ६९ ॥ वृथादवडितांपितृवचनार्थ ॥ तोपुत्रनव्हेप्रत्यक्षजंत ॥ तोवांचोनिभूभारव्यर्थ ॥ अनुपका
रीअभाग्य ॥ ७० ॥ पितृवचनेंउपजेत्रास ॥ सद्गुरुसींकरीद्वेष ॥ कुशब्दबोलेमातेस ॥ तोअल्पायुषीजाणिजे ७१
मुक्तदेखतांकरीउपहास ॥ साधूसीलावीसत्यदोष ॥ सद्गुरुहूनिह्मणेमीविशेष ॥ तोअल्पायुषीजाणिजे ७२
निंदीसदातीर्थक्षेत्रें ॥ असत्यमानीहरिहरचरित्रें ॥ सर्वदानिंदीवेदशास्त्रें ॥ तोअल्पायुषीजाणिजे ॥ ७३ ॥ काया
वाचामनें ॥ परपीडाहिंसाकरणें ॥ भूतद्रोहकरूंजाणे ॥ तोअल्पायुषीजाणिजे ॥ ७४ ॥ निंदीमहापुरुषांचेग्रंथ
मलतेंचकाढीकुतर्कार्थ ॥ भाग्यविद्यागर्वेंउन्मत्त ॥ तोअल्पायुषीजाणिजे ॥ ७५ ॥ श्रीहरीचेंगुणकीर्तन ॥ अव्हे
रीजोनकरीश्रवण ॥ टाकीविष्णुभक्तीउच्छेदुन ॥ त्यासीअधःपातस्फुटेना ॥ ७६ ॥ मीविष्णुभक्तमोठा ॥ ह्मणोनिनिं

दीजोंनीळकंठा॥ तपस्वीदेखोनिकरीचेष्टा॥त्यासीअधःपातसत्यहोय॥७७॥मीशिवभक्तनिर्मळ॥जोविष्णु
निंदाकरीचांडाळ॥नसतेंकुमार्गस्थापीजोखळ॥त्यासीअधःपातसुटेना॥७८॥होतांसाधूचाअपमान॥संतोष
वाटेमनातुन॥करीवृन्दाचेंमानखंडन॥त्यासीअधःपातसत्यहोय॥७९॥ सभेमाजीदुरुक्तिबोले॥जेणेंभल्या
चेंत्हृदयहालें॥जेमत्सरविषेंनेंमारवलें॥त्यांसीअधःपातसत्यहोय॥८०॥निर्नासिकदर्पणनपाहे॥तोंवरीचरू
पाचाअभिमानवाहे॥ह्मणेमाझेरूपासतुलनानये॥पृथ्वींतहीशोधितां॥८१॥मीएकजाणतासर्वज्ञ॥ऐसाध
डकेसदाअभिमान॥शतमूर्खाहूनिनीचपूर्ण॥कर्मकरीत्यातुल्य॥८२॥आतांअसोनहेबोल॥जोपितृवचनन-
करीसुफळ॥तोचिअभागीकेवळ॥ महाखळजाणावा॥८३॥नारदेंसांगीतलेंयेउन॥कींराजसूययज्ञकरावा
पूर्ण॥तोंबोलिलेभीमार्जुन॥उत्तमवचनातें॥८४॥पृथ्वीचेराजेजिंकून॥द्रव्यआणावेंबळेंकरून॥तरीसिद्धी
सपावेलसकळयज्ञ॥बहूतकठिनकार्यदिसे॥८५॥तरीद्वारकानाथश्रीकृष्णा॥जोआनकदुंदुभीचेंत्हृदयरत्न
तोजगद्गुरूआल्याविण॥कार्यसाधननव्हेची॥८६॥मगश्रीकृष्णासीदिव्यपत्र॥पाठवीधर्मपंडुपुत्र॥दूतधाडि
लेसत्वर॥द्वारकाधीशाबोलाऊ॥८७॥तोंजरासंधाचेबंदींनृपती॥ पडिलेबावीससहस्रछत्रपती॥त्यांहींपत्रेंलिहि
लींश्रीपती॥आह्मांसजगत्पतीसोडवीं॥८८॥ दोहींकडूनआलींपत्रें॥तींस्वयेंवाचिलींराजीवनेत्रें॥मगकाय
केलेंस्मरारिमित्रें॥तेंचरित्रपरिसापां॥८९॥मनींविचारीकमलोद्भवपिता॥आधींजावेंशक्रप्रस्था॥भेटोनियां
पंडुसुता॥कार्यतत्वतासाधावें॥९०॥ऐसेंबोलोनिकंसारी॥वेगेंआरूढलारथावरी॥पवनवेगेंतेअवसरीं॥श
क्रप्रस्थापातला॥९१॥पुढेंधावूनिधर्मराजें॥वंदिलीहरीचींचरणांबुजें॥वर्तमानजालेंसहजें॥सर्वकथिलेंहरी
प्रती॥९२॥स्वर्गींहूनिपंडुनृपती॥सांगोनिपाठवीनारदाहातीं॥ राजसूययज्ञकरानिश्चिती॥कैसीगतीकरावी
॥९३॥कर्ताकरवितापाहीं॥तुजवीणदुजानाहीं॥आह्मांरक्षिसीसर्वांठाईं॥उडीघालूनिनिजांगें॥९४॥याव

रीबोलेपद्माक्षीरमण॥ पृथ्वीचेराजेजिंकून॥ बळेंहिरोनिआणावेंधन॥ मगयज्ञहोईल॥९५॥ बावीससहस्त्र राजेजिंकिले॥ जरासंधेंबंदींघातले॥ त्यासमारिल्यावेगळें॥ यज्ञनव्हेतुमचा॥९६॥ जरासंधसतरावेळ॥ मथुरेसीधांवलापरमबळ॥ परीत्याचामरणकाळ॥ समीपअसेयावरी॥९७॥ धर्मह्मणेघननीळा॥ जरासंधकेसाजन्मला॥ तेकथामजदयाळा॥ किंचितकांहींसांगावी॥९८॥ हरिह्मणेऐकसुमती॥ मागधदेशींचानृपती॥ बृहद्रथमहामती॥ ज्याचीकीर्तीत्रिभुवनीं॥९९॥ काशीश्वराच्याकुमरी॥ जुवळ्याजाल्यादोघीउदरीं॥ सुलक्षणएककुमरी॥ गुणसुंदरीदुसरी॥१००॥ स्वयंवरींबृहद्रथेंजिंकोन॥ स्त्रियाकेल्यादोघीसगुण॥ परिनव्हेचिपुत्रसंतान॥ तेणेंउद्विग्नबृहद्रथ॥१॥ बहुतकेलेप्रयत्न॥ परिनव्हेचिपुत्रसंतान॥ स्त्रियासंगेंघेऊन॥ राजाहिंडेअरण्यांतरीं॥२॥ पूर्वपुण्येंकरून॥ अकस्मातजालेंऋषिदर्शन॥ चंडकौशिकनामाभिधान॥ तपोधनतेजस्वी॥३॥ नमस्कारघालीबृहद्रथ॥ नेत्रोदकेंचरणक्षालित॥ केशवसनेंपुसित॥ सद्गदितस्नेहेंसी॥४॥ आवडीदेखोननिर्मळ॥ बोलेचंडकौशिकस्नेहाळ॥ तुझेपुरवीनमनोरथसकळ॥ मागकांहींयेवेळे॥५॥ बृहद्रथबोलेवचन॥ पोटींनाहींपुत्रसंतान॥ बळाद्भुतकीर्तिसंपूर्ण॥ करीप्रकाशऋषिवर्या॥६॥ ऋषिबोलेआनंदोन॥ तुजहोईलपुत्रसंतान॥ बळाद्भुतकीर्तिसंपूर्ण॥ पृथ्वीमाजीजयाची॥७॥ आम्रछायेऋषिबैसला॥ तोंपक्कफळपडिलेंतेवेळां॥ वायुपक्षियेंदकालाविला॥ नाहींत्यासीतत्वता॥८॥ उचलोनिहृपाकर॥ प्रसाददेतऋषीश्वर॥ तुजहोईलदिव्यपुत्र॥ देईंस्त्रियांसभक्षावया॥९॥ प्रसादघेऊनिनमनकरित॥ परतोनस्वस्थळासीयेत॥ दोघीस्त्रियांचीभीडबहुत॥ फळदेतचिरूनी॥१०॥ अर्धअर्धभागदिधला॥ दोघींसीगर्भसंभवजाहला॥ नवमासभरतांएकचिवेळां॥ प्रसूतजाहल्यादोघीही॥११॥ अर्धअर्धशरीरतेअवसरीं॥ जन्मतदोघींचेउदरीं॥ जैसेंकर्वतिलेंकरीं॥ उभेंचिसमसमान॥१२॥ दोघांसहीअसेप्राण॥ परि

बोलावयानाहींवदन॥मातानीत्द्दयपिटून॥शरीरेंधरणीटाकिलीं॥१३॥कपाळपिटितबृहद्रथ॥ह्मणेकर्मी
चीगतीविपरीत॥वस्त्रेंगुंडाळोनिगुप्त॥नगराबाहेरटाकिलीं॥१४॥निशाजालीअर्धनेमस्त॥तोंजरानिशा
चरीआलीतेथ॥तिणेंजोडोनिदोनीहात॥अभेदशरीरपैंकेलें॥१५॥जालेंअभेदवज्रशरीर॥बत्तीसलक्ष
णीराजकुमर॥टाहोफोडितांसत्वर॥स्नेहउपजलाजरेतें॥१६॥राक्षसीरूपपालटुनी॥जालीदिव्यनितंबि
नी॥रुदनस्वरऐकोनी॥राजाधांवोनितेथेंआला॥१७॥दोघीस्त्रियाधांवत॥पान्हास्तनींदोघांसफुटत॥
तोंदिव्यरूपजरातेथ॥खेळवीतबाळकासी॥१८॥शक्तिरूपिणीतेजरा॥ह्मणेबृहद्रथाराजेश्वरा॥पुत्रनेंई
आपुल्याघरा॥देत्येंवरातुजलागीं॥१९॥जरेनेंबाळजडिलाशरुद्ध॥नामठेविलेंजरासंध॥मीयेक्षणीदेविप्र
सिद्ध॥लोकसर्वपूजितीमातें॥२०॥माझेंचित्ररेखूनिभिंतीसी॥पूजावेंश्रावणमासींप्रतिवर्षी॥अपुत्रिका
स्त्रियांसी॥पुत्रहोतीलवरदानें॥२१॥पुत्रदेऊनिराजेश्वरा॥गुप्तजालीतेजरा॥स्त्रियांसमवेतमंदिरा॥प्र
वेशलाबृहद्रथ॥२२॥पुत्रोत्साहद्वादशदिवस॥लागलेमंगळतुरांचेघोष॥भांडारेंफोडूनविशेष॥धनेंव
सनेंवांटिती॥२३॥विप्रकरितीजातक॥तोंआलाऋषिकौशिक॥सामोरायेतनृपनायक॥मिरवतबहुस
न्मानें॥२४॥पूजाजालीयथोचित॥चंडकौशिकमगबोलत॥बृहद्रथातुझासुत॥जिंकीलसमस्तपृथ्वीतें॥
॥१२५॥नाटोपेविस्फुरांसुरां॥बंदीघालीलनृपवरां॥परिश्रीकृष्णासीद्वेषकरितांपुरा॥नाशपावेलतत्काळ
॥२६॥ऐसेंसांगोनिकौशिकऋषी॥गेलाआपुल्याआश्रमासी॥पुढेंथोरजालियाजरासंधासी॥पित्यानेंराज्य
दिधलें॥२७॥प्रधानासीनिरऊनसुत॥दोघीस्त्रियाघेऊनिबृहद्रथ॥तपकरूनअद्भुत॥स्वर्गसदनापावला
॥२८॥इकडेजरासंधसबळ॥पृथ्वीचेनृपजिंकिलेसकळ॥पांडवआणियादवकुळ॥एवढेंवेगळेंकरूनी॥२९
हाकंसाचाश्वशुर॥सत्रावेळघेऊनदळभार॥याणेंवेढिलेंमथुरापुर॥युद्धअपारजाहलें॥३०॥वरुणपाशघे

ऊनतेवेळां ॥ हलधरेंसत्रावेळधरिला ॥ मगकाळयवनास घेऊनआला ॥ भस्मजालातोहीपुढें ॥ ३१ ॥ या-
करितांधर्माजाण ॥ जरासंधाचेंजवळीमरण ॥ आलेंयासकायकारण ॥ राजसूययज्ञआरंभिला ॥ ३२ ॥ शिष्य
करूनभीमार्जुन ॥ गुरूजगद्गुरूहोउन ॥ सडेचत्रिवर्गनिघोन ॥ जातेजालेतेधवां ॥ ३३ ॥ चंद्रसूर्यहुताशन ॥ तैसेतेजस्वीतिघेजण ॥ देशमहानघाउल्लंघोन ॥ मागधपुरापातले ॥ ३४ ॥ दुर्गदांसळोनिबळें ॥ आडमार्गेंग्रामां-
तगेले ॥ तोंमहाद्वारींदेखिलें ॥ भेरीनिशाणअद्भुत ॥ ३५ ॥ समरींमारूनिदैत्य ॥ त्याचींचर्मेंकाढोनिलारित ॥ भेरी
तीनकेल्याअद्भुत ॥ शतयोजननादजाय ॥ ३६ ॥ तोनादऐकतांकानीं ॥ शत्रूभयाभीतसमरंगणीं ॥ गर्भत्या-
गितीशत्रुकामिनी ॥ नादध्वनीऐकतां ॥ ३७ ॥ धर्मानुजेंतेक्षणीं ॥ भेरीटाकिल्याफोडुनी ॥ पुढेंगंधमाळाविक्र-
यदेखोनी ॥ घेतहिरोनबळेंचि ॥ ३८ ॥ गंधचर्चुनीतिघेजणीं ॥ पुष्पमाळाकंठींघालुनी ॥ आडमार्गेंराजसदनीं ॥
प्रवेशलेतत्काळ ॥ ३९ ॥ यागसंपादुनीसमस्त ॥ जरासंधस्वस्थळींबैसत ॥ भोंवतेबहुतपंडित ॥ चर्चाकरितीया
गाच्या ॥ ४० ॥ तोंदेखिलेतिघेब्राह्मण ॥ जरासंधकरीत्यांसनमन ॥ तोंतेनबोलतीधरिलेंमौन ॥ आशीर्वचन
नदेती ॥ ४१ ॥ जरासंधाचेहोमशाळेंतजाऊन ॥ उगेचबसलेतिघेजण ॥ राजाह्मणेकेसेब्राह्मण ॥ कांहींचव
चननबोलती ॥ ४२ ॥ तिघांसकनकासनेंदेत ॥ मधुपर्कपूजाबोपित ॥ ह्मणतीपूजानेघेनिश्चित ॥ इच्छानसेकां
हींआह्मां ॥ ४३ ॥ उगेचबैसलेतटस्थ ॥ मध्यरात्रजालीतेथ ॥ राजाचकितपाहत ॥ नकळेमततिघांचें ॥ ४४ ॥
राजाह्मणेद्विजहोसांगा ॥ कायइच्छाअसेलतेंमागा ॥ हरिह्मणेयुद्धभिक्षादेईवेगा ॥ तिघांमधूनएकातें ॥
४५ ॥ जरासंधपाहेविलोकुन ॥ देखेगोंधाळीचेंचिन्ह ॥ ह्मणेहेनव्हेतब्राह्मण ॥ महाक्षत्रियआहेत ॥ ४६ ॥ जरासं
धबोलेवचन ॥ म्याभिक्षादिल्हीतुह्मालागुन ॥ परितुह्मीतिघेजण ॥ आहांकोणसांगातें ॥ ४७ ॥ ह्मणवितांभलेब्रा
ह्मण ॥ शस्त्रराजमार्गटाकुन ॥ नगरदुर्गदांसळून ॥ भेरीनिशाणफोडिलें ॥ ४८ ॥ आह्मीकेलेंनमन ॥ नाहींदिल्हें

आशीर्वचन ॥ कदापिनव्हेश्रेष्ठवर्ण ॥ वेषधारीदिसता ॥ ४९ ॥ कायकारणकल्पून ॥ येथेंआलांसांगावचन ॥ तुह्मां
मध्येंगुरुकोण ॥ बोलाकापट्यसागरहो ॥ ५० ॥ मगबोलेश्रीरंग ॥ जेआमुचेसरवेजिवलग ॥ त्यांच्याग्रामांतशुद्ध
मार्ग ॥ पाहोनियेतोंमहाद्वारें ॥ जेकांशत्रुदुर्जन ॥ विष्णुद्वेषीदुरात्मेपूर्ण ॥ त्यांचेंनगरदुर्गपाडुन ॥ आडमार्गेंप्र
वेशतों ॥ ५२ ॥ जरासंधबोलेउत्तर ॥ तुह्मांआह्मांकासयाचेंवैर ॥ मगबोलेयादवेंद्र ॥ ऐकद्वेषियादुर्जना ॥ ५३
सकळराजेकरूनबंदिस्थ ॥ जाळूंपाहसीहोमांत ॥ ऐसातूंहिंसकपतित ॥ तुजसींयुद्धकरूंआतां ॥ ५४ ॥ बावीस
सहस्त्रनृपती ॥ जेधर्मात्मेछत्रपती ॥ तेतूंजिंकोनिक्षिती ॥ बंदींघातलेदुर्जना ॥ ५५ ॥ ब्राह्मणदेखतांउपहा
सकरी ॥ साधुसंतांसीद्वेषधरी ॥ सद्गुरुवचनअव्हेरी ॥ तोचिवैरीआमुचा ॥ ५६ ॥ निंदिशीविष्णुचारित्रें ॥ अ
पमानिसीसत्पात्रें ॥ अपूज्यपूजिसीआदरें ॥ तूंचिवैरीआमुचा ॥ ५७ ॥ कमळाआणिचक्रपाणी ॥ भेदींइच्छि
तीधर्मसदनीं ॥ कार्पण्यलोभेंविघडीदोनी ॥ तोचिवैरीआमुचा ॥ ५८ ॥ भगवद्भक्ताचाद्वेषकरी ॥ वेदमर्यादा
जोअव्हेरी ॥ सर्वभूतींद्वेषधरी ॥ तोचिवैरीआमुचा ॥ ५९ ॥ युद्धासउठेवेगेंकरून ॥ नाहींतरीनेऊंबोढून ॥ या
ज्ञिकघेतीपशूचाप्राण ॥ तेविंचूर्णकरूंतुझें ॥ ६० ॥ ऐसेंबोलतांमुकुंद ॥ क्रोधावलाजरासंध ॥ ह्मणेहागोवळा
गोविंद ॥ पोळखिलामहाकपटी ॥ ६१ ॥ माझाकंसजामात ॥ कपटेंमारिलामथुरेंत ॥ काळयवननेऊनगुहेंत
भस्मकेलाकापट्यें ॥ ६२ ॥ हावोळखिलापार्थ ॥ हाभीमहोययथार्थ ॥ क्रोधेंजरासंधकांपत ॥ कायबोलततेंवे
ळे ॥ ६३ ॥ तरणीच्याकिरणावरीदेखा ॥ केंश्याचढतीपिपीलिका ॥ कल्पांविजमक्षिका ॥ गिळेलकेंसीनेणवे
॥ ६४ ॥ चढोनिप्रळयाग्नीच्याशिरीं ॥ पतंगजैसानृत्यकरी ॥ ऊर्णनाभीच्यातंतूभीतरीं ॥ महागजकेंसाबांधवे
॥ ६५ ॥ तृणपाशेंकरून ॥ केविंबांधिजेलपंचानन ॥ खगेंद्रासीआळीधरून ॥ केविनेईलआकाशा ॥ ६६ ॥ दी
पतेजेंकरून ॥ केविंआहळेलचंडकिरण ॥ तैसामीमहावीरजिंकून ॥ जयकैसापावेल ॥ ६७ ॥ जिंकिलेए-

थ्वीचे पार्थिव ॥ धरूनआणीनयादवसर्व ॥ मशकप्रायपांडव ॥ आणीनक्षणनलगतां ॥ ६८ ॥ हेपशुमाझियें
नयनीं ॥ बांधीनएकेंचिदावणी ॥ यज्ञामाजी घालोनी ॥ बळिदानअर्पीन ॥ ६९ ॥ सिंहाचियेदरीआंत ॥ निघे
आलांअकस्मात ॥ आतांजावयाकैंचापथ ॥ आलामृत्युजवळीतुह्मां ॥ ७० ॥ खद्योतआपलेंतेजपूर्ण ॥ दावी
कविगुरूलागुन ॥ मृगेंद्रापुढेंयेउन ॥ मार्जारींउड्डाणमांडिलें ॥ ७१ ॥ स्फज्ञानपंडितापुढें ॥ बोलावयाआलीमहा
मूढें ॥ जंबुकआपलेपवाडे ॥ व्याघ्रापुढेंदावितो ॥ ७२ ॥ वायसेंब्रिदेंबांधोन ॥ नारदापुढेंमांडिलेंगायन ॥ मूषक
बहुतमिळोन ॥ वासुकीसधरूंपातले ॥ ७३ ॥ तैसीआगळीककरून ॥ मजवरीआलेतिघेजण ॥ मंडूकजैसेउडो
न ॥ चंद्रासिपाडूंइच्छिती ॥ ७४ ॥ भवगजविदारककेसरी ॥ यावरीकायबोलतकंसारी ॥ तुझीसुकृतवातीनिर्धा
री ॥ सरलीआतांसर्वही ॥ ७५ ॥ आयुष्यतैलसरलेंपूर्ण ॥ भीमम्याधरिलाव्यजन ॥ प्राणज्योतीजाईलविझोन
समयजवळीपातला ॥ ७६ ॥ देहदीपपात्ररितें ॥ पडेलतेथेंपालथें ॥ हेंफळअपूर्वयेथें ॥ पावसीलतूंआतां ॥ ७७
वांचावेंऐसेंअसेलमनांत ॥ तरीबंदींचेराजेकरींमुक्त ॥ द्वेषसांडोनिसमस्त ॥ सुखेंराज्यींवर्ततूं ॥ ७८ ॥ आतां
नृपसोडीरेझडकरी ॥ नाहींतरींयुद्धदृढकरीं ॥ जरासंधह्मणेनिर्धारी ॥ कितीबोलसीगोवळ्या ॥ ७९ ॥ तुवांक
धींयुद्धकेलें ॥ कपटेंचिकंसासीमारिलें ॥ अर्जुनतरीबाळकोंवळें ॥ विद्यासिकतेंद्रोणाची ॥ ८० ॥ भीमकांहींनगे
लमजसीं ॥ तोहीजडबहुआहारेंआळसी ॥ आयुष्यसरलेंनिश्चयेंसी ॥ ह्मणोनिआलांचालत ॥ ८१ ॥ भीमह्मणे
ऊठमशका ॥ कळेलतुझाआतांआवाका ॥ जरासंधेंराज्यदेखा ॥ पुत्रसहदेवादिधलें ॥ ८२ ॥ प्रधानासीनिरवि
लासुत ॥ भीममांडलंगोटीदृढबांधित ॥ सिंहमागेंपुढेंनपाहत ॥ धांवेजैसागजावरी ॥ ८३ ॥ किरीटकाढूनदोघेज
णीं ॥ शिखागुंढीबांधिल्यावोढुनी ॥ भीमेंमस्तककृष्णाचरणीं ॥ ठेऊनिह्मणेयशदेईं ॥ ८४ ॥ कृतांताचीबैसेदांत
खिळी ॥ तैसीदोघांहींफोडिलीआरोळी ॥ जरासंधभीमबळी ॥ मिसळलेमल्लयुद्धा ॥ ८५ ॥ थडकाबळेंचिदेती ॥ ब

र्मकळा रगडोनि धरिती ॥ वज्रमुष्टी गुडघे हाणिती ॥ भिरकाविती एकमेकां ॥ ८६ ॥ जिह्वा ढुंनी पाडिती ॥ आंसडोनि बळें आपटिती ॥ कोंपर घाय हाणिती ॥ न्याहाळूनउमटे अंबरीं ॥ ८७ ॥ मुष्टिघाय वाजती सबळ ॥ दणाणती सप्तपाताळ ॥ शेषकूर्मवराह सकळ ॥ सांवरूनि धरिती धरा ॥ ८८ ॥ लत्ताप्रहाराचे घाय थोर ॥ दणाणीत वरिअंबर ॥ विमानें पळविती सुर ॥ दिशाकुंजर दचकती ॥ ८९ ॥ किंशुककफुलती वसंतकाळीं ॥ तैसे आरक्त दिसती ते वेळीं ॥ बापरे भीम महाबळी ॥ बोले वनमाळी क्षणाक्षणा ॥ ९० ॥ कार्तिकशुद्ध प्रतिपदादिनीं ॥ युद्ध मांडिलें दोहीं जणीं ॥ त्रयोदशी गेल्या क्रमोनी ॥ चतुर्दशीचे रात्रीस ॥ ९१ ॥ काडी चिरूनअच्युत ॥ भीमास दावी संकेत ॥ सांधा चिरीं त्वरित ॥ जरेनें जो सांधिला ॥ ९२ ॥ चिराचिरिजे करें ॥ तैसा उभा चिरिला वृकोदरें ॥ दोनी खंडें एकसरें ॥ भिरकाउनी दिधलीं ॥ ९३ ॥ परि पुढती मिळोन एक भेद ॥ उभा ठाकला जरासंध ॥ भीमार्जुन मुकुंद ॥ आश्चर्य करिती देखोनी ॥ ९४ ॥ मग वैकुंठपुरविलासी ॥ संकेत दाखवी भीमासी ॥ खंडें विषम टाकीं वेगेंसी ॥ न उठे पुढती कदाही ॥ ९५ ॥ घेऊनि खर्जूरिकापत्र ॥ चिरून दाखवी शतपत्रनेत्र ॥ भीमें युद्ध केलें एक प्रहर ॥ पुढती तें साचि चिरियेला ॥ ९६ ॥ विषम टाकितां जाणा ॥ जरासंध मुकला प्राणा ॥ सुमनसंभार ते चिक्षणा ॥ सुरवर तेव्हां वर्षिती ॥ ९७ ॥ भीमें फोडिली विजयहाक ॥ डळमळिले तीनी लोक ॥ पार्थ आणि द्वारकानायक ॥ प्रीती भेटती भीमातें ॥ ९८ ॥ कृष्णदृष्टी जालें मरण ॥ मागध पावला वैकुंठभुवन ॥ जरासंधाचें प्रेत बीभत्स पूर्ण ॥ नगरद्वारीं पडियेलें ॥ ९९ ॥ सहदेव पातला होऊन सद्गद ॥ स्नेहें आलिंगित मुकुंद ॥ ह्मणे जसा मज प्रऱ्हाद ॥ तैसा सुखी राहें तूं ॥ २०० ॥ तुजवरी येईल जें विघ्न ॥ तें मी निजांगें वारीन ॥ उत्तरक्रिया करी संपूर्ण ॥ पितयाची यथाविधी ॥ १ ॥ राजसूययज्ञालागीं पाहीं ॥ सखया तूं सत्वर येईं ॥ सहदेव हरीस ते समयीं ॥ अपार संपत्ती वोपित ॥ २ ॥ राजसूययज्ञ होऊं निउरे ॥ ऐसीं दिधलीं द्रव्यभांडारें ॥ नवरत्नांचे एकसरें ॥ पर्वत चि वोपिले ॥ ३ ॥ असो जरासंधाचा स्यंदन ॥ त्रिभुवनींना

६

हीं ऐसा अन्य ॥ त्यावरी बैसला रमारमण ॥ प्रचंडकिरण तेवि दिसे ॥ ४ ॥ पूर्वी विधावया वृत्रासुर ॥ सहस्त्राक्षा
सदेत श्रीधर ॥ शक्रें आपला प्राणमित्र ॥ ह्मणोनि दिधला बृहद्रथा ॥ ५ ॥ त्यावरी जरासंध बैसोन ॥ पृथ्वीचे भू
भुज जिंकोन ॥ विजयी जाला संपूर्ण ॥ युद्धबळें करूनियां ॥ ६ ॥ बंदींचे नृपते क्षणीं ॥ सोडवित चक्रपाणी ॥ ते
सद्गद होऊन लोटांगणीं ॥ शरण येती श्रीरंगा ॥ ७ ॥ रत्नपुष्पांजुळी घेउनी ॥ अर्पिते जाले कृष्णाचरणीं ॥ एकम
नकपदीं ठेउनी ॥ प्रक्षालिती नेत्रोदकें ॥ ८ ॥ प्राणदाति याइंदिरावरा ॥ जलदवर्णा जलजनेत्रा ॥ आज्ञा कांहीं
द्यावी मज किंकरा ॥ ते वंदूं सुकुटीं आतां ॥ ९ ॥ समस्त राजे संगें घेऊन ॥ निघती भीम कृष्णार्जुन ॥ शक्रप्रस्था-
स येऊन ॥ धर्मराजास भेटले ॥ १० ॥ प्रेमें साष्टांग नमस्कार ॥ धर्मासि घालिती नृपवर ॥ क्षेमालिंगनीं क्षीरा
ब्धिजावर ॥ संतोषवित युधिष्ठिरा ॥ ११ ॥ भीमार्जुनास धर्म ॥ भेटोनि बोले सप्रेम ॥ स्वामीमाझा सर्वोत्तम ॥ स
र्वही यश त्याचें ॥ १२ ॥ बंधमुक्त नृप पूर्ण ॥ धर्मास देती आलिंगन ॥ अपार द्रव्यसंभार आणुन ॥ प्रीतीनें पु
ढें वोपिती ॥ १३ ॥ पुढें यावें राजसूययज्ञा ॥ गौरऊन देत धर्म आज्ञा ॥ नमस्कारून जगन्मोहना ॥ रावस्वस्था
ना पावले ॥ १४ ॥ श्रीकृष्ण ह्मणे धर्मालागुन ॥ तुझे कुळदीप हे भीमार्जुन ॥ मागधसदनीं पाजळोन ॥ शत्रु
तम निरसिलें ॥ १५ ॥ कृपापल्लवें झांकून ॥ मागुतें आणिलें सांभाळून ॥ धर्म धरी दृढ चरण ॥ जालों धन्य तुझे-
नें कीं ॥ १६ ॥ हरि ह्मणे धर्मराया ॥ बंधु पाठवीं पृथ्वी जिंकावया ॥ उर्वी कामधेनू दोहूनियां ॥ करभार दुग्ध काढावें
॥ १७ ॥ आरंभावा राजसूययज्ञ ॥ मी सवेंचि येतों द्वारकेहुन ॥ वसुदेव देवकीचे चरण ॥ वंदूनियां झडकरी ॥ १८
पांडव घालिती लोटांगणा ॥ जगद्गुरूसि करिती प्रदक्षिणा ॥ जाहें न बोलवे वचना ॥ यावें लौकरी गोविंदा ॥ १९
पुढिले प्रसंगीं सुधारस ॥ वर्षेल स्वामी वेदव्यास ॥ ते वैशंपायन जनमेजयास ॥ निरोपित सप्रेमें ॥ २० ॥ संस्कृ
त इक्षुरस अपार ॥ त्याची प्राकृत हे साखर ॥ सुजन सकुमार सेवणार ॥ प्रेमरसीं मिळोनियां ॥ २१ ॥ ब्रह्मानंदा

पांडुरंगा ॥ श्रीधरहृदयशतपत्रभृंगा ॥ तुझीकीर्तीवंद्यत्रिजगा ॥ वर्णितांनसरेकल्पांतीं ॥ २२ ॥ महागंगाव्या
सभारत ॥ श्रीधरदीनतृषाक्रांत ॥ अवघीनप्राशवेअद्भुत ॥ अंजुळीनेंकिंचितघेतलें ॥ २३ ॥ तैसेंहेंसारनिव
डुन ॥ पांडवप्रतापगोडजीवन ॥ प्राशितांशीतळहोऊन ॥ ब्रह्मानंदजाहला ॥ २४ ॥ सुरसपांडवप्रतापग्रंथ
॥ सभापर्वव्यासभारत ॥ त्यांतीलसारांशयथार्थ ॥ षोडशाध्यायींकथिला ॥ २५ ॥ इतिश्रीपांडवप्रतापग्रं-
थ ॥ सभापर्वटीकाश्रीधरकृत ॥ सभावर्णनजरासंधप्राणांत ॥ नृपवरमोचनकथनकेलें ॥ २६ ॥ ॥ इ
तिश्रीपांडवप्रतापसभापर्वेषोडशोऽध्यायः १६ ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥ शुभंभवतु ॥
॥ ओवीसंख्या ॥ २२६ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥
॥ ॥ श्री ॥ ॥ श्री ॥ ॥ श्री ॥ ॥ श्री ॥ ॥ श्री ॥ ॥ श्री ॥ छ

श्रीगणेशायनमः॥ ॥श्रीकृष्णकृपेंपांडवसमर्थ॥अक्षयभांडारेंअक्षयरथ॥गांडीवचापअक्षयसत्य॥अक्ष
यतूणीरसर्वदा॥१॥यावरीमयासुरेंउचित॥सभादिधलीअद्भुत॥जरासंधमारिलाबळोन्मत्त॥पुरुषार्थतो
ठसावला॥२॥बावीससहस्त्रराजेसोडविले॥आपुलेकरोनिसंस्थापिले॥धर्मेंयावरीकायकेलें॥आज्ञापिले
चौघेबंधू॥३॥उत्तरदिशेजातअर्जुन॥सवेंदळसमुद्रघेऊन॥प्रतापकल्लोळसंपूर्ण॥उचंबळतब्रह्मांडीं॥
॥४॥कोणीराजेयुद्धकरिती॥सवेंचिमागुतीशरणयेती॥एकपहिलेचमित्रभूपती॥जरासंधाच्याबंदीचे
॥५॥देशोदेशींचाझाडासंपूर्ण॥घेतचालिलाश्वेतवाहन॥समुद्रनामाराजजिंकून॥अपारधनघेतलें॥६
त्याच्यासमागमेंघेतलाभार॥पुढेंदेखिलेंप्राग्ज्योतिषपूर॥नरकपुत्रभगदत्तवीर॥तीनदिवसांतजिंकिला
॥७॥कुंतळींचाराववृहत॥त्यासहीजिंकीवीरपार्थ॥तोपद्मरागरत्नेंवोपित॥शतकोटीपांडवा॥८॥सेनवींद
नामेंमहारथ॥स्वनामसुवर्चबहुत॥पर्वतवासीयेसमस्त॥मार्गतस्करजिंकिले॥९॥हिमाचळवोलांडू-
निसमस्त॥पुढेंजिंकीतचालिलापार्थ॥धनरत्नेंसुवर्णपर्वत॥असंख्यघेतकरभार॥१०॥पुरुषखंडहाटे
कदेश॥गोरक्षपर्वतींसुवर्णविशेष॥मानससरोवरींअतिप्रकाश॥रत्नखाणीदेखिल्या॥११॥जेथिंचापा
टवाहेशब्द॥तेजाणिजेशरयूप्रसिद्ध॥संख्याएकअर्बुद॥हस्तीभरलेसुरत्नीं॥१२॥गंधर्वदेशजिंकोन॥
नानादेशस्थानेंकठिण॥जेथेंनाहींमनुष्यागमन॥तेथेंअर्जुनपावला॥१३॥ज्याज्यादेशींधनघेतलें॥त्या
चेचहस्तेंशक्रप्रस्थापाठविलें॥अश्वगजरथभरिले॥पावतेकरीतधर्मातें॥१४॥एवंउत्तरदिशेप्रतिजिंको
न॥अपारवस्तूसामग्रीघेऊन॥धर्मरायापुढेंआणोन॥पार्थवीरसमर्पी॥१५॥भांडारेंभरलींसंपूर्ण॥नगरो
तनमायेधन॥शक्रप्रस्थाबाहेरनेऊन॥धनराशीठेविल्या॥१६॥पूर्वदिशेसभीमसेन॥देशजिंकीतचालि
लासंपूर्ण॥पांचाळपुरायेऊन॥नगराबाहेरउतरला॥१७॥द्रौपदरावप्रेमेंधांवला॥वृकोदरायेऊनभेटला॥

अपारकरभारदीधला॥सर्वेंनिघालासात्वनो॥१८॥गंडकीवोलांडूनजात॥विदेहभेटलामिथुळानाथ॥पु
देंस्रुशर्माजिंकित॥अपारभेटनीनृपतीतें॥१९॥धनधेनूपुष्कळ॥ओदरेंभेटला शिशुपाळ॥तेरादिवसस
हदेव॥भीमसेनराहाविला॥२०॥बृहद्बळकोशलपतीसबळ॥जिंकीतजातम्लेंछमंडळ॥देऊनिधनपु-
ष्कळ॥पायवंदितीभीमाचे॥२१॥पर्वतवासीतस्कर॥वस्त्रेंरत्नेंदेतीअपार॥नानाशस्त्रजातीचेसंभार॥अ
ळंकारविचित्ररूपें॥२२॥मलयागरकृष्णागरचंदन॥केशरकस्तूरीजवादीपूर्ण॥पुष्कराजकचोरेजाण॥अ
पारदेतीभीमातें॥२३॥पूर्वदिशासर्वजिंकोन॥अपारसंपत्तीपर्वतघेऊन॥धर्मासभेटलाभीमसेन॥आनंदें
गगनपूर्णभरलें॥२४॥दक्षिणेसनिश्चित॥सहदेवपाठविलामाद्रीसुत॥पृतनाघेऊनअसंख्यात॥जाताजा
हलाबळाब्धी॥सुरसेनासजिंकून॥दंतवक्रासिदंडून॥कुंतिभोजेंभेटोन॥अपारधनदीधलें॥२६॥महास
कुमारसुमित्र॥युद्धींजिंकिलासाचार॥तेणेंधनराशीअपार॥सहदेवासअर्पिल्या॥२७॥भोजकोटनगरी
जाण॥रुक्माझुंझलाद्वयदिन॥मगदास्यत्वअंगीकारून॥पूजासंभारसमर्पी॥२८॥बहुतदेशजिंकीसह
देव॥धाकेंभेटतीसर्वहीराव॥किष्किंधावेटीबळार्णव॥युद्धअसंभाव्यजाहालें॥२९॥मैंदद्विविदवान्नर
॥केशधरणीयुद्धअपार॥जाहालेंमगवाळीभांडार॥फोडूनद्रव्यदेतसे॥३०॥शुक्रबृहस्पतीसमतेजाळ॥
रत्नेंमुक्तेंपुष्कळ॥पुढेंमहिष्मतीपूरसबळ॥नीळराज्यकरीतेथें॥३१॥जोप्रतिशक्रह्मणवित॥वन्हीजया
चाजामात॥त्यानगरप्रदेशींदळसमवेत॥येताजाहलासहदेव॥३२॥तोंअग्निक्षोभला अकस्मात॥सह
देवाचेंदळजाळित॥अश्वगजरथसमस्त॥हव्यवाटजाळीतसे॥३३॥संकटींपडलापंडुकुमर॥ह्मणेदूरि
राहिलाश्रीकरधर॥सव्यसाचीविद्यासागर॥वृकोदरहीदुरावला॥३४॥नसेदळभारकिंचित॥हुताशन·
आह्मासिझुंझ॥आतांवैश्वानरहोयशांत॥ऐसाप्रकारसमजेना॥३५॥तोंमहिष्मतीनगरींतत्वता॥चक्र्

वर्णींच्यायोषिता॥जारकर्मीपरमरता॥विधिनिषेधनसेचि॥३६॥राजानीळयागकरित॥फुंकितांकष्टलेबहु
त॥परिम्लपेटेचवायुसकल॥मगयेतराजकंन्या॥३७॥तेलावण्यसरितागुणराशी॥रूपासनतुळेरंभाउर्वशी॥
आंगींपरिमळअहर्निशी॥सुगंधासिशिमानसे॥३८॥तिणेंफुंकितांतेवेळीं॥मन्मथेंव्यापिलाज्वाळमाळी॥अ
नळतेव्हांविरहानळीं॥तमजाहलापरमतो॥३९॥ह्यवदनेंचुंबावें॥यादेसमहस्तेंआलिंगावें॥मगातोत्रिचरण
स्वभावें॥विप्रवेषेंप्रगटला॥४०॥रायासिह्मणेचत्वारिशृंग॥मजहेकन्यादेईंसवेग॥ऐकतांवचनअभंग॥भू
भुजतेव्हांअवश्यह्मणे॥४१॥मगजाहालेंपाणिग्रहण॥यावरीबोलेवसूआपण॥व्यभिचारकरितांनिर्दोष॥
पूर्ण॥करीनस्त्रियानगरींच्या॥४२॥जारकर्मअपवित्र॥केरळमत्याळदेशथोर॥दक्षिणदेशींसमुद्रतीर॥तेथें
चालतअद्यापीं॥४३॥श्वशुराप्रतबोलेअग्न॥परदळयेतांमींजाळीन॥मगघरजांवईकृशान॥नीळेंकरूनिठे
विला॥४४॥यालागींअग्निजाळित॥मगसहदेवहोऊनिशुचिर्भूत॥अग्नीचेंस्तवनकरित॥हस्तजोडोनितेध
वां॥४५॥चित्रभानुअनळबृहद्भानु॥कृशानज्वलनहुताशनु॥विभावसुचित्तहोत्रवायुनंदनु॥वैश्वानररु
ध्यावर्त्मा॥४६॥भूरितेजरोहिताश्वपावक॥मेषवाहनमरुतामित्रदेख॥चत्वारिशृंगत्रिपादअधोमुख॥द्वि
मूर्धानसप्तपाणी॥४७॥महाराजतूंजातवेद॥ज्वाळमाळीवेदप्रतिपाद्य॥सकळदेवमुखतूंवंद्य॥सागरजी
वनशोषकर्तूं॥४८॥मदनदहननयनीं॥वासकर्तातूंअग्नि॥विश्वजठरींराहोनी॥पालनकरिशीपवित्रा॥
४९॥तुजतृप्तकरावयापूर्ण॥आरंभिलाराजसूययज्ञ॥तुजदेवोनिआमंत्रण॥सामोग्रीजाणमेळवितों॥५०॥
ऐसेंऐकतांस्तवन॥प्रत्यक्षप्रगटलाहुताशन॥शीतळकेलेंसकळसैन्य॥क्षेमालिंगनदिधलेंतेव्हां॥५१॥
सहदेवासह्मणेवैश्वानर॥पार्थेंमजवरीकेलाउपकार॥खांडवदेऊनिसमग्र॥रोगमाझाहरियेला॥५२॥श्री
कृष्णभक्तांसिविघ्न॥मीनकरींगेलियाप्राण॥प्रल्हादम्यांरक्षिलापूर्ण॥लंकादहनींहनुमंत॥५३॥जेनकरि

२

नीहरिस्मरण॥ नायकनी त्याचें कीर्तन॥ नायकती स्वधर्माचरण॥ जाळीन सदन तयांचें॥ ५४॥ जें निंदक अभक्त
दुर्जन॥ न करिती माझें पूजन स्तवन॥ जे न करिती सूर्य आराधन॥ तयां जाळीन क्षणार्धें॥ ५५॥ काय करावें उत्तम
सदन॥ जेथें नाहीं ब्राह्मण भोजन॥ जेथें न होय हरिकीर्तन॥ नेमीं जाळीन क्षणार्धें॥ ५६॥ अतीत जाय निराश॥
माता पित्याचा करी द्वेष॥ गुरुदर्शनी जयास आळस॥ जाळीन सर्वस्व तयाचें॥ ५७॥ वडील बंधू माझा धर्म॥ त्या
सि न मानिती जे अधम॥ मी क्षोभोनि करीं भस्म॥ नृपनस्कर नागविती त्यां॥ ५८॥ यालागीं सहदेवा अवधारीं
मी तुमचा महाकारी॥ असो नीळराया ने अवसरीं॥ भेटविला सहदेवा॥ ५९॥ संपूर्ण होय राजसूय यज्ञ॥ ऐसें निवे
दिध लें धन॥ ह्मणे मी राजसूय यज्ञा येईन॥ श्रीकृष्ण चरण पाहावया॥ ६०॥ पुढें सहदेव चालिला बळें॥ सागर द्वीपीं
म्लेंछ मंडळें॥ पुरुषार्थें जिंकोन सकळें॥ करभार घेतसे॥ ६१॥ फिरंगाण हपशाण ताम्र॥ मंडळें जिंकिलीं सम
ग्र॥ निषाद राक्षस अपार॥ जिंकिले सबळ ने धवां॥ ६२॥ एककर चरण वसन॥ काळसुखें गुदहीन॥ जळचर प
ती तिमिंगळ जिंकोन॥ द्रव्य रत्नें घेतलीं॥ ६३॥ चैल्य मंडळ द्रावीड देश॥ कर्णाटक त्रिगूळ निःशेष॥ पत्र धाडि
लें लंकेस॥ बिभीषणास सहदेवें॥ ६४॥ बिभीषण ह्मणे दिवस धन्य॥ मग भेटला सत्वर येऊन॥ रावण भां-
डारींचीं रत्नें आणून॥ असंख्यात समर्पिलीं॥ नाना वस्तूंचे संभार॥ जे त्रिभुवनीं दुर्लभ साचार॥ राक्षस माथां
देऊनी अपार॥ शक्रप्रस्था धाडिले॥ ६६॥ सहदेव ह्मणे बिभीषणा॥ आपण यावें राजसूय यज्ञा॥ असो तयाची-
घेऊन आज्ञा॥ शक्रप्रस्था परतले॥ ६७॥ वंदोनियां धर्म नृपती॥ अर्पिली सकळ संपत्ती॥ यावरी नकूळ दळा-
प्रति॥ घेऊन पश्चिमे चालिला॥ ६८॥ नकुळाचा बळप्रताप॥ जिंकिले पश्चिमेचे भूप॥ मग येऊन द्वारकेसमी
प॥ नकुळ तेव्हां उतरला॥ ६९॥ दूता हातीं सत्वर॥ धर्मराज मुद्रांकित पत्र॥ द्वारके पाठवी माद्रीपुत्र॥ करभार-
आज्ञा देइजे॥ ७०॥ पत्र देखोन राजीवनेत्र॥ मस्तकीं वंदी जलजगात्र॥ सच्चिदानंद सर्वेश्वर॥ हर्षें निर्भर रजा-

हला॥७१॥इंदिरावररूपाघन॥कायबोलेहांसून॥मींधर्माचाअंकीनपूर्ण॥सर्वदेईनमजसहित॥७२॥करभा
रघारेनेऊन॥मींहीजाईनआणीकघेऊन॥धनरत्नांचेपर्वतपूर्ण॥पाठविलेनकुळासि॥७३॥तोलावण्यामृतसा
गर॥भक्तवल्लभकरुणाकर॥नकुळासयेऊनसत्वर॥नगराबाहेरभेटला॥७४॥येतांदेखोनतमालनील॥
सप्रेमहोऊनधांवेनकुळ॥दृढधरोनिचरणकमळ॥प्रेमभावेंवंदिला॥७५॥श्रीकृष्णचरणक्षालन॥केलेंने
त्रोदकेंकरून॥श्रीरंगेंतयाउचलोन॥हृदयींधरिलाआवडी॥७६॥प्रेमेंस्फुंदतनकुळ॥मींअन्यायीदासकेव
ळ॥तूंमाउलीस्नेहाळ॥अपराधघालींपोटांत॥७७॥मीअन्यायीथोरयादवेंद्रा॥पत्रमस्तकींकेलीमुद्रा॥भ·
क्तमानसचकोरचंद्रा॥तुजलागींपाठविलें॥७८॥महत्पुण्याचेपर्वत॥पूर्वींकेलेतुजप्रीत्यर्थ॥आम्हुचातूं रि-
णाइत॥अन्यायपोटींघालिशी॥७९॥श्रीरंगह्मणेतेवेळे॥तुह्मींमजभावबळेंजिंकिलें॥धर्मस्थापायाघेत
ले॥अवतारम्यांयुगायुगीं॥८०॥असोआज्ञाघेवोनत्वरित॥इंद्रप्रस्थाजायमाद्रीसुत॥दयासागरभगवंत॥
गुणवर्णीतयाचे॥८१॥खर्वअर्बुदपद्मशंख॥निधिचानिर्धीनकरवेलेख॥द्रव्यरत्नेंआणूनदेख॥धर्मराव·
संतोषविला॥८२॥जेजेदेशींचींमनुष्येंपाहीं॥तेतेधरोनिलवलाहीं॥संपत्तीवस्तूसर्वही॥घेऊनयेतीशक्र
प्रस्था॥८३॥संपूर्णजाहालादिग्विजय॥उदयपावलाप्रतापसूर्य॥शत्रुखद्योतसमुदाय॥तेजहीनदीसती
॥८४॥ऐसेकांहींदिवसगेले॥धर्मराजबंधूप्रतिबोले॥हेंकरभारद्रव्यआणिलें॥याचेंसार्थककरावें॥८५॥
पडिलेद्रव्याचेपर्वत॥सहस्रगजभरोनीवेंचिलेंनित्य॥तरिसहस्रवर्षेंपर्यंत॥द्रव्यनसरेसर्वथा॥८६॥स
र्वसामग्रीसिद्धजाहाली॥यागआरंभावायेकाळीं॥आप्तसुहृदसोयरेसकळी॥पाचारावेयज्ञातें॥८७॥-
पाचारावेब्राह्मणसमस्त॥जेशापानुग्रहेंसमर्थ॥वेदोनारायणसाक्षांत॥स्वानंदजयांचेह्रदयीं॥८८॥
सप्तपुऱ्यातीर्थेंअगाध॥तेथेंवसतीजेब्रह्मवृंद॥जेवेदांतज्ञानीब्रह्मानंद॥निजस्फुरवेंडुल्लती॥८९॥शा-

णवकुळींचे भूपाळ॥ आप्तसोयरे द्रुपदादि सकळ॥ विराटादि महानृपाळ॥ यज्ञालागीं पाचारा॥ ९०॥ द्वारकेस आधि पाठवावे दूत॥ जगद्वंद्य आमुचें कुळदैवत॥ तो स्वामी श्रीकृष्णनाथ॥ रुक्मिणीसहित पाचारा॥ ९१॥ द्रोणाचार्य कृपाचार्य॥ धृतराष्ट्र भीष्मादि महाआर्य॥ जे केवळ ज्ञानसूर्य॥ पाचारावे आदि येथें॥ ९२॥ दुर्योधनादि बंधू सर्व॥ पाचारावे आदरें कौरव॥ विदुर महाज्ञानी कृपार्णव॥ आधि येथें बोलावा॥ ९३॥ ऐशी आज्ञा देतां धर्मभूपती॥ लक्षानुलक्ष दूत धांवती॥ धर्माची आज्ञा सर्वांसी सांगती॥ नृप निघती वेगेंसीं॥ ९४॥ तों दैवें उदेलें अद्भुत॥ दूत न पाठवितां अकस्मात॥ निजभारेंसीं वैकुंठनाथ॥ नगराजवळी पातला॥ ९५॥ दूत धांवत आले धर्माजवळी॥ सांगती समीप आले वनमाळी॥ कुंजर भेरी गर्जती निराळीं॥ प्रतिशब्द न समाये॥ ९६॥ ऐकतां धर्मराज गहिंवरला॥ दूतस्यां नाहीं पाठविला॥ अंतर वोळखोन धांवला॥ स्वामी माझा मजलागीं॥ ९७॥ एक प्रेम धरितां हरिपायीं॥ मूळें वीण येतो लवलाहीं॥ माझ्या भाग्यासि अंत नाहीं॥ आला जांवई भीमकाचा॥ ९८॥ बंधूसहित धर्मराव॥ नगराबाहेर घेतली धांव॥ तों सेनेसहीत रमाधव॥ पंडूपुत्रें देखिला॥ ९९॥ सवें सोळा सहस्र कामिनी॥ मुख्य रुक्मिणी विश्वजननी॥ छपन्न कोटी यादवश्रेणी॥ तितक्यो कामिनी संगें असती॥ १००॥ साठ लक्ष कृष्णकुमर॥ कन्या स्नुषा आल्या समग्र॥ चौदा सहस्र भेरी प्रचंड थोर॥ गजपृष्ठीवरी धडकती॥ १॥ गज तुरंग पदाती रथ॥ अनुपम्य अळंकारमंडित॥ ध्वज अपार लखलखित॥ जेवि पुष्करीं सौदामिनी॥ २॥ मित्रासारिखीं मित्रपत्रें॥ चंद्रमंडळातुल्य झळकती छत्रें॥ नीळ आरक्त वर्णा विचित्रें॥ संख्येरहित दीसती॥ ३॥ कुंचे चामरें झळकती॥ गज महानादें किंकाटती॥ हिरे जडिले दंतोदंती॥ कर्णी डोलती मुक्तघोष॥ ४॥ रत्नमंडीत पाखरा सुरेख॥ घंटा गर्जती अधोमुख॥ मज लागमेते कृष्णउपासक॥ हरिनामें किंकाटती॥ ५॥ आतिरथी उद्भट जे वीर॥ पाठिसी चालती कृष्णकुमर॥ महारणपंडीत धनुर्धर॥ प्रचंड शूर हरीचे॥ ६॥ गजस्कंदीं बैसोन बंदीजन॥ हरिप्रताप वर्णिती ग

जोंन॥ पुढें कनकवेत्रधारी धांवोन॥ वाटकरिती चालावया॥ ७॥ श्रीकृष्ण भोंवते घनदाट ॥ आदळती मुकुटा
समुकुट॥ ऐसा द्वारकानाथ वरिष्ठ॥ धर्मरायें देखिला॥ ८॥ पांचही जणांस तेकाळीं॥ क्षेमदेत असे वनमाळी॥
धर्म हरीचे पदांघ्रिकमळीं॥ मस्तकठेवी आदरें॥ ९॥ हरि ह्मणे तूं दीक्षीत सहजीं॥ आह्मीं पूजा करावी तुझी॥ धर्में
श्रीरंग नगरा माजी॥ मिरवत मंदिरा आणिला॥ १०॥ चौदासहस्रमत्तवारण॥ आणिला अळंकार द्रव्य भरून॥
नानारत्नें वस्त्रें पंडूनंदन॥ द्वारकाधीशें पूजिला॥ ११॥ नोंसकळ देशींचे नृपवर॥ घेऊन पातले करभार॥ अन्याशीं
सहस्र ऋषेश्वर॥ शिष्यांसह पातले॥ १२॥ जे जरासंधाचे बंदीं पडले॥ बावीससहस्र राजे भले॥ तितके यज्ञपा
हों आले॥ संगें करभार घेऊनी॥ १३॥ धनाच्या राशी अपार॥ स्वर्गींहून पाठवी कुबेर॥ त्रिदशांसहित सुरेश्वर॥
विमानारूढ पाहात असे॥ १४॥ नवग्रह सुप्रसन्न॥ जयलाभ उभे करजोडून॥ श्रीरामभक्त बिभीषण॥ आनंदें पा-
हूं लागला॥ १५॥ सप्तद्वीपें छपन्न देश॥ नवखंडींचे नराधीश॥ भीष्मद्रोणादि कौरवेश॥ पुत्रांसहीत धृतराष्ट्र
॥ १६॥ जे जे आले भूभुजेश्वर॥ त्यांस धर्में जाऊनि समोर॥ बहु करोन आदर॥ इंद्रप्रस्था आणिले॥ १७॥ कोटी
सिल्पिकारीं अगोदर॥ चंदनसदनें निर्मिलीं विचित्र॥ सकळ ऋषि राजे यांसि पवित्र॥ तीं च सदनें निर्मिलीं॥ १८
धर्म ह्मणे सहदेवानें॥ धौम्यपुरोहिताचे अनुमतें॥ जे सामग्री लागे लयज्ञातें॥ सिद्ध करीं सत्वर॥ १९॥ मग भी
ष्म आणि जगन्मोहन॥ एकासनीं बैसोन॥ कृष्णपदीं मस्तक ठेऊन॥ धर्मराज विनवीतसे॥ २०॥ जें जें मनीं इ-
च्छिलें॥ तें तें रमाधवें पुरविलें॥ सकळ राजे भृत्य जाहाले॥ द्रव्य सांचलें असंभाव्य॥ २१॥ तरि येथें कार्यें वांटि
ल्यावीण॥ सिद्धी न पावे कदा यज्ञ॥ कवणा योग्य कवण कारण॥ तूं नारायण जाणशी॥ २२॥ आह्मीं नेणती लें
कुरें श्रीरंगा॥ आह्मास एक कार्य सांगा॥ कौंसांतका भक्तभवभंगा॥ आज्ञा करीं सत्वर॥ २३॥ मग बोले श्रीकर-
धर॥ मीं चतुर नव्हें नृपवर॥ नंदाचा गोरक्षक साचार॥ मज हा विचार समजेना॥ २४॥ यावरी अर्जुनाचा सारथी

होय॥ हेंतोंजाणेभुवनत्रय॥ धर्मेंधरिलेदृढपाय॥ तरिमीकायकरूंआतां॥२५॥ हरिह्मणेमीइतकेंकरीन॥ द्वि
जांचींचरणांबुजेंक्षालिन॥ उच्छिष्टपात्रेंकाढिन॥ इतकेंकारणमजद्यावें॥२६॥ ऋषींसलागतीलजेउपचार॥
तेविदुरेंद्यावेसमग्र॥ राजपूजेसचतुर॥ संजयशिष्यव्यासाचा॥२७॥ द्रव्यलागेलजेंअपार॥ तेंतेंपुरवावेंसम
ग्र॥ द्रोणआज्ञेद्रोणपुत्र॥ अश्वत्थामाकरोहें॥२८॥ अपारआल्याराजपृतना॥ त्यांसभक्ष्यभोज्याचीविचारणा॥
हेंकार्यसांगावेंदुःशासना॥ अवश्यह्मणेधर्मराव॥२९॥ ब्राह्मणांसदक्षणासहज॥ देईलकृपाचार्यमहाराज॥
जोप्रतापसूर्यतेजःपुंज॥ वेदज्ञआणिरणपंडित॥३०॥ राजेआणितीबहुधनें॥ तींविलोकिजेदुर्योधनें॥ मग
भांडारींसांठविजेरत्नें॥ अवश्यह्मणेपंडुपुत्र॥३१॥ यज्ञासयेतीलजींविघ्नें॥ तितकींनिवारावींअर्जुनें॥ ब्रा-
ह्मणाचीप्रार्थनाभीमसेनें॥ भोजनसमर्थकरावी॥३२॥ स्रकमनमाळागंधाक्षता॥ धूपदीपपरिमळद्रव्येंतत्व-
ता॥ हींअर्पावींसमस्तां॥ नकुळाकार्यसांगिजे॥३३॥ घृतमधूपंचामृतें॥ हींसहदेवेंवोढिजेएकचित्तें॥ न्यूनपू
र्णहोईलतेथें॥ गंगात्मजेंविलोकावें॥३४॥ विप्ररायांच्याबैसतीलपंक्तीं॥ त्यांसवाढीलद्रौपदीसती॥ अन्नपू
र्णाकेवळभगवति॥ करीलतृप्तीसमस्तां॥३५॥ प्रतिविंध्यादिराजकुमर॥ अत्यंतसुगंधकरूनीनीर॥ भोजनक
रितांवारंवार॥ पुरविजेत्यांनयार्नी॥३६॥ त्रयोदशगुणींविडेविचित्र॥ एकतांबूलसहस्रपत्र॥ हाधृष्टद्युम्न
सांगावाविचार॥ अवश्यह्मणेधर्मराज॥३७॥ धर्मरायातूंयजमान॥ भोंवतेघेऊनदिव्यब्राह्मण॥ यज्ञसांग
करींजाण॥ जेणेंत्रिभुवनधन्यह्मणे॥३८॥ ऋत्वीजनेमिलेचौघेजण॥ कमळोद्भवसुरव्यपूर्ण॥ दुजासत्यव-
तीहृदयरत्न॥ वेदाब्जसूर्यकेवळजो॥३९॥ तिजाब्रह्मनंदनवसिष्ठ॥ चौथायाज्ञवल्कीअतिवरिष्ठ॥ चौघेऋ
त्विजस्पष्ट॥ धर्मरायायोजीकां॥४०॥ राजाआणिभणगदीन॥ सर्वांसअन्नसमसमान॥ हेंमुख्यप्रभूचें
लक्षण॥ यज्ञपूर्णहोयतेणें॥४१॥ ऐशीआज्ञाघेऊनिसकळां॥ मगयज्ञासआरंभकेला॥ दीक्षाग्रहणीं

धर्मबैसला॥विप्रांसहीतसुखव्याजवळी॥४२॥एकसंवत्सरपर्यंत॥वसुधाराअखंडचालत॥जातवेदजा
हालातृप्त॥न्यूनपदार्थएकनसे॥४३॥विभागपावोनीसमस्त॥जयजयकारेंदेवगर्जत॥असंभाव्यपुष्प
वृष्टीहोत॥शक्रप्रस्थावरीपैं॥४४॥ऋषीराजेथोरलहान॥रत्नताटींकरितीभोजन॥षड्रसान्नेंजेवितीपू
र्ण॥जींदुर्लभसुरांतें॥४५॥तोंविप्रांसप्रार्थीभीमसेन॥बोलेपरमकठोरवचन॥ह्मणेजरीटाकालअन्न॥त
रिमीबांधीनशिरवेसी॥४६॥उदरापुरतेंमागोनघ्यावें॥पात्रीसांडितांबरवेंनव्हे॥ह्मणेमाझेस्वभावठावे॥तु
ह्मांअसतीकींसर्वही॥४७॥भीमधाकेंकरून॥ब्राह्मणजेवितीकिंचितअन्न॥विप्रगेलेशुष्कहोऊन॥तेंश्रीकृ
ष्णेंजाणितलें॥४८॥भीमासह्मणेजगन्मोहन॥गंधमादनऋषीपरमनिपुण॥त्याससत्वरआणीबोलाऊ
न॥अगत्यकारणअसेत्याचें॥४९॥भीमाचेंदाईअभिमान॥मींचएकबळेंआगळापूर्ण॥वृकोदरजातवे
गेंकरून॥गंधमादनाआणावया॥५०॥तोंवाटेसएकापर्वतांत॥वृद्धवेषधरूनिबहुत॥बैसलाहोताहनु
मंत॥पुच्छआडवेंटाकोनी॥५१॥त्यासीभीमबोलेक्रोधीं॥वानरापुच्छवाटेचेंकाढीं॥मजजाणेंआहेतांत
डी॥ऋषीदर्शनाकारणें॥५२॥तोंहनुमंतबोलेनम्रवचन॥भीमामजआलेंवृद्धपण॥हेंपुच्छजडजाहालें
पूर्ण॥आतांमाझेनउचलेना॥५३॥तरितूंबळियाभीमसेन॥एकीकडेठेवींउचलोन॥अवश्यह्मणेकुंतीनं
दन॥पुच्छउचलोनपाहातसे॥५४॥नवसहस्त्रवारणांचेबळ॥तेंभीमेंवेचिलेंसकळ॥तोंपुच्छनढळेअ
ढळ॥जैसाअचळपडियेला॥५५॥बळहतजाहलाभीमसेन॥गदगदांहांसेवायुनंदन॥ह्मणेधर्मानुजागर्व
सांडून॥कृष्णभजनीराहेंतूं॥५६॥मगभीमेंस्तवूनिहनुमंता॥ह्मणेतूंआवडसीरघुनाथा॥दशास्यबलहंता
॥सीताशोकहरणा॥५७॥निराभिमानभीमासपाहिलें॥मगपुच्छहनुमंतेंकाढिलें॥गंधमादनपर्वतातें वे
ळे॥धर्मानुजपातला॥५८॥दृष्टीदेखिलागंधमादन॥अंगकांतीदिव्यसुवर्ण॥परितयासूकराचेंवदन॥दु

गंधीपूर्णयेंनसे॥ ५९॥ भीमेंकेलानमस्कार॥ उभाराहिलाजोडोनिकर॥ ह्मणेतुह्मांसपाचारीयादवेंद्र॥ याग
होतसेधर्माघरीं॥ ६०॥ मगबोलेगंधमादन॥ हेंपरमदुर्गंधीसूकरवदन॥ मींतेथेंनयेचघेऊन॥ उपहासक
रितीलतेथें॥ ६१॥ भीमह्मणेमहाऋषी॥ तुझीकांतीस्कवर्णाऐशी॥ ऐसेंमुखतूंजङ्कावयासि॥ कायकारण-
सांगपां॥ ६२॥ येरूह्मणेऐकसावधान॥ पूर्वीमीहोतोंबहुसधन॥ सर्वदानेंकेलीपूर्ण॥ यथाविधिकरोनि-
यां॥ ६३॥ परिब्राह्मणाचाजायप्राण॥ ऐसेंबोललोंकठीणवचन॥ त्यालागींजाहालेंऐसेंवदन॥ पंडूनंदना
जाणपां॥ ६४॥ भीमातूंतरीसावधान॥ नकोबोलूंकठोरवचन॥ मनींदचकलाभीमसेन॥ आलापरतोनइं-
द्रप्रस्था॥ ६५॥ मगविप्रंप्रार्थीतसेतेव्हां॥ ह्मणेस्वामीसावकाशजेवा॥ नरुचेत्याचात्यागकरावा॥ प्रसाद
ठेवानिजपात्रीं॥ ६६॥ विप्रह्मणतीनवलझालें॥ यासहेगूणकोणीलाविलें॥ प्रार्थनाकरितांनम्रबोलें॥ आम्हा
चेंफळलेंभाग्यवाटे॥ ६७॥ असोधर्माचीसंपदाबहुत॥ देखतांदुर्योधनसंतापत॥ ह्मणेयाचासाहाकारीश्री
कृष्णनाथ॥ त्याचेनसर्वपूर्णहोय॥ ६८॥ श्रीकृष्णासह्मणेदुर्योधन॥ ह्मणेपांडवांवरीतुझेंमन॥ तूंएवढादेव
होऊन॥ समतानसेतुजठायीं॥ ६९॥ पांडवांकडेतुझीप्रीती॥ तैशीआह्मांकडेनाहींरीती॥ तुझेठायींद्वैतश्रीप
ती॥ नवलमजवाटतें॥ ७०॥ हरीह्मणेदुर्योधना॥ मींसमसमानअवघ्याजना॥ एकाअधीकएकाउणा॥ सर्व
थानाहींविचार॥ ७१॥ दरिद्रीराजाहोरंक॥ सर्वांसमानजैसाअर्क॥ किंवागंगेचेंउदक॥ सर्वांसहीसमजैसें॥
॥ ७२॥ कींसर्वांघटींसमानअंबर॥ कींसमानजैसासमीर॥ कींउगवतांरोहिणीवर॥ शीतळजैसासर्वांते॥ ७३
तैसामींदुर्योधनाअसेंजाण॥ परिजेकांकुटीळजन॥ तेसमविषमसंपूर्ण॥ माझेठायींभाविती॥ १७५॥ त्या
चीदावावयाप्रचीती॥ दुर्योधनासह्मणेयदुपती॥ एककारणअसेनिश्चिती॥ तेंतूंऐककुरुयोधना॥ ७६॥ इ-
तुकेहेबेसलेब्राह्मण॥ यांतएकसत्पात्रनिवडून॥ लवकरआणींउत्तमदान॥ देणेंअसेतयासी॥ ७७॥ दुर्यो

धनचालिलापाहावया॥ मगबोलाविलें धर्मराया॥ ह्मणेएकद्विजनष्टपाहोनियां॥ वेगेंआणिआतांचि॥ ७८॥ धर्में
जोंजोंपाहें ब्राह्मण॥ तोंकेवळदिसेसूर्यनारायण॥ महातपस्वीपुण्यपरायण॥ नष्टएकहीदिसेना॥ ७९॥ परतोन
आलाहरीपाशीं॥ ह्मणेअवघेचपुण्यराशी॥ अपवित्रगूणएकासी॥ नदिसेकोठेंसर्वथा॥ ८०॥ इकडेदुर्योधन
शोधित॥ अवघेंऋषिमंडळन्याहाळित॥ ह्मणेएकहीशिष्टनाहींयांत॥ दूषणेबहूदीसती॥ ८१॥ हरीजवळीआला
सत्वर॥ ह्मणेअवघेअपवित्र॥ एकहीनसेसत्पात्र॥ दोषीसर्वत्रदिसतीपैं॥ ८२॥ दुर्योधनासह्मणेजगजीवन॥ तु
झेंहृदयकापस्यमलिन॥ सदोषियानिर्दोषजाण॥ त्रिभुवनांतदिसेना॥ ८३॥ दुरात्माजोदुर्बुद्धिखळ॥ त्यादि
सेअवघेंअमंगळ॥ दृष्टीकोणीनदिसेनिर्मळ॥ पापेंसमूळवेष्टिला॥ ८४॥ वेश्येचियेनयनीं॥ सकळस्त्रिया
दिसतीजारिणी॥ तैसादुरात्मापापरवाणी॥ मलीनमनेंसर्वदा॥ ८५॥ धर्मासदिसतीजेपुण्यवंत॥ तेचतूज
दोषियेभासत॥ दुर्योधननबोलेतटस्थ॥ जोउन्मत्तविषयांध॥ ८६॥ असोएकवर्षपर्यंत॥ राजसूययज्ञउत्सा
हेंहोत॥ तोंनवलवर्तलेंतेथ॥ श्रोतींसावचित्तऐकावें॥ ८७॥ जान्हवीचेतिरींजाण॥ कोणीएकतपस्वीब्राह्म-
ण॥ अरण्यामाजीगुंफाबांधोन॥ स्त्रियेसहितराहातसे॥ ८८॥ परमतेजस्वीब्राह्मण॥ सदांकरीशिवउपासन॥
नित्यकैलासाहूनिविमान॥ संध्यासमयींयेतसे॥ ८९॥ नयाविमानींबैसोनिदोघे॥ कैलासाजातीसवेगें॥ शि
वार्चनकरूनिनिजांगें॥ परतोनियेतीआश्रमा॥ ९०॥ ऐसेंअसतांएकेकाळीं॥ दोघेहिंडतीवनस्थळीं॥ विमा-
नयावयाचीवेळजाहाली॥ पुष्पेंतोडितीसवेगें॥ ९१॥ तेंएकांतवनदेखोन॥ कामातुरजाहलाब्राह्मण॥ ह्मणे-
स्त्रियेसिभोगदान॥ देईंमजयेथेंचि॥ ९२॥ तंवतीह्मणेभ्रतारासि॥ चंडांशआलामध्यान्हासि॥ पुढेंजाणेंशि-
वपूजेसि॥ हेंगोष्टमानसींधरूंनका॥ ९३॥ तुह्मीसर्वशास्त्रींनिपुण॥ बरवेंपाहाविचारुन॥ तंवतोकामेंव्यापला
पूर्ण॥ घूर्णितनयनजाहले॥ ९४॥ अंतरभरलेंआनंगे॥ पंथसोडूनजाय आडमार्गें॥ तोंकाळसर्पेंडंखिलावे-

गें॥ प्राणगेलेतत्काळ॥ अचेतनपडलेंप्रेत॥ जवळीआलीस्त्रीधांवत॥ अट्टहास्येंशोककरित॥ तौंनारदतेथेंपा-
तला॥ ९६॥ नारदपुसेकायजाहालें॥ तिणेंजाहालेंवृत्तनिवेदिलें॥ नारदह्मणेकायकेलें॥ कांवचनमोडिलेंभ्र-
ताराचें॥ ९७॥ तंवतीह्मणेनारदमुनी॥ कांहींउपायसांगायेक्षणीं॥ येरूह्मणेशक्रप्रस्थाघेउनी॥ प्रेतजाईंसवे-
गें॥ ९८॥ यज्ञापाशींटाकींप्रेत॥ तेथेंमिळालेश्रेष्ठसमस्त॥ मीतूंजदावितोंशक्रप्रस्थ॥ उचलींप्रेतलवकरी॥ ९९॥
पुढेंचालेनारदमुनी॥ मागेंतीयेतप्रेतघेउनी॥ यज्ञमंडपांतआणुनी॥ अकस्मातटाकिलें॥ २००॥ ह्मणेसर्पदं-
शेंमेलाभ्रतार॥ कोणीउठवाजीसत्वर॥ तरीचयज्ञफळसाचार॥ ऐकतांयुधिष्ठिरघाबरला॥ १॥ ह्मणेयज्ञा-
सविघ्नवोढवलें॥ जेविंदुग्धांतसेंधवपडलें॥ स्वाहाकाररवोळंबले॥ हस्तआंखुडिलेब्राह्मणीं॥ २॥ धर्मझा-
लादीनवदन॥ समस्तांसविनवीकरजोडुन॥ कोणीतरीतपातेंवेंचून॥ उठवाशीघ्रप्रेतहें॥ ३॥ तटस्थपाह-
तीसभाजन॥ कोणीनबोलतीवचन॥ धर्मेंउदकेंभरलेनयन॥ श्रीकृष्णाकडेपाहातसे॥ ४॥ ह्मणेकैवारि-
याभक्तवत्सला॥ शेवटींहाअनर्थवोढवला॥ जैसाविदेशाहूनग्रामाआला॥ वेशींततनागविलातस्करीं॥ ५॥
हातासलागावेंजोंनिधान॥ तेथेंविवशीपडेयेऊन॥ मायबापतूंजगजीवन॥ तुझायज्ञसांभाळींतूं॥ ६॥
मीकिंकरतुझादीन॥ तूंसांभाळींआपुलायज्ञ॥ मीयज्ञकर्ताह्मणवीन॥ तरिजिव्हाझडोहे॥ ७॥ ऐकोन
धर्माचेंकरुणावचन॥ गहिंवरलेभक्तजन॥ शकुनिकौरवदुर्जन॥ हर्षपूर्णमनींत्यांचे॥ ८॥ खुणा-
वितीएकासएक॥ बरेंह्मणतीमांडलेंकौतुक॥ चांडाळदुरात्मेदेख॥ उणेंपाहातीभक्तांचें॥ ९॥ परिधर्मा-
चापाठिराखाथोर॥ वैकुंठपुरीचासकुमार॥ तोउणेंपडोंनेदीअणुमात्र॥ कमळनेत्रकमळापती॥ १०॥ मेघ-
गंभीरगिरागर्जोन॥ बोलेरुक्मिणीप्राणजीवन॥ मन्मथजनकजनार्दन॥ पांडवजनरक्षक॥ ११॥ ह्मणेवे-
चावेंकांहींजीतप॥ तरिउठेलहेंकुणप॥ यावरीविरिंचीचाबाप॥ कायकरिताजाहाला॥ १२॥ पीतवसनश्री

करधर ॥ सुरंगरुळे उत्तरी वस्त्र ॥ मंदहास्यें राजीवनेत्र ॥ प्रेता जवळी पातला ॥ १३ ॥ हातीं घेतली रत्नजडीत
झारी ॥ सव्य करें घोती सुरवावरी ॥ कृष्णद्वेषी दुराचारी ॥ हांसों लागले गदगदां ॥ १४ ॥ शिशुपाळादि कौरव दु-
र्जन ॥ ह्मणती हा काय आचरला पुण्य ॥ कोण तें तप केलें निर्वाण ॥ जन्मादारभ्य आजिवरि ॥ १५ ॥ महाकपटी
चोर जार ॥ गोवळ्यांचें उच्छिष्ट खाणार ॥ एक ह्मणती धराधीर ॥ कौतुक पाहा उगेचि ॥ १६ ॥ तों काय बोले मधु
कैटभारी ॥ जन्मावरी मी असें नब्रह्मचारी ॥ तों अव घे हांसती दुराचारी ॥ हस्ता सहस्त मेळऊनी ॥ १७ ॥ ब्रह्म-
चर्यसंकल्प करून ॥ ब्राह्मणाचे मुखीं जीवन ॥ जगज्जीवनें घालितां चरवडबडून ॥ उठिला विप्र ते वेळे ॥ १८ ॥
जाहाला एकचि जयजयकार ॥ देव वर्षती सुमनसंभार ॥ प्रेमें दाटला युधिष्ठिर ॥ भक्त अपार स्तविती तेव्हां
॥ १९ ॥ खळ दुर्जन ते वेळीं ॥ अधोवदनें पाहाती सकळी ॥ आनंदली भक्तमंडळी ॥ पिटिली टाळी सकळिकीं ॥-
२० ॥ असो उठविला जो ब्राह्मण ॥ धर्में केलें त्याचें पूजन ॥ स्त्रियेसहीत गौरवून ॥ वस्त्रें भूषणें अर्पिलीं ॥ २१ ॥ तों
यज्ञामधून एक जंबूक ॥ अकस्मात निघाला एकाएक ॥ कुंडवेदिकेवरी बैसोनि देख ॥ पुढील भविष्य वाखा-
णी ॥ २२ ॥ गर्जोनियां बोले शब्द ॥ एथें एकाचा होईल शिरछेद ॥ पुढें दिसतो मोटा विरोध ॥ कलह अगाध माजे
लपें ॥ २३ ॥ येथून तेरा वर्ष अवधारा ॥ निर्वैर होईल वसुंधरा ॥ ॥ जे नृप आले धर्ममंदिरा ॥ नितु के पुढें आटती ॥ २४
ऐसें तो जंबूक बोलिला ॥ तेथेंच मग अदृश्य झाला ॥ असो पुढें स्वाहाकार चालिला ॥ ब्राह्मण हस्तें करोनी ॥-
२२५ ॥ हें जैमिनी भारतीचें मत ॥ श्रोती पाहावें साव चित्त ॥ श्रीकृष्णें उठविलें प्रेत ॥ हें कथानक तेथींचें ॥ २६
कथा हे गोड ऐकिली ॥ ह्मणोनियां येथें योजिली ॥ पुढें शिशुपाळाचें शीर वनमाळी ॥ छेदील तें परिसा आ-
र्ता ॥ २७ ॥ पुढील अध्यायीं सुरस ॥ द्रौपदी वाढील समस्तांस ॥ तेथें एक कौतुक विशेष ॥ जगजीवन दाखव-
ील ॥ २८ ॥ पांडवप्रताप करितां श्रवण ॥ सर्वदा विजयी जे पूर्ण ॥ एक केवळ करितां ग्रंथावर्तन ॥ सकळ

कामनापुरतीहो॥ २९॥ संपत्तीविद्यापुत्रधन॥ कामीकपावतीकरितांश्रवण॥ हेंश्रीविठ्ठलेवरदान॥ पंढरीसी
दीधलें॥ ३०॥ पंढरीनगरींचयथार्थ॥ प्रगटलापांडवप्रतापग्रंथ॥ श्रवणेंसकळसंकटहरत॥ सत्यसत्यश्रोते-
हो॥ ३१॥ श्रीधरवरदापांडुरंगा॥ रुक्मिणीवल्लभात्हृत्पद्मभृंगा॥ पांडवरक्षकाभक्तभवभंगा॥ अव्ययनिःसं
गासुखाब्धि॥ ३२॥ सुरसपांडवप्रतापग्रंथ॥ सभापर्वव्यासभारत॥ त्यांतीलसारांशयथार्थ॥ सप्तदशाध्या
यींकथियेला॥ ३३॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु॥ ॥ छ॥ ॥ छ॥ ॥ छ॥ ॥

श्रीगणेशायनमः॥ बापरेधर्माचापाठिराखा॥ जोप्रेमळांचानिजसखा॥ कमळोद्भवाचाजनकदेखा॥ सारथीपा
र्थाचानिर्धारें॥ १॥ जोद्रौपदीचाकैवारी॥ नंदाघरींचाखिल्लारी॥ जोदुर्जनाचासंहारकरी॥ साहाकारीसाधूंचा
॥ २॥ जोक्षीराब्धितनयेचाप्रियकर॥ जोआनकदुंदुभीचाकुमर॥ जोयादवकुळभास्कर॥ मन्मथशत्रूध्या
यजया॥ ३॥ जोकाळाचाशासनकर्ता॥ जोब्रह्मादिकांसनिर्मिता॥ महामायेचानिजभर्ता॥ कर्ताहर्तापाळिता·
जो॥ ४॥ जोक्षीराब्धिचाजामात॥ धर्माचेघरींकेलेंअद्भुत॥ स्वसंकल्पेंउठविलेंप्रेत॥ गतकथार्थइतुकाजाह·
ला॥ ५॥ गजरेंहोतांराजसूययज्ञ॥ नित्यउत्तमान्नसंतर्पण॥ जेवितीऋत्वीजब्राह्मण॥ नामस्मरणेंगर्जती॥ ६
जेथेंपुरवितांभगवान॥ तेंकायवर्णूमींदिव्यान्न॥ त्याअन्नसुवासासंपूर्ण॥ सुरगणलाळघोंटिती॥ ७॥ अ
न्नसुवासासवेधोन॥ वसंतकरीप्रदक्षिण॥ नित्यजेवितीऋषिगण॥ परिवीटनयेसर्वथा॥ ८॥ जेसासोम·
कांताचाअचळ॥ तेसाभातशुभ्रनिर्मळ॥ जेविंसुवर्णनगदिसेपिंवळ॥ तैसेंवरान्नवाढिलें॥ ९॥ अमृता
सिआणितीउणें॥ ऐशींनिपजलींपक्वान्नें॥ विप्रजेवितांतिहरिस्मरणें॥ वारंवारगर्जती॥ १०॥ दधिमधुदुग्धघृतसरो
वर॥ शाखासुवासें भरितीअंबर॥ जेथेंपूर्णकर्ताइंदिरावर॥ तेथिंचीगोडीकायवर्णूं॥ ११॥ जेथेंवाढीतसेयाज्ञ
सेनी॥ जीश्रीकृष्णाचीप्रियभगिनी॥ जैशीझळकेसौदामिनी॥ तैशीवाढीचपळत्वें॥ १२॥ अन्नेंवाढितांनिवा·
डें॥ उभयहस्तींचेंझळकतीचुडे॥ जेवित्यावरीउजेडपडे॥ दिव्यरूपडेंद्रौपदीचें॥ १३॥ सुंदरघनश्यामवर्ण॥ ह्मणो
नद्रौपदीसह्मणतीकृष्णा॥ जीसुभद्रेहूनआवडेजगजीवना॥ पूर्णअपर्णाअवतरली॥ १४॥ विशाळभाळपद्मनेत्री॥
सुहास्यवदनाचारुगात्री॥ जेद्रुपदराजपुत्री॥ ख्यातीजिचीत्रिभुवनीं॥ १५॥ कोशकोशपर्यंत॥ जीचाआंगींचासुवास॥
धांवत॥ बोलतां दंतझळकत॥ वाटेविखुरतरत्नवाणी॥ १६॥ ऐशीकेवळतेंअंनपूर्णा॥ सदांअन्नवा
दीब्राह्मणा॥ जीचेकरपात्रींचाअन्ना॥ तुटीनसेकस्पांतीं॥ १७॥ द्रौपदीचपळत्ववाढित॥ तेंधर्मश्रीकृ

ष्णाविलोकित॥ कृष्णरंगेंरंगलीसत्य॥ श्रमकल्पांतीनबाधी॥१८॥ लक्षानुलक्षजेविती ब्राह्मण॥ कृ-
ष्णाएकलीवाढीआपण॥ परिघडीकृष्णवदन॥ विलोकीपरतोनसप्रेमें॥१९॥ त्याहाळूनपाहेहरिरूप
स्फुरेरव॥ तोंस्वेदेंडोरलासुरवमृगांक॥ मृगमदतिलककस्तुवासिक॥ घर्मेंकरोनीभिजलासे॥२०॥ स्फुरंग-
विराजेपीतांबर॥ गळांडोळलीमुक्तहार॥ कौस्तुभतेजेंअंबर॥ परिपूर्णकोंदलें॥ २१॥ जोगोपीमानस
राजहंस॥ जोस्वानंदक्षीरसागरविलास॥ जगद्वंद्यपुराणपुरुष॥ तोयाज्ञसेनीविलोकी॥२२॥ जेंवैकुंठीचें
निधान॥ जेंजलजोद्भवाचेंदेवनार्चन॥ जेंसनकादिकांचेंहृदयरत्न॥ निजठेवणेंस्मरारीचें॥२३॥ जोभक्त-
पाळकदिनबंधू॥ त्याचाविलोकूनवदनेंदु॥ पुढेंवाढितांब्रह्मानंदु॥ हृदयींनमायेद्रौपदीच्या॥ २४॥ ब्राह्म
णजेऊनऊठती॥ सर्वेचनृपांच्याबैसतीपंक्ती॥ दुर्योधनादिकौरवदुर्मती॥ तेहीबैसलेभोजना॥२५॥ पांड-
वआणिजगत्पती॥ इतकेचभागेंराहाती॥ वरकडबैसतीएकपंक्ती॥ जेवावयाकारणें॥२६॥ वाढावयाल
गींपुढती॥ सरसावलीद्रौपदीसती॥ जैसामेघवोसरोनिमागुती॥ वर्षावकरीअद्भुत॥ २७॥ कींवदनींश-
ब्दनिघतीअमित॥ त्यांचाजेसानकळेअंत॥ तैशीद्रौपदीवाढित॥ परिअन्ननसरेपात्रींचें॥२८॥ कींअद्भुत
क्षीरसागरीं॥ येतीलहरियावरीलहरी॥ तैशीद्रुपदराजकुमारी॥ उदावाकरीदुसन्यानें॥२९॥ जैशाजल-
दाचियाधारा॥ वर्षतीनकळतीअपारा॥ तैशीनेकृष्णासुंदरा॥ वाढीपात्रेंअसंख्य॥३०॥ परिक्षणाक्षणाप
रतोन॥ विलोकीजगज्जीवनाचेंवदन॥ तोंआंगींचीउटीघर्मेंकरून॥ ढायींढायींपुसलीसे॥३१॥ भक्तांचेजे
कांकष्टसर्व॥ आपणआंगेंसोसीरमाधव॥ उणेंपडोंनेदीकेशव॥ जोदयार्णवजगदात्मा॥ ३२॥ स्फुरवरू-
पवाढीद्रौपदी॥ श्रमकदांआंगींनबाधी॥ तेश्रमसोशीकृष्णाकृपानिधी॥ जोभवाब्धीतारकपें॥ ३३॥ असो
द्रौपदीणहेमागुती॥ तोंअनुपम्यदिसेकृष्णमूर्ती॥ ज्याचीत्रिभुवनींअगाधकीर्ति॥ वर्णितांनेतिह्मणतीवे-

द॥३४॥ ब्रह्मींचेंतेजगोळाहोऊन॥तेंकृष्णारूपवोतलेंसगुण॥सच्चिदानंदतनूपूर्ण॥भक्तजनप्रतिपाक
क॥३५॥ऐसेंवादितांद्रौपदीस॥कायबोलेजगन्निवास॥बाईआजबहूभागलीस॥प्राणसरवेद्रौपदीनूं
॥३६॥मगपृष्ठीवरूनहाथ॥उतरीकमळोद्भवाचातात॥तोंद्रौपदीसआनंदबहुत॥मनामाजीनसांठवे॥
३७॥परतोनपाहेहरिरूपसगुण॥किरीटकुंडलेंमंडीतपूर्ण॥सरळनासीकआकर्णनयन॥अतिसुंदरस्म
हास्य॥३८॥सुगुटाभोंवतादाटलाघर्म॥देरवतांद्रौपदीझालीसप्रेम॥ह्मणेमजलागीपरब्रह्म॥बहूश्रम
पावतसे॥३९॥मीकायहोऊंउतराई॥माझेसांवळेकृष्णाबाई॥ऐसेंबोलतांतेसमयीं॥सद्गदजाहलीया-
ज्ञसेनी॥४०॥प्रेमेंकरोनिआंगफुगत॥दोनीबाहूतटतटित॥बिरडेंसुटलेंअकस्मात॥कौरवपंक्तीतवा-
दितां॥४१॥पल्लवजाहलाविगलित॥वक्षस्थळउघडेंपडत॥हातआकर्षोनकृष्णातेथ॥घाबरीपाहे
चहूंकडे॥४२॥शकुनीदुर्योधनकर्ण॥एकासएकदावितीखुण॥नानाविनोददुर्जन॥करितेझालेतेधवां
॥४३॥लगबगकरितीअवघे॥एकासारिरवेंएकनमागे॥एकह्मणेयेथेंउभीकांगे॥अन्नआणिवेगेंपें॥
४४॥एकह्मणतीउदासकळ॥आजदिसेअन्नाचादुष्काळ॥परमलाजलीवेल्हाळ॥मुरवकमळकोमा
इलें॥४५॥नेत्रींवाहतीअश्रुधारा॥भोंवतीवासपाहेसुंदरा॥ह्मणेश्रीरंगायादवेंद्रा॥तुजकायहेंनकळे
चि॥४६॥तोंहाकफोडितीअवघेजण॥अन्नपदार्थमागतीभिन्न॥जेसेंसहस्रव्याघ्रींकरितांगर्जन॥
हरिणीचाप्राणजाऊंपाहे॥४७॥कींआक्रंदतांतान्हेंबाळक॥त्यासताडितीसहस्रवृश्चीक॥कींक्षतदे-
रवोनिकाक॥उकरायासधांवती॥४८॥चोहटापडलेंअन्न॥तेंदेरवूनधांवतीश्वान॥तेसेतेदुष्टदुर्जन॥न-
सतेंचिजाणमागती॥४९॥येकह्मणतीभातआणि॥येकह्मणतीआजहरिदिनी॥येकह्मणेहोएकावहिनी॥
तुह्मांकष्टदोनपडत॥५०॥वृक्षावरीथडकाहाणितां॥डाहाळयाडळमळतीसमस्ता॥एकेकर्दळीसपंचगज

भीडतां ॥ मगतिची अवस्था केंशी उरे ॥ ५१ ॥ तेसे रजनीमाजी तत्वता ॥ तुह्मी पांचासी स्फुरत युद्ध करितां ॥ गात्रें दि
लावली पाहातां ॥ एक डोलवोन माथा होय ह्मणती ॥ ५२ ॥ ऐसें संकट देखोन ॥ परतोन विलोकी हरीचें वदन ॥ ह्मणे
कृष्णा लपावयास दन ॥ तुजवांचोन कोठें नसे ॥ ५३ ॥ नेच दुरात्मे पापमती ॥ जेस द्रकांचें उणें पाहाती ॥ द्रौपदी
ससारद्यजगत्पती ॥ ह्मणोना भीयाज्ञसेनी ॥ ५४ ॥ तों यादवेंद्र मनमोहन ॥ द्रौपदीचे अंतरीं प्रवेशोन ॥ भुजांव
रीभुजा निर्माण ॥ करिता जाहला ते वेळीं ॥ ५५ ॥ बिरडें घालोनि सत्वर ॥ सवेंच सरसाविला पदर ॥ टवटवला मु
खचंद्र ॥ द्रौपदीचा तेधवां ॥ ५६ ॥ बाप भक्तवत्सल कृपानिधी ॥ पाहा हो चतुर्भुज केली द्रौपदी ॥ । दुर्जन जे कां मंद
बुद्धी ॥ अधोवदनें पाहाती ॥ ५७ ॥ द्रौपदी आणि श्रीकृष्ण ॥ पात्रोपात्रीं दिसती भिन्न ॥ जें जयास पाहिजे
अन्न ॥ तें तें तयास वाढित ॥ ५८ ॥ उगवतां जैसा दिनकर ॥ लाजोन पळे अंधार ॥ कीं विष्णुसहस्त्रनामें दोषसं
हार ॥ होय जैसा ये कायेकीं ॥ ५९ ॥ कीं मस्तकीं उर्वी धरितां ॥ सर्षपप्राय भोगिनाथा ॥ कीं वातात्मजें द्रोणागि
री आणितां ॥ श्रम सहसा न बाधे ॥ ६० ॥ तैसें द्रौपदीस वाटे जाण ॥ ह्मणे कित्ती मागतील दुर्जन ॥ हें त्रिभुवन सं
पूर्ण ॥ भोजन घालीन एकदां ॥ ६१ ॥ शुंभ निशुंभ मारुनी ॥ यशस्वी जाहाली भवानी ॥ तेशी विजयी याज्ञ
सेनी ॥ कौरवगर्व निवटोनियां ॥ ६२ ॥ जान्हवीचा होतां स्पर्श ॥ एकदांच सर्व हरती दोष ॥ कीं हरिकीर्तन ऐक
तां भूतांस ॥ होऊन त्रास पळती पैं ॥ ६३ ॥ जो जो मागे कोणी पदार्थ ॥ त्यापुढें टाकी अन्नपर्वत ॥ भीमास क्रोध आ
ला बहुत ॥ काय बोलत दुर्जनां तें ॥ ६४ ॥ ह्मणे अन्न टाकितां निश्चिती ॥ शिरवा उपडून देईन हातीं ॥ सकळ दुरा
त्मे खालीं पाहाती ॥ प्रत्योत्तर न देती कोणीही ॥ ६५ ॥ अंतरमलीन तें चंडभुवन ॥ लज्जी बुडाले अवघे दुर्जन ॥ भी
माचा क्रोध देखोन ॥ कोणी वचन न बोलती ॥ ६६ ॥ कीं दिव्य देतां खोटा होय ॥ कीं समरीं पावे पराजय ॥ तैसे दुरा
त्मे यादवराय ॥ अपमानीत तेधवां ॥ ६७ ॥ कीं तस्करास मार मारुनी ॥ शुष्क काष्ठं जोडिती चरणीं ॥ तैसे कौरव

दिसतीतेक्षणी॥ नेजहीनदुरात्में॥६८॥ भक्तबोलतीतेवेळीं॥ धन्यहे कृष्णावेल्हाळी॥ कृष्णेंआपणाचऐशीके
ली॥ चतुर्भुजप्रत्यक्ष॥६९॥ आंचऊनआलेसमस्त॥ गंगात्मजतयांसह्मणत॥ अरेहे देवीअद्भुत॥ नमस्कारा
इयेनें॥ ७०॥ हेमंगळदायकभवानी॥ इयेतेंवरमागाप्रार्थुनी॥ हेकोपलियानिर्वाणीं॥ कुळक्षयकरील॥ ७१
इचेठाईंकल्पितांविपरीत॥ नरिभस्मव्हालआतांसमस्त॥ परितेनऐकतीउन्मत्त॥ महापापीविषयांधा॥ ७२॥
असोद्रौपदीगेलीघरांत॥ मागेंगेलावैकुंठनाथ॥ पायींमिठीतेव्हांघालिन॥ प्रेमेंस्फुंदतद्रौपदी॥ ७३॥ कुंती
पांडवहीतेवेळे॥ सदनामाजींप्रवेशले॥ ह्मणतीश्रीरंगेमाउले॥ घोरवारिलेंसंकटआजि॥ ७४॥ धर्मह्मणेजग
न्नाथा॥ कोणतेउपकारआठऊंआतां॥ अन्नदातागुरुभयत्राता॥ तुजपरताअसेना॥ ७५॥ भीमआणिअर्जुन॥
स्फुंदस्फुंदोनिकरिती रुदन॥ त्यांसिंहृदयींधरूनमधुसूदन॥ करीसमाधानतयांचें॥ ७६॥ द्रौपदीसगाहिंवरु
नसांवरे॥ नेत्रींवाहतीजीवनझरे॥ ह्मणेश्रीकृष्णेत्रिभुवनसुंदरे॥ उपकारनविसरेंजन्मोजन्मीं॥ ७७॥ श्रीरं
गाचेकंठीं॥ कुंतीयेऊनघालीमिठी॥ ह्मणेकृपाळुवाजगजेठी॥ द्रौपदीससमजावीं॥ ७८॥ मगद्रौपदीसह्मणे
चक्रपाणी॥ वादितांभागलीसबहिणी॥ तूंसद्गुणरत्नाचीखाणी॥ प्राणाहूनआवडसी॥ ७९॥ मगद्रौपदी
बोलेवचन॥ मींजेथेंजन्मघेईन॥ तेथेंपाठिराखातूंश्रीकृष्णा॥ होयमाझाकेंवारी॥ ८०॥ असोअसाएकसंव
त्सर॥ राजसूययज्ञहोतथोर॥ नित्यकितीजेवितीविप्र॥ लेखानाहींतयातें॥ ८१॥ सकळांचींभोजनेंजाहल्या
वरी॥ मगपांडवांसहितपूतनारी॥ कुंतीद्रौपदीसुंदरी॥ पंक्तीबैसतीआठहीजणे॥ ८२॥ कृष्णपंक्तीभोज
न॥ ब्रह्मादिकांनघडेजाण॥ धन्यधन्यतेपंडूनंदन॥ जगज्जीवनवशज्यांतें॥ ८३॥ नित्यब्राह्मणाच्याहोतपं
क्ती॥ स्वयेंउच्छिष्टेंकाढीश्रीपती॥ ज्यासिवेदशास्त्रेंवाखाणिती॥ अगाधकीर्तीअनुपम्य॥ ८४॥ ठेऊनथो
रपणाचीप्रौढी॥ द्वारकाधीशपात्रेंकाढी॥ लाहेलाहेतांतडी॥ पुढतीपंक्तीबैसावया॥ ८५॥ उच्छिष्टेंकाढि॰

तांजगन्मोहन॥ ठायींठायींलेपलें अन्न॥ अन्नब्रह्मरूपमीसंपूर्ण॥ एकरूपदावीतसे॥ ८६॥ एकपंक्तील-
क्षब्राह्मण॥ ऐशाअभिनपंक्तीपूर्ण॥ कोटिसंख्याहोतीजाण॥ स्वर्गींघंटाएकदांवाजे॥ ८७॥ त्यावरूनकळे
गणित॥ मगधर्मराजसंतोषत॥ ह्मणेश्रीकृष्णातुजहोप्रीत्यर्थ॥ विश्वंभराविश्वेशा॥ ८८॥ तोमहोत्साहपा
हावयाजाण॥ तेथेंआलावेदव्यासनंदन॥ जोयोगियांमाजीमुकुटरत्न॥ चंडकीर्णदूसरा॥ ८९॥ कामक्रोधजे
णेंजिंकिले॥ रंभेनेंनानापरीछळिलें॥ परिनाहींचित्तचळलें॥ मनआकळिलेंजयानें॥ ९०॥ जोचिदंबरींचा-
निशाकर॥ कींअपरोक्षज्ञानाचासागर॥ कींशांतीचापूर्णआगर॥ शुकरूपेंटवटवला॥ ९१॥ असोयज्ञमंडप
द्वारींक्षणेक॥ उभाराहिलातोश्रीशुक॥ तोंमंडपघसणीहोनसेदेख॥ मार्गनदिसेजावया॥ ९२॥ श्रीशुकवि-
चारीमनांत॥ धर्मकेवळश्रीकृष्णभक्त॥ येथींचाप्रसादमजजरीप्राप्त॥ तरिसार्थकजन्माचें॥ ९३॥ श्रीकृष्णाजेथें
उच्छिष्टेंकादित॥ पडलेंपत्रावळीचेपर्वत॥ शुकयोगींद्रबैसोनितेथ॥ उच्छिष्टशितेंभक्षीतसे॥ ९४॥ मुखीं
घालितांएकग्रास॥ स्वर्गींघणघणाघंटाघोष॥ कदांनराहेआसमास॥ गजरविशेषेंजाहला॥ ९५॥ श्रीकृ-
ष्णासधर्मराजबोलत॥ हेंकायजीवर्तेंअद्भुत॥ घंटाघणघणतीकोणअर्थ॥ सांगास्वामीयादवेंद्रा॥ ९६॥ को
टीब्राह्मणजेवितां॥ एकनादहोयनत्वतां॥ आतांकदानराहेवाजतां॥ जगन्नाथामजसांगा॥ ९७॥ हरिह्मणे
येथेंतत्वतां॥ जेविलाअसेलब्रह्मवेत्ता॥ ब्रह्मविदांसिवंदितीमाथां॥ ब्रह्मादिकसहस्राक्ष॥ ९८॥ ब्राह्मण-
जेकांयातिमात्र॥ तेएकशतभरीसाचार॥ त्यातुल्यएकवेदज्ञविप्र॥ ग्रंथत्रयींज्यांचेंज्ञान॥ ९९॥ वेदज्ञाहोनि
शतगुणेंबहुत॥ जोवेदार्थकरणारपंडित॥ त्याहूनिअनुष्ठानींक्रियाबहुत॥ शतगुणेंआगळा॥ १००॥ अनु
ष्ठानीयाहूनशतगूणआगळा॥ एकइंद्रियजीतबोलिला॥ त्याशतगुणेंविष्णुभक्तसत्वाथिला॥ जोभेदर
हितनिर्मत्सर॥ १॥ त्याहूनशतगुणेंविशेषशुद्ध॥ एकजाणतोब्रह्मवृंद॥ ज्याचेदृष्टीसभेदाभेद॥ जनपददि

सेना॥ २॥ ऐसा ज्ञानियां तुझे घरीं॥ तृप्त झाला आज निर्धारीं॥ ऐसे चौघे जणया पृथ्वीवरी॥ ब्रह्मज्ञानी अद्भुत॥
॥ ३॥ कपिल याज्ञवल्की शुक॥ दत्तात्रय चौथा देख॥ जो परिपूर्ण ज्ञानार्क॥ अत्रितनय अवतरला॥ ४॥ धर्म हरीच
रण दृढ धरित॥ जो येथें झाला जी तृप्त॥ तो मज दाखवीं निश्चित॥ ह्मणोनि आळ घेतली॥ ५॥ मग धर्माचा धरोनि
हात॥ वेगें दोघे बाहेर येत॥ तों रूप पालटोनि व्यासकृत॥ वेगें वेंचित उच्छिष्ट शितें॥ ६॥ श्रीहरी ह्मणे धर्मा देख
हा व्यासपुत्र महाराज शुक॥ ऐकतां धर्में धांवोनि निःशंक॥ चरण धरिले तयाचे॥ ७॥ शुक मागें पाहे परतोन॥
तों उभा देखिला जगन्मोहन॥ दोघां जाहालें आलिंगन॥ प्रेमें करून सद्गद॥ ८॥ सवेंच धर्मास भेटला॥ धर्में शुका
चा हस्त धरिला॥ मंडपीं आणून पूजिला॥ षोडशोपचारें करूनी॥ ९॥ शुक देखतां च दृष्टी॥ आनंदल्या ऋषींच्या
कोटी॥ मग धर्म हातीं जगजेठी॥ पूजन करवी शुकाचें॥ १०॥ असो एक संवत्सर लोटला॥ राजसूय यज्ञ पूर्ण झाला॥
तेथींचा वर्णावया सोहळा॥ शेषही शक्य न से चि॥ ११॥ भीष्म निरोपी धर्मातें॥ अहेर अर्पा समस्तांतें॥ सकळ बैस-
ऊन मय सभेतें॥ तेथिचीं कौतुकें दाखवावीं॥ १२॥ असो राजसूय यज्ञा जे जे आले॥ तितुके सभेस आणिले॥ राजे ऋषी
बैसविले॥ ठायीं ठायीं सभास्थानीं॥ १३॥ धर्में अहेर सिद्ध केले॥ वस्त्राभरणाचे पर्वत पडिले॥ सुरत्नसिं
हासन मध्यें घातलें॥ अग्रपूजा करावया॥ १४॥ भीष्म ह्मणे धर्मराया॥ आचार्य ऋत्विज ऋषिवर्या॥ यथा योग्य-
पाहोनियां॥ पूजा समग्र समर्पीं॥ १५॥ पुरुषा लागीं सप्त भूषणें॥ तीन वस्त्रें कनकवर्णें॥ द्वादशांगीं अळंकार ले-
णें॥ स्त्रियांसि देणें तैसें चि॥ १६॥ अंतर्वसन बहिर्वसन॥ कंचुकी वेरणें प्रावर्ण॥ पंच वसनें संपूर्ण॥ स्त्रियांलागीं
देई कां॥ १७॥ तों धर्म ह्मणे कुरुनायका॥ माझिया जनका चिया जनका॥ अग्रपूजेचा अधिकार देखा॥ कोण मज
निरोपीं॥ १८॥ भीष्म ह्मणे पंडुसुता॥ यालागीं कृष्णाहून परता॥ हें ब्रह्मांड शोधितां॥ श्रेष्ठ नाहीं आणिक॥ १९॥ हा
जलजोद्भवाचा जनिता॥ अपर्णावर वंदी माथां॥ शक्राशक्रपद पाहतां॥ कृपेनें येणें दीधलें॥ २०॥ जो जगदंकुर मूळ

कंद॥जोत्रिभुवनमंदिरस्तंभअभेद॥जोविश्वंभरब्रह्मानंद॥याहूनथोरकोणअसे॥२१॥हृदयवैकुंठपीठाआंत॥
जेंविरिंचीचेंआराध्यदैवत॥अंतःकरणसांबळीनवाहात॥सनकादिकआवडी॥२२॥वेदपुराणेंषट्शास्त्र॥आग्र
हेंकरितीअर्थविचित्र॥तोहाचिजाणकोमळगात्र॥राजीवनेत्रश्रीकृष्ण॥२३॥स्वंपदतत्पदअसिपद॥याहूनवेग-
ळानूंशब्दबुद्ध॥वेदांतशास्त्रगर्जेअगाध॥तोहागोविंदवोळखवें॥२४॥मीमांसकस्थापितीकर्म॥ज्यालागींआच
रतीधर्म॥तोहाचिजाणपुरुषोत्तम॥पूर्णब्रह्मसर्वेश॥१२५॥नय्यायिकह्मणतीकर्ताईश्वर॥जीवासनकळेस्वरू
पअपार॥तोचिहाजाणश्रीकरधर॥पूर्णावतारपरमात्मा॥२६॥प्रकृतीपुरुषाचाऐक्यार्थ॥सांख्यशास्त्रअसेगर्जे
त॥तोहाक्षीराब्धिचाजामात॥लक्ष्मीसहीतअवतरला॥२७॥व्याकरणशास्त्रींसप्तविभक्ति॥नानासूत्रेंनाम
साधिती॥तोहाकंसांतकयदुपती॥अमूर्तमूर्तित्वासआला॥२८॥अष्टांगयोगादिसाधन॥पातांजळीं-
हेंचिकथन॥तोयोगसाधूनचरण॥याचेचपावावेंनिर्धारें॥२९॥शैवयासिह्मणतीशिव॥वैष्णवभाविती-
माधव॥सौरह्मणतीसवितास्वयमेव॥तोहाकेशवजाणपां॥३०॥गाणपत्यह्मणतीगणेश॥तोहाजाणद्वा
रकाधीश॥शाक्तह्मणतीशक्तिविशेष॥मायाविलासहरिदाचा॥३१॥संतांचेंहृदयींजोजीवन॥समरधीरदु-
ष्टभंजन॥तुमचेदृष्टीससोयरापूर्ण॥जगभूषणदिसेहा॥३२॥दुर्जनदुरात्मेपामर॥तेयासकपटीह्मणती
दुराचार॥हाजगद्गुरुयादवेंद्र॥जोसुरहरमधुसूदन॥३३॥त्याश्रीकृष्णासिदाकुन॥कोणाचेंकरिसीयेथेंपू
जन॥ऐसेंबोलतांगंगानंदन॥सहदेवेंपूजासिद्धकेली॥३४॥अग्रोदकाचाभरोनिकलश॥षोडशोपचारजें
जेंविशेष॥पूजावयाआदिपुरुष॥धर्मराजसिद्धझाला॥३५॥सुगंधचंदनपात्रघेऊन॥उभाठाकलाभीम
सेन॥सुवासपुष्पमाळाधरून॥पार्थउभाआवडी॥३६॥हिऱ्याचीतिवईआदळ॥लाहेंलाहेंघालीनकुळ॥
वरीक्षीरोदवसननिर्मळ॥घडीघातलीतयाची॥३७॥धर्मह्मणेयदुकुळटिळका॥याचौरंगावरीबैसोनि-

मन्मथजनका॥ पूजा ध्याजी वैकुंठनायका॥ कर्ममोचका मुरारी॥ ३८॥ पुढील कार्य जाणोनि साचार॥ आग्रह
नकरीच श्रीधर॥ पूजासनीं बैसला यादवेंद्र॥ जयजयकार जाहला॥ ३९॥ प्रतिविंध्यादि द्रौपदीचे कुमर॥ वरी ध-
रिती छत्र चामर॥ वाळयाचे विंझणे सुरवर॥ दोहींकडे वारिती॥ ४०॥ सुभद्रेचा पुत्र अभिमन्य॥ उभा हातीं पा-
दुका घेऊन॥ भीष्म विदुर अवघे भक्तजन॥ उभे ठाकले आवडी॥ ४१॥ वैष्णव कीर्तन करिती॥ हरिरंगें आनंदें ना-
चती॥ विष्णुचरित्रें अद्भुत गाती॥ टाळ्या वाजविती आनंदें॥ ४२॥ विमानीं पाहती सुरवर॥ वर्षती सुमनांचे सं-
भार॥ सनकादिकांचे नेत्र॥ प्रेमजळें पूर्ण भरले॥ ४३॥ नाना वाद्यांचा गजर होत॥ बंदीजन यदुवंश वर्णित॥ षोड
शोपचारें इंदिराकांत॥ धर्म पूजित तेवेळे॥ ४४॥ हरिचरण धरोन हातीं॥ प्रेमें क्षाळी धर्मनृपती॥ जेथून जाल्ह्वी-
ची उत्पत्ति॥ सदा तळमर्दी सिंधुकन्या॥ ४५॥ सद्गुरूस शरण जाऊन॥ ज्ञानें बोळखिजे निर्गुण॥ त्यापरीस गोड
सगुण॥ भक्तांलागीं अवतरले॥ ४६॥ जो पुराण पुरुष परात्पर॥ जो आनकदुंदुभीचा कुमर॥ हेरंबजननीचा व-
र॥ हृदयीं ध्याय जयातें॥ ४७॥ केवळ ब्रह्मानंद सुरोन॥ मूर्ती वोतिली हे सगूण॥ श्रुतिसी हीन वर्णवे पूर्ण॥ बुडे म
न जयामाजी॥ ४८॥ जो अलंकारमंडीत पूर्ण॥ मुकुट कुंडलें सुहास्यवदन॥ कृपाकटाक्षें करून॥ निजभक्तांस-
न्याहाळी जो॥ ४९॥ कपाळीं मृगमदाचा तिलक॥ आंगीं केशर उटी सुरेख॥ वैजयंतीचें तेज अधिक॥ हृदयीं प
दक झळकतसे॥ ५०॥ मनोहर पीतवसन॥ मुक्तलग पदक विराजमान॥ उत्तरीवस्त्र झळके पूर्ण॥ जेविं चपळा-
निराळीं॥ ५१॥ चरणीं ब्रीदें तोडर रुळती॥ असुरां वरी गजर करिती॥ ऐसा तो यादवेंद्र जगत्पती॥ धर्मराज पूजि-
तसे॥ ५२॥ श्रीकृष्णमूर्ती वर्णितां॥ सहस्रवदन शिणला तत्वता॥ वेद भागलागीती गातां॥ पंडुसुत पूजी तया॥
॥ ५३॥ वेद शास्त्र ग्रंथ पाहोन॥ ज्यांचे सदा शिणले नयन॥ त्याणीं श्रीकृष्णमूर्ती विलोकुन॥ ब्रह्मानंदें डुल्लती॥-
जे वैराग्यें जाहले तृप्त॥ जे तीर्थें हिंडती विरक्त॥ त्याहीं देखतां द्वारकानाथ॥ श्रमरहीत जाहाले॥ ५५॥ जपतप अ

नुष्ठाना॥ कर्मकुशलकरितीयज्ञ॥ जेएकांतींगुहाबैसलेसेऊन॥ तेहरिरूपपाहोननिवाले॥ ५६॥ तोंवैकुंठींचास-
कुमार॥ कमळोद्भवाचाजनितासाचार॥ भक्तजनांचेंमाहेर॥ जोभ्रतारइंदिरेचा॥ ५७॥ हेलावलासौंदर्यससमुद्र
॥ कींआनंदाचालोटलापूर॥ श्रीरंगदेखोनिपूर्णचंद्र॥ भक्तचकोरवेधले॥ ५८॥ कोट्यानकोटीमीनकेतन॥ न
खावरूनसांडावेवोवांळून॥ त्याचेंआपुल्याहातेंपूजन॥ पंडूनंदनकरीतसे॥ ५९॥ वस्त्रेंभूषणेंअळंकार॥ अर्पि
लेसोळाहीउपचार॥ करणेंसहीतमनसकुमार॥ कृष्णमनेंचरणींअर्पिलीं॥ ६०॥ डोळेभरूनहरिपाहिला॥ तेंसाच
त्दृदयींमगरेखिला॥ जैसानिर्वांतस्थानींदीपलाविला॥ तोकदापिंनहाले॥ ६१॥ ऐसापूजिलायादवेंद्र॥ परिदुर्ज-
नक्षोभलेसमग्र॥ आतांशिशुपाळाचेंशीर॥ उडवीलसाचारश्रीकृष्ण॥ ६२॥ शतशिव्यादेईलसभेंत॥ शेवट
तयाचामोक्षप्राप्त॥ तेसुरसकथाश्रोतेपंडित॥ अत्यादरेंपरिसोतकां॥ ६३॥ श्रीधरवरदब्रह्मानंद॥ जोअभंगअ
क्षयत्रिभुवनवंद्य॥ पांडवगृहींजगदांकुरकंद॥ विराजेसदांस्वानंदें॥ ६४॥ सुरसपांडवप्रतापग्रंथ॥ सभापर्व
व्यासभारत॥ त्यांतीलसारांशयथार्थ॥ अष्टादशाध्यायींकथियेला॥ ६५॥ ॥ ओंव्या १६५॥ ॥ श्रीकृ
ष्णार्पणमस्तु॥ ॥ छ॥ ॥ छ॥ ॥ छ॥ ॥ छ॥ ॥ छ॥

श्रीगणेशायनमः॥ माझेंहृदयींदिव्यकमळ॥ जेंतेजोमयअतिनिर्मळ॥ अष्टकर्णिकापरमकोमळ॥ मध्येंघ
ननीळविराजे॥ १॥ हृदयमध्यगर्भीदेखा॥ श्रीरंगनांदेभक्तसखा॥ अष्टकर्णिकावरीअष्टनायका॥ त्याही॰
स्थापूंनिजस्थानीं॥ २॥ रुक्मिणीजांबुवतीसत्यभामा॥ कालिंदीमित्रविंदामनोरमा॥ यज्ञजितीलक्ष्मणापूर्ण
कामा॥ मंद्रावतीआठवी॥ ३॥ मध्यभागींश्रीकरधर॥ कर्णिकावरीनायकासकुमार॥ ऐसात्हृदयकमळींयाद
वेंद्र॥ सर्वदांहीपूजावा॥ ४॥ अठरावेंअध्यायींकथाजाणा॥ धर्मेंअग्रपूजादिधलीश्रीकृष्णा॥ तेणेंक्षोभआला॰
दुर्जना॥ शिशुपाळादिकांसि॥ ५॥ चैद्यआणिकौरव॥ येकसभेसबैसलेसर्व॥ क्षुद्रदृष्टीलक्षितीमाधव॥ पर
मद्वेषीदुरात्मे॥ ६॥ शिवलिंगदेखतांदृष्टी॥ शिवद्वेषीहोतीकष्टी॥ विष्णुप्रतिमापाहातांपोटीं॥ कपाळीदुःख॰
जंगमाचे॥ ७॥ देखूनिसाधूंचेंपूजन॥ परमक्षोभतीकुजन॥ कींपतिव्रतेचीराहाटीदेखोन॥ जारिणीजेविंनिंदि
ती॥ ८॥ दृष्टीदेखनोराजहंस॥ वायसांसउपजेत्रास॥ कींपंचाननदेखोनिसावकाश॥ जंबुकासिवाटेना॥ ९॥
कींसभेंतदेखतांपंडित॥ मूर्खमतीमंदसंतापत॥ कींदृष्टीदेखतांसमीरसुत॥ वाटेअनर्थरजनीचरां॥ १०॥ ऐ॰
कतांहरिनामाचाघोष॥ भूतांप्रेतांउपजेत्रास॥ तैसेंपूजितांश्रीरंगास॥ दुर्जनपरमसंतापले॥ ११॥ महाकप॰
टीदुर्योधन॥ चैद्यांमाजीदमघोषनंदन॥ परमखवळलातोदुर्जन॥ काळसर्पज्यापरी॥ १२॥ भीष्मासह्मणेकुं॰
तीनंदन॥ आतांकोणांचेंकरूंपूजन॥ गंगात्मजेंजोबोलावेंवचन॥ तोंशिशुपाळजल्पेभलतेंचि॥ १३॥ ह्मणे॰
धर्माऐकेंवचन॥ तुह्मींशतमूर्खअवघेजण॥ गोरक्षकासिआधींपूजुन॥ अपेशमाथांघेतलें॥ १४॥ योग्यायो
ग्यविचार॥ मूढानकळेतुजसाचार॥ अग्रपूजेसअधिकारीजार॥ करितापामरपांडवतुह्मी॥ १५॥ दोघेजनक
त्यागोरक्षकातें॥ पंचतातातुह्मांपांडवांतें॥ यालागींदोघांचींचित्तें॥ ऐक्यजाहलींपरस्परें॥ १६॥ परममूर्खयु॰
धिष्ठिर॥ बुद्धिभ्रंशलागंगाकुमर॥ पूजेसिअधिकारीतस्कर॥ केलासाचारमंडपीं॥ १७॥ कलीजसांडोनिसत्य

वतीकुमर॥ कपिलयाज्ञवल्कीवसिष्ठपवित्र॥ द्रोणकृपाचार्यगुरुवर॥ टाकोनजारपूजिलाकैसा॥ १८॥ भीष्मबा-
ल्हीकवृद्धथोर॥ शैल्यएकलव्यभगदत्तवीर॥ जयद्रथशकुनीमहाशूर॥ सांडोनितस्करपूजिलाकैसा॥ १९॥ धृत
राष्ट्रसांडोनीवृद्ध॥ सोयरासांडोनिद्रुपद॥ कोणेविचारेंबुद्धिमंद॥ हागोविंदपूजिला॥ २०॥ अश्वत्थामागुरुनंदन॥
पूजावाहोताअर्कजकर्ण॥ पृथ्वीपतीसुयोधन॥ सांडोनिकृष्णपूजिलाकैसा॥ २१॥ पूज्याअपमानोनिथोर॥ अपू
ज्यापूजिलेंसाचार॥ तुमचीयशकीर्तीसमग्र॥ बुडोनभ्रष्टजाहाली॥ २२॥ येणेंकोणतेंकेलेंअनुष्ठान॥ कींकेलेंज-
पतपव्रतसाधन॥ कींकेलेंवेदपठण॥ ह्मणोनआधीपूजिला॥ २३॥ जरियासह्मणावेंरायासमान॥ तरिनाहींछत्र
सिंहासन॥ आचार्यनोहेहाब्राह्मण॥ भ्रष्टपूजनव्यर्थकेलें॥ २४॥ आह्मीबैसलोंअसतांनृपवर॥ आधीपूजिलाप
शुपाळकुमर॥ आमुचीघ्राणेंछेदिलींसमग्र॥ परमअपवित्रपांडवतुह्मी॥ २५॥ पूजणेंहोताजरिगोवळा॥ तुवां
कुष्ठपुत्राअमंगळा॥ तरिकांआह्मांआणिलेंरवळा॥ व्यर्थगेलायज्ञतुझा॥ २६॥ म्यांदिधलातुजकरभार॥ कींतूं-
दुर्बळकुष्ठपुत्र॥ धर्मकृत्यासससात्यव्हावेंसाचार॥ विवेकीनरबोलती॥ २७॥ तुंवांअपमानोनिभूपाळ॥ येथेंथोर-
केलागोवळ॥ परिइतकेनआह्मांनीचसकळ॥ सर्वथाहीनहोंचि॥ २८॥ यज्ञपुरोडाशअरण्यांतपडला॥ तोजंबु-
कासिलाभला॥ तितकेनकायश्रेष्ठझाला॥ मृगेंद्राहूनआगळा॥ २९॥ जैशीराजकन्यासुंदर॥ षंढाप्रतिदिधली-
साचार॥ हिंसकासगोदाननिर्धार॥ दिधलेंतुवांपंडुपुत्रा॥ ३०॥ जन्मांधासिहिरादाविला॥ सूकरसिंहासनीबै
सविला॥ येणेंजरासंधकपटेमारिला॥ कोणताकेलापुरुषार्थ॥ ३१॥ ऐसेंबोलोनपापमती॥ स्वर्गवसवोनआपले-
हातीं॥ ह्मणेउठारेआमचेसंगाती॥ जेअसतीलयासभे॥ ३२॥ ऐसेंबोलनांशिशुपाळ॥ तत्काळउठलेअवघेखळ॥
श्रीकृष्णद्वेषीपरमचांडाळ॥ अतिकोल्हाळकरितीतेथें॥ ३३॥ मगधर्मधांवोनतेवेळे॥ हृदयींकवळिलाशुशुपा
ळ॥ ह्मणेतूंबंधूआमुचाकेवळ॥ यज्ञसकळतुझाअसे॥ ३४॥ ऋषीतापसीवृद्धराजेंद्र॥ श्रीकृष्णपूजनीआनंद-

थोर॥ तूंहीकृष्णभजनींसादर॥ अनन्यहोईशिशुपाळा॥ ३५॥ परमजाणतागंगानंदन॥ इद्रवडीलसर्वांसिमान्य
॥ त्याचेआज्ञेनेंकेलेंपूजन॥ तूंकांदूषणठेवितोसि॥ ३६॥ तुजहोनिजाणतेपंडित॥ श्रीकृष्णपूजनीं आनंदत॥ आ
णितुझेहृदयींहाअनर्थ॥ कायह्मणोनीउदेला॥ ३७॥ तंवभीष्मकायबोलेवचन॥ परमदुष्टहादमघोषनंदन॥
त्याचेंकांकरिशीशांतवन॥ त्यासिमरणजवळीआलें॥ ३८॥ त्याचेंकांकरिशीसमाधान॥ कदांनमानीजोतुझेंव
चन॥ जैसेंमेनासवस्त्रभूषण॥ लेववूनकायसार्थक॥ ३९॥ मतिमंदापुढेंठेविलेंशास्त्र॥ कींषंढाहातींदिधलेंश
स्त्र॥ मसणींमंडपविचित्र॥ व्यर्थजैसेंउभविले॥ ४०॥ वायसासिअमृतफळें॥ उष्ट्रासअर्पणकेलींकेळें॥ कीरा
सभआंगासिलेपिलें॥ मृगमदाचेंउटणेंपें॥ ४१॥ द्राक्षफळेंअर्पिलींसूकरा॥ आदर्शदाविलाजन्मांधनरा॥ कि
रव्यासघातलीशर्करा॥ तैसात्यापामराबोधकाय॥ ४२॥ भग्नपात्रींजीवन॥ कांश्रमावेंव्यर्थघालोन॥ दुग्धा
माजीहरळरांधून॥ कायव्यर्थकरावें॥ ४३॥ उकर्डींवोतिलासुधारस॥ स्मशानशेजेंनिजविलाद्वेस॥ दुग्धेंन्हा
णिलावायस॥ शुभ्रनोहेकदाकाळीं॥ ४४॥ तैसाहासुबुद्धीनधरीपामर। जैसातस्करविटेदेखोनचंद्र॥ हिं
सकासधर्मशास्त्र॥ कदांनावडेजाणपां॥ ४५॥ आह्मीज्याचेंकेलेंपूजन॥ ज्यासहृदयींध्यायईशान॥ जल
जोद्भवसहस्त्रनयन॥ अनन्यशरणजयासि॥ ४६॥ तोजगद्गुरुइंदिरावर॥ प्रतापमित्रसमरधीर॥ ऐसा·
कोणतापामर॥ नयाआधीपूजाइच्छि॥ ४७॥ भवगजविदारकपंचानन॥ सनकादीकज्यासिशरण॥ त
यासिआह्मीपूजितांपूर्ण॥ कांहादुर्जनखवळला॥ ४८॥ जोअनंतब्रह्मांडनायक॥ भोगेंद्रज्याचातल्पक॥
जोपुराणपुरुषनिष्कळंक॥ जगद्वंद्यअनादिजो॥ ४९॥ हायेवढाआगळाबोलत॥ कोठेंयेणेंकेलापुरु·
षार्थ॥ महागजदेखोनिभुंकत॥ श्वानजैसेंअनिवार॥ ५०॥ ऐसेंबोलतांशंतनूकुमर॥ तोंसहदेवा
आवेशआलाथोर॥ जैसागर्जतमृगेंद्र॥ उभाराहोनिबोलत॥ आह्मींसभास्थानीनिश्चिंत॥ य·

थार्थपूजिलावैकुंठनाथ॥ असत्यमानीत्याचे पूर्वजसमस्त॥ चरणातळींमाझिया॥ ५२॥ जोकृष्णासनिंदीदुर्ज
न॥ त्याचेंजिव्हाघ्राणमीछेदीन॥ रासभावरबैसऊन॥ पिटीनजाणदिगंता॥ ५३॥ ऐसेंसहदेवबोलतांतेवेळे॥
जयजयकारेंदेवगर्जले॥ पुष्पांजळीवोपितेझाले॥ माद्रीसुतावरीपैं॥ ५४॥ आकाशवाणीगर्जत॥ धन्यसहदे
वश्रीकृष्णभक्त॥ नारदह्मणेऐकासमस्त॥ अनर्थमोटाहोईल॥ ५५॥ जेणेंनिंदिलाद्वारकानाथ॥ त्यासजवळी
आलामृत्य॥ तोप्रेतप्रायनिश्चित॥ जननीप्रसवलीव्यर्थतया॥ ५६॥ ऐसेंऐकोनितेवेळा॥ शिशुपाळअत्यं
तक्षोभला॥ घेऊनदुर्जनांचामेळा॥ उभाठाकेसंग्रामा॥ ५७॥ ह्मणेआजियादवपांडवभीष्म॥ कृष्णासहक
रीनभस्म॥ अवघेरवळभिळोनिपरम॥ कोल्हाळकरितीतेधवां॥ ५८॥ जैसादृष्टीदेखतांराजहंस॥ कोल्हा-
ळकरितीवायस॥ मगयुधिष्ठिरह्मणेभीष्मास॥ कैसेंआतांकरावें॥ ५९॥ मगबोलेगंगाकुमर॥ तूंस्व-
स्थराहींनसांडींधीर॥ कैसातरेनर्मीसागर॥ कुंभोद्भवेंकांविचारावें॥ ६०॥ निद्रिस्तजोंवरीपंचानन॥ तोंवरी
जंबूककरीगर्जन॥ हाधडधडीतकृष्णकृशान॥ दुर्जनकाननजाळीलपैं॥ ६१॥ श्रीकृष्णवडवानळावरी
येकवेळे॥ चैद्यनृपांचेउठलेपुतळे॥ त्यांतशिशुपाळकर्पूरबळे॥ पुढेंधांवेविझावया॥ ६२॥ याचाजो
परिवारसकळी॥ तोमेणांचीबाहुली॥ हाश्रीरंगज्वाळमाळी॥ भस्मकरीलक्षणार्धें॥ ६३॥ ऐसेंऐकतांशि
शुपाळ॥ क्रोधेंखवळलाजेसाव्याळ॥ कुशब्दाचीसांडीगरळ॥ भीष्मासमोरलक्षनी॥ ६४॥ ह्मणेरेभी-
ष्मादुष्टावृद्धा॥ परममलिनाबुद्धिमंदा॥ कपटियाआमचीकरितोसनिंदा॥ तुझीजिव्हाकांझडेना॥ ६५
कोणताकृष्णेंकेलापुरुषार्थ॥ ह्मणोनजल्पसीसभेआंत॥ पूतनास्त्रीमारिलीसत्य॥ ह्मणोनिदांभिकबो
लसी॥ ६६॥ केशीएकअश्वमारिलादेख॥ वृषभासूरतोनिर्दोख॥ कींकाळियामारिलेंकिरडूंएक॥ प्रता
पयेणेंकायसा॥ ६७॥ तस्करामाजीअतिश्रेष्ठ॥ जारामाजीमुख्यवरिष्ठ॥ कपटीनाटकपरमनष्ट॥ स्वधर्म-

भ्रष्टगोंवळा॥ ६८॥ अरेभीष्मातूंदुर्जन॥ काशीपतीच्याकन्यानेल्याहिरोन॥ त्यांतएकीनेंदिधलाप्राण॥ तुजवरीन-
पुंसका॥ ६९॥ स्नानसंध्याअनुष्ठान॥ यज्ञतपदानदेवतार्चन॥ सर्वव्यर्थगेलेंतुझेंवदन॥ संतानहीनापाहूंनये॥ ७०
लोकांसिनिरोपिसीधर्म॥ मूढातूंचकरिसीअधर्म॥ ऐशीनिंदाऐकतांभीम॥ गदासांवरूनिसरसावला॥ तेणेंजे
सारवदिरांगार॥ तैसेआरक्तदिसतीनेत्र॥ झेंपघालावीजंवसत्वर॥ तोंभीष्मेंसंकेतेंथोपिला॥ ७२॥ गंगात्मजह्म
णेभीमातें॥ क्षणेकराहेंतूंनिवांत॥ याचेंआयुष्यउरलेंकिंचित॥ जवळीअनर्थपातला॥ ७३॥ शिशुपाळभीष्मा-
सह्मणेअवधारीं॥ सोडींभीमयेउंदेमजवरीं॥ जातवेदपतंगाभस्मकरीं॥ तैसाकरीननिर्धारें॥ ७४॥ कृष्णआ-
णिभीमार्जुन॥ एकदांचयेऊंदेशस्त्रेंघेऊन॥ विलंबकरितांषंदपूर्ण॥ नामतुझेंनिर्धार॥ ७५॥ ऐशींदुष्टोत्तरेंबोल
त॥ तितकींक्षमाकरूनिगंगासुत॥ भीमासह्मणेऐकवृत्तांत॥ पूर्वीचातूंजसांगतों॥ ७६॥ दमघोषाचीपत्नीसा
त्वती॥ तीवसुदेवासभगिनीहोयनिश्चिती॥ तिचेउदरींहापापमती॥ शिशुपाळउपजला॥ ७७॥ उपजतपाहे-
बाळजननी॥ तोंभुजावरीभुजादोनी॥ कपाळींनेत्रअवगुणीं॥ हापापरवाणीउपजला॥ ७८॥ लोकह्मणतीहेंअ-
पचिन्ह॥ मातासह्मणेटाकाबाहेरनेउन॥ तोंआकाशवाणीबोलेगर्जोन॥ नटाकींबाळसर्वथा॥ ७९॥ हाहोईलमहा
भूपती॥ शिशुपाळनामठेवीयाप्रती॥ माताविस्मयजाहालिचित्तीं॥ कायपुढतीबोलत॥ ८०॥ कोणाचेहातींया
समृत्यु॥ देवदूतहोवदात्वरित॥ तोंआणीकप्रतिध्वनीहोत॥ मायऐकतसादर॥ ८१॥ ज्यापुरुषाचेदृष्टीकरू-
न॥ दोनीभुजाआणितृतीयनयन॥ खालींपडेलगळोन॥ यासिमरणत्यांचेहातें॥ ८२॥ ऐसेंबोलोनआकाश-
वाणी॥ गुप्तराहिलीतयेक्षणीं॥ मगबाळघेतीजाहालीजननी॥ विरूपनेत्रचतुर्बाहू॥ ८३॥ देशोदेशींचेभूप-
ती॥ बाळपाहावयासियेती॥ प्रतीतीविलोकावयासात्वती॥ शिशुपाळदेतसर्वांपुढें॥ ८४॥ तोंबळिभद्रआ
णिघननीळ॥ तेहीपाहावयाआलेबाळ॥ बंधुपुत्रदेखतांतुंबळ॥ आनंदजाहलासात्वतीतें॥ ८५॥ तोंशिशु

पाळआणिवक्रदंत॥ दोघेकृष्णापुढें आलेरांगन॥ कृष्णदृष्टीपडतांअकस्मात॥ भुजागळोनपडियेल्या॥ ८६॥
कपाळींचातृतीयनयन॥ तत्काळगेलाजिरोन॥ मातेसचिंतादारूण॥ प्राप्तजाहालीतेधवां॥ ८७॥ मगहरीपुढें
पदरपसरून॥ पितृभगिनीमागेपुत्रदान॥ ह्मणेमीयांसनमारींह्मणून॥ भाष्यदेईमजलागीं॥ ८८॥ श्रीकृष्णाबो
लेसाचवचन॥ शतअपराधक्षमाकरीन॥ अधीकजाहलीयाबोळवीन॥ मोक्षसदनानिर्धारिं॥ ८९॥ ऐसेंबोले
तवगोविंद॥ मातेसजाहलाआनंद॥ ह्मणेहाकासयाकरीलशतापराध॥ मगरामसुकुंदबोळविले॥ ९०॥ याला
गींऐकभीमानिश्चित॥ त्याशतअपराधांची होयगणित॥ यालागींकृष्णानिवांत॥ वाटपाहातसमयाची॥ ९१॥
हाशिशुपाळआणिवक्रदंत॥ पूर्वींचेमहाराक्षसउन्मत्त॥ रावणकुंभकर्णनिश्चित॥ रामावतारींवधिलेहे॥ ९२॥
येणेंपूर्वीयेऊनमिथुळेसि॥ धांवलावरावयासीतोसि॥ भार्गवचापनुचलेयासि॥ परमखेदपावला॥ ९३॥ तो
हाशिशुपाळपापखाणी॥ वरावयाधांवलारुक्मिणी॥ तेथेंपराभवपावलारणीं॥ जरासंदासमवेत॥ ९४
तोचद्वेषधरोनिमनांत॥ दुर्जनकृष्णनिंदाकरित॥ परिशतअपराधआलेभरत॥ जवळीअनर्थयासआला
॥ ९५॥ ऐकतांभीष्माचेंवर्मवचन॥ क्रोधेंखवळलादमघोषनंदन॥ जैसाखेहेंशिंपितांकृशान॥ अधिकाधि
कप्रज्वळले॥ ९६॥ ह्मणेबुद्धिहीनानपुंसका॥ कितीवानिसीगोरक्षका॥ जेयेथेंस्तवनासयोग्यदेखा॥ नवा
निसीलयांतें॥ ९७॥ चोरजारकपटीकेवळ॥ बहूमातलाहागोवळ॥ गोकूळचोंटाळिलेसकळ॥ कपटीअमं
गळकृष्णाहा॥ ९८॥ जालंदराचीपत्नीवृंदासती॥ येणेंतेभगिनीमानिलीहोती॥ तिसींचरतलानिश्चिती॥ न
भीचित्तींपापानें॥ ९९॥ परदाराआणिकपटी॥ यासमानकोणीनसेसृष्टी॥ ऐशाचीकायसांगसीगोष्टी॥ वा
रंवारमूढातूं॥ १००॥ मगह्मणेउठारेअवघेजण॥ आधीघेऊंभीष्माचाप्राण॥ तिळप्रायतुकडेकरून॥ येथें
चयाचेटाकावे॥ १॥ याज्ञीकमिळूनभोंवतें॥ यज्ञपशूवधितीमुष्टिघातें॥ तैसेंवधावेंद्दातें॥ येणेंआह्मं

सिनिंदिलें ॥ २ ॥ नैलकदईनाउनपरमा ॥ हाजीतचिआंनघालावाभीष्म ॥ कींशस्त्रेंताऊनउत्तमा ॥ खंडेयांचींकरावीं ॥
॥ ३ ॥ मगबोलेगंगासुत ॥ बोलिलाबोलजोनकरीसत्य ॥ त्याचेपूर्जजसमस्त ॥ पचतीलमहानरकीं ॥ ४ ॥ तुझिया
माथांचामुकुट ॥ तोमींपदघातेंकरीनपिष्ट ॥ जरीबोललेंवचनस्पष्ट ॥ खरेंकरूनदावीनासतरी ॥ ५ ॥ भीष्मसिंहापु
देंजंबूकसमस्त ॥ करितातुह्मींयुद्धाचीमात ॥ वज्रधाराधगधगित ॥ तृणेंकरूनखंडे ॥ ६ ॥ अजाजयाचीजननी ॥
तोसिंहासिभिडोंपाहेरणीं ॥ पिंप लिकाह्मणेथडकहाणोनी ॥ दिग्गजरवालींपाडीन ॥ ७ ॥ बळेंउडोनिआळिका ॥ वि
दारीनह्मणेविनायका ॥ मशकह्मणेहाणोनिथडका ॥ मेरुमांदारडोलवीन ॥ ८ ॥ घुंघुरड्याऐसेंवदन ॥ ह्मणेपर्व
तग्रासिन ॥ पतंगह्मणेअग्नीसगिळिन ॥ सूडघेईनखांडववनाचा ॥ ९ ॥ स्वतंत्रसूत्रेंकरूनी ॥ तंतुनाभह्मणेझांकी
नधरणी ॥ वृश्चीकअभिमानधरोनि ॥ ह्मणेफोडीनवज्रानें ॥ १० ॥ मजपुढेंकायआदित्य ॥ ह्मणोनिनिंदाकरीरव
द्योत ॥ मरणकाळींहोयसन्निपात ॥ तैसेंतुजजाहालेंरे ॥ ११ ॥ काळमृत्यूछायापडली ॥ मृत्युवेळाजवळआली ॥
ऐकोनशिशुपाळतेवेळीं ॥ क्रोधेंबहुतआवेशला ॥ १२ ॥ शस्त्रकाढोनिवेगेंसि ॥ ह्मणेरेकृष्णाऊठझुंझमजशीं ॥ १३
नपुंसकाकायबैसलासि ॥ लाजकैशीनुपजेतुतें ॥ १३ ॥ तुझेंरूसणेंसमजणेंदोनी ॥ मींशिशुपाळतृणप्रायमानी॰
॥ गोरक्षकातुजअजूनी ॥ लाजकांरेनवाटे ॥ १४ ॥ उपजोनितुह्मागोंवळा ॥ वृष्णिकुळाडागलाविला ॥ त्वांचोरू
ननेलीरुक्मिणीवेल्हाळा ॥ नवरीमाझीनिर्धारें ॥ १५ ॥ रुक्मिणीआधींअर्पिलीमातें ॥ म्यांमनींचभोगिलेंति
येतें ॥ मगतेंप्राप्तझालीतूतें ॥ माझेंउच्छिष्टगुराखिया ॥ १६ ॥ जैसेंभोगिलेंवस्त्रबहुत ॥ तेंभाटासदेतीभाग्य
वंत ॥ तैशीरुक्मिणीम्यांभोगिलीनिश्चित ॥ तूजतेप्राप्तजाहाली ॥ १७ ॥ पुष्पहारभोगोनिदाकिला ॥ तोभणा॰
गेंजैसाउचलिला ॥ कींरावणेंनेलीजनकबाळा ॥ तैशीरुक्मिणीतुवांनेली ॥ १८ ॥ शाल्वपवित्रतुजपरिस ॥ क
दानातळेंअंबेस ॥ नवरीजेनेमिलीआणिकास ॥ तेसर्वथानप्रणावी ॥ १९ ॥ ज्याचेनावेंजेंपात्रवाढिलें ॥ आ॰

णिकेंनेतांउच्छिष्टजाहलें॥हेंधर्मशास्त्रीबोलिलें॥तुजलानकळेकर्मभ्रष्टा॥२०॥श्रीकृष्णाह्मणेरेदुर्जना॥महानिंद-
कादुष्टामलिना॥तूंअग्रपूजाइच्छितोसिहीना॥तरिआतांचघेनिर्धारें॥२१॥ऐसेंबोलोनिक्षीराब्धिजारमण॥केलें
सुदर्शनाचेंस्मरण॥तंवतेंअकस्मातयेऊन॥कृष्णहस्तींवशीनलें॥२२॥जैसाकल्पांतींचाआदित्य॥तैसेंसुदर्शनधव
धवित॥शिशुपाळावरीसोडिलेंअकस्मात॥वैकुंठनाथेंतेधवां॥२३॥तत्काळशिशुपाळाचेंशिर॥निराळपंथेंउ
डविलेंसाचार॥सुरवेंगर्जनाकरीथोर॥म्याचयदुवीरजिंकिला॥२४॥सिरमागुतीउतरलें॥श्रीकृष्णाचरणाजवळी
पडलें॥अंतर्ज्योतिनिघालीतेवेळे॥कृष्णमुखींप्रवेशली॥२५॥बाळसूर्यसमतेजअद्भुत॥ज्योतीकृष्णमुखींप्रवे
शत॥जैसेंलवणजळींविरत॥कींगगनांतनादजैसा॥२६॥सांडोनिजीवदशासंपूर्ण॥शिशुपाळझालाश्रीकृष्ण
त्वंपदतत्पदहारपोन॥तैसालीनजाहाला॥कींपूर्णजळींबिंदुपडला॥तोमाघारानाहींपरतला॥तैसाशिशुपाळ-
गोपाळझाला॥नाहींउरलावेगळेपणें॥२७॥हेवैकुंठींचेद्वारपाळ॥जयविजयहेनिर्मळ॥सनकादिकींशापितांत-
त्काळ॥दैत्ययोनीनअवतरले॥२९॥तेचहिरण्याक्षहिरण्यकशिपूजाण॥तेचजाहलेरावणकुंभकर्ण॥तेचिहेवक्रदं
तशिशुपाळपूर्ण॥कृष्णावतारींजन्मले॥३०॥परमभक्तशिशुपाळ॥वैरेंचजाहलाहरिरूपतत्काळ॥हातींचीवस्तू
नेतबाळ॥तैसेंचकेलेंयथार्थपैं॥३१॥तिसरेजन्मींनिश्चिती॥कृष्णेंदीधलीअक्षयमुक्ती॥हृदयींदेखिलीअंतर्ज्यो
ती॥महाभक्तह्मणोनियां॥३२॥असोजाहलाजयजयकार॥देववर्षतीसुमनसंभार॥दुष्टपळालेसमग्र॥वक्रदं
तासहीतपैं॥३३॥कौरवअंतरींचिंताक्रांत॥ह्मणतीआमचेंउणेंपडलेंबहुत॥एकआनंदेंटाळियावाजवित॥बरें
जाहलेंह्मणोनी॥३४॥ऐसाशिशुपाळपावलानिजधाम॥पार्थाप्रतीनिरोपीधर्म॥ह्मणेयाचेंप्रेतकराभस्म॥जा
तवेदामाझारी॥३५॥मगशिशुपाळाचेंराज्यजेंहोतें॥तेंदिधलेंत्याचियापुत्रातें॥धर्मराजसकळराजयातें॥व
स्त्रेंअळंकारसमर्पी॥३६॥ब्राह्मणक्षत्रियवैश्यशूद्र॥सर्वांसगौरवीयुधिष्ठिर॥पूजामानपावोनसमग्र॥गेले

नगराआपुले॥३७॥अवभृथस्नानधर्मेंकेलें॥तेथेंजन सकळस्नानझाले॥सहपरिवारेंसितेवेळे॥श्रीरंगनि-
घालाद्वारकेसि॥३८॥धर्मासह्मणेकमळोद्भवपिता॥आह्मासनिरोपदेईआतां॥धर्मेंचरणींठेविलामाथा॥कं
ठजाहलासद्गदित॥३९॥नबोलवेचिप्रेमेंस्फुंदन॥जाऐसेनह्मणवेनिश्चित॥पुढतीलोकरयावेंह्मणत॥धन्य
भक्तधर्मराज॥४०॥भीमार्जुननकुळसहदेव॥तयांसपुसतवासुदेव॥कुंतीद्रौपदीसुभद्रेप्रतिमाधव॥स्ने
हेंआज्ञामागतसे॥४१॥तंवत्याह्मणतीश्रीपती॥जेथेंतुझींपदेंउमटती॥तेथेंआमुचेंमस्तकश्रीपती॥ऐसेंक
रींरमावरा॥४२॥हृदयांतूनआमुचेश्रीपती॥परनाजाऊंनकोअहोराती॥ज्याज्यादिसतीभूताकृती॥तुझेंरूपें
भासोत॥४३॥श्रीकृष्णासबोळउनी॥पांडवपरतोनआलेसदनीं॥जागृतसुषुप्तीस्वप्नीं॥कृष्णचिंतनींसा-
दर॥४४॥राजसूययज्ञजाहालासमाप्त॥द्वारकेपावलावैकुंठनाथ॥तोंपौंड्रीकआणिवक्रदंत॥वेढाघालिती
नगरातें॥४५॥शिवेंदिधलेंवरदविमान॥त्यांतवक्रदंतसेनेसहबैसोन॥द्वारकेवरीयेऊन॥युद्धकरीशस्त्रा-
स्त्रीं॥४६॥तोंइतक्यांतपावलाजगजीवन॥तत्काळसोडिलेंसुदर्शन॥वक्रदंताचेंशीरछेदून॥आकाशपंथें
उडविलें॥४७॥पौंड्रीकसहसेनासमस्त॥हरिनेंसंहारिलीतेथ॥ऐसाप्रतापकरोनिअद्भुत॥कृष्णेंसुदर्शनठे-
विलें॥४८॥वधिलेशिशुपाळवक्रदंत॥इतकेनसुफळअवतारकृत्य॥संपूर्णजाहलेंयथार्थ॥यादोघांसमारि
तां॥४९॥आह्मांशस्त्रधरणेंनाहींआतां॥उरलेजेंदैत्यतत्वता॥तेसारथ्यकरूनिपार्था॥हस्तींसर्ववधावे॥५०
जोदेवाधिदेवपुरातन॥जोपूर्णब्रह्मसनातन॥जोमायाचक्रचाळकशुद्धचैतन्य॥तोकृष्णरूपेंअवतरला॥-
५१॥दानवबहुतमातले॥त्यांहीभक्तजनगांजिले॥यालागींनिर्गुणसगुणासआलें॥तेचअवतरलेंश्रीकृष्णरू
प॥५२॥दुष्टकलीचेंस्वरूपसगळें॥तेंदुर्योधनरूपेंजन्मलें॥कामक्रोधमदमत्सरआगळे॥त्याचेहृदयींनांद
ती॥५३॥दुर्योधनादिबंधूशतवरी॥तेराक्षसअवतरलेअवनीवरी॥जेपौलस्त्यादिलंकेमाझारी॥तेचहस्त

नापुरींजन्मले॥५४॥जयविजयांशरावणकुंभकर्ण॥तेचिशिशुपाळवक्रदंतपूर्ण॥जरासंदादिकाळयवन॥दैत्यां
शसर्वजन्मले॥५५॥एवंमागधचेद्यकौरवसकळ॥भौमासूरबाणासूरदुष्टभूपाळ॥हेदैत्यांशचिसबळ॥द्वापा
रयुगींजन्मले॥१५६॥वसूवीर्येंगंगेचेउदरीं॥तोभीष्ममहाराजपृथ्वीवरी॥जोप्रतापसूर्यब्रह्मचारी॥महायोद्धा
जन्मला॥१५७॥शिवरुद्रदर्याचाक्रोधप्रबळ॥तोअश्वत्थामाबळेंसबळ॥सूर्यांशतोकर्णनिर्मळ॥कुंतीउदरींज-
न्मला॥५८॥जोकांदेवगुरूबृहस्पती॥द्रोणाचार्यतोचिनिश्चिती॥कृपाचार्यरुद्ररूपक्षिती॥गौतमवीर्येंजन्म-
ला॥५९॥यमसमीरशचीवर॥अश्विनोदेवदोघेसुंदर॥याचेधर्मभीमअर्जुनवीर॥नकुळसहदेवजन्मले॥
६०॥पांचसूर्यपृथ्वीवरी॥अवतरलेकुंतीचेउदरीं॥उजळलीसकळधरित्री॥प्रतापतेजेंज्याचिया॥६१॥दुर्वास
मुखमंत्रसमीरें॥फुंकोनकुंतीच्याकर्णद्वारें॥पंचदीपएकसरें॥पाजळिलेधरेवरी॥६२॥पतंगतेकौरवनिश्चि
ती॥यापांचांदीपांवरीझेंपावती॥परिपक्षसहितदग्धहोती॥राज्यलोभेंजुंझतां॥६३॥श्रीकृष्णाद्वारकेचीभवा
नी॥पांचहीदिवस्याहातींघेउनी॥ब्रह्मांडमंडपींगोंधळघालुनी॥दैत्यसर्वहीरगडील॥६४॥शचीमृडानीउभयां
शमिळोनी॥तेचिद्रौपदीयाज्ञसेनी॥तिचाकैवारीचक्रपाणी॥होऊनधरणीनिर्वैरकरी॥६५॥जन्मेजयास
सांगेवैशंपायन॥धन्यधन्यअवतारश्रीकृष्ण॥पांडवपाळकजगजीवन॥रात्रदिवसरक्षीतसे॥६६॥पुढेंक-
थाआहेस्फुरस॥नारदआणिवेदव्यास॥बुद्धिवादकरितीलधर्मास॥शत्रुविश्वासनधरावा॥६७॥पुढेंद्यूता-
रंभदारूण॥द्रौपदीससभेंतआणून॥परमपीडाकरितीलदुर्जन॥जगजीवनधांवेलपैं॥६८॥पांडवप्रताप-
यज्ञसत्र॥श्रोतेतुह्मींकरावीजपवित्र॥सावधानतास्वाहास्वधाकार॥अव्यग्रसदांचालोंद्या॥६९॥तेथींचापु
रोडांशपवित्र॥ब्रह्मानंदेंसेवोनिश्रीधर॥तृप्तहोऊनिनिरंतर॥हरिचरित्रसांगतसे॥७०॥सुरसपांडवप्रता-
पग्रंथ॥सभापर्वव्यासभारत॥त्यांतीलसारांशयथार्थ॥एकोनविंशतिमोध्यायींकथियेला॥७१॥ ॥छ॥

श्रीगणेशायनमः॥ यदुकुळकमळविकाशनेत्रा॥ जोसच्चिदानंदजलदगात्र॥ पद्मसंभवआणित्रिनेत्र॥ सदांहृदयींचिंतिती॥ १॥ भक्तकैवारीपूर्णावतार॥ लीलाविग्रहीयादवेंद्र॥ पांडवपाळकजगदीश्वर॥ भक्तवत्सलदयाब्धी॥ २॥ मागेंसंपलाराजसूयज्ञ॥ द्वारकेसगेलामनमोहन॥ नारदेंपाहोनिसभासदन॥ धर्मरायासजाणविलें॥ ३॥ पुढेंदिसतेंविघ्नथोर॥ आटतीलपृथ्वीचेनृपवर॥ हेंजगद्गुरूयेऊनिसविस्तर॥ वेदव्यासकथील॥ ४॥ नारदऐसेंबोलोन॥ सवेंचपावलाअंतर्धान॥ तोंसत्यवतीहृदयरत्न॥ वेदव्यासपावले॥ ५॥ नमस्कारितीपांचहीजण॥ कनकासनींकेलेंपूजन॥ धर्मह्मणेब्रह्मनंदना॥ सांगोनगेलासंकेत॥ ६॥ तेंप्रगटकरींसमस्त॥ मगबोलिलाशुकतात॥ बारेविघ्नांचेआवर्त॥ पुढेंअपारदीसती॥ ७॥ एकांतीनेऊनधर्मास॥ गुजकथीतवेदव्यास॥ शत्रूंचाअत्यंतउत्कर्ष॥ दिसतसेयेथूनी॥ ८॥ धैर्यनसांडींसर्वथासत्य॥ पुढेंतेरावर्षेंपर्यंत॥ अवदशाहोईलप्राप्त॥ अत्यंतक्लेशपावाल॥ ९॥ मावळेलऐश्वर्यदिवस॥ करणेंयेईलवनवास॥ तेथेंही घडिघडीत्रास॥ पावविनीलदुरात्मे॥ १०॥ द्वारकाधीशमन्मथतात॥ भक्तवत्सळस्नेहाळबहुत॥ तोरक्षीलतुह्मांयथार्थ॥ मायजेशीतान्ह्या॥ ११॥ ईश्वरीमायागहनबहुत॥ प्रारब्धभोगवीबळिवंत॥ पडतीलदुःखाचेपर्वत॥ धैर्यअत्यंतधरावें॥ १२॥ धर्मात्मयापंडूनंदना॥ नकरींकोणाचीहेळणा॥ नबोलेंनिष्ठुरवचना॥ दयादीनावरिंकरीं॥ १३॥ वर्मनबोलेंकोणाचें॥ आशीर्वादघेईंऋषींचे॥ विनोदेंही कोण्याप्राण्यांचें॥ छळणनकरींसर्वथा॥ १४॥ दुर्जनाचेगृहाप्रति॥ सहसानजावेंनिश्चिती॥ दुर्जनदुरुक्तीबोलती॥ प्रतिउत्तरनद्यावें॥ १५॥ नीचासीनकरींसहवास॥ गोत्रजांचानधरींविश्वास॥ षड्वैरीजिंकोनिमानस॥ लावींभगवंतींतत्वतां॥ १६॥ काडीहातींधरोनियां॥ सांगतोंतूंजधर्मराया॥ प्राणांतहीजाहलिया॥ नखेळेंद्यूतसर्वथा॥ १७॥ शत्रूजपतीबहुत॥ हस्तनापूरतळींवाटत॥ वरीइंद्रप्रस्थज्येष्ठदिसत॥ हस्तीवरीइंद्रजेसा॥ १८॥ गजपुरासिक-

दांनजावें॥शत्रुगृहींसहसानबैसावें॥विदुराचेबुद्धीनेंवर्तावें॥ नरवेळावेंद्यूतकदां॥१९॥ वैभवगेलियासम-
स्त॥रवंचोंनेंदीं धैर्यपर्वत॥हेंशिकवूनिसत्यवतीसुत॥अंतर्धानपावला॥ २०॥व्यासेंकथिलेंजेंगुज॥ बंधूसि
सांगेधर्मराज॥पुढेंबरवेंनदिसेमज॥काळकठिणवाटतोकीं॥२१॥पार्थबोलेयथार्थवचन॥पाठीसिअसतां
जगजीवन॥कदांबांधूंनशकेविघ्न॥श्रीकृष्णस्मरणकरितांहो॥२२॥कर्माच्यागतीपरमगहन॥आलेंजरीभ-
गवंताचेमना॥तेथेंकोणाचेंहीचालेना॥कल्पांतींजाणसर्वथा॥२३॥सूत्रधारीतोगोपाळ॥नकळतीत्याचे-
विचित्ररवेळ॥कर्ताहर्तापाळितासकळ॥त्यावीणदुजाअसेना॥२४॥असोजेजाहलीविवंचना॥शकुनी-
आणिदुर्योधना॥कळोंनेदितांजाणा॥मनामाजीठेविलें॥२५॥धर्मासह्मणेशकुनी॥आवडदुर्योधनाचेम
नीं॥मयसभापाहावीनयनीं॥सावकाशनिवाडें॥२६॥अजातशत्रूपंडुसुत॥अवश्यह्मणोनिधरिलाहात॥
शकुनीदुर्योधनासहित॥परिवारेंसिनिघाले॥२७॥निघाल्याराण्यातेवेळीं॥सुरवरणीत्यामाजीपांचाळी॥
सभेवरीचढल्यासकळी॥सुरवभूमंडळींनसमाये॥२८॥सभापाहतांभुलेमन॥विसरोनिजायभूकतहा
न॥यामिनीकिंवादीन॥नकळेकांहींसर्वथा॥२९॥मागेंसभावर्णिलीबहुत॥काश्मिरीभिंतीलरवलरवित॥द्वा
रेंझांकिलींकींमुक्त॥नकळतीचपाहात्यासि॥३०॥परमकुशळडोळसपाहातां॥स्तब्धहोतीपुढेंचालतां॥जळ
किंवामार्गतत्वता॥कांचभूमीकळेना॥३१॥वस्त्रेंसांवरीदुर्योधन॥सेवकह्मणतीहेंजीवन॥स्फटिकवापिका
भरून॥उदकेंपूर्णजाहलिया॥३२॥भूमीह्मणोनदुर्योधन॥चालतांपडिलानिसरून॥वस्त्रेंभिजलींसंपूर्ण॥हां-
सतीजनगदगदां॥३३॥भीमार्जुननकुळसहदेव॥टाळीपिटोनिहांसतीसर्व॥सकळस्त्रियांचासमुदाय॥पां
चाळीसहहांसल्या॥३४॥नकुळसहदेवहांसती॥हस्तदेवोनबाहेरकाढिती॥नूतनवस्त्रेंलेवविती॥धर्माज्ञेनें
तेवेळे॥३५॥कवाडेंझांकिलींकिंवामुक्त॥दुर्योधनहातेंचाचपित॥मुक्तह्मणोनिनिःशंकजात॥शिरींआद-

ळतमणिकपाटें॥३७॥सहदेवनकुळहातींधरून॥पुढेंचालवितीसुयोधन॥भीतभीनदाकीचरण॥मगभीम
सेनबोलतसे॥३८॥अंधपुत्रहेंअभिधान॥सुयोधनेंदाविलेंरवरेंकरून॥वर्मस्पर्शाचेंवचन॥ऐकतांहृदयरवोंच
लें॥३९॥प्रळयाग्नीऐसापेटत॥परिसमयींक्रोधाआवरीत॥तैसाविषदाहअद्भुत॥उमाधवधरितकंठींपैं॥३९॥
मनांतह्मणेमीदुर्योधन॥याशब्दाचेंउसणेंघेईन॥पांडवहिंडवीनरानोरान॥वस्त्रअन्नाविरहित॥४०॥स्त्रियां
सहपांचाळी॥मजहांसलीतयेवेळीं॥सभेदेरवतांतात्काळीं॥नग्नकरीनइयेतें॥४१॥येथेंक्रोधकरितांअविवेकें॥
होईलशिशुपाळासारिखें॥बुद्धीबळेंयांचीसुखें॥ठेंचूनचूर्णकरावीं॥४२॥धर्मासिआज्ञामागोनित्वरा॥दुर्योध
ननिघेहस्तनापुरा॥परमप्रीतीयुधिष्ठिरा॥दुर्योधनपुसतसे॥४३॥अनर्घ्यरत्नें वस्त्रेंउत्तम॥दुर्योधनासदेत-
सेधर्म॥शकुनीसगौरवूनपरम॥कुंजरपुरासबोळविलें॥४४॥दुर्योधनटाकीश्वासोश्वास॥आलावेगेंकुंजर
पुरास॥शरीरतप्तबहुवस॥लोहजैसेंअग्निसंगें॥४५॥सर्पाऐसाधुसधुशित॥नयनींअश्रुधाराश्रवत॥-
रागेंअधरचावित॥दांतरवातकरकरां॥४६॥मणगटेंचावूनकरीचूर्ण॥ह्मणेजळोजळोहानजायप्राण॥श
कुनीतयापुसेयेऊन॥रवेदक्षीणकांहोसी॥४७॥दुर्योधनह्मणेमातुळा॥शत्रूचीलक्ष्मींपाहिलीडोळां॥मयस
भेअपमानझाला॥तुवांदेखिलादृष्टीनें॥४८॥शत्रुप्रतापदेखोनिअत्यंत॥मजनवज्वरजाहलाप्राप्त॥अपमा
नत्यावरीसन्निपात॥झालाप्राणांतमजवाटे॥४९॥तरितूंमातुळावैद्यपूर्ण॥देईलोकरीरसायण॥मगशकुनी
बोलेवचन॥ह्मणेप्राक्तनसबळत्यांचें॥५०॥भीमासवीषघातलें॥लाक्षागृहांतअवघ्यांजाळिलें॥परिपूर्णत
पाचेयोगबळें॥मागुतीपावलेऐश्वर्य॥५१॥गांठीतयांचेंपूर्वपुण्य॥सेंवरींलाधलेद्रौपदीरत्न॥मयेंदेत्यसभा
करून॥अग्नीनेंधनुष्यबाणरथदिधला॥५२॥महत्पुण्याचेपर्वत॥तरीचपाठिराखाश्रीकृष्णनाथ॥त्यावरीसो
यरासोयरारवत॥पडोंनेदीउणेंकदां॥५३॥तरिआतांतुह्मींराजसूययज्ञ॥करासमस्तराजेजिंकून॥त्याहोनविशेष

उदारपण॥ करूनदावालोकांत॥ ५४॥ दुर्योधनह्मणेपांडवेंबळें॥ पृथ्वीचेराजेसर्वजिंकिले॥ आधीनकरूनरा-
ज्यदाथ लें॥ पुनरपीतयांसी॥ ५५॥ नरिदळआहेअकराक्षोणी॥ युद्धकरावेंसमरंगणीं॥ पांडवांलागीमारो-
नी॥ हिरोनघ्यावेंसर्वराज्य॥ ५६॥ शकुनीह्मणेऐकसाचार॥ व्यर्थकासयाकरिशीविचार॥ युद्धींजिंकोनिपार्थ
वृकोदर॥ जयकधींनपावाना॥ ५७॥ सुरांसहीतशचीरमण॥ आलेपृथ्वीचेराजेमिळोन॥ तरिनजिंकवेअर्जुन॥
विभांडीलसमस्तां॥ ५८॥ छपन्नकोटीयादवांसहित॥ कृष्णात्याचीपाठीराखित॥ द्रौपदधृष्टद्युम्नआास॥ पाठिंश
रवेसर्वदां॥ ५९॥ यालागींयुद्धाचीगोष्टी॥ व्यर्थकायबोलोनओंठीं॥ जैशीदरिद्राचीसुष्टी॥ झांकलीउघडीससा-
ना॥ ६०॥ तरिपांडवजिंकावयानात्काळ॥ एकयुक्तीअसेसबळ॥ कपटपाशमजवळ॥ असतीवशजवळिके॥
६१॥ त्याचिकपटपाशेंकरून॥ नळाचीसंपत्तीहरून॥ हिंडविलेंरानोरान॥ तैसेंचकरीनपांडवां॥ ६२॥ करू-
ननानालाघवक्राव॥ येथवरीआणावेपांडव॥ पणकरूनियांसर्व॥ राज्यहरीनतयांचें॥ ६३॥ इच्छिलाडावपडे
लआपणा॥ दुजियासवशनहोतीकोणा॥ कींगारुडियाआधीनजाणा॥ सर्पजेविषभयंकर॥ ६४॥ वरकडांसक
रीलदंश॥ तैसेंअसतीमजपाशींपाश॥ ऐसेंऐकतांकौरवेश॥ पायधरीशकुनीचे॥ ६५॥ ह्मणेमातुळासांगों
काई॥ तूंजमींकायहोऊंउतराई॥ मींसर्वस्वेंतुझापाहीं॥ अंकिलाहोईनजन्मवरी॥ ६६॥ तरीहेंअवघीमा
न॥ प्रज्ञाचक्षूसकरींश्रुत॥ शकुनीयेऊनिबोलत॥ अंधाप्रततेधवां॥ ६७॥ तुझावडीलसुतदुर्योधन॥ चिंता-
ग्रीतंगेलाकरपोन॥ ऐसेंऐकतांअंबिकानंदन॥ परमघाबराजाहाला॥ ६८॥ पाचारोनिसुयोधना॥ कुरवाळी
नत्याचियावदना॥ ह्मणेऐश्वर्यभोगभोगितांमना॥ कायखेदजाहाला॥ ६९॥ दुर्योधनबोलेतेवेळी ॥ भुजं
गफणीचीसाउलीपडली॥ संशयनिद्रालागली॥ घडेलकायसांगपां॥ ७०॥ सर्पेंआटीघालून॥ हृदयधरिला-
क्रोधेंचरण॥ तोंव्याघ्रमानेसबैसलायेऊन॥ रक्तपानकरावया॥ ७१॥ शर्करेचेलाडूवळून॥ त्याचेमुखांतघात

लानेऊन॥ त्याचास्वादघेईलपूर्ण॥ घडेलकायसांगपां॥७२॥ शत्रुऐश्वर्यदेखोन॥ माझेनिघोंपाहतीप्राण॥ कांदे
शत्यागकरून॥ सेवीनविपीनएकला॥७३॥ मयसभेंतचालतां॥ जळींबुडालोंअवचिता॥ द्रौपदीहांसलीतेयोंचि
ता॥ खेदवाढेमाझिया॥७४॥ मार्गह्मणोनमीचालत॥ तंवकपाळाभिंतीआदळत॥ भीमह्मणेअंधसुत॥ यथा-
र्थहोसीसत्यत्वं॥७५॥ हृदयपिटीदुर्योधन॥ ह्मणेमीआतांविषभक्षीन॥ मीपावलियामरण॥ नांदेंघेऊनपांडवां॥
७६॥ धृतराष्ट्रह्मणेहावृत्तांत॥ विदुराससांगावासमस्त॥ दुर्योधनह्मणेनोचिंतित॥ आसुचाघात्तसर्वदां॥७७॥ आ-
सुचाअपमानकरून॥ पांडवांचेवर्णीतगुण॥ शक्रप्रस्थाचेंराज्यदेऊन॥ प्रबळकेलेतेणेंचि॥७८॥ विदुराचीबुद्धी
कुटिळ॥ आह्मांसमस्तांमारविल॥ तूंजपांडवांचेद्वारींबैसवील॥ भणगप्रायनेउनी॥७९॥ दग्धकांतारींवानर॥ हिं
डजेसाक्षुधातुर॥ कींदरिद्रीचोडवीकर॥ अन्नालागींघरोघरीं॥८०॥ पांडवांचेसाउलीसी॥ बैसाजाऊनिअहर्नि
शीं॥ मजघेऊनिकायकरिसी॥ मनींचिंतिसीघातमाझा॥८१॥ शतपुत्रपावतीमरण॥ तूंवाचजैसासर्पजीर्ण॥ तु
झेंसपिंडीकरण॥ पांडवांहातेंइच्छिसी॥८२॥ अरेयाब्रह्मांडमंडपांत॥ पांडवांऐसानाहींभाग्यवंत॥ त्यांचेंउच्छि
ष्टभक्षितांयथार्थ॥ हस्तनापुरीचेंराज्यपें॥८३॥ पांडवांपुढेंनिश्चिती॥ कुबेरआणिअमरपती॥ मजमशाकेंवाट
ती॥ द्वारींतिष्ठतीनृपसर्व॥८४॥ स्रुवर्णरत्नेंवस्त्रभार॥ घेऊनिघराधांवतीनृपवर॥ नानादेशींचेंविचित्र॥ भेटी
येतीसर्वदा॥८५॥ राजसूययज्ञींम्यांदेखिले॥ भूपानींकरभारपाठविले॥ असंख्यहस्तीभरोनिआले॥ उभेरा-
हिलेधर्मद्वारीं॥८६॥ धर्मासजाणवितीमात॥ आलेकरभारअसंख्यात॥ ठेवाह्मणावयाउसंत॥ धर्मासतेथेंन-
होय॥८७॥ नानादेशींचेहस्त॥ श्वेतवर्णचौदंत॥ सप्तद्वीपींचेघोडेअद्भुत॥ पाठवितीधर्मातें॥८८॥ रथशिबि-
कादिनानायानें॥ मणिमयजडीतप्रकाशमानें॥ सांगतांत्यांचीनामाभिधानें॥ शतवर्षेंसरेना॥८९॥ माझेंआधी
नहोतेंभांडार॥ म्यांसंपत्तीदेखिल्यासमग्र॥ शत्रूमानलेअपार॥ करींविचारएकआतां॥९०॥ शकुनीकुशळम

तुळ॥ मजलागीं परमस्नेहाळ॥ तेणें विचार केला तो समूळ॥ मनास आणीं राजेंद्रा॥ ९१॥ शकुनी कर्णी सांगत॥ पांड
व आणावे येथ॥ यज्ञ एक आरंभावा यथार्थ॥ असत्य निमित्त करूनियां॥ ९२॥ विश्वासोनि आणावे येथ॥ मग मां-
डूं कपट द्यूत॥ पण करून समस्त॥ जिंकूं वैभव क्षणार्धें॥ ९३॥ मूळ पाठवावा विदूर तेथ॥ त्याचे बोलें येतील येथ॥
एकांतीं चा वृत्तांत॥ कळों त्यांसि न द्यावा॥ ९४॥ महोत्साह पाहावया आदरें॥ राजयांस लिहावीं पत्रें॥ यावरी वि-
दुरास अंबिकापुत्रें॥ आज्ञापिलें ऐका हो॥ ९५॥ आरूढोनियां कनकरथीं॥ जावें शक्रप्रस्थाप्रति॥ घेऊन येईं पांड
वांप्रति॥ कुंती द्रौपदी समवेत॥ ९६॥ महोत्साह पाहोनि तत्त्वता॥ मग जावें पुरंदरप्रस्था॥ विदूर ह्मणे राया सम-
र्था॥ अवश्य जातों आतांचि॥ ९७॥ त्रिकाळज्ञानी विदुर भक्त॥ कळला पुढील सर्व वृत्तांत॥ मग रथारूढ होऊनि
त्वरित॥ शक्रप्रस्था चालला॥ ९८॥ विदुराचिये कंठीं॥ दुर्योधन घाली प्रीती मिठी॥ ह्मणे एकदां दावीं दृष्टी॥ पांड
व माझे आणोनियां॥ ९९॥ धर्मराया ऐसा सगूण बंधू॥ न होय कदा दुसरा साधू॥ शांतिक्षमेचा केवळ सिंधू॥ मज-
लागे धूतयाचा॥ १००॥ मनांत वाटे बहुत रखंती॥ केधवां देखेन धर्माप्रति॥ पांडवांहून निश्चिती॥ मज नावडे दूसरें॥
॥ १॥ नयनीं आणिले अश्रुपात॥ ह्मणे विदुरा जाय त्वरित॥ सर्वज्ञ बंधू धर्म सत्य॥ वदन दावी तयाचें॥ २॥ द्रौपदी कुं-
ती पांडव॥ पाहावया आणीं महोत्साह॥ अवश्य ह्मणे सर्वज्ञराव॥ विदुर तेव्हां चालिला॥ ३॥ वाटेस जातां विदुर॥ म
नांत करीत विचार॥ काय करील न कळे यादवेंद्र॥ कठीण प्रकार दिसतसे॥ ४॥ विदुर आला ऐकोन॥ सामोरे येती-
पांडव धांवोन॥ प्रेमप्रीती वंदिती चरण॥ देती आलिंगन सद्भावें॥ ५॥ मंदिरांत नेऊन प्रीती॥ विदुराप्रति आदरें पूजि
ती॥ येऊनि भेटली कुंती॥ द्रौपदी सती नमी तेव्हां॥ ६॥ धर्म ह्मणे दिवस धन्य॥ आजि जाहालें पितृदर्शन॥ वडिला
तुझे स्नेहें करून॥ आह्मी बाळकें सुखी असों॥ ७॥ धेनू दूरि वना जाय॥ परि वत्सापाशीं गुंतला स्नेह॥ कीं कूर्मिणी दु
रोनि पाहे॥ पिल्यांकडे स्नेहानें॥ ८॥ किंवा ते क्रौंच पक्षिणी॥ समुद्रवेदीं पिलीं ठेउनी॥ चारा घ्यावया लागोनि॥ जाय

षण्मासपर्यंत॥९॥परिक्षणक्षणाआठवूनिबालका॥पाहेऊर्ध्वकरूनिमुख॥त्यास्नेहेंतीतृप्तदेख॥तेंचरीतीतूंआ
ह्मातें॥१०॥तूंआमुचीस्नेहाळजननी॥रक्षिसीबाळपणापासूनी॥तुझियावोसंगाघालुनी॥स्वर्गागेलापंडुराज॥
११॥विवरतुवांकोरविलें॥लाक्षासदनांतरक्षिलें॥बोलतांनेत्रींअश्रुआले॥धर्मरायाचेत्यावेळे॥१२॥विदुरह्मणे
ऐकनिश्चित॥दुर्जनांचेंनेणवेमत॥उत्तमबोलबोलूनघात॥करितीलकेव्हांनेणवे॥१३॥पुढेंकाळदिसतोकठिण
॥नारदस्वामीगेलेसांगोन॥जेंवेदव्यासेंकथिलेंपूर्ण॥ह्रदयींधरीगोष्टीते॥१४॥आणीकहीसंतमहंत॥तूंजमा
गतीहेंचिहित॥मींहीतुजशिकवितोयथार्थी॥बुद्धिवादतोचिकी॥१५॥धृतराष्ट्रआणिदुर्योधन॥घरींमांडला
उत्साहयज्ञ॥बोलाविलेभेटीलागुन॥कुंतीद्रौपदीसमवेत॥१६॥दुर्योधनकरीरवंती॥धरीभेटीचीबहुप्रीती॥ऐ
कतांपांचहीबंधूहांसती॥हस्तासहस्तमेळउनी॥१७॥आश्चर्यवाटेबहुवस॥गोडीसआलेंमहाविष॥दुष्टअ
हीसशांतीनिःशेष॥उपजलीनवलवाटतें॥१८॥शीतळजाहालावडवानळ॥अमृतजाहलेंहळाहळ॥व्याघ्रें
धरिलीनिर्मळ॥शांतिआजिवाटतें॥१९॥नम्रजाहलीवज्रधार॥क्षारसिंधूजाहालामधूर॥दुर्योधनाचीप्रीती
साचार॥तैशीआजवाटत्ये॥२०॥विदुरह्मणेसावधान॥तुह्मासमीनेतोंबोलाउन॥परितेथेंमिळतीलदुर्जन॥म
जपचनबोलतांनये॥२१॥त्यासीखेळोंनकोयथार्थी॥बळेंमांडितीलकपटद्यूत॥जालियासप्राणांत॥पणकां॰
हींनकरावा॥२२॥सहस्त्रगोष्टीचीगोष्टयथार्थी॥खेळूंनकोबारेद्यूत॥अवश्यह्मणेकुंतीसुत॥धर्मराजउठिला
॥२३॥तंवद्रौपदीपाठवीसांगोन॥म्यांआजदेखिलेंदुष्टस्वप्न॥कौरवींपांडवकरूनिदीन॥सभांगणींबैसविले॥
॥२४॥सभेसिमजनेऊन॥गांजूनकरूंइच्छितीनग्न॥मगबोलेअर्जुन॥स्वप्नअसेव्यर्थचि॥२५॥जागृतीआठ
वीमनीं॥तोचभासदिसेस्वप्नीं॥असोआज्ञाहोतांसेवकजनीं॥भेरीठोकिल्यागमनार्थी॥२६॥निघालेंचातुरं
गदळ॥दणाणिलेंउर्वीमंडळ॥वाद्यघोषेंकरूननिर्मळ॥नभसकळकोंदलें॥२७॥कुंतीआणियाज्ञसेनी॥नि॰

घाल्याबेसोनसुरवासनी॥ ज्यांचेंवहनापुढेंधेत्रपाणी॥ लक्षावधीधांवती॥२८॥ मागेंपुढेंवेष्टीतभार॥ रथारू-
ढजातीपंडूकुमर॥ एकेरथींधर्मविदूर॥ बोलतजातीप्रीतीनें॥ २९॥ पृथ्वीवरपसरेसागर॥ तेंशीसेनाचालिली-
अपार॥ शतबंधूंसहसत्वर॥ सामोरायेतदुर्योधन॥ ३०॥ वहनारवालींउतरोन॥ धर्मआणिसुयोधन॥ देतप्रीती
आलिंगन॥ अनुक्रमेंसमस्तां॥ ३१॥ महोत्साहकरित॥ नेलेआपुल्यामंदिरांत॥ नानाप्रकारेंधर्माचेंचित्त॥ तोषवी
तसुयोधन॥ ३२॥ शतबंधूंसमवेत॥ दुर्योधनसदांनिष्ठत॥ नानाउपभोगसमर्पित॥ समयोचितआणुनी॥ ३३॥
शांतिअवलंबोनिशुद्ध॥ यात्रेंतहिंडतीजेसेमंद॥ कींवाटपाडेरजनींनसिद्ध॥ होवोनियांबेसती॥ ३४॥ ग्रामां-
तआलियाजाण॥ सावचोरबोलतीगोडवचन॥ कींसुरवींघालितांपूर्ण॥ बचनागगोडलागे॥३५॥ कींविषेंभर-
लाकुंभसमस्त॥ तोंडींकिंचितअमृत॥ कींबककबेसलाध्यानस्त॥ मानशीघांतमत्स्याचा॥ ३६॥ तैसातोकापट्य
सागर॥ लटिकादावीवरवरआदर॥ सारूनियांविहिताचार॥ सभेससर्वबैसले॥ ३७॥ कृपाचार्यद्रोणभी
ष्म॥ श्रेष्ठासनींबैसविलाधर्म॥ धृतराष्ट्रविदूरउत्तम॥ अश्वत्थामाबैसला॥ ३८॥ दुर्योधनकर्णशकुनी॥ दुः
शासनादिबंधूघेउनी॥ शाल्वबाल्हीकविकर्णयेउनी॥ सभास्थानींबैसले॥ ३९॥ जयद्रथभूरिश्रवासमस्त॥
पृथिवीचेराजेविराजित॥ दुर्योधनजांभईदेत॥ कायबोलतमातुळासि॥ ४०॥ दिवसनकंठेबाटेथोर॥ युगास
मानजाहलाप्रहर॥ सभारंगदिसेसाचार॥ ऐसाप्रकारकरावा॥ ४१॥ शकुनीबोलेतत्काळ॥ मांडावाकांहींद्यूत
रवेळ॥ धर्मराजप्रवीणकुशल॥ हृदयजाणेअक्षाचें॥ ४२॥ पणकरूनसवेग॥ रवेळतांभरेलसभारंग॥ सभा-
नायकचतुरसांग॥ साक्षसमस्तअसती॥ ४३॥ द्यूतरवेळेंआळसहरत॥ हारीयेतांहांवभरत॥ हारविलेंतेंह
र्षयुक्त॥ द्यावेंदुःरवनमानितां॥ ४४॥ जिंकिजेपणपैंकरून॥ तेंअवश्यद्यावेंआपण॥ नबोलावेंदुष्टवचन॥ निक
रासिंनयावें॥ ४५॥ युद्धींआणिद्यूतीं॥ क्षत्रियमार्गेंनसरती॥ नरवेळतांसत्यजाती॥ यशआणिप्रताप॥ ४६॥

कनकपाशविशाळ॥ आणूनठेविलेअढळ॥ पाशदेखतांतत्काळ॥ बुद्धीचळलीसर्वांची॥ ४७॥ भ्रूसंकेतेंदावी
दुर्योधन॥ त्वराकरींशकुनीसह्मणोन॥ विदुरह्मणेद्यूतनिंद्यपूर्ण॥ खेळतांहानिस्फुरता॥ ४८॥ हरिकीर्तनपु
राणश्रवण॥ शास्त्रचर्चावेदाध्ययन॥ व्यासकींसंजयमुखेंकरून॥ सादरहोऊनिऐकिजे॥ ४९॥ अवलक्ष्मीचें
स्थानद्यूत॥ खेळणारासअपेशयेत॥ आदाहार्यंयथार्थ॥ वासअसेअवदशेचा॥ ५०॥ दीपाचेप्रतिछायेसबै
सणें॥ रात्रींदधिभोजनकरणें॥ यागींचापुरोडाशसेवणें॥ अवदशाजायावसेतेथें॥ ५१॥ द्यूतकर्मीजोरत॥ अ
वलक्ष्मीनेथेंवसत॥ कारागृहींरजस्वलाहोत॥ अवदशावसतलेथें॥ ५२॥ संध्याकाळींनिद्रिस्त॥ वसनेंमळी
नअस्नात॥ हींआदरस्थळेंनिश्चित॥ सज्जननरअव्हेरिती॥ ५३॥ धृतराष्ट्राचियामनांत॥ पांडवजिंकावेखे
ळोनिद्यूत॥ बाह्यह्मणेविदुरजेंसांगत॥ उत्तमबुद्धीस्वीकारा॥ ५४॥ कर्णशकुनीदुर्योधन॥ ह्मणतीविदुरबो
लेजेंवचन॥ तोअभाग्यपथसंपूर्ण॥ खेळावेंजाणद्यूतआधि॥ ५५॥ पाशपाहातांसमस्त॥ स्तब्धजाहलेस
भासत॥ कर्वतूनराक्षसदंत॥ चौधारश्वेतसाधिले॥ ५६॥ स्थूळलांबवीतप्रमाण॥ स्फवर्णरसेंआरक्तचि
न्ह॥ देखतांसर्वीधरिलेंमौन॥ कोणीदूषणनठेवि॥ ५७॥ भीमह्मणेदुर्योधनासत्य॥ धर्मासीतूंनखेळेंद्यूत॥
सुयोधनह्मणेयथार्थ॥ बोलसीमात्रवृकोदरा॥ ५८॥ आह्मीतुह्मींसभाजन॥ कौतुकपाहूंदुरून॥ शकुनीध
र्मदोघेजण॥ परस्परेंखेळती॥ ५९॥ विदुरह्मणेमनांत॥ अहाहामांडलाअनर्थ॥ पृथ्वीचेनृपांचाअंत॥ झा
लायावरीतत्वता॥ ६०॥ नारदव्यासोक्तीउत्तम॥ विसरलाकींयथार्थधर्म॥ कृष्णमायाघोरपरम॥ नकळे
विंदानतियेचें॥ ६१॥ सूत्रधारीयादवेंद्र॥ उतरावयापृथ्वीचाभार॥ उपाययोजीश्रीधर॥ नचालेअणुमा
त्रकोणाचें॥ ६२॥ धर्मेंटाकितांफासे॥ भीमेंहाकफोडिलीआवेशें॥ टाळीवाजवीतेणेंकापतसे॥ दिग्गजआ
णिभूमंडळ॥ ६३॥ हांकेसरसाअवधारा॥ खोटाडावहोयखरा॥ थरथरांकांपेवसुंधरा॥ हारीकौरवांयेतसे॥

॥६४॥ भीमाची हांक भीम॥ कौरवां जिंकी धर्म॥ दुर्योधन ह्मणे परम॥ खोटें कर्म वोढावलें॥ ६५॥ धर्मास ह्मणे दुर्योधन॥ हाक फोडितो भीमसेन॥ फांसे पडती उलथोन॥ न खेळूं आह्मीं सर्वथा॥ ६६॥ माझे वांटे चातुर्य्यासि॥ शकुनी प्रेरिला खेळावयासि॥ हारजीत लागली त्यासि॥ माझी ऐशी जाणिजे॥ ६७॥ धर्म ह्मणे भीमसेना॥ क्षणभरी तुह्मी धरा मौना॥ हाक न फोडीं सर्वज्ञा॥ माझी आज्ञा पाळी हे॥ ६८॥ हाती पाश घेऊनि शकुनी॥ धर्मपैज बोल वचनीं॥ त्वां जिंकिल्या येक्षणीं॥ राज्य वो पूं गजपुरीचें॥ ६९॥ आह्मी जिंकिल्या यथार्थ॥ बोलिलें त्वां घावें सत्य॥ यावरी धर्म पैज बोलत॥ सभासत ऐकती॥ ७०॥ हारावणाचा मध्यमणी देख॥ ज्याचें तेज सूर्य सम्यक॥ तो देईन मी निःशंक॥ फांसे टाळीत शकुनी तेव्हां॥ ७१॥ जिंकिलें ह्मणे त्याक्षणा॥ मध्यमणी दिधला सुयोधना॥ दुसरे डाव सजाणा॥ विजयरथ समर्पिला॥ ७२॥ तिसरे डाईं साचार॥ दिधलें अक्षय भांडार॥ त्यामाजी सिद्धी निरंतर॥ वेंचितां न सरे कल्पांतीं॥ ७३॥ हा वच दे धर्मासि॥ परम चतुर रंभा उर्वशी॥ ऐशा दिधल्या लक्ष दासी॥ ज्यांचिया रूपासि मदन भुले॥ ७४॥ चौसष्ट कळा प्रवीण॥ मृगमद कस्तुरी वास पूर्ण॥ चौथे डाईं जाण॥ दुर्योधनादी धल्या॥ ७५॥ परम चतुर लक्ष दास॥ पांच वेडाईं दे निःशेष॥ शकुनी दुर्योधनास हर्ष॥ गगनामाजी न समाये॥ ७६॥ दश लक्ष कुंजर॥ सहीत पाखरा शृंगार॥ हिरे दंती जडिले अपार॥ साहा वेडाईं देत से॥ ७७॥ दश लक्ष दिव्य रथ॥ ज्यांची प्रभा सेने वर पडत॥ ते ही दुर्योधनास देत॥ मागें पुढें न पाहातां॥ ७८॥ पवनाहूनि वेग गाढे॥ गंधर्वें पार्थास दिधले घोडे॥ ज्यांचे आंग कांतीचे पडे॥ चाट्टिणें पाहा पृथ्वीवरि॥ ७९॥ वरि रत्नजडीत जीन॥ क्षीरसागरीं आणिले धुवून॥ कीं चंद्रकिर्ण आडून॥ श्यामकर्ण घडिले ते॥ ८०॥ कीं शुभ्र रजताचें साचार॥ नवनीताचे सुकुमार॥ जान्हवी उदक निरंतर॥ पाजोनियां वाढविले॥ ८१॥ ऐशा अश्वशाळा समस्त॥ लक्षानुलक्ष न व्हे गणित॥ सात वेडाईं देत॥ दुर्योधना धर्मराव॥ ८२॥ कुटीळ बोलती ते क्षणीं॥ द्यूतरूपें

युद्धसमरंगणीं॥ दाकून जातां होय हानी॥ क्षत्रधर्मा निर्धारें॥ ८३॥ सौबळधर्मास ह्मणत॥ उदार असे कीं तुझें
चित्त॥ लोभ न धरीं यथार्थ॥ तृणवत सर्व मानीं कां॥ ८४॥ शकट उष्ट्र खेचर खर॥ आठ वेडाईं दिधले समग्र॥ भ्र
मे भ्रमला से युधिष्ठिर॥ अधीक ह्मावे भरतसे॥ ८५॥ जाळ देखोन लवला हें॥ पतंग पडे मागें न पाहे॥ सर्वउपे
क्षूं निजापें॥ सती जैशी पतीसवें॥ ८६॥ तैसें धर्मास जाहलें सत्य॥ मागें पुढें न पाहे भ्रांत॥ अक्षय भांडार कृष्णा
दत्त॥ नवमा डाईं दीधलें॥ ८७॥ धृतराष्ट्रास ह्मणे विदुर॥ दुर्योधन तुझा पुत्र॥ परम चांडाळ अपवित्र॥ घात
करील कुळाचा॥ ८८॥ हा जन्मला जे व्हां चांडाळ॥ अवचिन्हें प्रगटलीं पुष्कळ॥ त्याचा त्याग करीं तत्काळ॥
प्राणासहीत सांगीतलें॥ ८९॥ म्यां सांगीतला बुद्धिवाद॥ परि तूं न ऐकसी बुद्धिमंद॥ दुष्ट फळें हीं निषिद्ध॥
भोगीं आतां शेवटीं॥ ९०॥ अजून तरि द्यूत मोडीं॥ चांडाळ हा शकुनी दवडीं॥ दुर्योधना घालून बेडी॥ बंदीं रक्षीं
दुर्जन॥ ९१॥ आज्ञा देईं भीष्मद्रोणासि॥ धरवीं यांची भीड कायसी॥ कारागृहीं रक्षूनियासि॥ शकुनी बाहेर दव
डावा॥ ९२॥ सहज मागतां सुखें करून॥ सर्वही देता पंडुनंदन॥ द्यूत खेळून दुर्जन॥ आणिलें मरण सर्वांसी॥ ९३॥
ऐशीं विदुराचीं वचनें॥ ऐकोनियां दुर्योधनें॥ ह्मणे रे विदुरा वडिलपणें॥ अमर्यादा जल्पसी॥ ९४॥ पांडवांचें कल्या
ण इच्छिसी॥ आमचा तूं घात चिंतिसी॥ सर्पीण भक्षी जेवीं पिल्यांसि॥ पापराशी तैसा तूं॥ ९५॥ तूं वयें वाढिलासि
देख॥ परि बुद्धिहीन शतमूर्ख॥ मर्यादा सांडून निःशंक॥ बोलसी येथें अपवित्रा॥ ९६॥ ऐसें बोलावें वचन॥ जे
णें निवती सभाजन॥ न कळे तरी धरूनि मौन॥ मृतप्राय असावें॥ ९७॥ बोलों नेणसी पामरा॥ उठ जाय आपुले
घरा॥ तुज रक्षिलें या अवसरा॥ राजबंधू ह्मणोनियां॥ ९८॥ विदुर ह्मणे रे मशका॥ सुयोधना ऐक कीटका॥ दुष्टप
पीं पात्र शोका॥ प्राप्त करसी धृतराष्ट्रा॥ ९९॥ द्वेषाग्नी वाढला प्रबळ॥ पतंगप्राय पडल सकळ॥ माझी बुद्धी केव
ळ॥ विषप्राय वाटे तुह्मां॥ २००॥ पांडवांची लाभली संपत्ती॥ मूर्खा सूख वाटे चित्तीं॥ परि सांगतों तूज निश्चितीं॥

लाभत्यांसजाहालाजाणपां॥१॥त्यांचीसंपत्तीत्यांसजाईल॥परिनिवैरस्थीहोईल॥ईश्वरीमायागहनसबळ॥
अन्यायकरवीतुजहातीं॥२॥त्यांचेंत्यांससर्वघाल॥काळांतरेंप्राणहीवोपाल॥अमर्यादआटेलदळ॥परिक्रूणफि
टेना॥३॥पितातुझाजीर्णरडत॥पांडवांघरींपडेलयथार्थ॥व्यासाश्रमींअग्नीनं॥दग्धहोईलशेवटीं॥४॥प्राण-
त्यागितांसुयोधन॥मगआठविसीमाझेंवचन॥द्यूतनव्हेतुझाप्राण॥भीमग्राहीकृपानला॥५॥माझीं वचनेंवाट
तीकठिण॥परिपुढेंगोडअमृताहुन॥औषधआधीं कडुवटपूर्ण॥रोगहरणपुढेंकरी॥६॥जैशीनाबदसाकर॥सु
खीघालितांखडतरफार॥पुढेंगोडअनिवार॥वचनेंसाचारमाझींतैशीं॥७॥तुरटवाटेआमलक॥परिपुढेंगोडी
अधिक॥माझींवचनेंदुःखमोचक॥न्यायनिष्ठुरतैशींच॥८॥पितापदवीपुत्रालागुन॥त्यासवाटेविषासमान॥
परिपुढेंगोडीजाण॥महिमापूर्णवाटेजेव्हां॥९॥असोऐसेंबोलून॥विदुरेंधरिलेंतेव्हांमौन॥शकुनीह्मणेधर्मा-
लागुन॥तुवांद्यूतयज्ञआरंभिला॥१०॥पूर्णनहोतांपूर्णाहुती॥जगींवाढेलअपकीर्ति॥उदारत्वधरीचित्तीं॥धै
र्यनसोडींसर्वथा॥११॥श्र.भडावपडतांएकसरा॥इतुकेंहीनेशीआपुलेघरा॥धर्मपेटलाअविचारा॥शपथका
यबोलत॥१२॥पूर्वसमुद्रधरून॥पश्चीमसमुद्रपर्यंतजाण॥खिल्लारेंअसतीगोधन॥दिधलींतुह्मासतितुकीहीं
॥१३॥तोहीडावजिंकिला॥पुढेंधर्मकायबोलिला॥देशदुर्गगडतेवेळा॥सर्वराज्यवोपिलें॥१४॥ब्राह्मणादि
लेंवृत्तीधन॥तेंवेगळेंकरूनिपूर्ण॥तेरावेडायींजाण॥सर्वदेशसमर्पिले॥१५॥द्रौपदीचेपांचपुत्र॥जिंकि
लेनलागतांक्षणमात्र॥चवघेबंधूपवित्र॥आपणपांचवाशेवटीं॥१६॥ह्मणेतुमचेनिजभृत्य॥तैसेपांचबंधूयथा
र्थ॥तोहीडावजिंकिलाक्षणांत॥जाहलाअनर्थह्मणतीपैं॥१७॥शेवटींद्रौपदीचाडाव॥घालूनरखेळेधर्मराय॥
जैसेंपिशाचभुलोनिसर्व॥टाकोनिजायआपुलें॥१८॥द्रौपदीऐशीसुंदरी॥त्रिभुवनांतनांहींदूसरी॥इंद्रनीलकी
ळगाळूनिनिर्धारीं॥वोतिलीतयाविधीनें॥१९॥जीचेआंगींचासुवास॥जायअर्धयोजनआसमास॥जैसेंश्री-

कृष्णरूपविशेष॥ तेरें चरूपडें द्रौपदीचें॥ २०॥ एवंविसावेंडायीपूर्ण॥ जिंकिलें द्रौपदीनिधान॥ हाहाःकार· करितीसज्जन॥ महाअनर्थभाविनी॥ २१॥ कृषिचक्षस्थळेंपीटिती॥ भूपाळकपाळेंबडविती॥ भीष्मद्रोणा· चेनेत्रींयेती॥ अश्रुपातदळदळां॥ २२॥ कर्णदुर्योधनशकुनी॥ यांचाआनंदनमायगगनी॥ अंधआल्हादला मनीं॥ म्हणेसंपदाजतनठेविजे॥ २३॥ वीसडावसंपूर्णजाहले॥ आतांआणीकदोनउरले॥ अरण्यवासपुढेंबो लिले॥ अज्ञातवासदूसरा॥ २४॥ जाहलियावस्त्राहरण॥ पुढेंआहेतेंनिरूपण॥ व्यासशिष्यवैशंपायन॥ ज न्मेजयाप्रतिसांगे॥ २५॥ ब्रह्मानंदेंश्रीधर॥ तेंचकथावर्णीलसाचार॥ श्रवणकरोतपंडीतचतुर॥ विवेकसा· रसज्जन॥ २६॥ स्फुरसपांडवप्रतापग्रंथ॥ सभापर्वव्यासभारत॥ त्यांतीलसारांशयथार्थ॥ विसावेअध्यायींकं थियेला॥ २२७॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु॥ ॥ छ॥ ॥ छ॥ ॥ छ॥ ॥ छ॥

श्रीगणेशायनमः॥ अजातशत्रुधर्मराज॥ धर्मपरायणधर्मात्मज॥ स्वधर्माचरणदेवद्विज॥ भजननसांडीसर्वथा
॥१॥ कौरवपरमदुर्जन॥ कपटद्यूतत्यांसीखेळोन॥राज्यसेनादेशधन॥ द्रौपदीसहितजिंकिलें॥२॥ पांचपांडव
पंचानन॥ कपटकूपींपडिलेयेऊन॥ कींतेपंचमराळनेऊन॥पंकगर्त्तेंतरोंविले॥३॥विदुरासह्मणेंदुर्योधन॥ पांड
वजिंकोनिकेलेदीन॥जैसेंदग्धवनींहरिण॥तेजहीनक्षुधितपैं॥४॥द्रौपदीझालीआमचीदासी॥ऊठबोलाऊ-
निआणिसभेसी॥ तिचेंपतिव्रतापणजनासी॥दारखवूंआजितलतां॥५॥विदुरह्मणेपापखाणी॥तुजनिकटआ
लीप्राणहानी॥ कायअपवित्रबोलसीवाणी॥ महादुर्जनाकपटिया॥६॥ दुर्योधनह्मणेदेखा॥ हापांडवांचापाठिरा
खा॥ कृत्रिमसांगतविवेका॥हितशत्रूघातक॥ ७॥ मागकामसूतपुत्रजाण॥त्यांससांगेदुर्योधन॥ आणीपांचाळी
बोलाऊन॥भीडसोडूनसभेसी॥८॥ हेरप्रवेशलामंदिरीं॥ ह्मणेअहोद्रुपदराजकुमरी॥ दुर्योधनेंतेथवरी॥बोला
विलेंजाणपां॥९॥ धर्मेंहरविलेंसमस्त॥कोणाचाशब्दनचालेतेथ॥ द्रौपदीह्मणेमनांत॥मांडिलाअनर्थनिर्धा-
रें॥१०॥वाटेकाळजींघातलीसुरी॥कींसौदामिनीपडिलाशिरीं॥ कींसकुमारकमळणीवरी॥वज्रघायपडियेला
॥११॥मगद्रौपदीह्मणेतयासी॥जाऊनिसांगेंभीष्मद्रोणासीं॥तुह्मीश्रेष्ठअसतांसभेसी॥ विपरीतकरणीकायहे
॥१२॥ धर्मेंहारविलेंआपणास॥ तरितोतुमचाजाहालानिःशेष॥धर्मासआणिआह्मास॥ मगसमंधकायसा॥
॥१३॥मीपंचपुरुषांचीललनापाहीं॥मजसर्वथाजिंकिलेंनाहीं॥नारदेंनेमिलेंसर्वही॥ सीमाकेलीअलोट॥१४॥
पांचांठायींवांटिलेंवर्ष॥ दोनमासद्वादशदिवस॥ यांतमीस्त्रीभिमाचीनिःशेष॥ तरीधर्मकेंवीहारवी॥१५॥ सभेसि
येऊनसूतनंदन॥सांगेसुयोधनावर्तमान॥रुतुस्नातद्रौपदीनिधान॥कैसीआणूंसभेंत॥१६॥त्यासनिर्भर्च्छीदुर्यो
धन॥ मगउठविलादुःशासन॥ह्मणेधांवआणिवोढून॥ केशधरूनीयेथवरी॥१७॥आमचीतेझालीदासी॥मगति
चीभीडकायसी॥दुःशासनधांवलावेगेंसी॥द्रौपदीपासींपातला॥१८॥ हरिणीवरीक्रोधयुक्त॥महाव्याघ्रजेवीझें

पावत ॥ कींतस्करजैसासंचरत ॥ राजभांडारीं एकलाची ॥ १९ ॥ कींमेदिनीगर्भरत्न ॥ हारूंधावलाद्विपंचवदन ॥
तैसायाज्ञसेनीजवळयेउन ॥ कायबोलेदुरात्मा ॥ २० ॥ ऊठआतांवेगेंयेथून ॥ राजापाचारितोतुजलागून ॥ तुझेभ्रता
रदासकरून ॥ आह्मींजिंकूनठेविले ॥ २१ ॥ तूंआमचीदासीनिर्धारें ॥ ऊठसभेचालसत्वरें ॥ तुझेंभाग्यउमटलेंचतुरे
॥ दुर्योधनावरीआतां ॥ २२ ॥ आयुष्यांतींयमदूत ॥ तैसाद्रौपदीसभासत ॥ कंठहोऊनसद्गदित ॥ कायमातबोलिली ॥
॥ २३ ॥ ह्मणेदेवरातूंअवधारीं ॥ सभेसिकैसीनेतानारी ॥ ज्येष्ठसहोदराचीसुंदरी ॥ गांधारीसमतुह्मातें ॥ २४ ॥ देवराए
केंयेसमयीं ॥ माझाकैवारीतूंचिहोईं ॥ निर्दोषपदरींयशघेईं ॥ केवळशिष्टाईकरीतैसी ॥ २५ ॥ देवरातूंहोयमाउली ॥
लज्जारक्षींआजिआपुली ॥ माझाद्रुपदराजयेवेळीं ॥ तूंचिहोईंदयाळा ॥ २६ ॥ किंवाशस्त्रघेऊनतत्वतां ॥ वधींमज
येथेंचिआतां ॥ लोकधन्यह्मणतीऐकतां ॥ वानितीलकीर्तीतुझी ॥ २७ ॥ निर्दयबोलेपापराशी ॥ ऊठवाचाळेचालस
भेसी ॥ तुजओढोनिनेईनकेशीं ॥ जाहालीसदासीआमचीतूं ॥ २८ ॥ हिंसकासकैंचीदया ॥ मार्गभ्रांसकैंचीमाया ॥
उपरतीपैशून्यवादिया ॥ कदाकाळींघडेना ॥ २९ ॥ धनलुब्धासनावडेधर्म ॥ जारासिकायसेंसत्कर्म ॥ साधुनिंदका
नावडेप्रेम ॥ भजनमार्गकदाही ॥ ३० ॥ शांतनव्हेकदाविरवार ॥ दुर्जननबोलेकधींचमधुर ॥ ध्यानकरूंबैसलेखर
काळत्रयींघडेना ॥ ३१ ॥ असोओढवलाकाळकठिण ॥ पांचाळीउठिलीतेथोन ॥ गृहांतचालिलीदरवोन ॥ दुःशा-
सनधांवला ॥ ३२ ॥ अर्धयोजनआसमास ॥ जीचेतनूचाजायसुवास ॥ चहूंकडेफांकेजीचाप्रकाश ॥ तिचेकेशध-
रियेले ॥ ३३ ॥ हाकफोडीश्रीकृष्णभगिनी ॥ आसडूनिपाडिलीमेदिनीं ॥ ब्रह्मांडडळमळिलेंतेक्षणीं ॥ उसळेपा-
णीसागरींचें ॥ ३४ ॥ रोहिणीवरवासरमणी ॥ खचोंभावितीतेव्हांधरणी ॥ वैकुंठकैलासतेक्षणीं ॥ डळमळिलेंअ
तिदुःखें ॥ ३५ ॥ केशींआकर्षोनिवेल्हाळ ॥ सभेसिचालिलाचांडाळ ॥ जैसाहरिणीसधरूनशार्दूळ ॥ घेऊनिजा
यत्वरेनें ॥ ३६ ॥ रुदनकरीतअधोवदनी ॥ नयनोदकेंभिजतीकुंभिनी ॥ ह्मणेवीरगुंठाकरेंकरुनी ॥ हळूचालीध

रीकां॥ ३७॥ भूषणेंजाहालीं विगलित॥ ठांयींठांयींगळोनिपडत॥ मुक्तेंवाटेसविखुरत॥ तेजें कविगुरूसारिखीं
॥ ३८॥ ह्मणेराजसासरवयादेवरा॥ हळूचालेंनकरीत्वरा॥ केशवोदितीएकसरा॥ सुढाळमुष्टीधरीकां॥ ३९॥ उभा-
राहेंएकक्षण॥ कासावीसजाहालेमाझेप्राण॥ रसनाअधरगेलेंवाळोन॥ जीवनेंवीणयेधवां॥ ४०॥ द्रोणगुरूची
तुह्मासआण॥ धांवडूनकामजलागून॥ तुटोनिपडोंपाहतीचरण॥ परिकुलक्षणनायके॥ ४१॥ सेभेस आणिली
सुंदरी॥ उजेडपडिलासकळांवरी॥ विद्युल्लताजैसीअंधारीं॥ नभमंडळींप्रकाशे॥ ४२॥ देखतांद्रौपदीनिधान॥ संत
भक्तांझांकिलेनयन॥ परमसंतोषलेदुर्जन॥ स्वरूपदेखोनतियेचें॥ ४३॥ जिचियास्वरूपावरून॥ कुर्वंडी करिजेर-
तीरमण॥ अपर्णेची अपरप्रतिमाजाण॥ गुणनिधानद्रौपदी॥ ४४॥ पाकशासनकमळजन्मा॥ त्यांचीन करवेजसी
प्रतिमा॥ रंभाऊर्वशीतिळोत्तमा॥ चरणांगुष्ठींनतुळती॥ ४५॥ कृष्णाचऐसी कृष्णाभगिनी॥ कींवोतिलीइंद्रनीळग
ळूनी॥ खंजनमृगमीनलोचनावरूनी॥ वोंवाळूनटाकावे॥ ४६॥ दंतजेविहिरेखाणी॥ बोलतांउजेडपडेमेदिनीं॥
जीचासुखप्रकाशदेखोनी॥ रोहिणीवरलज्जित॥ ४७॥ कर्णह्मणेद्रौपदीस॥ तूंदुर्योधनाचेअंकींबैस॥ भोगींआ
तांराज्यविलास॥ सोडींआशापांडवांची॥ ४८॥ ऐसेंऐकतांपद्माक्षी॥ भीमार्जुनाक्रोधेंलक्षी॥ परिपक्षहीन अंध
पक्षी॥ तैसेदीनदिसताते॥ ४९॥ भीमासनावरेक्रोधकदा॥ सांवरूनिकरें अकर्षीगदा॥ ह्मणेकौरवांच्याशिरच्छे
दा॥ करीनआतांक्षणार्धें॥ ५०॥ पांचाळीनेंपाहातांविलोकून॥ माझेंहृदयजाहालेंशतचूर्ण॥ वडवानळजाळीतृ-
णकानन॥ तेवींदुर्जनमारीनहे॥ ५१॥ धर्मह्मणेऐकभीमा॥ त्याणीपणकरूनिजिंकिलेंआह्मां॥ क्रोधआवरीकरी
क्षमा॥ वेगेंपाहेंविचारून॥ ५२॥ तुजक्रोधनावरेचकदा॥ तरीमाझियेमस्तकींप्रेरीगदा॥ परीस्वधर्मसत्यमर्यादा
सर्वथाहीनसांडीतूं॥ ५३॥ चळतीलमेरूमंदर॥ पृथ्वीसोडीलभूधर॥ हेंअघटीतघडेलसाचार॥ परंतुधीरनसो
डावा॥ ५४॥ पश्चिमेसउगवेलजरीरोहिणीपती॥ शिळेवरीकमळेंउगवती॥ हेंहीघडेपरीनवर्तती॥ भगवद्भक्तअ

सत्यपैं ॥ ५५ ॥ भीमह्मणेएकांतीं ॥ वडिलींतुजसांगीतलीनीती ॥ नारदव्यासाचियासुक्ती ॥ रत द्यूतीं होऊंनको ॥ ५६ ॥ वर्जितांरखेळोनियांकपट द्यूत ॥ व्यसनींपाडिलेसमस्त ॥ तुझेतोडीनआतां हस्त ॥ गदाघायेंतत्काळ ॥ ५७ ॥ अवश्यह्मणेमहाराजधर्म ॥ गदाउचलीक्रोधें भीम ॥ तोसद्विवेकीपार्थपरम ॥ हस्तधरितभीमाचा ॥ ५८ ॥ ह्मणेयाब्रह्मांडमंडपांत ॥ धर्माऐसासत्यशांत ॥ नाहींनाहींयथार्थ ॥ साक्षदेतसरस्वती ॥ ५९ ॥ जोनिश्चयेंगंगेचालोट ॥ तोविवेकरत्नाचामुकुट ॥ कींभक्तीवैराग्यरणींसुभट ॥ दिव्यहिराजन्मला ॥ ६० ॥ सद्बुद्धीसरोवरींचाराजहंस ॥ भक्तिउद्यानीचातापस ॥ जोअजातशत्रुनिर्दोष ॥ पंडुसमान आह्मातें ॥ ६१ ॥ तेणेंशब्दगोंविलानेमा ॥ तोनिश्चयतुह्मांआह्मां ॥ धर्मासमारून भीमा ॥ अपकीर्तीचिकरावी ॥ ६२ ॥ संसार मृगजळन्याय ॥ याचाभरवसाअसेकाय ॥ येअवनीसबहुतराय ॥ भोगोनिगेलेपूढेंजाती ॥ ६३ ॥ भीमाचाक्रोधाग्निअत्यंत ॥ चालिलाविवेकवनजाळित ॥ सुशब्दवर्षलामेघपार्थ ॥ तेणेंशांतजालातो ॥ ६४ ॥ धर्माचेचरणवंदुनी ॥ भीमबैसलास्वस्थानी ॥ तोंदुःशासनकेशकवळोनी ॥ झोंकादेतद्रौपदीतें ॥ ६५ ॥ इंदुवदनापद्मलोचनी ॥ पद्मजनकाची भगिनी ॥ सकुमारएकवसनी ॥ जाचिलीदुर्जनीतेधवां ॥ ६६ ॥ पूर्वींजालाराजसूययज्ञ ॥ सेवटींझालें अवभृतस्नान ॥ तेव्हांकेशमोकळेकरून वीरगुंठीबांधिलीजे ॥ ६७ ॥ तेकेशहस्तीदृढधरूनदुःशासन ॥ झोंकेदेतसेहिंसकदुर्जन ॥ तेव्हांद्रौपदीगुणनिधान ॥ भीष्मद्रोणाकडेपाहे ॥ ६८ ॥ तुह्मींवडीलन्यायसागर ॥ अन्यायहोतोपरमदुस्तर ॥ इहींमजजिंकिलेंकायसाचार ॥ वदाउत्तरयेधवां ॥ ६९ ॥ भीष्मवदेतेक्षणीं ॥ ऐकेंवोसद्गुणरत्नखाणी ॥ धर्मबोलेस्वमुखेंकरूनी ॥ आह्मासपणीं जिंकिलें ॥ ७० ॥ तेथेंआमचेंन्यायवचन ॥ कोणमानीलसांगप्रमाण ॥ मगबोलेगुरुद्रोण ॥ भीडधरून कौरवांची ॥ ७१ ॥ ससुद्राहूनिअगणित ॥ धर्माचेंनगणवेमातेंसत्व ॥ निर्मळअंतरशांतदांत ॥ वचनविपरीतनबोले ॥ ७२ ॥ कोणीभीडटाकून ॥ नबोलेचियथार्थवचन ॥ हेंदेखोनिविकर्ण ॥ बोलताझालाउठोनियां ॥ ७३ ॥ द्रौ

पदी जिंकिली [illegible] ह्मणतील कोणी ॥ गळित कुष्ट झडेलवाणी ॥ त्यासनिकट आली प्राणहानी ॥ येचक्षणी जाणिजे ॥ ७४ ॥ त्रि[illegible]र हाक फोडोनी ॥ ह्मणे नाहीं जिंकिली याज्ञसेनी ॥ हे अन्याय यास्थानी ॥ साधू कोणी नसे येथें ॥ ७५ ॥ अंतर्बा[illegible] ह्य धृतराष्ट्र अंध ॥ पुत्रलोभें झाला मंद ॥ अरे हे भीष्मद्रोण वृद्ध ॥ सत्य येथें बोलती ॥ ७६ ॥ कुळक्षयास कारण [illegible] ॥ तो हा शकुनी आणि कर्ण ॥ अधिकाधीक दुर्योधन ॥ इहीं बोधून खवळिला ॥ ७७ ॥ राजा केवळ राक्षस जाण ॥ व्याघ्ररूपी अवघे प्रधान ॥ सेवक ते केवळ श्वान ॥ मग अन्याय वर्तत असे ॥ ७८ ॥ दुर्योधनास स्फुरख वाटत ॥ परिसमीप आला अनर्थ ॥ द्रौपदी केली उभी येथ ॥ भुलले मूर्ख सर्व ही ॥ ७९ ॥ गांजितां द्रौपदी वेल्हाळा ॥ परि हे प्रळयाग्नी-चीज्वाळा ॥ तुह्मा पतंगास कळा ॥ भस्म करील क्षणार्द्धे ॥ ८० ॥ ऐकोन विकर्णाची वाणी ॥ स्फुर वर्षती दिव्य सुमनीं ॥ मस्तक आणि तर्जनी ॥ डोलविती आनंदें ॥ ८१ ॥ ऐसें देखोनि ते क्षणी ॥ कर्ण कोपला शतगुणीं ॥ धर्म बोलें करूनपणीं ॥ याज्ञसेनी हरविली ॥ ८२ ॥ तें असत्य अवघें करूनी ॥ मल तें चिजल्पसी सभास्थानी ॥ तुज वधितों येचक्षणी दुखवेल मनी गांधारी ॥ ८३ ॥ शतमूर्ख तूं त्रिशुद्धी ॥ वडिलांस शिकविसी बुद्धी ॥ येथें काय जाहाला अविधी ॥ दासी सभेसि आणिल्या ॥ ८४ ॥ एक स्त्री भ्रतार पांचजण ॥ कोणे शास्त्रीं केलें लेखन ॥ हे दोषखाणी जारिण ॥ करा नग्न येथें आतां ॥ ८५ ॥ वस्त्रें भूषणे संपूर्ण ॥ अवघीं घ्या पांडवांचीं हिरोन ॥ ऐसें ऐकतां पांचही जण ॥ वल्कलें वेष्टून बैसले ॥ ८६ ॥ जानुउघडी करून ॥ द्रौपदीस दावी दुर्योधन ॥ ह्मणे बैस अर्धांगीं येउन ॥ पट्टराणी होई तूं ॥ ॥ ८७ ॥ भीमे गदा उचलोनि लवला हे ॥ ह्मणे अंधपुत्रा इकडे पाहें ॥ तुझा अंक गदाघायें ॥ चूर्ण करीन जाण पां ॥ ८८ हें जरी न करवे मां झेनी ॥ तरी प्रसवून वंध्या कुंती जननी ॥ लज्जा लागली सोमवंशा लागुनी ॥ कृष्णदास्य त्वव्यर्थ गेलें ॥ ८९ ॥ ऐसें ऐकतां वचन ॥ प्रगट बोले दुर्योधन ॥ ह्मणे गे द्रौपदी येऊन ॥ बैस निःशंक मांडीवरी ॥ ९० ॥ ऐसें बोलतां दुर्योधन ॥ द्रौपदी बोले तीक्ष्ण वचन ॥ बळें चचेतविला प्रळयाग्न ॥ कौरवकूळ जाळावया ॥ ९१ ॥ बळें

खवळिला भुजंग ॥ कीं शुंडें पिळिला मत्त मातंग ॥ निद्रिस्थ व्याघ्र सवेग ॥ नासिकावरी ताडिला ॥ ९२ ॥ तैसी ते पां
डवललना ॥ ह्मणे चांडाळा दुर्योधना ॥ गळित कुष्ट भरो निरसना ॥ झडों दे तुझी पापिया ॥ ९३ ॥ महाप्रळयसौंदा
मिनी ॥ हिंसका पडो तुजवरी येउनी ॥ तुझे दृशीचे कोळसे होउनी ॥ भस्म होऊं दे दुर्जना ॥ ९४ ॥ भीमे गदा ने मिलीन
वरी ॥ रणचत्वरीं घेई मांडीवरी ॥ पंचप्राण घालोनि बाहेरी ॥ प्रळयलग्न लावी कां ॥ ९५ ॥ तुझ्या स्त्रिया हृदय पिटुनी
॥ वाद्यें वाजविती भयंकर वदनी ॥ रक्त मृत्तिका मिळोनी ॥ हळदी सहज ची लागेल ॥ ९६ ॥ मग ते गदा हृदयीं धरून ॥
समरमंचकीं करी शयन ॥ बंधू समवेत यमसदन ॥ पावोनि करी साडे तेथें ॥ ९७ ॥ शब्दशस्त्रांचे घाय तीक्ष्ण ॥ ला-
गतां खवळला दुर्योधन ॥ ह्मणे इचे तुकडे करून ॥ सर्षपप्राय टाका रे ॥ ९८ ॥ जिव्हा आणि नासीक कर्ण ॥ टाका हस्त
शस्त्रें छेदुन ॥ दुःशासना फेडीं वसन ॥ दावी नग्न सभेंत ॥ ९९ ॥ वाम हस्तें केश कवळून ॥ सव्य हस्तें फेडी वसन ॥ न-
गरलोक सभा सज्जन ॥ झांकिती नयन अति दुःखें ॥ १०० ॥ कृष्णा सकरावया स्फूत ॥ वेगें पिटिला मनोदूत ॥ ह्मणे
मांडिला थोर आकांत ॥ धांवें त्वरित कैवारिया ॥ १ ॥ सुभद्राकारके भवानी ॥ मूळपीठ द्वारकाविलासिनी ॥ हृदय
वृंदारण्यविहारिणी ॥ वेगें करून धांवें कां ॥ २ ॥ खगवरकेतना इंदिवरनेत्रा ॥ इंदिरावरा सुजळ जळगात्रा ॥ विश्व
व्यापका त्रिनेत्रमित्रा ॥ सूत्राचा महिमा नेणें तुझा ॥ ३ ॥ आतां यादवकुळमुकुटअवंतसा ॥ कंसांतका क्षीराब्धिवि
लासा ॥ सच्चिदानंदा मनोहरवेशा ॥ शरणागतातारिसी तूं ॥ ४ ॥ सनकादिवंद्या जगदोद्धारा ॥ पद्मजातजनका
त्रिभुवनसुंदरा ॥ पांडवपाळका रणरंगधीरा ॥ अति उदारा श्रीरंगा ॥ ५ ॥ मायाचक्रचाळका निरंजना ॥ महारज
तपूर्णवसना ॥ मधुसुरकैटभभंजना ॥ जगज्जीवना धांवें कां ॥ ६ ॥ दशावतारचक्रचरित्रपाळका ॥ धांव अनंतब्र
ह्मांडनायका ॥ ब्रह्मानंदसुखमृगांका ॥ दावी एकदां ये वेळे ॥ ७ ॥ मुचुकुंदोद्धारका गिरिधरा ॥ पंचशरजनका
परात्परा ॥ निगमागमवंद्या अनंतनेत्रा ॥ संकट माझें न देखसी ॥ ८ ॥ अंध जातां घोर कांतारीं ॥ समागमी टाको

निगेलेदूरी ॥ मगतळमळीनानापरी ॥ मजसुरारीतेविझालें ॥ ९ ॥ व्याघ्रें पाडसधरिलेंवनी ॥ तेंदीनरजनीचिंतीज
ननी ॥ वैकुंठपुरविहारिणी ॥ चिंतित्येंमनींतेवितूतें ॥ ११० ॥ प्रसूतसमयमाध्यान्हीं ॥ तृषितधेनूदग्धवनी ॥ तों-
सहस्त्रव्याघ्रींयेउनी ॥ गर्जनाकरीतवोढिली ॥ ११ ॥ भक्तवत्सळास्नेहाळाहरी ॥ तेवीमजगांजिलेंदुराचारीं ॥ कोठें
गुंतलासिकैवारी ॥ कमळायतनाहृदयस्था ॥ १२ ॥ येसमयींनयेसीकरुणार्णवा ॥ उणेंयेईलकींबिरुदनावा ॥ भ
क्तवत्सलारमाधवा ॥ कंठबाहतांशोकलाकीं ॥ १३ ॥ गांजितीकौरवजनदुर्जन ॥ यावयाकांधरिलाअभिमान ॥
पांचाळीश्रीरंगातुझीबहिण ॥ घोषगाजेत्रिभुवनीं ॥ १४ ॥ कौरवकुबुद्धीससुद्रांत ॥ बुडाल्येंहरीदेईहात ॥ दीन
वदनझालेपंडुसुत ॥ बांधलेदृढकपटपाशें ॥ १५ ॥ कौरवपीडावणवादारुण ॥ जळतोकेशवावरुषेंघन ॥ भीष्म
द्रोणाचेंनचालेवचन ॥ म्लानवदनबैसले ॥ १६ ॥ कौरवसभाभूतमेळीं ॥ पडिलीतुझीदासीपांचाळी ॥ पंचाक्ष-
रीतूंवनमाळी ॥ धांवयेवेळींत्वरेनें ॥ १७ ॥ हरित्तूकंठीरवदयाब्धी ॥ तुझीकन्यामीयेथेंद्रौपदी ॥ कौरवगजींवेढि
लेंत्रिशुद्धी ॥ आतांधांवआधींहाकदेत ॥ १८ ॥ चिंतारोगजडलादारुण ॥ धांवेंकृपारसपात्रघेऊन ॥ तुजपासींध
डीनप्राण ॥ कुणपयेथेंटाकूनिहे ॥ १९ ॥ लपावयातुझेंहृदयीं ॥ हरीमजलाठावदेईं ॥ लाजगेलियालवलाहीं ॥ म
गकायउरेल ॥ १२० ॥ करुणाकरागोपाळा ॥ विलंबफारकांलाविला ॥ झालियाभगिनीचीअवकळा ॥ मगकाय
डोळांपाहसी ॥ २१ ॥ कामधेनूश्रीरंगमाउली ॥ कोणतेवनीआजिगुंतली ॥ द्रौपदीवत्साविसंबली ॥ कौरववृक
सभेंत ॥ २२ ॥ आहाश्रीकृष्णायादवेंद्रा ॥ तुजकायलागलीयोगनिद्रा ॥ द्रौपदीकन्याएकसरा ॥ हाकफोडितांशो
कली ॥ २३ ॥ आपणवाढविलेंह्मणऊन ॥ जडकाष्ठतारीजीवन ॥ पाळिलेंजातांबुडोन ॥ ब्रिदेंगळगळोनिगेलीं
कीं ॥ २४ ॥ यदुकुळकमळविकाशमित्रा ॥ पांडवमानसचकोरचंद्रा ॥ जगद्वंद्याकृपासमुद्रा ॥ करींत्वरायेवेळे ॥
॥ २५ ॥ द्रौपदीचेकरुणाशब्द ॥ हेचिउडालेप्रेममिलिंद ॥ श्रीकृष्णकमळींसद्गद ॥ गुंजारवजाणविती ॥ १२६ ॥

कौरवसभाकंटकस्थळ ॥ जाणोनि द्रौपदीचे शब्दमराळ ॥ कृष्णमानससरोवर विशाळ ॥ जाऊन तेथें बैसले ॥ ॥ २७ ॥ स्वानंदरूप पर्यंक ॥ तेथें पहुडला वैकुंठनायक ॥ चरणतळ हातीं तेथें देख ॥ ज्ञानकळा रुक्मिणी ॥ २८ ॥ अनुभवबोधरूक्स्वर ॥ गाती नारद आणि तुंबर ॥ तेथें उद्धव आणि अक्रूर ॥ सुगंधवायु जाणविती ॥ २९ ॥ सप्रेमलक्ष जोडला करीं ॥ उभा सन्मुख तो सर्पारी ॥ चरणतळ हाती भीमककुमारी ॥ देखें नखअंकुरीं ब्रह्मांडें ॥ १३० ॥ कौरवसभा काळ भंई दारुण ॥ द्रौपदीचें वस्त्राहरण ॥ करावया तस्कर दुःशासन ॥ घालाघालूं पाहातसे ॥ ३१ ॥ तों द्रौपदीचे शब्द रूरेख ॥ तेही द्वारकेंत घालिती हांक ॥ जागा झाला वैकुंठनायक ॥ घाबरेपणें विलोकी ॥ ३२ ॥ ज्ञानें पाहे यादवेंद्र ॥ पांडवभांडारीं कौरव तस्कर ॥ द्रौपदी लज्जाधन अपार ॥ नेऊं पाहाती हरूनियां ॥ ३३ ॥ रुक्मिणीचे हातिंचा चरण ॥ असडोनि उठिला जगज्जीवन ॥ धांव घेतली उठोन ॥ न बोलतां कोणासी ॥ ३४ ॥ पीतांबराची रुळत कांस ॥ तो न सांवरीच हृषीकेश ॥ मुकुट राहिला रुळती केश ॥ सुगंधसुमनें सांडती ॥ ३५ ॥ कौस्तुभ माळा वैजयंती ॥ निकट न सांवरी श्रीपती ॥ खेद पावला श्रीतनुप्रती ॥ कंठ सद्गद जाहला ॥ ३६ ॥ श्रीरंगाचा वेग पुढें ॥ मन पवन कायसें बापुडें ॥ चिंतिलिया ठाया जावें गरुडें ॥ परी तोही मंद राहिला ॥ ३७ ॥ धांवा केला हें भक्तिलक्षण ॥ परि तो हृदयींच नांदे नारायण ॥ सर्वव्यापक जगन्मोहन ॥ गमनागमन नसेची ॥ ३८ ॥ नारद पुसे रुक्मिणी लागुन ॥ कां घाबरेपणें गेले जगज्जीवन ॥ रुक्मिणी ह्मणे द्रौपदी गांजिली ह्मणऊन ॥ न सांवरत धांवले ॥ ३९ ॥ इकडे द्रौपदीचें वसन ॥ फेडूं पाहात दुःशासन ॥ तंव तो पाठिसी येउन ॥ उभा ठाकला कैवारी ॥ १४० ॥ जो पीतांबर आपला ॥ तेणें झांकिली द्रौपदी बाळा ॥ प्रकाश असंभाव्य झळकला ॥ कौरवसभा दचकली ॥ ४१ ॥ कृष्णवसन तें जाळ सुवास ॥ तेणें सुगंधें भरिलें आकाश ॥ उभा पाठिसी आदिपुरुष ॥ सद्भक्तीं च देखिला ॥ ४२ ॥ अल्हादली पांचाळी ॥ ह्मणे कैवारिया वनमाळी ॥ मज गांजिलें दुर्जनीं सकळीं ॥ हरी माउली नसतां तूं ॥ ४३ ॥ हरी ह्मणे द्रौपदीसी ॥ जें जें बोलिले

तसेतेकाळीं ॥ ७९ ॥ आपलापीतांबरशेवटीं ॥ द्रौपदीसनेसवीतजगजेठी ॥ रत्नदर्शनरोवूनिवोटीं ॥ स्फदर्शनउच
लिलें ॥ १८० ॥ ह्मणेयावसनासलावितांहात ॥ दग्धकरीनकौरवसमस्त ॥ विदुरद्रोणगंगासुत ॥ ह्मणतीअनर्थ
मांडिला ॥ ८१ ॥ धृतराष्ट्रासजाणवितीमात ॥ सर्वांचायेथेंमांडिलाअंत ॥ दुर्योधनभयाभीत ॥ दुःशासनावारीतसे
॥ ८२ ॥ दुर्योधनह्मणेवस्त्रभार ॥ भांडारींठेवाहेसमग्र ॥ तोंएकहीनदिसेसाचार ॥ अभाग्यासीतेधवां ॥ ८३ ॥ तों
अवचिन्हेंझालींबहुत ॥ गगनींउठिलेत्रिविधकेत ॥ मेघरक्तधारावर्षत ॥ भयाभीतकौरवपैं ॥ ८४ ॥ भक्तसाधून
गरजन ॥ द्रौपदीसकरितीसप्रेमनमन ॥ कौरवांसनिंदुन ॥ वर्णितीयशपांडवांचें ॥ ८५ ॥ दुर्योधनासह्मणेभीम
सेन ॥ तुझीमांडीमीकरीनचूर्ण ॥ नातरीपूर्वजपावतीपतन ॥ जीतचीजाणप्रेतमी ॥ ८६ ॥ गांधारीहृदयपिटित ॥
भीमबोलेतेंकरीलयथार्थ ॥ धृतराष्ट्रेंपांडवसमस्त ॥ द्रौपदीसहितबोलाविले ॥ ८७ ॥ आलिंगूनिपांचहीजण
॥ ह्मणेचांडाळ्हादुर्योधन ॥ येणेंतुह्मासकष्टविलेंपूर्ण ॥ तेंकांहींआठवूंनका ॥ ८८ ॥ मीवृद्धचक्षुहीन ॥ धर्माकरीं
तूंमाझेंपालन ॥ तथास्तुह्मणेभीमसेन ॥ ऐसेंचहोईलशेवटीं ॥ ८९ ॥ द्रौपदीचामाथांहस्त ॥ ठेऊनधृतराष्ट्रबोल-
त ॥ मायेतूंकुळतारकयथार्थ ॥ दुर्जनीकष्टदिल्हेतूतें ॥ १९० ॥ इच्छाअसेलमनात ॥ तेंतूंमागपुरवीनसत्य ॥ येरी
ह्मणेपांडवमुक्त ॥ पणींजिंकिलेतेकरावे ॥ ९१ ॥ शस्त्रेंवस्त्रेंराज्यरथा ॥ देऊनबोळवावेइंद्रप्रस्था ॥ दासनह्मणावे
आतां ॥ इतकेंचितातादेईजे ॥ ९२ ॥ तत्काळचीकेलेमुक्त ॥ उपहासूनकर्णहांसत ॥ ह्मणेतुह्मीपंडुसुत ॥ षंढतील
संसारीं ॥ ९३ ॥ बंदीपडिलांसमस्त ॥ तेस्त्रीप्रयत्नेंझालांमुक्त ॥ जारकर्मकरूनिपाळित ॥ पतीजैसीस्वैरणी ॥ ९४ ॥
अर्जुनह्मणेमशका ॥ भ्रष्टाकौळिकअन्नभक्षका ॥ कुळहीनासहस्रमूर्खा ॥ ऐकआतांप्रतिज्ञाहे ॥ ९५ ॥ आह्मीं
नपुंसककींरणशूर ॥ पुढेंकळेलहेंसमग्र ॥ तुझेंरणीछेदीनमीशिर ॥ तरीचपुत्रपंडूचा ॥ ९६ ॥ असोरथींबैसो
निपांचहीजण ॥ माताकुंतीद्रौपदीनिधान ॥ सिबिकारूढहोऊन ॥ नगरांतूनचालिलीं ॥ ९७ ॥ पूर्वद्यूतसंपलें ॥

आतांअन्यद्यूतआरंभिलें॥ तेंपुढेंअसेकथिलें॥ श्रवणकेलेंपाहिजे॥ ९८॥ अंतरींयेऊननेवेळां॥ श्रीरंगसकळां सभेटला॥ धांवोनद्रौपदीवेल्हाळा॥ मिठीगळांघालित॥ ९९॥ नयनोदकेंकरून॥ केलेंकृष्णचरणक्षालन॥ म्ह- णेश्रीरंगातुजवरून॥ ओंवाळूनजाईनमी॥ १००॥ तुझेकायआठऊं उपकार॥ आजलाजरक्षिलीथोर॥ पांडवकें वारियादवेंद्र॥ त्रिभुवनीथोरब्रीदगाजे॥ १॥ श्रीपतीह्मणेगेद्रौपदीमाय॥ पांडवमजप्राणाहूनप्रिय॥ संकट- पडतांलवलाहें॥ ऐसाचयेईनक्षणाक्षणा॥ २॥ ऐसेंबोलोनिगोविंद॥ द्वारकेसगेलाआनंदकंद॥ तोंपांडुरंग पुंडलीकवरद॥ भीमातिरींनांदतसे॥ ३॥ ब्रह्मानंदापांडुरंगा॥ श्रीधरह्रदयकल्हारभृंगा॥ आदिपुरुषा- अव्यंगा॥ दिगंबराअविनाशा॥ ४॥ स्फुरसपांडवप्रतापग्रंथ॥ सभापर्वव्यासभारत॥ त्यांतीलसारांशयें थार्थ॥ एकविसाव्यांतकथियेला॥ ५॥ ओव्या॥ २०५॥ ॥ छ॥ ॥ छ॥ ॥ छ

श्रीगणेशायनमः॥ संपदाराज्यसुखअपार॥ देऊनिबोळविलेपंडुकुमर॥ हें देखोनि कौरवथोर॥ संतापले
मानसीं॥१॥ भयाभीतजाहालेमनी॥ सकळदुर्जनमिळोनी॥ ह्मणतीमहासर्पदुखवांनी॥ हृदयीं कंठीं धरिये-
ले॥ २॥ तैसेंवृद्धेंकेलेंनिश्चित॥ राज्यसंनाशस्त्रेंसहित॥ पांडवसोडिलेजीवेंजीत॥ केलाअनर्थअंधानें॥ ३॥
दुर्योधनदुःशासनकर्णशकुनी॥ वृद्धाप्रतीसांगतीयेउनी॥ तुवांहेकायकेलीकरणी॥ कुळहानीमांडिली॥ ४॥
दोनडावउरलेअसती॥ तेणेंपाठवूंवनवासाप्रती॥ अज्ञातवासमागुती॥ तेरावर्षेंनेमावा॥ ५॥ प्रगटझालियाकिं-
चित॥ मागुतीतेरावर्षेंपर्यंत॥ नष्टचर्यभोगितीयथार्थ॥ पुनःपुनःतैसेची॥ ६॥ आतांपांडवआणितांयेथ॥ धृतरा-
ष्ट्रह्मणेदिसतोअनर्थ॥ गांधारीह्मणेयथार्थ॥ बुडविलेंदुर्योधनें॥ ७॥ सोमदंतबाल्हिकद्रोण॥ भीष्मविदुरगुरुनं-
दन॥ कृपाचार्यभूरिश्रवाविकर्ण॥ ह्मणतीअनर्थपुढतीहा॥ ८॥ दुर्योधनह्मणेऐसीनीती॥ वैरीवधावेनानायुक्ती
अपाययोजोनीपुढती॥ वनवासासीधाडावे॥ ९॥ अंधह्मणेअहोहोणार॥ कालत्रयींनचुकेसाचार॥ मगप्रासका-
मसारथीपुत्र॥ धांवडीसत्वरबोलाऊं॥ १०॥ तोधांवोनिपांडवांससांगत॥ फिरामागुतीखेळाद्यूत॥ आपलीआण
निश्चित॥ अंबिकासुतेंघातली॥ ११॥ तुह्मासपितृवचनप्रमाण॥ घ्यावेंपितयाचेंदर्शन॥ मगबोलतीभीमार्जुन॥
कांहोदुर्जनफिरविती॥ १२॥ काययोजिलाअनर्थ॥ कींकरूंपाहतीप्राणांत॥ धर्मह्मणेहेंअद्भुत॥ श्रीकृष्णमायाने-
णवेची॥ १३॥ उतरावयाभूभार॥ अवतरलाहोयादवेंद्र॥ पांडवकरूनिनिमित्तमात्र॥ दुष्टसंहारूंइच्छिती॥ १४
कपटद्यूततुटले॥ पुनःसांधावयाबोलाविले॥ नेघेह्मणतांनसुटेवहिलें॥ जेंकांलिहिलेंविधीनें॥ १५॥ अधर्मस-
भेसिपरतोन॥ पांडवआलेपांचहीजण॥ उभेठाकलेदुर्जन॥ देऊनमानबहुवस॥ १६॥ धर्मासह्मणेशकुनी॥ च-
ळाडावखेळूंमागुतेनी॥ आह्मासहारीआलीयेक्षणी॥ नेमवाणीऐकपां॥ १७॥ वल्कलेंमृगचर्मवेष्टुन॥ द्वादशव-
र्षेंवनवाससेउन॥ तेरावेवर्षजाण॥ अज्ञातवासनिर्धारें॥ १८॥ प्रगटझालियाअवधारा॥ पुढतीवनवासवर्षें

बारा॥मगयावेंआपल्यानगरा॥ हाचिनिर्धारतुह्माआह्मां॥ १९॥ धर्मरावविचारीमनी॥जरीमाघारघ्यावीयेचक्ष
णी॥ तरीपुरुषार्थाहोयहानी॥आणीकहेकरणीईश्वराची॥ २०॥ धर्मदोनवेळांफांसेटाकित॥ शकुनीजिंकिलेंरे
धर्माह्मणत॥दुर्योधनगदगदांहांसत॥एकटाळीपीटिली॥ २१॥ कर्णासमुखअपार॥ ह्मणेध्वजउभारासत्वर॥
जयवाद्यांचागजर॥राजभेरीठोकिल्या॥ २२॥ कौरवगर्जतीजयजयकारीं॥राज्यजाहालेंएकछत्री॥ दीनवदनते
अवसरीं॥ पांडवदिसोंलागले॥ २३॥ काळवंडलाआदित्य॥सुटलाक्रोधेंप्रळयवात॥ थरथरांऊर्वीकांपत॥उल्का
पातजाहाले॥ २४॥ आकाशींहूनिअवधारा॥पडतीतेव्हांरक्तधारा॥ दृन्दद्वन्दह्मणतीधरा॥निर्वैरहोईलयावरी
॥ २५॥ पांडवांसह्मणेदुःशासन॥आतांकरावनवासीप्रयाण॥ अवदशाआलीतुह्मापूर्ण॥ कायकारणनगरांत॥
॥ २६॥ फेडावस्त्रेंअळंकार॥ वल्कलेंवेष्टावींसत्वर॥ काळींवदनेंकरूनसाचार॥ रक्षालावासर्वांगीं॥ २७॥
नपुंसकेंतुह्मीनिर्बळें॥जैसींतिळाचींशुष्ककोळें॥ कींव्याघ्रचर्मेंविशाळें॥प्राणहीनेपूरिता॥ २८॥ अर्कतूलवि
गतधवावंध्याविधुर॥ भग्नभाजनवृक्षखंकार॥ स्मशानभूमीअकाळमेघनिर्धार॥तैसेचिव्यर्थतुह्मीही॥ २९
जैसेअजाच्चेगललांगूळ॥तैसेतुह्मींदिसतांकेवळ॥ कींवनीपडिलींविशाळ॥दरिद्रीयाचींप्रेतेंपें॥ ३०॥ द्रौपदी
सह्मणेदुःशासन॥ वनवासपरमकठिण॥ दुर्योधनाचीस्त्रीहोउन॥शरीरअर्पीतयानें॥ ३१॥ आह्मीबंधूएकश
त॥मनाआवडेतोवरींत्वरित॥नपुंसकदरिद्रीसमस्त॥पांडवदूरीकरीकां॥ ३२॥ हेंएकोनिभीमसेन॥सिंहाऐ-
साबोलेगर्जोन॥हेबोलविषतरूचींफळेंजाण॥प्राप्ततुह्मांहोतील॥ ३३॥ मर्यादासोडोनियेथ॥ बोलसीदुष्टवि
परीत॥ तूंमाजलासीबहूतबस्त॥शरीरपुष्टजाहालें॥ ३४॥ द्वारावतीचीभवानी॥ चतुर्भुजश्रीकृष्णरूपिणी॥
तीसनवसकेलाआजपासोनी॥ वनीहूनआलिया॥ ३५॥ द्वेषाग्नीप्रज्वळेलप्रचंड॥रणमंडळतें होमकुंड॥तूं
तेथेंबस्तखंडविखंड॥ गात्रेंतुझींकरीनमी॥ ३६॥ प्रथमतुझेंअवदान॥मगएकापाठींएकशतजाण॥ शेवटींह्

वस्तदुर्योधन॥समर्पीन पूर्णाहुती॥३७॥पक्षपाती तुमचे संपूर्ण॥गदाघायें करीन चूर्ण॥सूर्यसुताचें सदन॥पा
हूं धाडीन समस्तां॥३८॥तुह्मीं शब्दशस्त्रें केलां ताडण॥लोहशस्त्रें आह्मीं फेडूं उसणं॥जिव्हा छेदून उपडिन॥हस्त
तुझे रणांगणीं॥३९॥या शब्दाची आठवण॥देऊन घेईन तुमचे प्राण॥हें हृदयपत्रीं लिहून॥ठेवा तुह्मी रासभ हो॥
॥४०॥असो यावरी वेष्टूनि वल्कलें॥वना जावया उदित झाले॥नगर दुर्गावरी चढिले॥कौरव कौतूक पहावया॥४१॥
पांडव पायीं चालत॥गाई हे द्रौपदी कौरव ह्मणत॥पांचही पोळ धांवत॥गाई पाठी एकसरां॥४२॥मोकळे केश सोडूनी॥
रडत जात याज्ञसेनी॥भीम वारंवार परतोनी॥कौरवांकडे पाहातसे॥४३॥सिंहावलोकनें करून॥परतोनी पाहातां
भीमसेन॥दुर्योधन वांकडे पाय करून॥उपहासित वृकोदरा॥४४॥सुयोधनास ह्मणे भीमसेन॥तुझे शिराचा कंदु
क करून॥चेंडूफळी खेळेन॥निवेल मन अंधाचें॥४५॥मी व्याघ्र की भीमसेन॥दुःशासनाचा कंठ फोडून॥आधीं क
रीन रक्तपान॥उटी येईन सर्वांगीं॥४६॥तें रक्त चर्चूनि हस्तीं॥पांचाळीचे केश मोकळे रुळती॥मग देईन त्यांसि ग्रंथी
॥वीरगुंठी बांधेन॥४७॥सूर्यमार्ग खुंटेल करितां भ्रमण॥नेत्रीं अंधळा पावेल अग्न॥मशकाची थड का लागुन॥जरी मे
रू पडेल॥४८॥पाषाणप्रहार लागुन॥वायू पडेल मोडोनि चरण॥पिपीलिका शोखी सिंधुजीवन॥विजे सजाऊन मश
कधरी॥४९॥भडभडीत अग्नज्वाळ॥कर्पूरतुषारें होतील शीतळ॥हें ही घडेल एकवेळ॥परी वचनाचळ न व्हे माझि
या॥५०॥यावरी आवेशें बोले पार्थ॥करीन कर्णाचा निःपात॥शिर भोंवडीन आकाशांत॥तरीच सुत पंडूचा॥५१॥
मागें निंदा बोलसी तोंडें॥तरी करीन शतखंडें॥कौरवांची उडतील मुंडें॥कंदुका ऐसीं आकाशीं॥५२॥मृगेंद्राची निं
दा देख॥करिती मागें जंबूक॥अळिकाह्मणती विनायक॥धरूनि आणूं क्षणार्द्धें॥५३॥तृणपुतळे मिळोनि बहुत॥
वडवानळास धरूं ह्मणत॥हृदयीं भावी खद्योत॥आसडोनि आदित्य पाडूं खालीं॥५४॥शलभ बहुत मिळोनी॥
वीज धाल्ं ह्मणती वदनी॥मृत्तिकेचा गज धांवोनी॥सागर शोषूं भावित॥५५॥परम कुमती जो बळहीन॥मागें निं

दाजल्येरात्रदिन ॥ समरभूमीसपळेउठोन ॥ हें तों लक्षणश्वानाचें ॥ ५६ ॥ सहदेवबाहूपिटून ॥ ह्मणेरे शकुनी
सावधान ॥ मीचग्राहिकअसेंजाण ॥ प्राणासीतुझ्यानिर्धारें ॥ ५७ ॥ बहुतफांसेटाकिलेजाण ॥ तितके अंगींभे
दीनबाण ॥ सुयोधनासहितसर्वहीजण ॥ समरींसंहारीननिर्धारें ॥ ५८ ॥ शकुनीमीतुझाकाळ ॥ जरीछेदिनांशि
रकमळ ॥ तरितेमाद्रीवेल्हाळ ॥ जन्मोनिव्यर्थश्रमविली ॥ ५९ ॥ हिमाचळचळेलआसनी ॥ तेजसांडीलवासरमणी
शीतळत्वटाकीलरोहिणी ॥ रमणजरीतत्वता ॥ ६० ॥ शेषसांडीलभूभार ॥ विषजरीवमीलकर्पूरगोर ॥ हें हीघडे
लपरिनिर्धार ॥ नेममाझाटळेना ॥ ६१ ॥ भुजापिटोननकुळबोलत ॥ कौरवकुळसंहारीनसमस्त ॥ धान्यक्षेत्राचें
निर्मूळकरित ॥ कृषिकरजैसाएकसरें ॥ ६२ ॥ ऐसीप्रतिज्ञाबोलोन ॥ करितेजाहालेवनप्रयाण ॥ धौम्यअग्निहो
त्रपात्रें घेउन ॥ सहितकुशानचालिले ॥ ६३ ॥ दर्भपवित्रें हातीं घालित ॥ पितृसूक्तजपतजात ॥ कौरवांचा होईल
अंत ॥ चिन्हपुढीलदावितों ॥ ६४ ॥ अजातशत्रुसूज्ञधर्म ॥ समस्तांसपुसेसप्रेम ॥ ह्मणेवडीलहोपरम ॥ कृपाब
हुतअसोंद्या ॥ ६५ ॥ तुमचाआशिर्वादेंकरून ॥ पुढतीपाहूंतुमचेचरण ॥ समस्तकौरवांसपुसोन ॥ धर्मराजचा
लिले ॥ ६६ ॥ धर्मासह्मणेविदुर ॥ कुंतीवृद्धआणिसकुमार ॥ ज्येष्ठबंधूचीपत्नीनिर्धार ॥ मातामाझी असोंदे
॥ ६७ ॥ माझियेघरींठेउन ॥ बारेवनवासाकरींतूंप्रयाण ॥ मगवंदिलेकुंतीचेचरण ॥ साष्टांगेंसीधर्मराजें ॥ ६८
विदुरह्मणेधर्मराजा ॥ सोमवंशीविजयध्वजा ॥ श्रीकृष्णध्यानस्मरणपूजा ॥ प्राणांतेंहीनविसंबे ॥ ६९ ॥ हृद
यींध्यातांकंसारी ॥ कदाभयनाहींकांतारी ॥ तोचिरक्षीलनानापरी ॥ दुःखतिळभरीझगटेना ॥ ७० ॥ धर्मह्मणे
विदुरासी ॥ तूंगुरुपितादेवआह्मासी ॥ तुझीआज्ञावंदूंशिरसी ॥ अहर्निशीवर्त्तेन ॥ ७१ ॥ ऐसेंबोलतांयुधि
ष्ठिर ॥ धांवोनिआलिंगीत्यासिविदुर ॥ अश्रुधाराश्रवतीनेत्र ॥ प्रेमसागरउचंबळला ॥ ७२ ॥ कुंतीसनिरऊनब
हुत ॥ पांचहीविदुरासीनमित ॥ लक्षोनियांअरण्यपंथ ॥ जातेजाहालेतेधवां ॥ ७३ ॥ पांचपांडवराजहंस ॥ हं

सिनी द्रौपदी डोळस ॥ जीचें अंगींचा सुवास ॥ वनामाजी फांकतसे ॥ ७४ ॥ एकवस्त्रें द्रौपदी जात ॥ मागें पांडव
बल्कलें वेष्टित ॥ कुंती देखोनि आक्रंदत ॥ हृदय पिटित हस्तकें ॥ ७५ ॥ अंग टाकीत धरणी ॥ अगे वेल्हाळी याज्ञ
सेनी ॥ पतिसमवेत नयनी ॥ केव्हां तूतें देखेन ॥ ७६ ॥ अहा नगरविलासिया ॥ कोठें गुंतला सिवि सांविया ॥ पांडव
व्यसनीं पडलिया ॥ नेणसी हें व्यापका ॥ ७७ ॥ कुरुकुळकुमुदावतंस ॥ पंडुराजा तूं पवित्र पुरुष ॥ तुज कैसा स्वर्गवा-
स ॥ गोड वाटे येथवां ॥ ७८ ॥ वना गेलिया श्रीरामचंद्र ॥ पाठी धांवे कौसल्या सुंदर ॥ तैसी गजपुराबाहेर ॥ कुंती धांवे
पुत्रां मागें ॥ ७९ ॥ अगे पांचाळी माय बहिणी ॥ प्राणसखे सांगातिणी ॥ वदन दावीं गे परतोनी ॥ मज टाकूनि जात्येसी
॥ ८० ॥ सहदेव आणि नकुळ ॥ तान्हीं बाळें केवळ ॥ मज निरऊनि वेल्हाळ ॥ माद्री निघाली स्वर्गातें ॥ ८१ ॥ नकुळ स
हदेवाचा गळां ॥ कुंती मिठी घाली ते वेळां ॥ कौरवांच्या नारी सकळा ॥ देखोनि रडती तेथवां ॥ ८२ ॥ ह्मणती वैधव्य आ
ह्मांस आलें ॥ भुलले कौरव कांहें न कळे ॥ नगरवासी लोक ते वेळे ॥ शोक करिती अपार ॥ ८३ ॥ ह्मणती नीती सां
गोनि अभिनव ॥ वनीं दवडिले वीर पांडव ॥ कैकेयीनें जैसा रघुराव ॥ तैसें येथें जाहालें ॥ ८४ ॥ कुंतीस संावरूनि
विदुर ॥ गृहा सनेत सत्वर ॥ सुभद्रा आणि सौभद्र ॥ द्वारकेसी पाठविलीं ॥ ८५ ॥ पांडवांस बोळवीत विदुर ॥ अर
ण्यांत गेला दूर ॥ दुष्टकरंटे चांडाळ समग्र ॥ मागुती येत स्वस्थळा ॥ ८६ ॥ इतर पांडवस्त्रिया सुंदरा ॥ कुंती पाठवीत
माहेरा ॥ वनवास सरल्यास कुमरा ॥ मागुती यावें भेटीतें ॥ ८७ ॥ द्रौपदीचे पंच कुमरां ॥ विदुर पाठवी पांचाळपु-
रा ॥ धृष्टद्युम्न द्रुपद अवधारा ॥ प्राणापरिस प्रिय करिती ॥ ८८ ॥ धृतराष्ट्र पुसे विदुरा ॥ पांडव गेले वनांतरा ॥ विषा
द धरिला अंतरा ॥ किंवा सुखरूप गेले पैं ॥ ८९ ॥ विदुर ह्मणे झांकूनि वदन ॥ धर्में केलें वनप्रयाण ॥ मुखें धरिलें
दृढ मौन ॥ न बोलत कोणासी ॥ ९० ॥ भुजा उभारोनि भीमसेन ॥ कल्पांत रुद्र क्रोधायमान ॥ गर्जत जैसा पंचानन
॥ हुंकारत तेविं गेला ॥ ९१ ॥ वाममुष्टी सिकता घेउनी ॥ सव्यभागें विखरे मेदिनी ॥ शिर तुकावित विपिनी ॥ पार्थ

वीरप्रवेशला ॥ ९२ ॥ कर्दमेलेपूनियांवदन ॥ गेलासहदेवमाद्रीनंदन ॥ जैसाआच्छादिलाअभ्रेंकरुन ॥ वा-
सरमणीनिराळीं ॥ ९३ ॥ सर्वांगींमृत्तिकाचर्चोन ॥ नकुळगेलाबळसंपन्न ॥ जेवींसंसारमायाटाकून ॥ योगीजाय
तपोवना ॥ ९४ ॥ मोकळेकेशहस्तेंसारित ॥ हृदयींपेटलाअनळबहुत ॥ नेत्रोदकेंतोविझवित ॥ द्रौपदीगेलीवनांत
रा ॥ ९५ ॥ धौम्यदर्भधरूनिमुष्टी ॥ पढतगेलाअंत्यष्टी ॥ ज्येष्ठकनिष्ठनामेंअलोटीं ॥ तर्पणपुढेंकरावया ॥ ९६ ॥
विदुरासधृतराष्ट्रह्मणत ॥ पांडवींकायसुचविलाअर्थ ॥ हींलक्षणेंविपरीत ॥ कायकारणदावावया ॥ ९७ ॥ विदु
रह्मणेतोअर्थ ॥ कासयापुससीतूंव्यर्थ ॥ पुत्रलोभेंतुझेंचित्त ॥ भ्रमीभूतजाहलें ॥ ९८ ॥ समरंगणींजीवअपार
होईलब्रह्मसृष्टीचासंहार ॥ ह्मणऊनिधर्मराजवक्र ॥ झांकोनिगेलानपाहवे ॥ ९९ ॥ तेरावर्षाउपरी ॥ कौरवप्रेतें
पडतीलसमरीं ॥ तींनपाहावयादृष्टीभरी ॥ मुखझांकिलेंह्मणुनियां ॥ १०० ॥ भुजाविलोकीभीमसेन ॥ मनांतसंक
ल्पिलेंहेंचिपूर्ण ॥ दोर्दंडबळेंकरून ॥ कौरवप्रेतेंपाडीनमी ॥ १ ॥ सागरींचीवाळूनगणवेजाण ॥ तैसेअसंख्यसो
डीनबाण ॥ घेईनकौरवांचेप्राण ॥ हेंचिअर्जुनचिंतित ॥ २ ॥ फाल्गुनेंदाविलेंहेंपूर्ण ॥ फाल्गुनमासींचेमंत्रसंपूर्ण
॥ जपतीलतुझेनंदन ॥ येतांमरणशेवटीं ॥ ३ ॥ रक्तपंकमाजेलरणीं ॥ कौरवप्रेतेंपडतीमेदिनी ॥ चिखलेंमुखेंज
तीलभरुनी ॥ गीधबैसोनीटोंचिती ॥ ४ ॥ हेंचिचिन्हसहदेवेंदाविलें ॥ धुळीनेंअंगभरिलेंनकुळें ॥ स्वरूपत्याचेंते
जागळें ॥ कामिनीभुलतीपाहतां ॥ ५ ॥ यालागींमृत्तिकामळें ॥ शरीरझांकिलेंनकुळें ॥ चिन्हद्रौपदीनेंदाविलें ॥ अ
र्थऐकतियेचा ॥ ६ ॥ चवदावर्षांउपरीजाणा ॥ हृदयपिटितीतुझ्यासुना ॥ मुक्तकेशायेतीलस्नाना ॥ अंत्यष्टिवि
धीपाहावया ॥ ७ ॥ धौम्यहेंचिजाणविल ॥ कौरवांचीक्रियासमस्त ॥ करावयासीजपत ॥ अंत्यष्टविधीआधींपैं ॥ ९
॥ ८ ॥ पांडवप्रवेशतांवनांतरीं ॥ दुश्चिन्हेंउदयलींकुंजरपुरीं ॥ स्वप्नेंदेखतीकौरवनारी ॥ दुष्टदुःखदायकें ॥ ९
विगतधवाकामिनी ॥ वोंटीभरितीमृत्तिकाघेउनी ॥ मंगळसूत्रेंतोडोनी ॥ काळपुरुषनेतसे ॥ ११० ॥ कृष्णाव-

स्रवेष्टितनारी ॥ कौरवांचियाशिरावरी ॥ तेलसिंदूरघालिती झडकरी ॥ आरक्तपुष्पें अनेक ॥ ११ ॥ पृथ्वी तम
झालीबहुत ॥ सूर्यवन्हिवृष्टिकरित ॥ मेघरक्तधारावर्षत ॥ प्रळयवातसूटला ॥ १२ ॥ भयाभीतदुर्योधन ॥ विप-
रीतचिन्हें ऐकोन ॥ द्रोणासह्मणेकरीजतन ॥ गुरुवर्यायेथुनी ॥ १३ ॥ सुयोधनासह्मणेद्रोण ॥ तुझियाकाजीं वे
चीनप्राण ॥ सर्वांठायीं यशसाधीन ॥ एकापांडवांवांचूनी ॥ १४ ॥ कृष्णकृपेचावज्रपंजर ॥ पांचपांडवत्यांतकीर ॥
स्वस्वरूपरखेळती अहोरात्र ॥ निर्भयानिःशंकसर्वदां ॥ १५ ॥ माझीं शस्त्रेंत्यांससमरीं ॥ नरूपतीचगानिर्धारीं ॥ जै
सामेघवर्षतापर्वतअंतरीं ॥ दुःखकाहीं मानीना ॥ १६ ॥ द्रुपदाचाकेलाअपमान ॥ तेणेंतेंवैरस्मरोन ॥ पुत्रजन्म
विलाधृष्टद्युम्न ॥ अग्निवंशमजलागीं ॥ १७ ॥ त्याचेहातेंमजमृत्य ॥ होणारनचुके बळवंत ॥ तरीमी एकसांगेन
हित ॥ धरिसीजरीमानसी ॥ १८ ॥ तरीवैरभावसांडोनी ॥ पांडवआणावेपरतोनी ॥ शक्रप्रस्थीतेस्थापुनी ॥ सु
खरूपनांदावें ॥ १९ ॥ धृतराष्ट्रह्मणेविदुरासी ॥ जाऊनिआणीपांडवांसी ॥ समजाऊनितयासी ॥ शक्रप्रस्थापा
ठवूं ॥ १२० ॥ जरितेनयेतीवनींहुनी ॥ नरिवस्त्रेंवाजीवारणभूषणीं ॥ अपारसंपत्तीनेउनी ॥ द्यावीत्यांसीवनांत ॥
॥ २१ ॥ मगबोलेविदुरवचन ॥ तेसर्वथानयेतीपरतोन ॥ तुझाकुळक्षयकेल्याविण ॥ समाधाननव्हेचि ॥ २२ ॥
विदुराचावचनेंतिव्र ॥ ऐकतांखोंचलें अंतर ॥ अंधव्याकुळअहोरात्र ॥ चिंतार्णवींबुडाला ॥ २३ ॥ संजयह्मणेअं
बिकानंदना ॥ पांडवदवडिलेदूरिवना ॥ एकछत्रीराज्यासना ॥ रूढनांदेंपुत्रपौत्रीं ॥ २४ ॥ लक्ष्मी आणियश ॥ ति
हींदिधलेंआह्मांसभाग्य ॥ ईश्वरीकळाअसमास ॥ काळेंतुह्मांसदीधली ॥ २५ ॥ तुह्मासहाभरवसानिश्चित ॥ आ
तांकांवाटेतेंदुश्चित ॥ भाग्यभोगीबहुत ॥ दिवसेंदिवसचढतेंची ॥ २६ ॥ अंधखोंचलामानसीं ॥ ह्मणेकांकाळिजीं
सुरीघालिसी ॥ विपरीतव्हावेंपांडवांसी ॥ माझेमानसीनसेहें ॥ २७ ॥ मीचक्षहीनवृद्धगलित ॥ पुत्रनमानिती
वचनार्थ ॥ ऐश्वर्यमदें झालेमत्त ॥ नेणतीहेंत्रिभुवन ॥ २८ ॥ पांडवमाझेशत्रूकेले ॥ चिंताग्नींतमजलोटिलें ॥ काळें

सुळावरीरोंविलाप्राणी॥ त्यासउपभोगकायदेउनी॥ कड्यावरून
पाशदाटिलें॥ कंठींमाझेसंजया॥ ३०॥ सुळावरीरोंविलाप्राणी॥ त्यासउपभोगकायदेउनी॥ कड्यावरून
लोटिलाधरणी॥ सुमनशेजकायत्या॥ ३१॥ तैसेंपांडवांसीवैरपडिलें॥ आतांस्फरवकासयाचें बोलें॥ कुळक्ष
यहोईलबळें॥ हेंमजकळलेंसंजया॥ ३२॥ संजयह्मणेतेवेळां॥ कुळक्षयहातुवांचकेला॥ पुत्रांचियाबोला
माजीवर्तसीतेवेळीं॥ ३३॥ सभेसआणिलीपांचाळी॥ पुत्रांसनबोलसीतेवेळीं॥ वस्त्रेंफेडितांहृदयकमळीं
सुखतुजवाटलें॥ ३४॥ दुर्योधनदुरोक्तीबोलत॥ कर्णशकुनीअनुमोदित॥ तेदंतभग्नकरूनीसमस्त॥ वर्जि
लेनाहींततुवांकीं॥ ३५॥ पंचहीभ्रतारटाकुनी॥ निघेतूंआमचेसदनीं॥ तुझापुत्रबोलिलावाणी॥ उगाच
ऐकुनीहोतासी॥ ३६॥ भीष्मेंविदुरेंनीती॥ तुजसांगीतलीबहुतरीती॥ परीनभरेचितुझेचित्तीं॥ बाउग्या
गोष्टीकायआतां॥ ३७॥ आपल्याहातींघेऊनिशस्त्रें॥ काळनाहींछेदितशिरें॥ बुद्धिविपरीतहोतांनिर्धारें
काळक्षोभजाणिजे॥ ३८॥ केल्याअन्यायाचाराशी॥ व्यर्थकासयागोष्टीबोलसी॥ केलेंतेंफळभोगिसी॥
अल्पकाळेंचितल्वतां॥ ३९॥ महासतीतेपांचाळी॥ जिचाकैवारीवनमाळी॥ अपारवस्त्रेंपुरविलीं॥ देखिलीं
सकळींसभेत॥ १४०॥ धृतराष्ट्रह्मणेसंजयासी॥ जितक्यातूंगोष्टीबोलसी॥ आल्यामजप्रत्ययासी॥ स-
त्यसत्यसुजाणा॥ ४१॥ पांडवांचारक्षक॥ पूर्णअसेद्वारकानायक॥ हेंजाणतांमूर्ख॥ कैसाझालोंसंजया
॥ ४२॥ माझेंप्रारब्धघोरगहन॥ नकळेतयाचेंविंदाण॥ दुःखभोगवीलसंपूर्ण॥ हेंमीबरवेंजाणिलें॥ ४३॥
द्रौपदीक्षोभविलीपरम॥ कौरवहोतीअवघेभस्म॥ ईश्वरीमायेचेंदुर्गम॥ विंदाणवाटेमजलागीं॥ ४४॥ पांड
वगेलेबाहेरी॥ एकचीआकांतझालानगरीं॥ आक्रंदतीसकळनारी॥ झालीबोहरीवंशाची॥ ४५॥ द्रौपदी
सकुशब्दबोलिले॥ मनातऐसेंभाविलें॥ जेंश्रीधरेंऐकिलें॥ शब्दलागलेदेवकीतें॥ ४६॥ द्रौपदीनव्हे द्रौपदी
माउली॥ दुर्जनींसभेंतगांजिली॥ सुदर्शनसोडोनितेवेळीं॥ शिरेंछेदावींकौरवांचीं॥ ४७॥ सत्वधीरजगन्मा

थ ॥ क्षमा केली तेव्हां बहुत ॥ द्रौपदीनें करूनि निमित्त ॥ कुळक्षय करील तो ॥ ४८ ॥ संजय ह्मणे धृतराष्ट्रासी आतां गोष्टी आल्या प्रत्ययासी ॥ वैशंपायन जन्मेजयासी ॥ कथा सांगे रसाळ ॥ ४९ ॥ सभापर्व संपलें येथ ॥ पुढें वनपर्व अद्भुत ॥ जें ऐकतां पापपर्वत ॥ भस्म होती श्रवणेंची ॥ १५० ॥ भारतसरोवरीं निर्मळ ॥ सभापर्व त्यांत कमळ ॥ सज्जन मिलिंद सकळ ॥ आमोद सेऊं धांवती ॥ ५१ ॥ कीं भारत हा ब्रह्मगिरी ॥ सभापर्व निघाली गोदावरी ॥ प्रेमसहित स्फुरनारी ॥ स्नानालागीं धावती ॥ ५२ ॥ भारत हा क्षीरसागर ॥ असंभाव्य भरला थोर ॥ तेथें ब्रह्मानंद श्रीधर ॥ क्षुधाक्रांत धांवला ॥ ५३ ॥ त्यांतील अंजुळीनें किंचित ॥ घेतलें क्षुधा निवारणार्थ ॥ तैसा सार भाग यथार्थ ॥ भारतांत निवडिला ॥ ५४ ॥ पाल्हाळ बोलतां अपार ॥ ग्रंथ होईल जैसा समुद्र ॥ बोलतां ध्वनीत अनुमात्र ॥ कथा विचित्र दिसेना ॥ ५५ ॥ संकोच पाल्हाळ टाकूनि समस्त ॥ मित रसाळ प्रगटला ग्रंथ ॥ रचनासाहित्य पंढरीनाथ ॥ कर्त्ता येथें जाणिजे ॥ ५६ ॥ पांडवप्रताप ग्रंथ गहन ॥ पांडुरंग हें अभिधान ॥ नाम ठेविलें असे लपूर्ण ॥ प्रीती करून सत्यपैं ॥ ५७ ॥ पुढें वनपर्व वसंतवन ॥ दृष्टांत वृक्ष दाटले सघन ॥ साहित्य वनश्री पूर्ण ॥ विराजमान टवटवित ॥ ५८ ॥ तेच्छायेसी पंडितस्फूर्त्ती ॥ सदाकाळ घेती विश्रांती ॥ श्रीधर तेथें अहोरात्रीं ॥ चरणतळ हतीत यांचे ॥ ५९ ॥ श्रीमद्भीमातटविलासा ॥ दिगंबरा पंढरीशा ॥ श्रीधरवरदा अविनाशा ॥ ब्रह्मानंदा दयाब्धी ॥ ६० ॥ सुरस पांडवप्रताप ग्रंथ ॥ सभापर्व व्यासभारत ॥ त्यांतील सारांश यथार्थ ॥ बाविसाव्यांत कथियेला ॥ ६१ ॥ इति श्री पांडवप्रताप ग्रंथ ॥ सभापर्वटीका श्रीधरकृत ॥ पांडव गेले वनवासाप्रत ॥ सभापर्व संपविलें ॥ ॥ १६२ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ श्रीमज्जगदीश्वरार्पणमस्तु ॥ ७ ॥ ७ ॥ ७ ॥

॥ श्रीगणेशाय नमः ॥ भवपंकजोद्भवपाकशासन ॥ सदा वंदिती ज्याचे चरण ॥ चारी साहा अष्टादश गुण ॥ ज्याचे
वदती सर्वदा ॥ १ ॥ यदुकुळतिलकावतंस ॥ आनकदुंदुभीमानसहंस ॥ लीलाविग्रही आदिपुरुष ॥ देवकीतनय ज
गदात्मा ॥ २ ॥ नंदहृदयारविंदमिलिंद ॥ निजभक्तचित्तचातकजलद ॥ भैमीनयनाब्जानंद ॥ प्रकाशकमित्र जो ॥ ३
भयविदारककंठीरव ॥ मुचुकुंदोद्धारक रमाधव ॥ कंसचाणूरमर्दक करुणार्णव ॥ अभिनवजलदवर्ण जो ॥ ४ ॥ उग्र
सेनमानसविषादहरण ॥ शिशुपाळांतक वृष्णिकुळभूषण ॥ अनंतकल्याणदायक पीतवसन ॥ शरणागतकुली-
शपंजर जो ॥ ५ ॥ जननमरणविपिनकृशान ॥ दानवकुळरश्मिनिकृंदन ॥ नखांकुरीं मीनकेतन ॥ कोट्यान कोटी बिं
बले ॥ ६ ॥ मायाचक्रचाळक पुराणपुरुष ॥ लावण्यामृतसागर मनोहर वेष ॥ सच्चिदानंद पंढरीश ॥ मधुसुरनरकभं
जन जो ॥ ७ ॥ दशावतारचरित्रचाळक ॥ तो हा पांडुरंग पांडवपाळक ॥ पंडुस्नुषालज्जारक्षक ॥ लीलाकौतुक दावी-
तो ॥ ८ ॥ भूवैकुंठ पांडुरंगनगर ॥ चंद्रभागामानससरोवर ॥ राजहंस तूं श्रीधर ॥ अतिउदार जगदात्मा ॥ ९ ॥ सत्यव
तीहृदयरत्न ॥ वेदाब्जविकाशकचंडकिर्ण ॥ साठलक्षश्लोक जाण ॥ जेणें निर्मिले अवलीळा ॥ १० ॥ जेथें लेखक पर
म चतुर ॥ जाहाला महाराज नरकुंजर ॥ तेथील साहित्यरस अपार ॥ मानव केवी वर्णूं शके ॥ ११ ॥ व्यासमति महारज
तपर्वत ॥ वैशंपायन लाधला किंचित ॥ त्यांतील सारांश साहित्य ॥ अलंकार प्राकृत हे ॥ १२ ॥ आदिपर्व सभापर्व पू-
र्ण ॥ श्रीधरमुखें निमित्त करून ॥ पांडुरंग रुक्मिणीजीवन ॥ ब्रह्मानंद वदला हो ॥ १३ ॥ मागें सभापर्व संपलें ॥ पुढें
वनपर्व आरंभिलें ॥ महत्पापें क्षुद्रें सबळें ॥ श्रवणमात्रें दग्ध होती ॥ १४ ॥ कांवनपर्ववसंतवन ॥ सप्रेम श्रोते वृक्ष-
सघन ॥ वनपल्लवी विराजमान ॥ नवविध भजनें सफळित ॥ १५ ॥ सभापर्व संपतां ॥ शेवटीं वर्णिली सुरसकथा ॥
द्रौपदी सभेसि विटंबितां ॥ जगन्निवास पावला ॥ १६ ॥ पुढें कपटद्यूत खेळोन ॥ वना निघाले पृथानंदन ॥ विदुर कुं
ती सवें घेऊन ॥ गजपुराप्रति गेला ॥ १७ ॥ यावरी कैसी कथेची रचना ॥ परिक्षिती सुत पुसे वैशंपायना ॥ माझे पूर्वज

गेलेवना॥ ज्ञानसंपन्नासांगातें ॥१८॥ वैशंपायनह्मणेकुंभिनीनायका॥ अष्टादशपर्वांचीहेनौका॥ व्यासवंशाची
सुरेखा॥ सर्वजनाआश्रय॥१९॥ हेयष्टीधरोनिह्मातीं॥ सर्वदाजेसुक्तविचरती॥ तेंअडखळोनीनपडती॥ भवगर्तें
ततत्वता॥२०॥ दोषपशश्रृंगेंउभारून॥ सर्वथानयेतीचवताळोन॥ अज्ञानरजनीतरक्षीजाण॥ अष्टादशपर्वय-
ष्टी॥२१॥ असोवनानिघालेपंडुनंदन॥ सवेंकृष्णाभगिनीगुणनिधान॥ मागूनआलाइंद्रसेन॥ रथघेऊनपांचही
॥२२॥ इंद्रसेनसमवेतसंपूर्ण॥ सेवकआलेचवदाजण॥ स्यंदनीआरुढलेपंडुनंदन॥ तोंप्रजाधांवोनियेती॥२३
गजपुरांतूनप्रजांचेभार॥ निघालेतेव्हांअपार॥ कींप्रजासरिताचेपूर॥ धर्मससुद्राप्रतिजाती॥२४॥ विचारकरि
तीप्रजासमस्त॥ कदानराहवेगजपुरांत॥ अरेहेभीष्मद्रोणवृद्धबहुत॥ अधर्मरतसर्वही॥२५॥ कपटद्यूतनिर्मु
न॥ लटिकेंचजिंकिलेपंडुनंदन॥ दुर्योधनदुर्जनअग्न॥ वंशकाननजाळील॥२६॥ शकुनीदुःशासनकर्ण॥ दुर्यो
धनाचेदुष्टप्रधान॥ त्यांसदुष्टबुद्धीशिकऊन॥ अधिकाधिकखवळती॥२७॥ धर्मसमागमेंकरून॥ स्रखेंसेऊंआ
ह्मीकानन॥ ऐसेंबोलतप्रजाजन॥ धर्माकडेधांवती॥२८॥ च्यारीवर्णसर्वप्रजा॥ येऊननमितीधर्मराजा॥ आह्मींतुज
सवेंपंडुतनुजा॥ वनवासालागींयेऊं॥२९॥ शिल्पशास्त्रीपरमसुजाण॥ सूत्रधारलोहकर्मींनिपुण॥ कनकअलंका
रींनिःशीमसुज्ञान॥ असोअपारपातले॥३०॥ ताम्रघडणारचतुर॥ पाषाणमूर्तीकोरणार॥ रत्नपरिक्षाकरणार॥ आ
लेसत्वरधर्मापाशीं॥३१॥ वणिजनानावस्तूरक्षक॥ कुंभकर्त्तेतेलकारक॥ रजकरंगारीगौळीसकळिक॥ धर्मदर्श
नापातले॥३२॥ सांळीमाळीसोवनीचतुर॥ दुसीघुसीनापिकअपार॥ सुगंधतैलमृगमदकेशर॥ विक्रयकारधां
वती॥३३॥ व्यापारीधनधान्यारक्षक॥ नडिदंबरेंविणतेपरिक्षक॥ किरातगुरवचिकित्सक॥ धनिकव्हेव्हारीधांव
ती॥३४॥ कृषिकारकरवनकचित्रकार॥ मातंगचर्मकअतिशूद्र॥ धर्मदर्शनीप्रेमाअपार॥ धरूनित्वरेंधांवती॥
॥३५॥ असोसर्वप्रजामिळोन॥ धर्मापुढेंकरितीरुदन॥ गजपुरींराजादुर्योधन॥ वासआमचेननकरवे॥३६॥ व

नानिघतांभूजारमण॥ दुःखेंव्याप्तपौरजजनपूर्ण॥ कींअनकदुंदुभीहृदयरत्न॥ जातांगौळीचरफडती॥ ३७॥
तैसेपांडवनिघतांवनांतरीं॥ प्रजाबुडाल्याशोकसागरीं॥ ह्मणतीधर्मात्मजाअवधारीं॥ आह्मींगजपुरींनरा-
हों॥ ३८॥ राजाकेवळरजनीचर॥ प्रधानतेप्रत्यक्षव्याघ्र॥ ग्रामसिंहसेवकसमग्र॥ तरीप्रजाकेवींनांदती॥ ३९॥
प्रजारंजवीनिरंतर॥ तोचिह्मणावाराजेश्वर॥ अनीतीदासीचापदर॥ जासनलागेकालत्रयीं॥ ४०॥ सत्की-
र्तिधर्मपत्नीसींरत॥ निजप्राणऐशाप्रजापाळित॥ अधर्मपंकेंजाचेंचित्त॥ नमळेनिर्दोषसर्वदा॥ ४१॥ सुहृदप्र-
जाआणिभूसुर॥ जाचेंकल्याणचिंतितीअहोरात्र॥ उभारिलायशध्वजजेविचंद्र॥ शरत्काळींचानिर्मळपैं॥
॥ ४२॥ जोनिश्चयअंबरींध्रुवपूर्ण॥ अचळनचळेसत्यवचन॥ जेणेंस्वसत्तापदरुफभनेसवून॥ शृंगारिलीकुंभि-
नीहे॥ ४३॥ साधुसंग्रहदुष्टनिग्रहसाचार॥ शरणागताकुलिशपंजर॥ दानशस्त्रेंदरिद्र॥ निवटीसर्वयाचकाचें
॥ ४४॥ दानधर्माचींओझींफार॥ नेतांकंटाळतीयाचकविप्र॥ दानमेघवृष्टीनेनिर्धार॥ याचकधुळीआर्द्रजाह्मा-
ली॥ ४५॥ हर्षांकुरेंपिकलीअवनी॥ प्रजेचाआनंदनमायेगगनीं॥ राजघनवाणीऐकतांश्रवणीं॥ मनमयूरना-
चतसे॥ ४६॥ यालक्षणींमंडिततूंपंडुनंदन॥ आह्मासचिंतार्णवींलोटोन॥ संतोषेंआदरिलेंतपोवन॥ आह्मींदि-
नतुजविणदिसों॥ ४७॥ कपटद्यूतमेघथोर॥ तूंदृष्टीनपडसीधर्मचंद्र॥ आह्मीप्रजाआर्त्तचकोर॥ चिंताग्नींतप-
डियेलों॥ ४८॥ निष्कलंकतूंशशिशीतळ॥ वियोगराहूमध्येंसबळ॥ त्रयोदशवर्षेंरुद्धमंडळ॥ वदनेंदुकधींवि-
लोकूं॥ ४९॥ कपटद्यूतकेतुपूर्ण॥ धर्मझांकिलाचंडकीर्ण॥ तेरावर्षांउपरीमुक्तस्नान॥ तोंवरिउपोषणपडियेलें
॥ ५०॥ त्रयोदशवर्षेंक्रमोनिरजनी॥ कधींप्रगटेलस्वधर्मतरणी॥ प्रजाकमळेंविकाशनी॥ तृप्तकरिसीधर्मराया॥
॥ ५१॥ शांतउदारतूंपंडुनंदन॥ कपटद्यूतहाप्रभंजन॥ दुरीनेलेंझडपोन॥ जीवनेंवीणसुकलोंकीं॥ ५२॥ पांचहीपां-
डवराजहंस॥ सांडोनिगजपुरमानस॥ पाठविलेंकंटकवनास॥ द्रौपदीसहितदुष्टानीं॥ ५३॥ असोऐसाप्रजांचाप्रे-

मा ॥ ऐकतांस्नेह दाटला धर्मा ॥ ह्मणे घोर विपिना जाणे आह्मा ॥ येणे तुह्मांन होय तेथें ॥ ५४ ॥ भीष्मद्रोणविदुर ॥
वडिल प्रज्ञाचक्षु राजेंद्र ॥ यामात असतां साचार ॥ तुह्मा दुःख नव्हेची ॥ ५५ ॥ मजवरी कृपा करूनी ॥ सुखें नांदा नि-
जसदनी ॥ त्रयोदश वर्षें क्रमोनी ॥ तुह्मापासीं मी येत्तों ॥ ५६ ॥ भीड धर्माची गहन ॥ प्रजा न देती प्रतिवचन ॥ धर्माचे-
धरूनियां चरण ॥ अधोवदने स्फुंदती ॥ ५७ ॥ दीनवदनें अत्यंत ॥ प्रजा प्रवेशली नगरांत ॥ शक्रप्रस्थींचे जन सम
स्त ॥ शोक करित चीपरतले ॥ ५८ ॥ इकडे भीष्मजननीचे तीर ॥ पांडव पातले सत्वर ॥ विशाळ न्यग्रोध तरुवर ॥ त्या
तळीं रजनी क्रमियेली ॥ ५९ ॥ साही जणी जलाहार ॥ ते दिवशीं केला निर्धार ॥ भूमीवरी शयन साचार ॥ वरी अंबर
पांघरावया ॥ ६० ॥ उदयावरी आलें रविचक्र ॥ तों शक्रप्रस्थ आणी गजपुर ॥ तेथिचे आले भूसूर ॥ धर्माजवळी स
र्वही ॥ ६१ ॥ अग्निहोत्री याज्ञिक ॥ चहुं वेदांचे पाठक ॥ षड्शास्त्रवेत्ते देख ॥ मुखोद्गत पुराणें ॥ ६२ ॥ पुरश्चरणी अ
धीक ॥ सामर्थ्यें खोळंबिती लअर्क ॥ शापानुग्रहसमर्थ देख ॥ असंख्यात मिळाले ॥ ६३ ॥ सुर आणी भूसूर ॥
यांसी भेद नाहीं अणुमात्र ॥ धर्मा सविनविती विप्र ॥ आह्मी येऊं तुजसमागमें ॥ ६४ ॥ तुजसांगातीं कंठूं काळ ॥ ध
र्मा तूं पुण्यशीळ ॥ तुजवरी भार न घालूं सकळ ॥ अन्न आच्छादन न मागों ॥ ६५ ॥ कंदमूळें भक्षून ॥ करूं सर्वदा
अनुष्ठान ॥ चिंतूं तुझें कल्याण ॥ नाहीं कारण दुसरें पैं ॥ ६६ ॥ वेदशास्त्रपुराण ॥ नाना इतिहास पुण्यपावन ॥
धर्मा तुज करवूं श्रवण ॥ जयकल्याणप्राप्तीसीं ॥ ६७ ॥ धर्म ह्मणे घोर वनवास ॥ ब्राह्मण तुह्मी पावाल क्लेश ॥
तें मज न पाहवे निःशेष ॥ निर्दोष यशन जोडे ॥ ६८ ॥ त्यामाजी शौनक नामा विप्र ॥ ह्मणे युधिष्ठिरा ऐक साचार ॥ तु
वां पूर्वीं पूजिले धरामर ॥ तेणें निर्भर जाहालों आह्मीं ॥ ६९ ॥ धर्मा तूं न करी शोक ॥ सर्व पुरवील जगन्नायक ॥ तूं
गोब्राह्मणप्रतिपाळक ॥ अजातशत्रू धर्मात्मा ॥ ७० ॥ धनधान्य असोनि गांठी ॥ जो कृपणता धरी पोटीं ॥ ही न-
व्हे अवंचक हत वटी ॥ महाकृपदी तो जाण ॥ ७१ ॥ जयापासीं नाहीं धन ॥ तरी तया इतकें चि भजन ॥ द्यावें ब्राह्म

णासअभ्युत्थान॥स्थूळासनआदरें॥७२॥उदकदानप्रियभाषण॥नमनआणिविप्रस्तवन॥इतकेंनेहोयस
र्वकल्याण॥सकळपूजनपावलें॥७३॥मगधौम्यबोलेवचन॥धर्मातूंकरीपुरश्चरण॥प्रत्यक्षदैवतसूर्यनाराय
ण॥अमितअन्नपुरवील॥७४॥विप्रपालनायथार्थी॥हाचिउपायजाणसत्य॥ऐकतांआनंदलाकुंतीसुत॥तप
अद्भुतमांडिलें॥७५॥जितेंद्रियनिराहार॥साधूनिसप्तमीरविवार॥प्राणायामकरूनियुधिष्ठिर॥पूजाप्रकारस
मर्पी॥७६॥नाभिपद्मपर्यंत॥सलिलीधर्मउभाराहात॥त्रिरिचामंत्रजपत॥न्याससुक्तयथाविधि॥७७॥एकमं
डळपर्यंत॥धर्मरावतपकरित॥स्तवनमांडिलेंअद्भुत॥ऊर्ध्ववदनेंतेकाळीं॥७८॥सूर्यभजनसूर्यस्तवन॥पांच
ळीकरीप्रीतीकरून॥जेणेप्रसन्नहोयनारायण॥सहस्त्रकीर्णतमांतक॥७९॥जयतमनाशकासहस्त्रकीर्णा॥
अंबरचूडामणीसूर्यनारायणा॥जीवमिलिंदबंधच्छेदना॥हृदयकमलविकाशका॥८०॥सर्वमंगलकल्याणका-
रणा॥रोगप्रशमनाआयुर्वर्धना॥नमोमार्तंडादुष्टदमना॥हाटकवर्णावासरमणी॥८१॥मित्ररविसूर्यभानुदि
वाकरा॥खगपूषहिरण्यगर्भातिमहरा॥मरीच्यादित्यसवितार्कभास्करा॥अमिततेजानमोतुज॥८२॥आदिपु
रुषानिर्विकारा॥हरिहरविरंचिस्वरूपधरा॥काश्यपेयासहस्त्रकरा॥वसुधामराप्रियतूंची॥८३॥जन्ममृत्युज
राव्याधिहरणा॥भयदरिद्रदुःखविध्वंसना॥कालाग्नियासर्वकारणा॥विश्वनयनाप्रकाशका॥८४॥एकच
क्रकनकभूषितरथ॥सप्तसुखहयवेगबहुत॥निमिषार्द्धामध्येंअपारपंथ॥क्रमोनिजासीमनोगती॥८५॥मु
ख्यदेवतसूर्यनारायण॥सूर्यानुष्ठानेंश्रेष्ठब्राह्मण॥वरकडदैवतकल्पितपूर्ण॥चंडकीर्णप्रत्यक्ष॥८६॥सूर्यमं-
डळविलोकुन॥नित्यनकरीजोकांनमन॥तोअभाग्यपरमअज्ञान॥अल्पायुषीजाणावा॥८७॥व्यासवाल्मीक
सुरपाळ॥वर्णितीअद्भुतसूर्यमंडळ॥सूर्यउपासकसदांसुशीळ॥यमकाळवंदीतया॥८८॥देखोंनिधर्माचेंतप
तीव्र॥मूर्तिमंतउतरलादिनकर॥कर्णजनकतोसत्वर॥थाळीदेतधर्माप्रती॥८९॥द्वादशवर्षेंपर्यंत॥उत्तमान्न

जेंजें इच्छित ॥ षड्रसचतुर्विधरसभरित ॥ उसन्न होतील यांतुनी ॥ ९० ॥ कोट्यावधी जेवितां ब्राह्मण ॥ परी नस
रे कदा अन्न ॥ शेवटीं तुह्मीं द्रौपदी जेऊन ॥ मग धूवून ठेविजे ही ॥ ९१ ॥ पांचाळी जेविली या जाण ॥ मग ते दिवशीं
न निघे अन्न ॥ माझें हृदयीं करूनि स्मरण ॥ करा पूजन थाळीचें ॥ ९२ ॥ भृष्टीचा उद्भव होय किती ॥ हें न व्हे कदां गण
ती ॥ तैसी थाळी चा अन्नाची मिती ॥ सहस्रास्यान करवे ॥ ९३ ॥ ऐसें बोलोनि पद्मिनीनाथ ॥ अंतर्धान पावला त्वरि
त ॥ पुढें काम्यकवन प्रवेशत ॥ पांडव विप्रांसमवेत पैं ॥ ९४ ॥ नित्य पंच पार्थ उठोन ॥ करिती तमांतकाचें स्तवन ॥ था
ळी प्रसवे इच्छित अन्न ॥ अपार ब्राह्मण जेविती ॥ ९५ ॥ विप्रभोजन पंचमहायज्ञ ॥ तेणें कौंतेय आनंदघन ॥ रात्र
दिवस पुराणश्रवण ॥ वेदाध्ययन शास्त्रचर्चा ॥ ९६ ॥ न्याय मिमांसा सांख्या द्भुत ॥ पातंजलि व्याकर्ण वेदांत ॥ पंडित
मुखें पंडुसुत ॥ श्रवण मनन करी सदा ॥ ९७ ॥ महद्भाग्य हेंचि उत्तम ॥ अखंड ज्यासी सत्समागम ॥ तीर्थाटन व्रतें त
प परम ॥ मग कासया करावें ॥ ९८ ॥ सत्समागम सदा ज्यास ॥ त्यास नित्य वैकुंठवास ॥ तरी पांडव भाग्य विशेष ॥ व
नीं समागम संतांचा ॥ ९९ ॥ अद्भुत पुण्य ज्याचे पदरीं ॥ त्याचीं चिन्हें ऐका चारी ॥ उदार सत्पात्रीं दान करी ॥ कदा का-
ळीं विटेना ॥ १०० ॥ सर्वदाही बोले मधुर ॥ न वदे कदा वचन निष्ठुर ॥ श्रीकृष्णीं बहुत आदर ॥ काया वाचा मान
सें ॥ १ ॥ परमादरें ब्राह्मणपूजन ॥ देत धन धान्य आसन वसन ॥ या चहूं चिन्हीं मंडित पूर्ण ॥ तोचि अंश श्रीहरी
चा ॥ २ ॥ ह्मणोनि धन्य पंडुनंदन ॥ सर्वलक्षणीं मंडित पूर्ण ॥ यावरी गजपुरींचें वर्तमान ॥ सावधान ऐका राया ॥
॥ ३ ॥ प्रज्ञाचक्षु ह्मणे क्षत्ता ॥ तुझे ठायीं असे ममता ॥ तरी मज कांहीं सांगें हिता ॥ कैसें आतां करावें ॥ ४ ॥ चिंते
चिया कुपांत ॥ पडिलों सर्वज्ञा देईं हात ॥ आधि ह्यावण वा जाळित ॥ विवेकमेघ वर्षतूं ॥ ५ ॥ हृदयकुंडीं क्रोधाग्नि
॥ प्रदिप्त करुनी पंडुनंदन ॥ वना गेले प्रतिज्ञा बोलोन ॥ जे अलोट हरिहरा ॥ ६ ॥ त्यांचा दुःखें प्रजा देख ॥ अहोरा
त्र करिती शोक ॥ दारुण त्याचा शापपावक ॥ कौरवकानन जाळिल ॥ ७ ॥ तरी प्रजा भजती जेणें करुन ॥ पांडव

स्नेह होय वर्द्धमान ॥ विदुरा ऐसें बोले वचन ॥ तूं सर्वज्ञ सर्व विषयीं ॥ ८ ॥ विदुर ह्मणे पुढती ॥ किती सांगों आ
तां तुज निती ॥ आपले कुमर धरूनि हातीं ॥ धर्मचरणावरी घाली ॥ ९ ॥ करुणा बोलोन क्षमा करावी ॥ तुह्मी मा
गें निंदा केली आघवी ॥ आतां स्तुती करुनी बरवी ॥ ते विरवावी शुद्ध मनें ॥ १० ॥ दुर्योधन दुःशासन शकुनी कर्ण
यांस धर्माचे करीं देऊन ॥ पदरपसरूनि प्राणदान ॥ घ्यावें मागोन सत्वर ॥ ११ ॥ भीमाचे पोटांत डोई घालून ॥ दे ई
हातीं दुःशासन ॥ दुर्योधनाचे मस्तकीं हस्त सुखघन ॥ धर्मरायाचा ठेववीं ॥ १२ ॥ पार्थाचीं पदाब्जें निर्मळ ॥ तेथें स्प
र्शवि कर्णाचें भाळ ॥ शकुनी हा कुटीळ खळ ॥ सहदेव चरणावरी घाली ॥ १३ ॥ तूं आपल्या नेत्रीं दकें देख ॥ धर्मास
करी अभिषेक ॥ ऐसें ऐकतां अक्षय सुख ॥ ब्रह्मांडभरी तुज होय ॥ १४ ॥ तुझें न ऐकती पुत्र वचन ॥ तरी गारुडी स
र्पास करी दीन ॥ तेवीं भीष्म द्रोणास सांगोन ॥ आकळोनी बंदी घालीं ॥ १५ ॥ नासिक द्वारें गुण वोवुन ॥ महा वृष
भ करिती दीन ॥ कीं मत्त द्विरद आकळोन ॥ आकर्षुनी ठेविती ॥ १६ ॥ कुपुत्र पोटांतील रोग ॥ छेदोनि काढावा स
वेग ॥ हननरक्षण त्याग ॥ त्यांतील एक करी वेगें ॥ १७ ॥ ऐसीं वचनें ऐकोन ॥ क्रोधें संतप्त अंबिकानंदन ॥ ह्मणे
तुझें सर्वज्ञान ॥ समजलें पूर्ण मज लागीं ॥ १८ ॥ पांडवांचें करितां स्तवन ॥ कधींच न धाये तुझें मन ॥ जेव्हां तुज
पुसावें जाण ॥ वारंवार हेंचि वदसी ॥ १९ ॥ तिहीं हरूनि यांपण ॥ काननागेले उठोन ॥ आह्मीं च शत मूर्ख पूर्ण ॥ तु
ज पुसत सों विचार ॥ १२० ॥ तूं ही शतशत्रू पाहतां ॥ तुज पाशीं नाहीं आप्तता ॥ आमचें अनहित तत्वतां ॥ पुनःपुनः
तें चि कथिसी ॥ २१ ॥ दुर्योधनास आधीं ॥ घालिसी पांडवांचिये बंदी ॥ कळों आली तुझी बुद्धी ॥ घात त्रिशुद्धी क
रणार ॥ २२ ॥ तुझें पांडवांकडे मन ॥ मत्पुत्राचें पाहासी न्यून ॥ तूं न को समजावयालागुन ॥ जाय येथून आतां ची ॥
॥ २३ ॥ अवश्य ह्मणोनी विदुर ॥ रथारूढ जाहाला सत्वर ॥ काम्यकवनाप्रती चतुर ॥ परम वेगें पातला ॥ २४ ॥ दू
रा देखोनि विदुर ॥ बंधूंसि बोले युधिष्ठिर ॥ क्षत्ता कां येतो सत्वर ॥ काय विचार कल्पूनी ॥ २५ ॥ कीं शकुनी आणि

स्रुयोधन ॥ तिहीं दिधला पाठवून ॥ कपट द्यूत दुसरेन ॥ खेळावया लागीं पैं ॥ १२६ ॥ तरि मी यावरी अवधारा ॥
नवजाय कौरवांचिया मंदिरा ॥ क्षत्ता समीप देखतां त्वरा ॥ बंधू सर्वत्र उठिले पैं ॥ २७ ॥ सर्वांनी विदुरा सन्मान ॥
आदरें देती आलिंगन ॥ मग बैसऊनि वर्तमान ॥ क्षत्ता सांगे गजपुरींचें ॥ २८ ॥ मी बहुत प्रकारें अत्यंत ॥ अंधास
सांगीतलें स्वहित ॥ परि तो मनीं न धरी यथार्थ ॥ नानापरी बोधितां ॥ २९ ॥ शुद्ध मार्ग टाकुन ॥ आडमार्गें जो करी ग
मन ॥ त्यास अपाय येतील दारुण ॥ ने घे ह्मणतां न चुकती ॥ १३० ॥ सर्वांसी द्वेष करित ॥ आपलें क्षेम कल्याण चिं
तित ॥ तरी त्यास अनर्थ येती शोधित ॥ ने घे ह्मणतां न चुकती ॥ ३१ ॥ जे कर्म निंदिती विद्वज्जन ॥ तेथें हटें चि घाली
मन ॥ तरी अरिष्टें येतील टाकुन ॥ ने घे ह्मणतां न चुकती ॥ ३२ ॥ महासतीचा अभिळाष धरित ॥ बळें चक्षोभवि
त संतभक्त ॥ बलवानासीं वैर लावित ॥ येती अनर्थ न प्रार्थितां ॥ ३३ ॥ उसां धुसधुसीत उरग ॥ स्रुखनिद्रा केवि
ये मग ॥ शूळावरी बळें चि टाकी अंग ॥ येती अनर्थ न प्रार्थितां ॥ ३४ ॥ परवित्ताचा अभिलाश धरित ॥ परकांतेसी
इच्छी स्रुरत ॥ छत्रपतीसीं द्वेष धरित ॥ येती अनर्थ न प्रार्थितां ॥ ३५ ॥ समर्थाचीं वर्में देखे ॥ लोकांत बोले जो शत
मूर्ख ॥ तपस्वीयास छळून पाहे कौतुक ॥ येती अनर्थ न प्रार्थितां ॥ ३६ ॥ सद्विवेक मित्र करून ॥ विहित पंथें करावें ग
मन ॥ सुधारसाहूनि गहन ॥ संतांचीं वचनें मानावीं ॥ ३७ ॥ परयोषिता परवित्त ॥ तृणाहूनि निच मानित ॥ चतुरा
सीं वाद वीमित्रत्व ॥ शास्त्र ह्मणत धन्य त्यासी ॥ ३८ ॥ असो विदुराविण तत्काळ ॥ धृतराष्ट्र झाला व्याकुळ ॥ ह्मणे
मज न गमे वेळ ॥ तयाविण क्षणभरी ॥ ३९ ॥ बाह्य अंध बुद्धिहीन ॥ विदुराविण मज कोण ॥ सुज्ञानसिंधु चा मज
लागुन ॥ आश्रय आहे पाहातां ॥ १४० ॥ संजयास ह्मणे प्रज्ञानयन ॥ काम्यकवना प्रती जाऊन ॥ विदुरास येईं घे
ऊन ॥ समजाऊन आतां ची ॥ ४१ ॥ संजय तत्काळ निघाला ॥ काम्यकवना प्रती पावला ॥ तों धर्में तापसवेश देखि-
ला ॥ विद्वज्जनवेष्टित ॥ ४२ ॥ वल्कलांजने शोभिवंत ॥ भस्म सर्वांगीं विराजित ॥ जैसा व्योमकेश मिरवत ॥ ताप

समंडळींमाझारीं ॥ ४३ ॥ देवींवेष्टिलासहस्रनेत्र ॥ कींकीर्णचक्रांतविराजेमित्र ॥ कींदिव्यरत्नाभोंवतेअपार ॥
परिक्षकजैसेमिळतीपैं ॥ ४४ ॥ असोसंजयह्मणेविदुरालागुन ॥ कंठींधरिलारायेंप्राण ॥ जीवनेंवीणजैसामीन ॥
तेवींतुजलागींव्याकुळ ॥ ४५ ॥ विदुरासतत्काळसमजावून ॥ सत्वरचिगेलाघेऊन ॥ प्रज्ञाचक्षुभेटलाउठोन ॥ स
माधानकरीबहू ॥ ४६ ॥ विदुरगेलारुसोन ॥ माघाराआणिलासमजाऊन ॥ हेंदुर्योधनेंएकोन ॥ परमक्षोभपाव
ला ॥ ४७ ॥ आमचाघातकर्ताक्षत्ता ॥ अंधेंआणिलामागुता ॥ तोनानाउपायकरूनिआतां ॥ पांडवयेथेंआणी
ल ॥ ४८ ॥ मीआपल्याउदरींशस्त्रघालिन ॥ किंवाकरीनमहाविषपान ॥ शकुनीमीत्यागीनप्राण ॥ पांडवदृष्टींदे
खतां ॥ ४९ ॥ ऐसाउपायकराउठाउठी ॥ पांडवपुनःनपडतीदृष्टी ॥ कर्णशकुनीह्मणेकष्टी ॥ होऊंनकोदुर्योधना
॥ १५० ॥ जरियेथेंआलेपंडुनंदन ॥ पुनःकपटद्यूतखेळोन ॥ तत्काळटाकूंजिंकून ॥ एकक्षणनलगतां ॥ ५१ ॥ श
कुनीह्मणेअसासावधान ॥ दूरीआहेतपांचाळआणिश्रीकृष्ण ॥ त्वरितघालाघालावारेजाऊन ॥ टाकावेवधून
पांचही ॥ ५२ ॥ सिद्धकेलेंसकळसैन्य ॥ तोंएकांतींसत्यवतीनंदन ॥ अंधाससांगेयेउन ॥ अनर्थपूर्णपुढेंदिसे ॥ ५३ ॥
घालाघालूंइच्छित ॥ तरीहेपडतीलअनर्थांत ॥ पांडवांसश्रीरंगरक्षित ॥ अंतर्बाह्यसर्वदा ॥ ५४ ॥ अंधपायसिवे
हातें ॥ म्यांप्रेरिलेंनाहींत्यांतें ॥ तेजातीघालाघालावयातें ॥ तरीमीप्राणातेंदेईन ॥ ५५ ॥ हेरसुखेंवार्ताऐकोन ॥ म
गउगेचिराहिलेदुर्जन ॥ ह्मणतीअंधाविसरपाडून ॥ गुप्तरूपेंपुढेंजाऊं ॥ ५६ ॥ असोधृतराष्ट्रबोलेवचन ॥ स्वामी
तूंचिबोधीदुर्योधन ॥ व्यासह्मणेमैत्रेयजाण ॥ येईलतेथेंशीघ्रची ॥ ५७ ॥ तोबोधीलतुझियासुता ॥ परिहानां
यकेचिशिकविता ॥ तोशापशस्त्रेंनलवतां ॥ ताडीलयासीक्षणार्द्धें ॥ ५८ ॥ ऐसेंबोलोनिपराशरसुत ॥ अंतर्धानपा
वलात्वरित ॥ दुर्योधनपित्याजवळीयेत ॥ तोंमैत्रेयपातला ॥ ५९ ॥ दैदीप्यमानमूर्तिमंत ॥ तैसादेखिलाअकस्मा
त ॥ सुतांसहितअंबिकासुत ॥ सन्मानीतत्तयातें ॥ १६० ॥ सुयोधनपुसेवर्तमान ॥ कोठोनिझालेंआगमन ॥ मैत्रे

यह्मणेतीर्थेंसंपूर्ण॥ करितआलोंकाम्यकवना॥६१॥ तोंपांडवदेखिलेअकस्मात॥जटाधरवल्कलेंवेष्टित॥तृ
णशेजेवरीनिजत॥उष्णवातबहुततेथें॥६२॥ परमसकुमारपांचाळी॥चंपककळिकाशृंगारशाळी॥वातउष्णें
कोमाइली॥ अपाददेखिलीसमग्रम्यां॥ ६३॥ कपटद्यूतखेळोन॥बाहेरघातलेपंडुनंदन॥ अद्यापीतरीऐकव-
चन॥ आणीबोलाऊनजाऊनितूं॥ ६४॥ महासाधुविरक्तभक्त॥ विख्यातवीरबळिवंत॥ हिडिंबकिर्मिरअद्भु
त॥राक्षसमारिलेभीमसेने॥ ६५॥ खांडववनदेऊनिवैश्वानरा॥जर्जरकेलेंनिर्जरेश्वरा॥ अरेत्याकपिवरध्वज
महावीरा॥समरींकोणजिंकिल॥६६॥ द्रोहसांडीसुयोधना॥ वांचवणें आहे आपल्याप्राणा॥ तरितूंजाऊनिका
म्यकवना॥ पृथानंदनाआणवेगीं॥ ६७॥ ऐसेंऐकतांदुर्योधन॥परमक्षोभलाकृशान॥ श्मश्रुहातेंपिळून॥ अं-
कआपलाथापटित॥ ६८॥सव्यपदें घांसेमेदिनी॥गर्वेंनबोलेचिपापखाणी॥सक्रोधेंहुंकारदेउनी॥ अधरद
शनेंरगडित॥ ६९॥ ऐसेंदेखतांचिजाण॥प्रळयींक्षोभेमृडानीरमण॥ शापवदेमैत्रेयदारुण॥जोकांअलोट
हरिहरा॥ १७०॥ ह्मणेचांडाळतूंदुर्योधन॥ द्वेषीहिंसककुटिळपूर्ण॥ करिसीतपस्वीयाचा अपमान॥गर्वैक
रूनबोलसी॥७१॥ नधरिसीब्राह्मणाचीमर्यादा॥दुष्टामलिनामतिमंदा॥तुझेअंकींभीमाचीगदा॥ विद्युल्ल
तेऐसीपडेल॥ ७२॥ तेणेंचअंकचूर्णहोऊन॥तळमळूनसोडिसीलप्राण॥ माझें अन्यथानव्हेशापवचन॥ज
ळजासनाचेनेही॥७३॥मदेंमाजलाजेविंबस्त॥ कींपिसाळलेंश्वानयथार्थ॥ कींडुकरमांजलेंपुरुषार्थे॥ हा
णेदांतभलत्यासी॥ ७४॥ तैसातूंमाजलासिपूर्ण॥पक्कफळजेविंहोयचूर्ण॥तेविंभीमगदेंकरून॥ छिन्नभिन्न
अंकहोका॥ ७५॥ ऐसेंमैत्रेयबोलोन॥सवेंचपावलाअंतर्धान॥जैसाकार्येंतूनिगेलाप्राण॥ तैसातोनेणवेको
णासी॥ ७६॥ भयाभीतदुर्योधन॥चिंतार्णवींबुडालापूर्ण॥ शोकेंतळमळीअंबिकानंदन॥ ह्मणेवर्तमानबरें
नदिसे॥ ७७॥ यावरीविदुरासबोलाऊन॥धृतराष्ट्रपुसेपरमउद्विग्न॥तुवांदेखिलेंकाम्यकवन॥ तरींवर्तमा

नएकसांगें ॥ ७८ ॥ भीमें मारिलाकिर्मिर ॥ कथामजसांगेंसमग्र ॥ मगबोलेचतुरविदुर ॥ ऋषिमुखेंऐकिली
म्यां ॥ ७९ ॥ गजपुरांतूनिनिघालेपंडुनंदन ॥ तीनदिवसांपावलेकाम्यकवन ॥ रजनीतजातमार्गक्रमुन ॥ तोंकिर्मि
रराक्षसधांवला ॥ १८० ॥ महाविशाळरजनीचर ॥ कज्जलवर्णपर्वताकार ॥ भाळींचर्चिलासिंदुर ॥ दाढाशस्त्र
भयानक ॥ ८१ ॥ त्याचाभयेंकरुनी ॥ कोणीतेथेंनवसेप्राणी ॥ तोपांडवांसआडयेउनी ॥ कवणह्मणोनीपुसत
से ॥ ८२ ॥ त्यासदेखोनिद्रौपदी भयाभीत ॥ नेत्रझांकीहोयकंपित ॥ अर्जुनतियेससांवरित ॥ कांहींमनांतभीऊं
नको ॥ ८३ ॥ राक्षसासीपंडुनंदन ॥ पुसतीतूंआहेसकोण ॥ येरूह्मणेमीकिर्मिरजाण ॥ बकासुराचाबंधूपैं ॥
॥ ८४ ॥ पुरुषमात्रधरून ॥ मीभक्षितोंनलगतांक्षण ॥ तुह्मींपाचजणआहांकोण ॥ नेताकामिनीकोणाची ॥ ८५
धर्मह्मणेआह्मीपंडुकुमर ॥ हस्तनापुरींचेराज्यधर ॥ मगबोलेकिर्मिर ॥ दावावृकोदरकोणता ॥ ८६ ॥ त्याभीमाच्या
रक्तेंकरुन ॥ करीनबकासुराचेंतर्पण ॥ मगत्याससगळाचिग्रासिन ॥ करीनचूर्णदंतारवालें ॥ ८७ ॥ माझाबका
सुरबळेंगहन ॥ तेणेंमारिलाकपटेंकरून ॥ बहुतदिवसभीमालागुन ॥ शोधितांआजीसांपडला ॥ ८८ ॥ ऐसेंबो
लतांकिर्मिर ॥ हाकफोडीवृकोदर ॥ पर्वताकारतरुवर ॥ उपडूनहातींघेतला ॥ ८९ ॥ अर्जुनेंनलगतांक्षण ॥
गांडिवासिचढविलागुण ॥ तोंकिर्मिरवृक्षघेऊन ॥ भीमावरीधांविला ॥ १९० ॥ एककाळएककृतांत ॥ एकअ
स्वयाएकहनुमंत ॥ एकएकाचेपृष्ठीवरीमोडित ॥ वृक्षसर्वउपडोनी ॥ ९१ ॥ द्वादशयोजनेंपर्यंत ॥ महितरूभंगि
लेसमस्त ॥ मगशिळाआणिपर्वत ॥ परस्परेंटाकिती ॥ ९२ ॥ मल्लयुद्धअद्भुत ॥ झालेंघटिकाच्यारपर्यंत ॥ मग
भीमेअलातचक्रवत ॥ चरणींधरूनिभोंवडिला ॥ ९३ ॥ तैसाचआपटिलाझडकरी ॥ मगपायदेऊनिपृष्ठीवरी
॥ धरूनिशिरपादाग्रीं ॥ मध्यभागींमोडिला ॥ ९४ ॥ दुंदुभीफुटतांध्वनींउमठत ॥ तैसाराक्षसदेहांतींओरडत
॥ कुंजरअथवापर्वतपात ॥ भूमीवरीतेविपडियेला ॥ ९५ ॥ ऐसापुरुषार्थकरूनपंडुनंदन ॥ गेलेद्वैतवनाला

गुन ॥ द्रौपदी परम आनंदोन ॥ ह्मणे धन्य वृकोदर ॥ ९६ ॥ ऐसी कथा सांगतां विदुर ॥ श्वासोश्वास टाकी धृ
तराष्ट्र ॥ ह्मणे मैत्रेयाचा शाप क्रूर ॥ काळत्रयीं टळेना ॥ ९७ ॥ असो यावरी वनीं कष्टी पांडव ॥ भेटावयास आ
ले राजे सर्व ॥ बाराजातीचे यादव ॥ यादवेंद्र समवेत पैं ॥ ९८ ॥ वसुदेव आणी उद्धव अक्रूर ॥ उग्रसेन रेवती व
र ॥ दळासहित सत्वर ॥ द्वैतवना पातले ॥ ९९ ॥ शिखंडी आणी धृष्टद्युम्न ॥ आले द्रौपदीचे बंधु धांवोन ॥ कौ
रवपती निंदिती संपूर्ण ॥ क्रोधें करून सर्व ही ॥ २०० ॥ श्रीरंगासी देखोन ॥ पांडव घालिती लोटांगण ॥ द्रौप
दी धांवूनि धरी चरण ॥ प्रेमें करून स्फुंदत ॥ १ ॥ द्रौपदीस ह्मणे यादवेंद्र ॥ माये तुवां कष्ट देखिले अपार ॥
तरी कौरव रक्तें समग्र ॥ धरातळ भिजवीन ॥ २ ॥ देखोनि कौरवांचा अंतकाळ ॥ त्यांचा स्त्रिया सर्व रडतील
॥ तो तूं देखसी कोल्हाळ ॥ अल्पकाळें चि यावरी ॥ ३ ॥ उतरून पृथ्वीचे भार ॥ धर्मावरी धरीन छत्र ॥ यावरी त्र
योदश वर्षानंतर ॥ सोहळा देखसी कृष्णे तूं ॥ ४ ॥ वस्त्रहरणीचें दुःख अद्भुत ॥ आठऊनि कृष्णा शोक करि
त ॥ ह्मणे पांच ही पती बळिवंत ॥ उगेच होते तये वेळीं ॥ ५ ॥ कैवारिया भक्तवत्सला ॥ वस्त्रें पुरविलीं ते वेळां ॥
करुणाकरा दयाळा ॥ लाज माझी रक्षिली ॥ ६ ॥ धर्म ह्मणे उपकार ॥ किती आठवावे अपार ॥ कुंभिनीचें कर
नपत्र ॥ लिहितां चरित्र सरेना ॥ ७ ॥ पांचाळीचे पंचपुत्र ॥ महायोद्धे वयकिशोर ॥ द्रौपदी पांडवांस सत्वर ॥ धृष्ट
द्युम्नें भेटविलें ॥ ८ ॥ प्रतिविंध्य श्रुतसोम शतानिक ॥ श्रुतसेन श्रुतकर्मा देख ॥ पितयातुल्य ते बाळार्क ॥ परम पु
रुषार्थी पांच ही ॥ ९ ॥ सुभद्रा आणि अभिमन्य ॥ कृष्णासंगें आले द्वारकेहुन ॥ सौभद्रें पांडवांस वंदुन ॥ के
लें नमन द्रौपदीसी ॥ २१० ॥ यावरी देशोदेशींचे राव ॥ स्तविती द्वादशजातीचे यादव ॥ वसुदेव बळिभद्र उ
द्धव ॥ समयोचित बोलती ॥ ११ ॥ धृष्टद्युम्न प्रतिज्ञा करुन ॥ ह्मणे क्षणात द्रोण समारीन ॥ शिखंडी ह्मणे
अंत करिन ॥ ह्नद्भीष्माचा यावरी ॥ १२ ॥ सुयोधन दुःशासन ॥ भीम हस्तें सोडिती प्राण ॥ कर्णाचा का

ळ अर्जुन ॥ शल्यासमरणधर्महस्तें ॥ १३ ॥ माद्रीनंदनप्राण ॥ शकुनीचा घेतील नलगतां क्षण ॥ असो सर्व
ही कौरवसैन्य ॥ पांचही मिळोनि आटतील ॥ १४ ॥ यावरी यादवांसहित यादवेंद्र ॥ सुभद्रा आणि सौभद्र
द्वारकेसी गेले सत्वर ॥ आज्ञा घेऊनि पांडवांची ॥ १५ ॥ घेऊनि द्रौपदीचे नंदन ॥ पांचाळपुरा गेला धृष्टद्यु
म्न ॥ सकळ राजे प्रजाजन ॥ निजदेशाप्रती जाती ॥ १६ ॥ यावरी द्वैतवनीं पंडुकुमर ॥ राहिले घेऊन अपार
विप्र ॥ तेथें द्वादशसंवत्सर ॥ क्रमिते झाले सत्समागम ॥ १७ ॥ नित्य नैमित्तिक कर्म ॥ व्रतें हवनें पितृश्राद्धें उ
त्तम ॥ अग्निसेवा त्रिकाळ होम ॥ देतधर्म आदरेंसी ॥ १८ ॥ पक्ष इष्टी मास इष्टी ॥ नक्षत्र इष्टी प्रिय परमेष्ठी ॥
चातुर्मास्य पर्वें पोटीं ॥ आचरतां आनंद धर्मातें ॥ १९ ॥ यागसदनीं वेदघोष ॥ ओंकार वषट्कार ध्वनी सु
रस ॥ तेते महाऋषी निर्दोष ॥ येंच रीती आचरती ॥ २० ॥ यथासुखें राहिले ब्राह्मण ॥ कुंडवेदिका शास्त्रप्र
माण ॥ सायंकाळीं देदीप्यमान ॥ तीनी अग्नी शोभती ॥ २१ ॥ चहुं वेदांचें अध्ययन ॥ शास्त्रचर्चा पुराणश्रव
ण ॥ पांडवांजवळी हरिकीर्त्तन ॥ रात्री करिती सर्वही ॥ २२ ॥ मार्कंडेय महाऋषी ॥ येऊनि भेटला पांडवांसी
ह्मणे धर्मा तूं वनवासी ॥ सुखी आहेस वाटतें ॥ २३ ॥ प्रत्यक्ष परब्रह्म रामचंद्र ॥ चौदा वर्षें सेविलें सेवन घोर ॥
मग रामकथा समग्र ॥ धर्मराया सांगीतली ॥ २४ ॥ ते रामकथा वर्णावी समस्त ॥ तरी समुद्रा ऐसा वाढेल ग्रं
थ ॥ पूर्वीं रामविजय ग्रंथीं सत्य ॥ सप्तही कांडें कथियेलीं ॥ २५ ॥ पांडुरंग कृपें यथार्थ ॥ चाळीस अध्याय
रामविजय ग्रंथ ॥ तो श्रोतीं पहावा तेथ ॥ अत्यादरें करूनियां ॥ २६ ॥ द्वैतवन परम सुंदर ॥ नानाजातीचे तरु
वर ॥ भेदीत गेले अंबर ॥ मनोहर सदा जे ॥ २७ ॥ छायाशीतळ सघन ॥ माजी न दिसे सूर्यकीर्ण ॥ नारळी के
ळी पोफळी रातंजन ॥ सुवास चंदन मलयागरू ॥ २८ ॥ अशोकवृक्ष उतोनिया ॥ राय आंवळे अंबे खिरणी
या ॥ निंबें कवठें वाढोनियां ॥ सुंदर डाहाळिया डोलती ॥ २९ ॥ दाळिंबी रायकेळी मंदार ॥ चंदनवृक्ष सोहोअं

जीर ॥ चंपकजाईजुईपरिकर ॥ तुलसीकरवीरबकुलमोगरी ॥ १३० ॥ शतपत्रजेरुद्राक्षपरिकर ॥ शेंवती कनकवेलीस्कमांदार ॥ नागवेलीअतिसुंदर ॥ पवळवेली आरक्त ॥ ३१ ॥ मयूरेंचातकेंबदकें ॥ कस्तुरीमृगजवादिबिडालकें ॥ राजहंसनकुळेंचक्रवाकें ॥ कोकिळाकौतुकेंबाहती ॥ ३२ ॥ धन्यधन्यधर्मराजनृपती श्वापदेंनिर्वैरविचरती ॥ योगसाधनेंऋषिआचरती ॥ गायकगर्जती अलापें ॥ ३३ ॥ रसाळआणीपरमपावन ॥ अरण्यपर्वगोडगहन ॥ स्वधर्मनिष्ठधर्मपरायण ॥ त्यासीचजाणरुचेहें ॥ ३४ ॥ वनपर्वकमळस्फुरस पंडितमिलिंदघेतीसुवास ॥ दर्दुरकुटिलनिंदकास ॥ कुतर्कपंकप्राप्तसदा ॥ ३५ ॥ दर्दुरानाहींकमळपराग ॥ परिसदाराहातीसज्जनभृंग ॥ जांचेहृदयींश्रीपांडुरंग ॥ सर्वकाळवसतसे ॥ ३६ ॥ ब्रह्मानंदापंढरीराया ॥ श्रीधरवरदाकैवारिया ॥ अभंगनिर्विकाराकरुणालया ॥ ठेवींपायांजवळची ॥ ३७ ॥ स्फुरसपांडवप्रतापग्रंथ ॥ अरण्यपर्वव्यासभारत ॥ त्यांतीलसारांशयथार्थ ॥ तेंविसाव्यांतकथियेला ॥ ३८ ॥ इतिश्रीपांडवप्रतापग्रंथ ॥ अरण्यपर्वटीकाश्रीधरकृत ॥ काम्यकवनांतूनद्वैतवनांत ॥ पांडवगमनकथियेलें ॥ २३९ ॥ इतिश्रीपांडवप्रतापादिपर्वेत्रयोविंशत्यध्यायः ॥ २३ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ श्रीमज्जगदीश्वरार्पणमस्तु ॥

७॥ ७॥ ७॥ ७॥ ७॥

श्रीगणेशायनमः॥जन्मेजयह्मणेवैशंपायनास॥तुझ्यावदनेअतीस्फरस॥कथागोडलागेसुधारस॥तुच्छवाटे
त्याहुनी॥१॥वैशंपायनह्मणेराया॥तुझ्यापूर्वजांचीपवित्रचर्या॥ऐकतांनिरसेतापत्रयमाया॥होयकायाशीतळ
॥२॥वंदोनियांकृष्णाचरणा॥सांगेनअद्भुतकथेचीरचना॥पांडववनींअसतांजाणा॥कृष्णभजनानविसरती॥
॥३॥प्रत्यहींलक्षसंख्याब्राह्मण॥नित्यत्यांसषड्रसान्न॥धर्मराजदेतभोजन॥त्रिभुवनीपूर्णख्यातीजाहाली॥
॥४॥ब्राह्मणयेऊनगजपुरासी॥कीर्तीसांगतीदुर्योधनासी॥ह्मणतीधन्यउपमापांडवांसी॥त्रिजगतींअसेना
॥५॥तुह्मीबाहेरदिल्हेंदवडुन॥परीत्यांसरक्षितोजगज्जीवन॥प्रत्यहींलक्षसंख्याब्राह्मण॥पंक्तीजेवितीधर्मा
चे॥६॥ऐकोनिपांडवांचीस्तुती॥दुर्योधनसंतप्तचित्तीं॥ऐकोनिसंतांचीस्थिती॥निंदकतापतीमानसीं॥७॥व
संतऋतुराजदेखोनी॥कोकिळाकरितीमधुरध्वनी॥तोसुंदरस्वरऐकोनी॥वायसमनीसंतापे॥८॥देखोनिव्युत्प
न्नपंडितजन॥मूर्खांचेंहृदयजायजळोन॥कींऐकोनीहरिकीर्त्तन॥भूतप्रेतेंविटतीपैं॥९॥ऐसादुर्योधनपापम
ती॥अपाययोजीनानाचित्तीं॥तोंदुर्वासऋषीमहामती॥अकस्मातपातला॥१०॥त्यासदुर्योधनेंदेखोन॥करि
ताजाहालासाष्टांगनमन॥मनीकापट्यकल्पिलेंपूर्ण॥पांडवछळूंपाहती॥११॥जारणमारणादिअनुष्ठान॥ते
थेंआवडीभजतीकुजन॥तैसाचअर्थकल्पून॥दुर्योधनसेवाकरी॥१२॥जेजेसमयींजेंजेंमागे॥तेंतेंदेऊनिसं
तोषवीअंगें॥रात्रीचारीप्रहरजागे॥सेवास्वांगेंकरीत॥१३॥भूतप्रेतसाधनालागुनी॥कुटिळकपटीजागतीस्म
शानी॥तैसीबहुतसेवाकरूनी॥दुर्वासमुनीप्रसन्नकेला॥१४॥तोह्मणेमागवरदान॥येरूबोलेकरजोडून॥आ
मचेदायादपांडवजन॥त्यांसछळोनयेंईजे॥१५॥सूर्येंथाळीदिल्हीत्यांप्रती॥असंख्यऋषिपंक्तीनित्यजेविती॥
शेवटींजेऊनद्रौपदीसती॥थाळीपालथीघालित॥१६॥थाळीपालथीघालितांराती॥मगतेथेंअन्ननाहींनि
श्चिती॥आपणजावेंत्यासमयाप्रती॥भोजनप्रीतीमागावें॥१७॥तेकरितीअनमान॥तरीभस्मकरावेंशापु

न॥ तों बोले अत्रिनंदन॥ अवश्य करणे हें आह्मां॥ १८॥ दुर्योधन दुःशासन दुर्वास॥ तिघांची एक राशी एक रस॥
परी अत्रिनंदन निर्दोष॥ त्याची मती ऐसी कां॥ १९॥ एक मासपर्यंत जाण॥ भक्षिलें कौरवांचें अन्न॥ दुर्जनाचे अ
न्नाचा गुण॥ पांडवछळन वाटलें॥ २०॥ सज्जनाचें सेवितां अन्न॥ सुबुद्धी उपजे तेणे करून॥ असो दुर्वासाचें उद्वि
ग्न मन॥ झालें पांडवछळावया॥ २१॥ साठसहस्त्र शिष्यभार॥ घेऊनि चालिले अत्रिपुत्र॥ रात्र जाहाली दोन प्रह
र॥ अद्वैतवना पातले॥ २२॥ ऐकोनी ब्राह्मणाची गजबज॥ जागा जाहला धर्मराज॥ बंधूसहित तेजःपुंज॥ लोटां
गण घातलें॥ २३॥ ह्मणे धन्य धन्य आजिचा दीन॥ जाहालें साधूचें दर्शन॥ दुर्वास ह्मणे तुझें स्तवन॥ गोड न लागे ये
वेळे॥ २४॥ पोटीं क्षुधेचा अनळ॥ प्राण होताती आमचे विकळ॥ तुझे उपचार पावले सकळ॥ भोजन आधी दे ईजे
॥ २५॥ समय पाहूनि पूजन॥ चतुरें करावें जाण॥ कासावीस होताती प्राण॥ झडकरी अन्न दे आतां॥ २६॥ इच्छा
धरूनि भोजनी॥ वेगें येतां मार्गी मुनी॥ तों अस्ता गेला वासरमणी॥ ह्मणोनि रजनी जाहाली॥ २७॥ सत्वर येतों
स्नान करुन॥ पात्रीं वाढोनि ठेवा अन्न॥ विलंब जाहल्या जाण॥ मग शापिन क्षणार्धे॥ २८॥ ऐकोनि ऋषीचें वच
न॥ धर्मदत्त कलामनी पूर्ण॥ पाहे द्रौपदीचें वदन॥ ह्मणे परम विघ्न वोढवलें॥ २९॥ द्रौपदी ह्मणे धर्मराजा॥ स्ना
नास जाउं द्या सत्वर द्विजा॥ ऐसें बोलतां द्रुपदात्मजा॥ मुनी उठिले सत्वर॥ ३०॥ दुर्वास बोले वचन॥ आमचें दि
वसा झालें संध्या अनुष्ठान॥ आतां येतों स्नान करून॥ द्रौपदी ह्मणे अवश्य॥ ३१॥ घेऊनि ऋषींचे भार॥ स्ना
नास गेला अत्रिपुत्र॥ मागें धर्मराज दीनवक्त्र॥ द्रौपदीलागीं बोलतसे॥ ३२॥ कसी करावी आतां गोष्टी॥ रिघावें क
वणाचिया पाठी॥ द्रौपदी ह्मणे पडतां संकटीं॥ यादवराया स्मरावें॥ ३३॥ मग ते पांडवांची पत्नी॥ उभी टाकली वृंदा
वनीं॥ द्वारकेकडे कर जोडुनी॥ मूर्ति ध्यानीं विलोकिली॥ ३४॥ ह्मणे श्रीरंगा इंदिरावरा॥ धराधरशायना विश्वंभ
रा॥ भक्तमानसचकोरचंद्रा॥ करुणासमुद्रा गोपाळा॥ ३५॥ नमो अनंत ब्रह्मांडनायका॥ हे दयार्णवा विश्वव्या

पका॥ वैकुंठपतेभवमोचका॥ मदनजनकाजगत्पती॥ ३५॥ हेकृष्णाजगदंकुरकंदा॥ साधुहृदयारविंदमि
लिंदा॥ निजजनचातकजलदा॥ ब्रह्मानंदापरात्परा॥ ३६॥ कमलोद्भवजनकाकमलनयना॥ कमलनाभा॰
कमळनयना॥ कमलानायकाकमलवदना॥ कमलसदनाकमलप्रिया॥ ३७॥ जयजयश्रीकृष्णाविश्वपाल
ना॥ विश्वव्यापकाविश्वकारणा॥ विश्वमनीचाळकाविश्वजीवना॥ विश्वरक्षकाविश्वेशा॥ ३८॥ जयश्रीकृष्ण
कमलपत्राक्षा॥ कंसांतकासर्वसाक्षा॥ मखपाळकानिर्विकल्पदक्षा॥ कर्माध्यक्षाकर्ममोचका॥ लाक्षासदनीं
रक्षिलेंश्रीहरि॥ उघडेंकरिनांसभेभीनरि॥ उडीघाल्तूनिमुरारी॥ पूर्णकेंवारीजाहालासि॥ ४०॥ तुजवांचूनि सं
सारीं॥ नारककोणबाकंसारी॥ यावेळींसत्वरारवेंहरी॥ धांवझडकरीमाउलीये॥ ४१॥ भक्तवत्सलाअतिउदा॰
रा॥ श्रीकरधराश्यामसुंदरा॥ माझेविसावियासर्वेश्वरा॥ करावीत्वरायेवेळे॥ ४२॥ माझेसांवळेकृष्णाबाई॥ बि
रडेंस्फुटलेंयादनेसमयीं॥ मजचतुर्भुजकेलेंलवलाहीं॥ तैसायेसमयींधांवेंकां॥ ४३॥ इकडेद्वारावतीसतेवेळे॥
नाटरुक्मिणीनेंविस्तारिलें॥ ग्रासघ्यावातोघननीळें॥ तोंशब्दऐकिलेभगिनीचे॥ ४४॥ द्रौपदीचेशब्दकोमळ॥
करुणारसभरीतस्फुटाळ॥ हृदयींगहिंवरलागोपाल॥ नाटदूरिदकलिलें॥ ४५॥ उभाराहिलाचक्रपाणी॥ नटस्थ
पाहेरुक्मिणी॥ धांवघेतलीतेक्षणीं॥ नबोलतां अतिवेगें॥ ४६॥ सत्वरयेऊनवनमाळी॥ उभाठाकलाद्रौपदीजव
ळी॥ प्रेमेंआलिंगिलीपांचाळी॥ नेवेळींगोपाळें॥ ४७॥ नेत्रउघडोनिद्रौपदीपाहे॥ तोंपुढेंघनःश्यामउभाआहे॥
दृढधरोनिपांये॥ मगमूखपाहेहरीचें॥ ४८॥ वदनसुहास्यअतिउदार॥ मुकुटकुंडलेंमकराकार॥ आकर्णनेत्र॰
सकुमार॥ निटळींकेशरविराजे॥ ४९॥ सर्वालंकारींमनोहर॥ उभादेखिलाजगदोद्धार॥ द्रौपदीह्मणेऋषेश्वर॥
स्नानागेलेगोविंदा॥ ५०॥ श्रीरंगह्मणेद्रौपदीमाये॥ मजबहूक्षुधालागलीआहे॥ धांवोनिआलोंलवलाहें॥ ना
टदूरकरोनियां॥ ५१॥ द्रौपदीह्मणेकमलाधवा॥ ऋषिलागींकेला तुझा धांवा॥ जगजीवनाकेशवा॥ आतांबा॰

हूं कोणासि ॥ ५२ ॥ कृष्ण ह्मणे झडकरी ॥ कांहीं तरी पाहें गृहांतरीं ॥ थाली मज दावीं लौकरी ॥ अंतरीं कांहीं असेल ॥
५३ ॥ द्रौपदी सद्गद बोले वचन ॥ थाली स्यांपालथी घातली धुवोन ॥ कृष्ण ह्मणे कांहीं भक्षिल्याविण ॥ माझें मन-
तृप्त न व्हे ॥ ५४ ॥ थाली मज पाहूं दे आधीं ॥ ते आणोनि दाखवी द्रौपदी ॥ तों येक भाजीचें पान कृपानिधी ॥ दावी हा
तें करोनियां ॥ ५५ ॥ जगत्पालक जगन्नाथ ॥ द्रौपदीपुढें वोढवी हात ॥ येरी ते घातलें त्वरित ॥ ह्मणे मी तृप्त झालों के सि
॥ ५६ ॥ तें शारवादळ लचलाहीं ॥ मुखीं घाली क्षीराब्धिचा जावई ॥ देंकर दिधला ते समयीं ॥ ह्मणे त्रिभुवन धालें
हो ॥ ५७ ॥ ह्मणे आतां पाचारा ब्राह्मण ॥ द्रौपदी पाहे आश्रमांत येऊन ॥ तों अन्नाचे पडिले पूर्ण ॥ जेणें त्रिभुवन-
जेऊन उरे ॥ ५८ ॥ तों गंगातिरीं ऋषिमंडळी ॥ अघमर्षण गंगाजळीं ॥ तेथें प्रगटोनि वनमाळी ॥ भोजनशाळार-
चियेल्या ॥ ५९ ॥ द्रौपदी आणि पांडव ॥ दुसरे निर्मी माधव ॥ दुर्वासादि ऋषी सर्व ॥ जेवावया बैसले ॥ ६० ॥ मघम
घीत सुवास अन्न । देव ही लाळ घोंटिती जाण ॥ वसंत करी प्रदक्षिण ॥ ह्मणे हें अन्न मज कैचें ॥ ६१ ॥ देवें अमृत-
दिधलें आणोन ॥ . न रिझ ऋषी ह्मणती नेदुं हें अन्न ॥ ब्रह्मादिकांस दुर्लभ पूर्ण ॥ प्रीती करून जेविती ॥ ६२ ॥ रत्नज-
डीत अडणियांतळीं ॥ त्यावरी कनकाचीं ताटें मांडलीं ॥ स्वर्णपिढीं बैसाया दिधलीं ॥ समसमान समस्तां ॥ ६३
पृथक् पृथक् वाणविया ॥ वरी रत्नदीपिका लावोनियां ॥ कांचनाचिया झारिया ॥ उदकें भरिल्या सुवासें ॥ ६४ ॥
जैसा सोमकांताचा पर्वत ॥ तैसा पडिला सेश भात ॥ स्वर्णाचळ अद्भुत ॥ तैसें वरान्न दिसतसे ॥ ६५ ॥ पंचभक्ष
परमान्न ॥ साठि पत्रशारवा सुवासें पूर्ण ॥ घृत मधु दुग्ध सरोवरें जाण ॥ दधिशर्करादी सती ॥ ६६ ॥ जैसें अलातच-
क्र फिरताहे ॥ तैशी द्रौपदी वाढूनि जाय ॥ चुडे झळकती विज्जुप्राय ॥ उजेड पडे जेविल्यांवरी ॥ ६७ ॥ प्रार्थना करिती-
धर्म कृष्ण ॥ भीम विनवी करजोडुन ॥ स्वामी साव काश कीजे भोजन ॥ उशीर बहू जाहाला कीं ॥ ६८ ॥ तृप्त जाहा-
ले ऋषी समस्त ॥ ह्मणती सार्वकाळ राहावें येथ ॥ सर्वदा भक्तांचें अन्न पुनित ॥ द्रौपदीहस्तें जेविजे ॥ ६९ ॥ आ-

युष्यअसावेंकल्पवरी॥सदांराहावेंधर्माचेघरीं॥ऐसेंबोलतांऋषेश्वरीं॥करप्रक्षालनजाहालें॥७०॥सकळ
ऋषीआंचवले॥त्रयोदशगुणीविडेघेतले॥सर्वहीरूगंधेंचर्चिले॥मगनिजलेनावेक॥७१॥मंत्राक्षताघाव
यासी॥उठिलेमागुतीजोंऋषी॥तोंपांचाळीसहवेगेंसी॥कृष्णापांडवगुप्तजाहाले॥७२॥तंवसहदेवपानला॥
वेगेंसी॥ह्मणेस्वामीचलावेंभोजनासि॥पात्रेंवाढूनतुह्मासी॥बोलाउंमीपातलों॥७३॥मगबोलेअत्रिनंद
न॥परमचांडाळदुर्योधन॥हरिभक्तांचीछळणाकरून॥तपाचरणाआंचवलों॥७४॥दुर्जनाचीबुद्धीऐकिजे
॥हरिभक्तांचेंछळणकीजे॥साधूचाअंतपाहिजे॥हींद्वारेंअनर्थाचीं॥७५॥पूर्वींअंबऋषीचेंकेलेंछळण॥
पाठीलागलेस्कदर्शन॥परमचांडाळदुर्योधन॥तेणेंबुधीचकविली॥७६॥दुर्वासह्मणेसहदेवातें॥माझाआ
शीर्वादसांगाधर्मातें॥विजयकल्याणातुह्मातें॥शत्रुक्षयातेंपावती॥७७॥वज्रचूडेमंडीतमहासनी॥माझा
आशीर्वादसांगेनिजप्रति॥तुजसारिखाअसोसर्वार्थी॥जोकांश्रीपतीसर्वदा॥७८॥ब्राह्मणगेलेतेथून॥सहदे
वआलापरतोन॥मगयेऊनिजगाचाजीवन॥प्रगटभेटलापांडवां॥७९॥आलिंगोनिपांडवांप्रति॥हृदयींध
रिलीद्रौपदीसती॥ह्मणेतुह्मीपडतांसंकटावर्ती॥मीश्रीपतीरक्षीन॥८०॥ब्रह्मानंदयादवेंद्र॥आज्ञामागोनस
र्वेश्वर॥द्वारकेसगेलाश्रीकरधर॥अभंगसाचारविटेना॥८१॥असोयावरीद्वैतवनीं॥असतांपांडवयाज्ञसेनी॥तोंजग
द्गुरूयेउनी॥व्यासदेवभेटला॥८२॥शत्रूविध्वंसासकारण॥अर्जुनाकरींतूंतीर्थाटण॥शिवशचीरमण॥अ-
स्त्रेंशस्त्रेंदेतीलबहू॥८३॥ ॥गुरुबुद्धीविशेषजाणोन॥तीर्थाटणानिघालाअर्जुन॥हिमनग
पर्वतवोलांडुन॥इंद्रकीलपर्वतापावला॥८४॥तेथेंवृक्षपर्णेंभक्षून॥दुसरेमासींजलसेऊन॥घोरतपकरी-
अर्जुन॥धूम्रपानतृतीयमासीं॥८५॥चवथेमाशींवायुआहार॥एकांगुष्ठावरीपार्थवीर॥ऊर्ध्वबाहूकरूनिनेत्र
॥तपआचरेकौंतेय॥८६॥जैसामाध्यान्हींचाचंडकीर्ण॥तपतेजेंतैसाअर्जुन॥भोंवतेतपस्वीब्राह्मण॥तेज-

साहूंनशकनी॥ ८७॥ व्योमकेशाप्रतिजाऊन॥ ऋषीसांगतीवर्तमान॥ अर्जुनाचेतपतेजेंकरून॥ सहस्रकीर्णझां
कोळला॥ ८८॥ ऐसेंऐकोनिमृडानीभर्ता॥ येनाजाहलाइंद्रकीलपर्वता॥ केशनरूपझालाधर्ता॥ अतिविशाळने
जस्वी॥ ८९॥ रूपपालटोनिशक्ति॥ संगेंवनाआलीहेमवती॥ भूतपाळेअसंख्यनिघती॥ उमाधवावेष्टित॥ ९०॥ भू
कनामेंदैत्यबळविशेष॥ त्याप्रतिबोलतसेव्योमकेश॥ तूंधरोनवराहवेष॥ अर्जुनासन्मूखजाईकां॥ ९१॥ आज्ञावं
दूनिअसुर॥ वराहवेषेंधांवेभयंकर॥ मुसांडीघेऊनसत्वर॥ पार्थावरीचौताळला॥ ९२॥ मेघमुखवाहूनघोषगहन॥
सूकरकरीऐकेअर्जुन॥ गांडीवाससीनचढवून॥ लाविलाबाणचापासि॥ ९३॥ पवनवेगेंसूकरजात॥ पाठीलाग
लावीरपार्थ॥ तोंकिरातरूपेंउमाकांत॥ वेगेंधांवतआडवा॥ ९४॥ पार्थासह्मणेउमावर॥ म्यांपिटीतआणिलासूक
र॥ संधानीलक्षिलासाचार॥ तूंयासमारूंनको॥ ९५॥ तेंनमानीचअर्जुन॥ धांवोनचापासिलाविलाबाण॥ वर्मी
भेदितांजाण॥ सूकरेंप्राणसोडिला॥ ९६॥ परमपुरुषार्थीसुभद्रारमण॥ किरातासपुसेतूंकोण॥ निर्भयस्त्रियेस
हीतपूर्ण॥ एकलावनींविचरसि॥ ९७॥ किरातह्मणेयेचभूमी॥ वस्तीकरितोंसदाआह्मी॥ तूंकोणआहेसअध
र्मी॥ सूकरमाझावधिलाकां॥ ९८॥ तूंगर्वबहूतकरिशी॥ तरितूंयुद्धकरींमजशीं॥ आमुच्यावनातूंकांआलासि॥
मानववेषीसकुमारा॥ ९९॥ योद्धाह्मणविशीनिपुण॥ तरिटाकींमजवरीस्वेच्छाबाण॥ अर्जुनेंमांडिलेंवज्रठा
ण॥ शरदारूणसोडीत॥ १००॥ असंख्यसोडिलेबाण॥ परिशिवाआंगींनरुपतीजाऊन॥ सुमनवृष्टीहोतांजा
ण॥ इभजेसानगणीच॥ १॥ तृणशिखापडतांसबळ॥ अचळनसोडीजेसास्थळ॥ तैसेंपार्थाचेंबाणजाळ॥ ग्री
वानीळमानीना॥ २॥ जेंजेंपार्थसोडीअस्त्र॥ मुखपसरोनग्रासीत्रिनेत्र॥ कुंतीचाजोतृतीयपुत्र॥ विस्मीतहोऊ
नपाहातसे॥ ३॥ मगसुभद्रामनरंजन॥ ह्मणेसांगतूंरुद्रकींशचीरमण॥ किरातनबोलेएकहीवचन॥ अपार
बाणसोडिलां॥ ४॥ बाणजाळसोडितांबहुत॥ परमत्रासलावीरपार्थ॥ बाणसरलेसमस्त॥ अक्षयभातारि

नापें॥५॥ ह्मणेअग्निदत्तअक्षयतूणीर॥ बाण कांआजिसरलेसमग्र॥ हा कोणपुरुषनिर्धार॥ नकळेपारय
याचा॥६॥ मगगांडीवदंडेंकरून॥ मारीतउठिलाअर्जुन॥ तोंरुद्रेंपसरोनिवदन॥ चापही गिळिलेंनेंधवां॥७
मगदिव्यखड्ग घेऊन॥ शिवासताडीअर्जुन॥ नेंहीगिळीनलगतांक्षण॥ मगवृक्षअर्जुनेंटाकिले॥८॥ वृक्ष
सरलेसंपूर्ण॥ शिळापर्वतघालीउचलोन॥ हाणतांमुष्टिप्रहारेंकरून॥ मल्लयुद्धामिसळले॥९॥ चारघ
टिकापर्यंत॥ शिवेंयुद्धकेलेंअद्भुत॥ अर्जुनजाहलामूर्छागत॥ मगउमाकांतकायकरी॥१०॥ कृपाकरेंकु
रवाळुन॥ सावधकेलाअर्जुन॥ प्रत्यक्षदशभुजपंचवदन॥ प्रकटजाहलातेधवां॥११॥ ह्मणेप्राणसखया
पार्था॥ प्रसन्नजाहलोंमागआतां॥ विजयीहोईसर्वथा॥ शत्रुसंग्रामींसर्वदांतूं॥१२॥ पार्थेंघातलेंलोटांगण
॥ स्कंदतातेंदिधलेंआलिंगन॥ मगश्वेतवाहनेंपूजून॥ दिव्यस्तवनमांडिलें॥१३॥ पंचवदनाविरूपाक्षा॥ वि
श्वंभराकर्माध्यक्षा॥ भक्तवल्लभासर्वसाक्षा॥ मायाचक्रचाळका॥१४॥ गंगाधराहिमनगजामाता॥ गजा॰
स्यजनकाविश्वनाथा॥ विष्णुवल्लभाप्रतापवंता॥ त्रिपुरांतकात्रिलोचना॥१५॥ विशाळभाळाकर्पूरगौरा
नीलग्रीवासुहास्यवक्त्रा॥ दक्षमखदलनाविश्वेश्वरा॥ गजांतकास्मरारी॥१६॥ हेभवभवांतकभवा॰
नीवरा॥ भोगीभूषणामहाभयहरा॥ हेमगर्भाभक्तजनप्रियकरा॥ अंधकसंहारावृषभध्वजा॥ तारकारि
जनकात्र्यंबका॥ गुणातीतात्रयतापहारका॥ हेपशुपतेदोषत्रयनिवारका॥ पंचमुकुटापुरातना॥१८॥ ऐ
सेंऐकतांपंचवदन॥ हृदयींआलिंगिलाफाल्गुन॥ विजयह्मणेमाझेंसंपूर्ण॥ अपराधक्षमाकरीकां॥१९
गिळिलेंहोतेंचापखड्गतूणीर॥ शिवेंदिधलेंकाढूनसमग्र॥ मगपाशुपतआणिब्रह्मास्त्र॥ किरीटीलागीं
दीधलें॥२०॥ स्नानकरूनअर्जुन॥ न्यासमंत्रविधिपूर्वकजाण॥ अत्यादरेंशिवपूजून॥ बिभत्सशस्त्रेंघेता
जाहला॥२१॥ मगह्मणेउमाकांत॥ निर्बळक्षीणयुद्धटाकोनिपळत॥ त्यावरीहींअस्त्रेंटाकितांयथार्थ॥ जा

ळितील त्रिभुवना॥ तरि पुढें युद्ध मांडेल दारूण॥ गुरु गुरुसुत कानीन॥ त्यावरीच प्रेरीं हें गहन॥ आणि का-
योग न होती॥ २३॥ अर्जुनें करितां अस्त्रग्रहण॥ कुंभिनी गज बजली भयें करून॥ सकळ रायां आंगीं भय शि-
रें दारूण॥ कंप सुटले दुष्टांसी॥ २४॥ धन्य धन्य मी कृतकृत्य॥ ऐसें मानोनि वीर पार्थ॥ पुढती पुढती नमित॥
विरूपाक्षासि आदरें॥ २५॥ यावरी अष्ट दिक्पाळ॥ विजय पाहावया आले सकळ॥ शचीवरसहित सर्व दळ॥
स्तविती तेव्हां पार्थातें॥ २६॥ यम दंडास्त्र देत॥ वरूण मंत्र दे विधियुक्त॥ प्रसरण आकुंचन सहित॥ वरुणें
पाश दीधले॥ २७॥ कुबेर प्रस्वापन अस्त्र देत॥ कृशान शक्ती वोपी अद्भुत॥ लोकप्राणेश समर्पित॥ वेग अ-
त्यंत स्यंदना॥ २८॥ बिडौजा ह्मणे पार्था॥ तूं अमरावतीये ईं तत्वता॥ मातुळी सारथी आणि रथा॥ न्यावया
लागीं पाठवितों॥ २९॥ पार्थास देऊन वरदान॥ दिक्पाळ पावले स्वस्थान॥ तों मातुळी घेऊन स्यंदन॥ गगन
पंथें येत से॥ ३०॥ भूतळीं उतरला सूर्यनारायण॥ कीं वैकुंठींहून उतरला सुपर्ण॥ तैसा तो रथोत्तम घेऊन॥ मा-
तुळी आला पार्थापाशीं॥ ३१॥ ह्मणे शक्रात्मजा शक्रें येवेळे॥ तुह्मां स्वपद पाहावया बोलाविलें॥ अर्जुनें स्नान
दान केलें॥ शुचिष्मंत जाहला॥ ३२॥ उदयाचळीं उगवे मित्र॥ तैसा रथीं शोभला कृष्णमित्र॥ वृत्रशत्रु पाहाव-
यास त्वर॥ सुभद्रावर चालिला॥ ३३॥ तंव सहस्रांचीं सहस्र विमानें॥ अंतरिक्ष देखिलीं कुंतीनंदनें॥ जें-
शीं जळसागरीं गहनें॥ जाहाजें सत्वर धांवती॥ ३४॥ कीं पृथ्वीवरी पुरें पट्टनें॥ दिसती श्रीयुक्त विराजमानें॥
स्वर्गवासी राजे नयनें॥ पार्थवीरें विलोकिले॥ ३५॥ मनुष्यास तारा दिसत॥ परि ते स्वर्गस्थ मूर्तिमंत॥ तों अमरावती
देखे पार्थ॥ ऐरावत द्वारीं उभा असे॥ ३६॥ कर्पुरा ऐसा शब्द श्वेत॥ कीं कनकाद्रीच मूर्तिमंत॥ तों सहजच्चा-
ळतां ऐरावत॥ उर्वी लपे भारें ज्याचे॥ ३७॥ हिऱ्या ऐसे चारी दंत॥ विशाळ जैसे पर्वत॥ तैशीं च उद्यानें विराजत॥
सरोवरें उचंबळती॥ ३८॥ जवळ देखिलें नंदनवन॥ लागलें कल्पद्रुमांचें बन॥ जें मनुष्यासि दुर्लभ पूर्ण॥ ते

तरू तेथें विराजति॥ ३९॥ कामधेनूचींखिल्लारें। चिंतामणीचींधवलारें। चंद्रसूर्यऐसेंतेजाकारें। पाषाणतेथें विराजति॥ ४०॥ ऐसेंतेंशक्रपदवरिष्ठ॥ निर्जरांचाजेथेंथाट॥ तेथेंअर्जुनपावलासुभट॥ शक्रआदरेंकरोनि यां॥ ४१॥ महापुण्याच्याराशीकोटी॥ शऌद्‌असतीज्याचेगांठीं॥ त्यानेंअमरावतीपडेदृष्टीं॥ तेपाहेकिरीटीप्री तीनें॥ ४२॥ जेथेंवेदांच्याप्रत्यक्षमूर्ती॥ शास्त्रेंपुराणेंप्रत्यक्षदिसती॥ सर्वदाशक्रास्तविती॥ थोरवीकितीवर्णा वीते॥ ४३॥ जवळीआलापार्थवीर॥ पुरोहितदेवपाठविलेसमोर॥ पार्थेंशक्रासनमस्कार॥ साष्टांगेंसीघात ला॥ ४४॥ पुढेंसप्रेमेंधांवोन॥ अमरेशेंदिधलेंआलिंगन॥ करूनमस्तकअवघ्राण॥ मांडीवरीबैसविला॥ ४५ हृदयींचीपरमआर्त॥ सुखकुर्वाळीअमरनाथ॥ विजयासपाहातांअद्भुत॥ तृप्तीनव्हेशक्रातें॥ ४६॥ आपलेनि जासनावरी॥ शक्रेंबैसविलाशेजारीं॥ अष्टनायकातेअवसरीं॥ नृत्यकरितीचपळत्वें॥ ४७॥ ज्यांचेआंगींचा सुवासपूर्ण॥ भोंवताधावेएकयोजन॥ त्यांचियापदनखावरून॥ भ्रमररुंजीघालिती॥ ४८॥ पद्मिणीनागिणी सुंदरी॥ वर्णितीबहुतलोकांतरीं॥ त्यादासीनिर्धारीं॥ साजतीयानायकांच्या॥ ४९॥ सकळविद्याअस्त्रेंशस्त्रें॥ जेअनुच्छिष्टमंत्रयथाविधियंत्रें॥ चौसष्टीकळापार्थवीरें॥ चतुर्दशविद्याअभ्यासिल्या॥ चित्रसेनगंधर्वाप सून॥ गायननृत्यकळासंपूर्ण॥ तांडवअनालस्येंकरून॥ यथासांगअभ्यासी॥ ५१॥ रागउपरागभार्यासहित॥ मूर्छनासारीकल्पित॥ पुढेंरागमूर्तिमंत॥ आळवितांउभेठाकती॥ ५२॥ कोणेएकेंदिवशींनृत्यानिघालीउर्वशी॥ अर्जुनेंविलोकितांतिसी॥ परमसंतोषपावला॥ ५३॥ उर्वशीचेनयन॥ वेधलेपार्थमुखपाहोन॥ दुसरेदिवशींस हस्त्रनयन॥ चित्ररथाप्रतिसांगे॥ ५४॥ अर्जुनाचियेसेवेसि॥ वेगेंपाठवीउर्वशी॥ गंधर्वेंबोधोनितियेसी॥ नि शीमाजीधाडिली॥ शृंगारसरोवरमराळिका॥ जेसकळप्रमदांचीनायका॥ नयनकटाक्षेंदेखा॥ मूर्छीततनाप सांपाडिती॥ ५५॥ द्विजराजमुखीपरमसगुण॥ मृगराजकटीविराजमान॥ करिराजगमनींगमन॥ पार्थापासींपा

तली॥५७॥धनंजयनिजलानिजशयनीं॥तोंजाणविलेंसेवकेंयेउनी॥उर्वशीआलीहंसगमनी॥दर्शनालागीं
तुमचे॥५८॥तोंउर्वशीसदेखोन॥पार्थेंदिधलेंअभ्युत्थान॥ह्मणेमातेआपलेंआगमन॥कायनिमित्यजाहालें॥
॥५९॥उर्वशीसांगेवर्तमान॥शक्रेंपाठविलेंमजलागुन॥तूंबोलसीमातेह्मणोन॥तेणेंक्षीणजाहाल्येंमीं॥६०
अर्जुनह्मणेशारद्वती॥मातामाद्रीकिंवाकुंती॥कींरमाशचीआह्मांप्रति॥त्याचपंक्तीमायेतूं॥६१॥धरतोंमीतुझे
चरण॥स्वस्थळाजाईपरतोन॥उर्वशीबोलेशापवचन॥नपुंसकत्वपावसीतूं॥६२॥स्त्रीनापुरुषनिर्धार॥होशी
लएकसंवत्सर॥स्त्रियांमध्येंवासनिरंतर॥तुजघडेलमजशापें॥६३॥उर्वशीगेलीपरतोन॥पार्थसांगेशक्रास
येऊन॥व्यर्थगेलीशापून॥मगशचीरमणबोलत॥६४॥हाहितरूपशापनिर्धार॥तुजकार्यायेईलएकसंव-
त्सर॥आज्ञातवासकरितांसाचार॥विराटगृहींजाणपां॥६५॥ऐकोनपार्थसंतोषला॥तोंलोमेशऋषीतेथेंआला॥
शक्रेंसन्मानूनिबैसविला॥कायबोलिलामुनीतो॥६६॥तुझेआसनींबैसलापार्थ॥कायपुण्यआचरलाबहुत॥
शक्रह्मणेहामाझासुत॥मजसमानतेजस्वी॥६७॥विष्णुआणिहाजिष्णूजाण॥बद्रिकाश्रमींतपकरून॥अवतर
लेनरनारायण॥भूभारउतरावया॥६८॥इंद्रह्मणेलोमेशऋषी॥तुवांजावेंद्वैतवनासि॥इतकेंसांगधर्मासी॥मज
पाशींपार्थआहे॥६९॥संपूर्णविद्याशिकवून॥पाठवितोंनवभेटीलागुन॥लोमेशद्वैतवनलक्षून॥जाताझाला
भूतळा॥७०॥इकडेव्यासशिष्यसंजयजाण॥धृतराष्ट्रासंसांगेवर्तमान॥सकळविद्याप्रवीण॥पार्थजाहला-
शक्रापासीं॥७१॥प्रसन्नजाहालाउमारमण॥शस्त्रास्त्रेंदिधलींसंपूर्ण॥सकळदेवानींवरदान॥बहुआनंदें
दीधलें॥७२॥तुझेपुत्राचेंकर्मस्मरण॥रात्रंदिवसकरितोअर्जुन॥केव्हांमांडेलघोररण॥घेईनप्राणशत्रूंचा
॥७३॥वस्त्राहरणआठऊन॥गदाघेऊनभीमसेन॥धांवावयाउदितपूर्ण॥परीधर्मराजआवरीतया॥७४॥
सावरणचक्रांतयेऊन॥एकलासंहारीपंचानन॥किंवाएकलाविष्णुवाहन॥असंख्यसंहारीविखार॥७५॥

नेसाए कस्रूटनांवृकोदरा॥ करील असंख्यवीरांचासंहार॥ तुझे पुत्रावियेयीफार॥ धुसधुसीनअंतरी॥ ७७॥ हा
अल्पकाळगेलेयासत्य॥ मगभीमदुजयाचीवादनपाहात॥ ऐसेंएकतांकृतांतवत॥ धृतराष्ट्रउद्विग्नजाहाला॥
असोइकडेद्वैतारण्यांत॥ धर्मभीममाद्रीसुत॥ रात्रदिवसचिंताकरित॥ वाटपाहातपार्थाची॥ ७८॥ पांचसंवत्स
रजाहालेसंपूर्ण॥ कांअजूननयेचअर्जुन॥ माझेंजिवलगासिआलिंगन॥ केव्हांदेईनमीआतां॥ ७९॥ भीमह्म
णेपार्थाविण॥ आह्मींदिसतोंअवघेदीन॥ जैसेंदीपेंवीणसदन॥ नासिकावीणवदनजेसें॥ ८०॥ प्राणेंवीणश
रीर॥ कींजीवनावीणसरोवर॥ तेंवपार्थावीणआह्मींसमग्र॥ दीनबळहीनदिसतों॥ ८१॥ धर्मभीमाचेनयन॥
अश्रूयेतीक्षणक्षण॥ आठऊनिपार्थाचेगुण॥ चिंताग्रस्तद्रौपदी॥ ८२॥ भीमह्मणेधर्मालागुन॥ तुझेंटाकितांनी
येनेमवचन॥ नातरीगजपुराजाऊन॥ कौरवमारीनसर्वही॥ ८३॥ कपटद्यूतपणेंकरून॥ केवढेंपाडिलेंदुर्धरव्यस
न॥ त्रयोदशवर्षेंसंपूर्ण॥ कधींहोतीलनेणवे॥ ८४॥ दुःशासनाचेंहृदयफोडुन॥ केव्हांकरीनरक्तपान॥ त्या
चासव्यहस्तउपडुन॥ दावीनकेव्हांद्रौपदीसि॥ ८५॥ दुर्योधनअंकावरीबैस॥ सभेंतबोलिलाद्रौपदीस॥
त्याचाअंककधींनिःशेष॥ चूर्णकरीनगदाघायें॥ ८६॥ धिक्गांडीवसायकासन॥ धिकूहेगदाकायरक्षून॥
अरण्यांतीलशक्रहीन॥ शत्रूंनींनांवठेविलेंआह्मा॥ ८७॥ असोचिंताग्रस्तमानशीं॥ धर्मभीमअहर्निशी॥
तोंबृहदश्वमहाऋषी॥ धर्मापासीपातला॥ ८८॥ करूनतयाचेंपूजन॥ धर्मसांगेआपुलेंवर्तमान॥ आह्मीं
वनवासेंपीडिलोंपूर्ण॥ दुःखदारूणआमुचें॥ ८९॥ आह्मासारिखेकष्टी॥ ऋषीकोणअसतीसृष्टी॥ पूर्वींहीं
अशीगोष्टी॥ कवणासजाहालीनसेल॥ ९०॥ मगबृहदश्वह्मणेधर्मासि॥ तुमचेकष्टाचीलेखाकायसी॥ नै
षधराजाचेकष्टासी॥ गणीतनाहींधर्मराया॥ ९१॥ तेणेंहीद्यूतखेळोन॥ हारविलेंराज्यसंपूर्ण॥ एकलेपणें
घोरविपिन॥ बहूक्लेशपावला॥ ९२॥ तूंनवबंधूसमवेत॥ फरवेअसशीवनांत॥ मुनिजनसदांवेष्टित॥ अन्न

सत्रतुजपाशीं॥९३॥ धर्मह्मणेजीआतां॥सांगेनळरायाचीसर्वकथा॥ बृहद्श्वाह्मणेसमस्तां॥कथाऐकार्मीवीनें ॥९४॥द्रौपदीआणिपांडव॥सावधऐकतीऋषीसर्व॥वैशंपायनह्मणेहेनरदेव॥ कथाअपूर्वऐकतूं॥९५॥ब्रह्मानं दह्मणेश्रीधर॥कथास्फुरसरसाळफार॥श्रवणकरोतपंडितचतुर॥सप्रेमचित्तेंकरोनियां॥९६॥सुरसपांडवप्रता- पग्रंथ॥वनपर्वव्यासभारत॥त्यांतीलसारांशयथार्थ॥चोविसाव्यांतकथियेला॥९७॥ ॥इतिश्रीपांडवप्र- तापेचतुर्विंशोध्यायः॥ ॥श्रीकृष्णार्पणमस्तु॥ ॥छ॥ ॥छ॥ ॥छ॥ ॥

श्रीगणेशायनमः॥ ॥बृहदश्वाह्मणेधर्मराजा॥सोमवंशविजयध्वजा॥पुण्यश्लोकभूभुजा॥माजीनळप्रथमचि
॥१॥नैषधदेशपरमपावन॥तेथीलनगराधिपवीरसेन॥चतुःषष्टीकळाप्रवीण॥नळनामापुत्रत्याचा॥२॥चतुर्द
शविद्यापारांगत॥बोलकाजैसाअंगिरासुत॥स्वरूपासतुळितांयथार्थ॥शंबररिपुसरीनपावे॥३॥धनुर्वेदींपरम
निपुण॥जाणेअश्वपरीक्षालक्षण॥सर्वरायांतमुकुटरत्न॥शचीरमणपृथ्वीवरी॥४॥नवग्रहांतवासरमणीदे
खा॥कींद्विजांतश्रेष्ठविनायक॥कींदंदशूकांतअधिक॥सहस्त्रशीर्षप्रतापीपैं॥५॥धनुर्धरांमाजीश्रेष्ठ॥भुजावर
कींभृगुकुळवरिष्ठ॥समरंगणींपरमधीट॥जैसाध्रुवहानचिहाले॥६॥विदर्भदेशींचाराजेंद्र॥भीमकनामापरम
चतुर॥उदरींनाहींत्यासपुत्र॥जालेंविचित्रपूर्वदत्तें॥७॥घराआलाऋषिदमन॥रायेंपूजिलाआदरेंकरून॥तेणें
दिल्हेंवरदान॥पुत्रतीनतुजहोती॥८॥एककन्याचारुगात्री॥जैसीइंदिराइंदीवरनेत्री॥मित्रतुल्यपुत्रउदरीं॥
सर्वेंचिजालेतयातें॥९॥दमदमांतदमन॥दमयंतीकन्यादिव्यरत्न॥लावण्यभूमीचेंनिधान॥आकर्णनयनवि-
राजती॥१०॥जालीस्वरूपाचीसीमा॥तेमृडानीचीअपरप्रतिमा॥तिचेंस्वरूपकमळजन्मा॥दुसरेंनिर्मूनशकेचि
११॥तेशतक्रतूचीप्रिया॥कींअवतरलीअब्जतनया॥बहुतवर्णितीवरारोह्या॥इचीप्रतिमानसेचि॥१२॥देवगं-
धर्वकन्यानागिणी॥इच्यादासीजाल्यापद्मिणी॥अत्रिस्नुषालावण्यखाणी॥स्वरूपपाहोनिलज्जित॥१३॥चक्षु
श्रव्याचीकुमारी॥वृत्रारिशत्रूंचीअंतुरी॥त्रिदशनेत्राचीनारी॥नंपवेसरीइच्येची॥१४॥तारकारिजनकशत्रुप्रिया
स्वरूपेंवर्णिल्याबहुतस्त्रिया॥गुणेंस्वरूपेंदमयंतिया॥लघुलसर्वाआणिलें॥१५॥भाळींआरक्तअक्षयरत्नमणी
द्विजजैसेहिऱ्यांचीखाणी॥बोलतांप्रकाशपडेधरणी॥तटस्थनयनपाहतां॥१६॥शशिकळातेजस्वीषोडश॥निरू
नद्विजकेलेबत्तिस॥कलंकभरिलासंधीस॥अतिराजसदिसती॥१७॥सव्यहस्ताआंगोळिका॥सुधारसस्त्रवती
देखा॥स्पर्शतांकुणपाचियामुखा॥प्राणपरतेसवेंचि॥१८॥मृगमीनकल्हारखंजन॥वोवाळावेनयनावरून॥

विराजेत्यानेत्रींचेंअंजन॥मीनकेतनदेखोनिनाचे॥१९॥एककोशपर्यंत॥आगींचासुवासधांवत॥पदमुद्राउम
टत॥चालतांआरक्तभूमीवरी॥२०॥द्विजेंद्रलज्जितदेखतांवदन॥मृगेंद्रलज्जितकटीपाहुन॥करींद्रगमनांतें
देखोन॥लज्जायमानसहजचि॥२१॥विचित्रशक्रसायकासन॥त्यासीसिंदूररेखाआणीन्यून॥मनसिजआ
पलाप्राण॥वोवाळीलदेखतां॥२२॥कुरळकुंतळींजिंकिलेंमिलिंदचक्र॥कामांकुशींमदलेपजपार॥अंगिरातनु
जकवेंद्र॥कर्णभूषणींराहिले॥२३॥ऐसीतिचीअंगप्रभा॥आणिलीलेणियादिव्यशोभा॥चामीकरतत्वगाभा
तैसीकांतीतियेची॥२४॥भोंवत्यासख्यारंजिविती॥शृंगाररसएकगाती॥सकळनृपांतविशेषवर्णिती॥सौं
दर्यकीर्तीनळाची॥२५॥ऐकतांनळाचेंवर्णन॥भैमीचेंगुंतलेंतेथेंमन॥इकडेनैषधसदनीं अनुदिन॥सख्या
वर्णितीदमयंती॥२६॥ऐकतांवैदर्भीचाशृंगार॥विरहेंव्यापिलावीरसेनकुमर॥एकेदिवसींतोनृपवर॥मृगये
सीचालिला॥२७॥तोंदेखिल्याहंसपंक्ती॥शुद्धश्वेततयांचीअंगकांती॥कींनिर्दोषयशनिश्चिती॥हंससर्वलेइले
॥२८॥शातकुंभप्रभेसमान॥पक्षझळकतीविराजमान॥चरणआणिनयन॥प्रवाळमण्यासारखे॥२९॥नळक
रपंकजींमुक्तमाळ॥कविगुरुऐसीमुक्तेंतेजाळ॥देखोनिएकहंसतत्काळ॥नळाचेकरींआरूढला॥३०॥मनुष्य
वाणीहंसबोलत॥नैषधानकरींमाझाघात॥दमयंतीतुजहोयप्राप्त॥ऐसाप्रयत्नकरीनमी॥३१॥नळेंऐशीएक
तांवाणी॥ह्मणेतूंआवडसीप्राणाहुनी॥तरितूंआतांविलंबटाकुनी॥वैदर्भदेशाप्रतिजायीं॥३२॥अवश्यह्मणो
नित्वरित॥उडालासकळहंसांसहित॥नगरांतराहिलेसमस्त॥मुख्यतोजातभैमीगृहा॥३३॥दिव्यमराळदे
खोनियां॥सख्याधांवतीधरावया॥मगदमयंतीनेंजाऊनियां॥प्रार्थूनिजवळीआणिला॥३४॥कोमळहस्तेंकुर-
वाळित॥पंडिताऐसाहंसबोलत॥ह्मणेमृगशावाक्षीऐकमात॥मीआहेंहिंडतत्रिभुवनीं॥३५॥बहुतदेखिलेभू
भुज॥परिनळाऐसानाहींतेजःपुंज॥ज्याचेंविलोकितांवदनांबुज॥मीनध्वजखालेंपाहे॥३६॥क्षीराब्धींतकलं

कधुवोन॥ बाहेरनिघालारोहिणीरमण॥ तैसेंनैषधाचेंवदन॥ पाहतांमनउल्हासे॥ ३७॥ कोंदणावरीबैसेहिरा॥
तैसीतूंहोयत्याचीदारा॥ जैसाश्रीरंगआणिइंदिरा॥ तैसीशोभादिसेल॥ ३८॥ मगतेवैदर्भदेशबाळी॥ शृंगारस
रोवरमराळी॥ ह्मणेहंसोत्तमायेकाळीं॥ मनोजवेंजाईंकां॥ ३९॥ नैषधराजवरहोयपूर्ण॥ ऐसेंकरींत्वरेंजाउन॥ की
र्तीऐकोनतृप्तजालेकर्ण॥ परिउदितनयनपाहावया॥ ४०॥ गगनमार्गेहंससत्वरा॥ आलातत्काळनैषधमंदिरा
नळेंत्हृदयींधरूनमित्रा॥ समाचारविचारित॥ ४१॥ हंसह्मणेजळेंविण॥ तळमळीतजैसामीन॥ तैसीविरहज्वरें
करून॥ वैदर्भकन्याजाहली॥ ४२॥ रतिवरशत्रुभूषणकुमारी॥ सखियादेतीनअंगिकारी॥ लोकप्राणेशवनजा
तसुंदरी॥ त्यागिलीदूरीविरहज्वरें॥ ४३॥ त्रयोदशकरूनचतुर्गुण॥ भोगींवेष्टितजोतरुजाण॥ तुझ्याविरहेंकरू
न॥ पंकत्याचानशिवेचि॥ ४४॥ आसनशयनभोजन॥ विषतुल्यमानीतुजविण॥ सुमनहारपवनाशन॥ तैसे
भासतीतियेतें॥ ४५॥ जलजवदनआरक्तओठ॥ जलजवत्शोभेकंठ॥ जलजमाळाअवीट॥ तोडूनिटांकीतनववि
रहें॥ ४६॥ जलाविरहितदिव्यान्न॥ तैसीतेजालीतुजविण॥ अनळवत्भोगपूर्ण॥ नळाविणमानीते॥ ४७॥ इकु
डेभैमीच्यासख्याजाण॥ भीमकाससांगतीवर्त्तमान॥ तुझेकन्येसीध्यान॥ नैषधाचेंलागलें॥ ४८॥ रायेंआरं
भिलेंस्वयंवर॥ भूभुजांसपत्रेंलिहिलींसत्वर॥ छप्पन्नदेशींचेनृपवर॥ येतेजालेतेधवां॥ ४९॥ आपलालेप्रतनेस
हित॥ नृपआलेअसंख्यात॥ द्वादशगांवपर्यंत॥ नगराभोंवतेउतरले॥ ५०॥ यथाकुळयथाशीळ॥ रायेंनृपयोजि
लेसकळ॥ तोंनारदमुनीतत्काळ॥ सहस्राक्षाजाणविती॥ ५१॥ महिरत्नामाजिनिर्दोष॥ वैदर्भराजअतिविशेष
त्याचीकन्याबहुरूपेश॥ तेप्रत्यक्षइंदिरादुजी॥ ५२॥ नळनृपतीपरमसुंदर॥ मानसींइच्छीतोभ्रतार॥ भीमकेंमा-
डिलेंस्वयंवर॥ भूभुजअपारमिळाले॥ ५३॥ तिच्यास्वरूपाचीदुजीप्रती॥ नाहींनाहींत्रिजगती॥ ऐसीसाक्षदेतसर
स्वती॥ विश्वतोमुखेंशविवरा॥ ५४॥ भाळींरत्नमणीतिलकविशेष॥ सव्यकराग्रींवसेसुधारस॥ ऐकतांशक्राचें-

मानस॥पाहोंइच्छिततियेतें॥५५॥पुरंदरयमकृशानवरुण॥वैदर्भनगराआलेचौघेजण॥तोंत्याचमार्गेंक
रून॥नैषधराजायेतसे॥५६॥किरणचक्रींविराजेमित्र॥तैसाचमूसहेंशोभेराजेंद्र॥पंचवदनारीहूनिसुंदर
देखोनिशक्रादिपुसती॥५७॥ह्मणतीपुण्यश्लोकातूंकोण॥तोह्मणेमीनळवीरसेननंदन॥ममस्वरूपींवेध
लेंभैमीचेंमन॥ह्मणोनिजातोंस्वयंवरा॥५८॥शक्रह्मणेतूंपुण्यशीळ॥ऐसेंलोकवर्णितीसकळ॥तरिआमुचें
दूतत्वनिर्मळ॥निःकपटतुवांकरावें॥५९॥इंद्रअग्नियमवरुण॥आह्मीदिक्पाळचौघेजण॥तरितेदमयंतीबो
धुन॥वश्यकरींआह्मांतें॥६०॥चौघांतएकासघालीमाळ॥ऐसेंकरींतूंपुण्यशीळ॥आपुलास्वार्थसांडोनिसक
ळ॥कार्यसाधींएवढें॥६१॥नळह्मणेअंतःपुरांत॥मींकैसाजाऊंतेथ॥मगवरदेतअमरनाथ॥नदिसेंसत्य
कोणातूं॥६२॥एकभैमीवेगळीकरून॥होईलसमस्तांदृष्टिबंधन॥मगएकलाचनळतेथुन॥आलावैदर्भमं
दिरा॥६३॥तोअनंतशक्तिसमवेत्त॥त्रिपुरसुंदरीविराजित॥स्वरूपींवोतिलेकोटिमन्मथ॥तैसीशोभतदम
यंती॥६४॥शरत्काळींचाचंद्रदेख॥पहातांपहातांवाटेसुख॥तैसेंतिचेंदेखतांश्रीमुख॥अतिआल्हादन
ळातें॥६५॥मृगमुखांकदेखोन॥चकोरजालेनैषधनयन॥त्यासवैदर्भीपाहून॥कामानळेंअहाळली॥६६
ह्मणेलावण्यगुणनिधाना॥ममहृदयानंदवर्धना॥वेधलाविलासमनयना॥बोलवचनाकोणतूं॥६७॥भैमी
च्यासख्यासकळा॥तन्मयजाल्यापाहतांनळा॥ह्मणतीधन्यमाउलीवेल्हाळा॥ऐसापुत्रप्रसवली॥६८॥कि
तीतपेंआचरलीसाचार॥कींअर्चिलेरमावरउमावर॥कींदिव्यरत्नींवसुधामर॥संतोषविलेपूजोनियां॥
६९॥कींयथोक्तव्रतेंकेलींविचित्र॥तरीपावलीऐसादिव्यपुत्र॥याचेपादींजेबैसेलपवित्र॥तेहीधन्यात्रिभुव-
नीं॥७०॥यावरीगुणाढ्यतोविशेष॥भैमीप्रतीबोलेसुरस॥वरुणकृशानयमदेवेश॥त्यांचादूतमीअसें॥७१
मीनळनामावीरसेनसुत॥परिलोकपाळांचेंकेलेंदूतत्व॥ऐकोनतुझेंसौंदर्यत्व॥वरूंइच्छितीशुभांगे॥७२॥

त्याच्यावरें करूनसत्य ॥ कोणीनदेखतां आलों गुप्त ॥ तरीत्याचेंथोंतांतत्वरित ॥ एकासवरींगुणसरिते ॥ ७३ ॥ या
वरीवैदर्भीबोलेवचन ॥ जेणेंनिवतीनैषधकर्ण ॥ तनुमनधनेंसीशरण ॥ तुजनिघाल्येंनृपश्रेष्ठा ॥ ७४ ॥ चापाहून
सुटेबाण ॥ तोकेविपरतेमागुतेन ॥ तैसेंतुजसमर्पिलेंमन ॥ जैसेंलवणसागरीं ॥ ७५ ॥ नळावांचोनिपुरुषमात्र ॥
पिताबंधुकिंवापुत्र ॥ आणीकइच्छीनदुजावर ॥ तरीरसनाझडेलहे ॥ ७६ ॥ परमहंससज्ञान ॥ तेणेंसांगीतलेंव
र्तमान ॥ हेंस्वयंवरआरंभिलें पूर्ण ॥ तुजलागुनवरावया ॥ ७७ ॥ नैषधासुंदराचारुगात्रा ॥ लावण्यकोशाआक
र्णनेत्रा ॥ चामीकरवर्णासुहास्यवक्त्रा ॥ माझ्याअंतराशोधिसीकाय ७८ ॥ तूंनवरिसीमजलागुन ॥ तरिआतां
चित्यागीनप्राण ॥ स्वर्गीच्यादेवासिकारण ॥ माझेंनाहींनृपवरा ॥ ७९ ॥ मीनासपाहिजेजळउत्तम ॥ घृतसिंधूवां
चूनकायकाम ॥ दधिमधुसरोवरेंपरम ॥ मिळतांत्यासअमान्यतीं ॥ ८० ॥ वैदर्भीबोलेकरजोडुन ॥ मीत्यालोक
पाळांसकरीननमन ॥ परिकायावाचामनेंजाण ॥ जायातुझीझाल्येंमी ॥ ८१ ॥ आतांविनंतीहेचिनिश्चित ॥ आ
पणबैसावेंलोकपाळांत ॥ त्यांदेखतांत्वरित ॥ तुजवरीननृपवर्या ॥ ८२ ॥ ऐसेंऐकतांवेगेंसीं ॥ नळआलादेवां
पासीं ॥ होऊननिःकपटमानसीं ॥ जालेंतेंचकथियेलें ॥ ८३ ॥ म्यातुमचेंकेलेंवर्णन ॥ भैमीह्मणेतुजचिवरीन ॥ लो
कपाळांसबैसऊन ॥ स्वयंवरसभेतत्वता ॥ ८४ ॥ तुमचेवंदोनियांचरण ॥ ह्मणाल्येमजमाळघालिन ॥ निःक
पटनैषधपूर्ण ॥ इंद्रादिकांससमजलें ॥ ८५ ॥ इकडेपृथ्वीचेभूभुज ॥ सभेसिबैसलेतेजःपुंज ॥ बहुतबैसलेतप
स्वीद्विज ॥ शापानुग्रहींसमर्थजे ॥ ८६ ॥ अनर्घ्यरत्नपहावयाजवळी ॥ मिळेजैसीपरीक्षकमंडळी ॥ कींसिद्धाचे
भोंवतीपाळी ॥ साधकांचीविराजे ॥ ८७ ॥ तोंनैषधासमवेततत्काळ ॥ सभेसबैसतीलोकपाळ ॥ परिचोघेही
जालेनळ ॥ पूर्वरूपपालटुनी ॥ ८८ ॥ उगवलेपंचादित्य ॥ एकरूपतेजाद्भुत ॥ तोंलावण्यहारिणीअकस्मात ॥ मा
ळघेऊनपातली ॥ ८९ ॥ लावण्यामृताचीपुतळी ॥ कींसौदामिनीदिव्यप्रकटली ॥ मृगशावाक्षीसभान्यहाळी ॥

तोंपंचनळदेखिले ॥९०॥ परमदचकलीमनांत ॥ ह्मणेपंचनैषधबैसलेयेथ ॥ मुख्ययांतवीरसेनसुत ॥ कैंसाक
ळेलपैंआतां ॥९१॥ कमळधराकमळासना ॥ मीअनन्यशरणतुमच्याचरणा ॥ मुख्यवीरसेननंदना ॥ मजदा
खवायेवेळे ॥९२॥ यमवरुणअग्निसहस्त्रनयना ॥ मीतुमचीअसेंकन्या ॥ मजनैषधाहातींदेऊनिह्मणा ॥ जामा
तनळआपुला ॥९३॥ नळचरणींअसेलमाझेंमन ॥ तरीओळखीनदेवचिन्ह ॥ पाहेचौघांकडेविलोकुन ॥ तंवने
त्रपातींनहालती ॥९४॥ अंतरिक्षींआसनेंअसती ॥ छायानाहींपडळीजगतीं ॥ भूमीवरीबैसलानैषधपती ॥
लक्षीदमयंतीनिश्चयें ॥९५॥ तेसौंदर्यकासारमराळी ॥ सौभाग्यगंगावैदर्भबाळी ॥ गजगमनानळन्यह्मा
ळी ॥ माळाघालीवेगेंसीं ॥९६॥ एकसरेंवाजतीवाद्येंनाना ॥ भेरीठोकिल्याचंद्रानना ॥ प्रतिशब्दनमायेगगना
सोहाळाकोणानवर्णवे ॥९७॥ राजेतळमळतीमनांत ॥ गेलीहातींचीअनर्घ्यवस्त ॥ वोहरेंउठोनित्वरित ॥ न
मनकरितीलोकपाळां ॥९८॥ लोकपाळसंतोषलेसत्वर ॥ नळासीदिधलेअष्टवर ॥ गुप्तव्हावेंप्रगटव्हावेंगति
अपार ॥ स्मरतांअग्निप्रकटावा ॥९९॥ सत्वधैर्यपराक्रमपूर्ण ॥ रितेकुंभींप्रगटावेंजीवन ॥ हेअष्टवरदेउन ॥
अंतर्धानपावले ॥१००॥ वर्णितीनळाचेंभाग्यअपार ॥ स्वस्थानापावलेनृपवर ॥ मगयथासांगसविस्तर
चारदिवसजाहले ॥१॥ आंदणदिलेंअपार ॥ रथगजतुरंगयानेंसुंदर ॥ दासदासीअळंकार ॥ वस्त्रभारांन
गणती ॥२॥ दमयंतीघेऊनसांगातें ॥ नळगेलास्वनगरातें ॥ राज्यकेलेंभूभुजनाथें ॥ भैमीकांतेंतैसेंचि ॥३
दमयंतीसक्रीडतांकाळ ॥ संवत्सरमानीजैसेंपळ ॥ जालाइंद्रसेनकुमर ॥ वेल्हाळकंन्याजालीइंद्रसेना ॥४॥
इकडेलोकपाळजातीस्वर्गघाटें ॥ द्वापारकळीभेटलेत्याचवाटे ॥ वेदह्मणतीबहुनेटें ॥ जाताकोठेंसांगाहो ५
कळीह्मणेअवधारा ॥ जातोंदमयंतीच्यास्वयंवरा ॥ देवह्मणतीवीरसेनकुमरा ॥ वरिलेंतियेनेंप्रीतीनें ॥६॥ ए
कतांकळीकोपलासबळ ॥ सांडूनसुधापानलोकपाळ ॥ मृत्युलोकींचामानवनळ ॥ त्यासमाळघातली ॥७॥ त्या

नळासदंडकरून॥हिंडवींनमीरानोरान॥एकवस्त्रदोघांलावीन॥नेमेंआणीनअवदसा॥८॥कळीह्मणेद्वापारा
स॥तूंहोईकपटपात्रा॥खेळतांजिंकोनिनळास॥राज्यभ्रष्टकरावें॥९॥मगद्वापारआणिकळी॥गुप्तराहतीन
ळाजवळी॥न्यूनपाहतीकदाकाळीं॥द्वादशवर्षेंपर्यंत॥१०॥राजानैषधपुण्यशील॥प्रजाप्रतिपाळकदयाळ॥
महायज्ञकरूनसकळ॥देवद्विजतृप्तकरी॥११॥निर्दोषयशअक्षयकीर्ती॥पूर्णकरीयाचकांचीतृप्ती॥निर्दयाच
रणनिश्चिती॥सहसानावडेनळातें॥१२॥भगवद्भजनींपरमादर॥सत्यसदयअतिउदार॥दंडाविषयींखळ
सूर्यकुमर॥वैश्वानरपवित्रतैसा॥१३॥कळीजपतांबहुतकाळ॥लघुशंकाकरूनआलानळ॥पादशौचनक
रितांउठावेळ॥संध्यावंदनाबैसला॥१४॥इतकेंउणेंदेखतांजाण॥कळीनेंमांडिलेंविंदाण॥दायादएकआला
दुरोन॥पुष्करनामतयाचें॥१५॥तयासीकळीह्मणत॥नळासींतूंखेळद्यूत॥द्वापारकपटअक्षसत्य॥वृषभ
तेथेंहोईनमीं॥१६॥पुष्करह्मणेवित्तनाहींमज॥केवींनळासीखेळूंपैज॥कळीह्मणेतूंहोयसतेज॥पाठीतुझी
राखितोंमी॥१७॥पन्नासवृषभउभेकरीतत्वता॥सर्वराज्ययेईलतुझ्याहाता॥नैषधासदवडोनिदिगंता॥द
रिद्र्व्यथापाववूं॥१८॥कक्षेसअक्षघेऊनसत्वर॥नळरायासभेटलापुष्कर॥ह्मणेमाझेहेपन्नासढोर॥उभे-
करितोंखेळतूं॥१९॥मजहारयेतांवृषभघेईं॥तुजम्याजिंकिल्याराज्यदेईं॥मगराज्यपदार्थसर्वही॥हिरो
निनेलेंपुष्करें॥२०॥वाजीवारणपदातीरथ॥कोशदेशगडदुर्गअमित॥पुष्करेंजिंकिलेंसमस्त॥चिंताग्रस्त-
लोकजाले॥२१॥समस्तप्रजामिळोन॥नळासविनवितीकरजोडुन॥कपटद्यूतहेंमाजवून॥सर्वथाहीखेळोंन
को॥२२॥कळीनेंव्यापिलेंनळाचेंमन॥प्रजांसनेदीप्रतिवचन॥दमयंतीसमीपयेऊन॥नृपालागींविनवित॥
२३॥ह्मणेसकळनृपचक्रचूडामणी॥अमात्यविनवितीकरजोडुनी॥पौरवलोकव्याकुळमनीं॥नपाहसीकांनृ
पोत्तमा॥२४॥सर्वथानबोलेनृपनाथ॥पणामागेंपणहरत॥मगवार्ष्णेयसारथीसत्य॥बोलावीतदमयंती॥

॥२५॥ ह्मणेवेगेंसिद्दकरींस्यंदन॥ इंद्रसेनाआणिइंद्रसेन॥ दोन्हीबाळकेंनेउन॥ भीमकापासींघालावीं॥२६॥ नैष
धेंहरविलेंसर्व॥ आह्मासजगतीनेदींठाव॥ बुडालेंराज्यवैभव॥ घोरकर्मवोडवलें॥२७॥ तैंवार्ष्णेयेंएकोन॥ दोनी
बाळेंरथींबैसउन॥ विदर्भनृपापासींनेउन॥ घालविलींअतित्वरें॥२८॥ वर्तमानऐकोनिसर्व॥ शोकाकुलितभी
मकराव॥ ह्मणेविनाशकाळबुद्दीचेंवैभव॥ विपरीतजालेंनळाचें॥२९॥ यावरीवार्ष्णेयसारथी॥ ऋतुपर्णअयो-
ध्याधिपती॥ सेवाअंगिकारुनीनिश्चिती॥ राहिलातोस्रुततेथें॥३०॥ इकडेपुष्करेंसर्वहिरोन॥ आतांनैषधाबोलें-
वचन॥ घालीदमयंतीचापण॥ नळऐकोनिउगाचि॥३१॥ मगदोघांचींभूषणेंवस्त्रें॥ हिरोनिघेतलींपुष्करें॥ ह्म
णेराज्यांतूनत्वरें॥ उठाजातुह्मीआतांचि॥३२॥ पुष्करेंधांडोरापिटोन॥ आज्ञापिलेंनगरजन॥ जोनळासीक
रीलभाषण॥ त्यासदंडीनक्षणार्धें॥३३॥ नगराबाहेरतीनादिन॥ राहतीनिराहारेंदीनवदन॥ द्वारींउभेराहून
देतीजन॥ बोलूंवचननशकती॥३४॥ एकएकवसनवेष्टित॥ अंगउघडेंकेशमुक्त॥ प्राणक्षुधेनेंव्याकुळित॥
वनांतरींप्रवेशती॥३५॥ तोंदेखिलेशकुंत॥ नैषधत्यांसधरूंधांवत॥ तंवतेदूरदूरपळत॥ नैषधटाकितवस्त्र
वरी॥३६॥ अर्धटाकिलेंवसन॥ पक्षीअवघेउडालेघेउन॥ नैषधतेव्हांजालादीन॥ पक्षीवचनबोलती॥३७॥
आह्मीपुष्करांचेअक्षजाण॥ घेऊनजातोंतुझेंवसन॥ एवंनळासनारायण॥ पाठिमोराजाहला॥३८॥ असो-
नैषधराजनग्न॥ क्षुधातुरअत्यंतदीन॥ तोंकव्हीहोऊनिर्मीन॥ जळाबाहेरपडियेला॥३९॥ मच्छमारूनिल
रित॥ तोवैदर्भीपासींदेत॥ ह्मणेमच्छपचवूनिसत्य॥ पाककरींवरानने॥४०॥ क्षुधेनेंजातातिप्राण॥ दमयं
तीनेंभाजिलामीन॥ उदकींधुवावाह्मणउन॥ जळासमीपघेऊनआली॥४१॥ दुर्गंधीधूतवैदर्भबाळी॥ तोंमुखीं
लागतांअंगोळी॥ अमृतस्त्रवतांतत्काळीं॥ मीनसजीवजाहला॥४२॥ नलगतांएकक्षण॥ अगाधजीवनींपळा
लामीन॥ देखोनवीरसेननंदन॥ परमक्षोभपावला॥४३॥ ह्मणेक्षुधेनेंजातीमाझेप्राण॥ नष्टेंकेंसाहरविलामी॥

न॥ मगह्मणेहाविंध्याद्रीवोलांडुन॥ जाईंआपल्यामाहेरा॥ ४४॥ वैदर्भीबोलेवचना॥ राजेंद्राचक्रमुकुटरत्ना॥
चारुगात्राविशाळनयना॥ गुणनिधानाममप्रिया॥ ४५॥ हेंशरीरआणिप्राण॥ वोवाळीनतुजवरून॥ तववद
नसरोजींमाझेनयन॥ मिलिंदहोऊनलुब्धले॥ ४६॥ तुजदुःखसमुद्रींलोटुन॥ जरिजाऊंइच्छीमाझेंमन॥ तरि
हेरसनाझडोन॥ कीटकपडोआतांचि॥ ४७॥ पाहतांतववदनसुधाकर॥ नृत्यकरीममानसचकोर॥ क्षण-
भरीनदेखतांवक्त्र॥ वाटेनेत्रउन्मळती॥ ४८॥ प्राणपतीचेंभाग्यपाहुनी॥ प्रीतीकरितीसर्वनितंबिनी॥ त्वतार
दुःखदृष्टीदेखोनी॥ जातीपापिणीटाकूनियां॥ ४९॥ मीवैदर्भराजनंदिनी॥ मजप्रसवलीनाहींऐसीजननी॥ तुज
सांडोनिघोरविपिनीं॥ मीनजायींजनकग्रहा॥ ५०॥ अवंचकस्त्रीसुख्यप्रधान॥ होयरत्नामाजीचूडारत्न॥
सुखदुःखाचीभागीण॥ सांगातीणअंतकाळीं॥ ५१॥ ऐकोनिपद्माक्षीच्यानिर्धारा॥ नळनेत्रींआल्याअश्रुधा
रा॥ परिकलीच्यागतीअपारा॥ वियोगपाडिलाक्षणार्धें॥ ५२॥ वैदर्भीह्मणेकमलेक्षणा॥ मजमार्गकांदाविसी
क्षणक्षणा॥ तरीजाऊंचलावैदर्भदर्शना॥ राज्यसर्ववोपीलतूतें॥ ५३॥ नैषधह्मणेअवद्दसाघेउन॥ केवितवजन
कादावूंवदन॥ दमयंतीनेंअर्धवसन॥ अखंडदिधलेंनेसावया॥ ५४॥ अस्तागेलावासरमणी॥ पुढेंशून्यशाळा
देखिलीनयनीं॥ दोघेंपहुडलींतयेस्थानीं॥ अंगासधरणीखुपत॥ ५५॥ दुःखेंनिद्राआलीदमयंती॥ नैषधजा
गाविचारीचित्तीं॥ पाहूनियावैदर्भीप्रती॥ ह्मणेमरणमजकांनये॥ ५६॥ हेसकळप्रमदांचीईश्वरी॥ इचीप्रतिमा
नाहींउर्वीवरी॥ आह्मावैदर्भराजकुमरी॥ धरणीवरीपडिलीसे॥ ५७॥ जीचेअंगींचापरमसुवास॥ तिचेधुळींतलो
ळलेकेश॥ हेत्दृषीकेशाव्योमकेश॥ कायदुःखपाहातोसी॥ ५८॥ मनींविचारीवीरसेननंदन॥ जावेंइचात्यागकरून
इचेंदुःखमाझेनयन॥ शक्तनहोतीदेखावया॥ ५९॥ हेपतिव्रतांतशिरोमणी॥ परपुरुषकरितांप्रयत्नकोणी॥ दृष्टी
नेंटाकीलभस्मकरूनी॥ नलगेरक्षणदुजेंकाहीं॥ ६०॥ तोंकळीनेंतेअवसरीं॥ नळापुढेंटाकिलीसुरी॥ अर्धवस्त्रछे

दोनिनिर्धारीं ॥ नळतेथूनिनिघाला ॥ ६१ ॥ शतपदगेलातेअवसरीं ॥ गह्विवरदाटलाअंतरीं ॥ परतोनपाहेराज
कुमारी ॥ अनर्थावरीपडिलीसे ॥ ६२ ॥ क्षणक्षणायेत्तपरतोनी ॥ अश्रुजीवनींभिजेधरणी ॥ ह्मणेअन्यायनसतां
इयेवनीं ॥ कैसीत्यागूंइयेतें ॥ ६३ ॥ जीच्याअंगुष्टावरून ॥ सांडणेंकरावामीनकेतन ॥ जिचेंवदनांबुजपाहोन ॥
रंभाउर्वशीलज्जित्त ॥ ६४ ॥ स्वप्नांतहीइचात्याज्य ॥ देखिलानाहींअन्याय ॥ जागृतजाल्याकरीलकाय ॥ प्राण
देईलमजलागीं ॥ ६५ ॥ पृथ्वीअपतेजअनिलगगन ॥ यांसनळप्रार्थीकरजोडोन ॥ वृकव्याघ्रादिप्राणीदारुण ॥
करारक्षणइयेचें ॥ ६६ ॥ मगकठीणकरूनमन ॥ प्रवेशलाघोरविपिन ॥ आठउनीवैदर्भीचेगुण ॥ करीरुदनराव
तो ॥ ६७ ॥ दमयंतीजागीहोत्त ॥ घाबरेपणेंपाहेकंपित ॥ तोंअर्धवस्त्रछेदूनत्वरित्त ॥ टाकूनगेलाघोरवनीं ॥ ६८ ॥
वक्षस्थळबडवून ॥ भूमीसपडेमूर्छायेउन ॥ नैषधानैषधाह्मणोन ॥ रानवनहिंडत्त ॥ ६९ ॥ लोभियाचेंजेसेंधन
तस्करीनेलेंहिरोन ॥ तैसीवैदर्भीनामघेउन ॥ रजनीमाजिवनींधांवे ॥ ७० ॥ आहापुण्यश्लोकानळराया ॥ मीमु
क्तकेशीझाडीनतुझेपायां ॥ तुजवरूनमाझीकाया ॥ कुरवंडीकरीनआतांचि ॥ ७१ ॥ हेनैषधागुणसमुद्रा ॥ कीं
विनोदकरिसीराजेंद्रा ॥ जवळीअसोनअतिउदारा ॥ प्रत्युत्तरनदेसी ॥ ७२ ॥ चरणीचालतांश्रमलीबहुत ॥
मूर्छनायेऊनवाटेपडत ॥ ह्मणेनाथहानाथ ॥ ह्मणोनधांवतचहूंकडे ॥ ७३ ॥ आंधळेंसोडोनिवनांतरीं ॥ सांगा
तीगेलादुरच्यादुरी ॥ तीचदमयंतीचीपरी ॥ अंतनाहींशोकातें ॥ ७४ ॥ तुझेसकुमारचरण ॥ रुततीखडे
कंटकतीक्ष्ण ॥ वैदर्भीचीकरुणादेखोन ॥ वृक्षपक्षीगह्विवरती ॥ ७५ ॥ वैरभावटाकोनी ॥ सकळश्वापदेंरड
तीतेक्षणीं ॥ सव्यअपसव्यजायघोरकाननीं ॥ मार्गकोठेंदिसेना ॥ ७६ ॥ वनींहिंडतांवैदर्भबाळी ॥ अजगरें
अकस्मातगिळिली ॥ नळरायाधांवधांवयेवेळीं ॥ अजगरेंग्रासिलीतवप्रिया ॥ ७७ ॥ कर्णीऐकतांकरुणास्वर
व्याधएकधांवलासत्वर ॥ तेणेंशस्त्रेंफोडोनिअजगर ॥ लावण्यगंगासोडविली ॥ ७८ ॥ सलिलेंप्रक्षाळूनकेलें

सावधान॥ ह्मणेपद्माक्षीतूंआहेसकोण॥ भैमीनेंसांगीतलेंवर्तमान॥ पूर्वींहूनवर्त्तलेंजें॥७९॥ देखोनिसौंदर्यअपा-
र॥ व्याधजालाकामातुर॥ आलिंगनद्यावयासत्वर॥ सरसावलापापरवाणी॥८०॥ मरणविसरूनपतंग॥ दीप
सत्त्रुंबूंधावेसवेग॥ कींराजहंसासकाग॥ स्पर्शावयाधांवला॥८१॥ असोवैदर्भीनेंक्षोभोनपरम॥ व्याधतत्काळ
केलाभस्म॥ जैसापंचाननापुढेंकाम॥ गेलादग्धहोऊनि॥८२॥ मगत्याघोरअरण्यांत॥ दमयंतीनळनामघेतजा
त॥ श्वापदेंहोतीभयाभीत॥ स्वरूपदेखतांभैमीचें॥८३॥ अर्धवस्त्रजातनेसोनी॥ मुक्तकेशीपद्मनयनी॥ श्वा-
पदांप्रत्तीपुसेवनीं॥ नळदेखिलाकायसांगा॥८४॥ मजकांनयेचिमरण॥ श्वापदेंहोभक्षामजलागुन॥ हेविंध्या-
चळबोलवचन॥ नळरावकोठेंआहेपां॥८५॥ उत्तरपंथेंजातदमयंती॥ तोंदेखिल्यातापसपंक्ती॥ जितेंद्रियत
पश्चर्याकरिती॥ पुसेत्यांप्रतीकोमळांगी॥८६॥ तापसीह्मणतीहेकोणमंगळा॥ आमचीतपश्चर्याआलीफळा॥
कींप्रणवरूपिणीवेल्हाळा॥ महामायाआदिशक्ती॥८७॥ कींहेसाक्षातअपर्णा॥ कींपद्मजातजनकाचीललना
कींप्रत्यक्षहेमित्रकन्या॥ प्रसन्नव्हावयाउतरली॥८८॥ कींनळाचीदमयंती॥ जीसबहुकाव्यकर्त्तेवर्णिती॥ तों
समीपयेऊनजालीपुसती॥ देखिलानृपतीनळकाय॥८९॥ कष्टीदेखोनिअपार॥ गहिवरेंदाटलेवसुधामर॥ ह्म
णतीसौभाग्यसरितेतुझाप्राणेश्वर॥ तुजसत्वरभेटेलपैं॥९०॥ बाळपद्मदळनयनी॥ गेलीविंध्याद्रीवोलांडुनी॥
पुढेंनदीतीरींदेखिलेतेक्षणीं॥ सौदागरउतरले॥९१॥ वणिकपतीमुख्यदेख॥ त्याचेंनामसार्थवाहक॥ तोसर्वव
स्तूंचारक्षक॥ गजतुरंगरथादी॥९२॥ त्यांचीधरूनसंगती॥ रजनीक्रमितदमयंती॥ तोंवनींचेनिरंकुशहस्ती॥ उ
दकप्राशनातेथेंआले॥९३॥ मत्तइभनादोपतीकोणा॥ मारीतचाललेवणिकसेना॥ अंधारींव्यक्तनदिसतीकोण
महाप्रळयवर्त्तला॥९४॥ ठावनेदीकोठेंक्षिती॥ महावनींप्रवेशेदमयंती॥ असोउगवलागभस्ती॥ वणिककिंचित
उरलेपैं॥९५॥ त्यांचेसंगतीसुंदरी॥ पावलीचैद्यवसूचीपुरी॥ नगरांतजातांझडकरी॥ लोकअपारमिळाले॥९६

तेथेंराजासुबाहुथोर॥त्याचेमातेनेंलक्षिलीसुंदर॥धात्रीपाठवूनिसत्वर॥उपरीवरीनेलीते॥९७॥राजमातापुसे
प्रीतीनें॥तूंकोणाचीसांगमृगलोचने॥अमरप्रभेसुहास्यवदने॥जालेंयेणेंकोठोनी॥९८॥मगवैदर्भीतेव्हांबो
लत॥बत्तीसलक्षणीअखंडमाझाकांत॥कर्मभोगेंजालेंविपरीत॥आल्येंहिंडतअर्धवस्त्रीं॥९९॥मगबोलेराज
माता॥मीशोधूनआणीनतुझ्याकांता॥अथवातोयेईलतत्वता॥तुजकारणेंशोधित॥२००॥तुजदेखोनिमाये
मजबहुस्नेहउपजलाआहे॥तूंमजपासींसदाराहें॥कन्यामाझीहोयतूं॥१॥दमयंतीबोलेवचन॥मीनकरींकोणा
चेंउच्छिष्टभोजन॥अथवापादप्रक्षालन॥नकरींभाषणकोणासीं॥२॥पतीआणिसीशोधून॥तरीमीतुजपा
सींराहीन॥राजमातेनेंभाकदेउन॥कन्याह्मणोनिठेविली॥३॥सुनंदानामेंकन्याजाण॥भैमीजालीतिचीसां
गातिण॥असोइकडेनळघोरकानन॥हिंडतसेअतिशोकें॥४॥तोंअद्भुतदेखिलादावानळ॥आकाशपंथेंज्वा
ललीज्वाळ॥नळाधांवधांवतत्काळ॥कर्णीध्वनीऐकिली॥५॥नळजवळीआलाधांवत॥तोंकर्कोटकबैसला
कुंडलवत॥ह्मणेरायावोणवाअद्भुत॥कार्दीमजयेथोनी॥६॥मीपूर्वींबहुतउन्मत्त॥सर्वदामीनिंदींसाधूभक्त
नारदेंशापिलेंयथार्थ॥कर्कोटकदेहपावसी॥७॥उश्यापबोलिलातत्काळ॥तुजवनींउद्धरीलनळ॥तरीमाझे
नेंनघालवेपाउल॥काढूनघेईमजआतां॥८॥कर्कोटकजालालहान॥नळेंखांदाघेतलाउचलोन॥वोणव्या
बाहेरनेउन॥ठेवितांजालातेधवां॥९॥तोंकर्कोटकेंहस्तासदंशकेला॥विषयोगेंनळकाळाजाला॥कर्कोटह्म
णेराजानळा॥चिंताकांहींकरूंनको॥१०॥म्यांतुझेंरूपझांकिलेंनिःशेष॥तुजनबाधीदुसरेंविष॥कार्यजा
लियाविशेष॥पूर्ववतहोसीलतूं॥११॥कर्कोटकेंदिधलेंदिव्यवसन॥हेंनैषधाकरींजतन॥माझेंकरूनस्म
रण॥शेवटींहेंपांघुरें॥१२॥पूर्वस्वरूपहोसील॥भेटेलदमयंतीवेल्हाळ॥आपलेंस्वराज्यपावसील॥पुण्य
श्लोकानळराया॥१३॥ऐसेंतोनागबोलोन॥तत्काळपावलाअंतर्धान॥मगनळरायेंअयोध्येसजाऊन॥ऋ-

तुपर्णरायास भेटला ॥ १४ ॥ ऋतुपर्ण पुसे तूं कोण ॥ येरू ह्मणे बाहुक नामाभिधान ॥ अश्वसारथ्य गति लक्षण ॥
मी जाणें सर्वही ॥ १५ ॥ ठाऊक आहे सूपशास्त्र ॥ अन्नें करीन चित्रविचित्र ॥ ऋतुपर्ण संतोषोनि अपार ॥ अश्वशि
क्षे ठेविला ॥ १६ ॥ वार्ष्णेय सारथी आहे ॥ तूं सर्वांहूनि श्रेष्ठ होयें ॥ असो बाहुक राहिला पाहें ॥ सेवा करून रायाची ॥
१७ ॥ विकळ होऊनि रजनी माझारीं ॥ दमयंतीलागीं विलाप करी ॥ अगे प्राणवल्लभे सुंदरी ॥ कोणीकडे गेलीस
१८ ॥ जीवल नामें राजसेवक जाण ॥ बाहुकास पुसे वर्तमान ॥ रात्रीं विलाप करिसी दारुण ॥ तें कारण सांग पां १९
बाहुक ह्मणे ते क्षणीं ॥ कोणी एक मंदबुद्धी प्राणी ॥ दिव्य स्त्री सांडोनि वनीं ॥ आतां मनीं झुरतो ॥ २० ॥ निराप
राध स्त्री निर्मळ ॥ सौंदर्य समुद्रींचें मुक्ताफळ ॥ शृंगार वैरागरींचें तेजाळ ॥ दिव्य रत्न त्यागिलें ॥ २१ ॥ ऐसी सां
डोनि सुंदरी ॥ आतां मूर्खपणें शोक करी ॥ त्याची रीती ये अवसरीं ॥ मी सहज दावितों ॥ २२ ॥ इकडे वैदर्भीचीं-
बाळें पाहुन ॥ भीमकराजा शोकें क्षीण ॥ शोधावया ब्राह्मण ॥ पृथ्वीवरी पाठविले ॥ २३ ॥ जामात आणि कन्या
रत्न ॥ शोध पाडील जो ब्राह्मण ॥ त्यासी अलंकार सहस्र गोदान ॥ देईन जाण मागेल तें ॥ २४ ॥ छप्पन्न देशामा
जी जाण ॥ सास्ेपें शोधिती ब्राह्मण ॥ त्यांत सुदेव नामाभिधान ॥ चंदिवसु पुरीस आला ॥ २५ ॥ तेणें दमयं
ती देखिली ॥ जैसी राहूनें चंद्रप्रभा ग्रासिली ॥ कीं दिव्य प्रवाळवल्ली ॥ दाह जाली अग्नींत ॥ २६ ॥ पंकें माखिलें मु
क्ताफळ ॥ तैसी झांकिली से वेल्हाळ ॥ तों सुदेव देखत तात्काळ ॥ रडों लागली वैदर्भी ॥ २७ ॥ शोकार्णवीं भैमी प
डली ॥ देखोन सुनंदा सद्गद जाली ॥ राजमाता जवळी आली ॥ पुसों लागली विप्रातें ॥ २८ ॥ सुदेव सांगत तिज
प्रती ॥ तुझे भगिनीची कन्या हे दमयंती ॥ वनीं सांडोनि गेला पती ॥ इची गति हे जाली ॥ २९ ॥ ही सकळ प्रमदांची
स्वामिनी ॥ कपाळीं अक्षय रत्नमणी ॥ सुनंदा कपाळ धोउनी ॥ पाहती जाली ते धवा ॥ ३० ॥ तों भाळीं रत्नमणी झ
ळाळी ॥ राजमाता कंठीं मिठी घाली ॥ ह्मणे म्यां नाहीं वोळखिली ॥ भगिनी कन्या माझी हे ॥ ३१ ॥ अहा अन्याय जाह

लाप्रबळ॥नोळखेभगिनीकन्यावेल्हाळ॥जवळीअसतांदिव्यमुक्ताफळ॥अंधाप्रतीदिसेना॥३२॥दमयंतीबोलेवच
न॥मातेमीपितृगृहासजाईन॥संगेंदेऊनअपारसैन्य॥वैदर्भपुरापाठविली॥३३॥दृष्टीनदेखवतांभ्रतार॥नेघे
वस्त्रेंअळंकार॥वहनींबैसऊनिसुंदर॥निजमाहेरापाठविली॥३४॥दृष्टीदेखतांदमयंती॥मातापितावेगेंभेट
ती॥बाळेंयेऊनगळांपडती॥नाहींअंतशोकातें॥३५॥सुदेवशांतवीसमस्तां॥आतांशोककरितांवृथा॥नळ
शोधावातत्वता॥अवनीमाजीयावरी॥३६॥मगसुदेवाससहस्रगोदान॥पूजिलासालंकारदेउन॥वैदर्भम्ह
णेवीरसेननंदन॥शोधींआतांसत्वर॥३७॥माझेंवनींहरपलेंदिव्यरत्न॥जोकोणीदेईलआणून॥त्यासमी
दिव्यवस्त्रेंअळंकारींपूजीन॥सुरभीदेईनसहस्रभरी॥३८॥असोग्रामघोषपुरेंपट्टणें॥द्विजशोधित्तीनळा
कारणें॥देशदुर्गेंकठिणस्थानें॥पाहतीबहुतकुशळत्वें॥३९॥त्यांतपर्णादनामाविप्रजाण॥तोआलाअयो
ध्येहुन॥दमयंतीतेंवर्तमान॥सांगताजालातेथिचें॥४०॥अयोध्यानगरपरमपवित्र॥घेतलाघरोघरींसम
चार॥अहोदमयंतीतुझेंचरित्र॥जालेंतेंसर्वकथियेलें॥४१॥सर्वपुरुषांऐकविलेंकर्णीं॥प्रतिउत्तरनदेती—
कोणी॥परिराजसारथियेंऐकोनी॥साक्षेपेंजवळीपातला॥४२॥तयानामबाहुक॥तेणेंतुझ्यागोष्टीऐकोनिदे
ख॥करिताजालाअपारशोक॥नकळतकोणातें॥४३॥म्हणेअहोदमयंतीराणी॥निरापराधेंत्यागिलीका-
मिनी॥प्राणवल्लभाकोणेवनीं॥रुडतफिरतअसेल॥४४॥अहाप्रियेगुणभरिते॥गुणगंभीरेसौभाग्यसरि
ते॥पतिमानसकल्पलते॥पतिव्रतेधन्यतूं॥४५॥कुळवंताकामिनीशुद्ध॥जरीझालापतीचाअपराध॥त
रीत्हृदयींनधरितीभेद॥कदांहांशब्दनठेविती॥४६॥पर्णादसांगतांवर्तमान॥भैमीनेंत्यासगौरउन॥मगपा-
ठविलासुदेवब्राह्मण॥अयोध्येसीतेधवां॥४७॥विप्रज्ञानीपरमचतुर॥ऋतुपर्णासभेटलासत्वर॥दमयंती
नेंसांगीतलाविचार॥तोनित्यासीकथियेला॥४८॥म्हणेदमयंतीचेंस्वयंवरपूर्ण॥पुनःमांडिलेंदुसरेन॥उदई

कप्रातःकाळींआहेलग्न॥नेमहान्वकेलासे॥४९॥प्रातःकाळींयेईलजोभूपाळ॥त्यासतेघालीलमाळ॥ऋतुपर्णें
तत्काळ॥बाहुकासबोलाविलें॥५०॥दमयंतीचेंउदईकलग्न॥नैषधमनांतभावीपूर्ण॥मजकारणेंकरितसेप्रय
त्न॥गुणनिधानदमयंती॥५१॥बाहुकरायासबोलेवचन॥सूर्योदयनहोतांपूर्ण॥पांचशतयोजन॥रथचालवी
नजाणपां॥५२॥मगपवनासमानतुरग॥बाहुकेंकाढिलेसवेग॥रोडकेदेखोनिक्षीणांग॥ऋतुपर्णबोलतसे५३
ह्मणेउत्तमअश्वरत्नेंटाकून॥हेराडकेआणिलेनिवडुन॥बाहुकबोलेवचन॥याचीपरीक्षामीजाणें॥५४॥केतकी
चेंलघुपत्रजाण॥धाकटादिसेपंचानन॥थोरपणासीनाहींकारण॥ऐकतांऋतुपर्णतोषला॥५५॥याअश्वां
चेंअंतरसवेग॥रायाकळेलक्रमितांमार्ग॥चिमणेंरत्नस्फुरंग॥थोरपाषाणकासया॥५६॥मगरथींऋतुपर्ण
बैसला॥घोडेजुंपिलेतेवेळां॥वार्ष्णेयेंसारथ्यकेलेंनळा॥पूर्वींजाणनेमाचें॥५७॥तुरंगजातीजैसेपवन॥परम
संतोषलाऋतुपर्ण॥ह्मणेअश्वज्ञानीनिपुण॥मातलींकिंवानळएक॥५८॥मातलीऐसेयाचेगुण॥परिशरीर
दिसेविवर्ण॥तोंउत्तरीयवस्त्रपडिलेंगळोन॥घेघेह्मणोनरावबोले॥५९॥तोंबाहुकबोलेवचन॥द्वादशयोजनीं
राहिलेंवसन॥तोंबिभीतकवृक्षदेखोन॥ऋतुपर्णबोलत॥६०॥यावृक्षासफळेंपर्णेंकिती॥बाहुकातुजसांगेन
गणती॥स्थीरकरूनरथगती॥कौतुकेंनृपबोलत॥६१॥बाहुकेंउतरूनरथातळीं॥फळेंपर्णेंसर्वमोजिलीं॥सां
गीतलींतितुकींचभरलीं॥परमाश्चर्यकरिततो॥६२॥मगसंख्येचीविद्यासंपूर्ण॥दुसरेंअक्षहृदयज्ञान॥दो
नविद्याऋतुपर्ण॥बाहुकाससमर्पी॥६३॥अश्वशिक्षापरीक्षाज्ञान॥बाहुकापासींशिकेऋतुपर्ण॥विद्येनेंविद्या
संपूर्ण॥सफळजालीदोघांतें॥६४॥बाहुकेंअक्षविद्याजाणतां॥हृदयांतूनकळीनिघालाअवचिता॥नळाचेच
रणींठेविलामाथा॥बोलताझालामूर्तिमंत॥६५॥ह्मणेम्याछळिलेंबहुत॥हेंतुझेंचरितश्रवणकरित॥त्यासमी
पीडींनायथार्थ॥सत्यसत्यत्रिवाचा॥६६॥मगबिभ्याच्यावृक्षांततत्काळ॥प्रवेशलातोकळीखळ॥ह्मणोनिबिब

वावृक्षअमंगळ ॥ छायेसमीपनबैसावें ॥ ६७ ॥ ऐसावार्ष्णेयबाहुकऋतुपर्ण ॥ तिघेरथारूढहोउन ॥ वैदर्भपुरी-
पाहतीयेउन ॥ तोंतेथेंकाहींदिसेना ॥ ६८ ॥ नदिसेकांहींस्वयंवराची स्थिती ॥ कोणीनाहींतभूपती ॥ ऋतुपर्णतेव्हां
चित्तीं ॥ परमलज्जितजाहला ॥ ६९ ॥ तोंभैमीप्रतीशकुन ॥ जाणवितीशुभचिन्ह ॥ मगउपरीचढोन ॥ रथगती
परीक्षी ॥ ७० ॥ ह्मणेहेरथगतीजाणा ॥ नळाविणनयेकोणा ॥ असोभीमकऋतुपर्णा ॥ भेटताजालायेउनी ॥ ७१
भीमकेंगृहासनेउन ॥ आदरेंपूजिलाऋतुपर्ण ॥ ह्मणेकांजालेंआगमन ॥ कायकारणकल्पिलें ॥ ७२ ॥ मगअयो
ध्यापतीबोलेवचना ॥ सहजआलोंतुमच्यादर्शना ॥ रायेंदेऊनउत्तमसदना ॥ उपचारसर्वपाठविले ॥ ७३ ॥ रथ-
शाळेसबाहुकजाण ॥ राहाताजालाजाउन ॥ तुरंगसेवाकरून ॥ यथोपचारेंतोषविलें ॥ ७४ ॥ मगयावरीदम
यंती ॥ पाठवीकेशिनीनामेंदूती ॥ ह्मणेपरीक्षाकरूनबहुरीती ॥ येईपाहूनकोणतो ॥ ७५ ॥ तोंकेशिनीचतुरयेउ
नी ॥ पुसतबाहुकालागुनी ॥ कायकारणकल्पुनी ॥ तुह्मीयेथेंपातलां ॥ ७६ ॥ तोह्मणेदमयंतीचेंस्वयंवर ॥-
बोलिलायेऊनसुदेवविप्र ॥ ह्मणोनिअयोध्येचानृपवर ॥ ऋतुपर्णयेथेंपातला ॥ ७७ ॥ मीत्याचासारथीबाहु
क ॥ वार्ष्णेयनळसारथीदेख ॥ केशिनीपुसेनैषधसम्यक ॥ कोठेंआहेसांगपां ॥ ७८ ॥ बाहुकह्मणेनेणवेकांहीं
गुप्तराहिलाकोणेठाईं ॥ कायापालटोनिमही ॥ कोठेंहिंडतोकळेना ॥ ७९ ॥ केशिनीमाघारीयेउन ॥ दमयंती
ससांगेवर्त्तमान ॥ नेसलाआहेअर्धवसन ॥ परिकायाजाणतेनव्हे ॥ ८० ॥ त्याचीपाहतांवर्त्तणुक ॥ नळाऐसी
दिसेसम्यक ॥ सत्कर्माचरणसद्विवेक ॥ नैषधऐसादिसतो ॥ ८१ ॥ वैदर्भीह्मणेजाउन ॥ आणीकपाहेंसर्वचिन्ह
देऊंनकोउदकअग्न ॥ लेंकरेंघेउनजायतेथें ॥ ८२ ॥ मगदोनबाळेंघेउनी ॥ त्यापासींगेलीतेक्षणीं ॥ बाळेंदृष्टीदे
खोनी ॥ अश्रुनयनींआणिले ॥ ८३ ॥ दोघेंआलिंगुनीह्रदयीं ॥ खेदकरीत्यामितीनाहीं ॥ मगतींबाळेंठेउनीमही
केशिनीसींबोलत ॥ ८४ ॥ माझींबाळेंऐसींचघरीं ॥ मजअंतरलींबहुदूरि ॥ यांसदेखोनिअंतरीं ॥ गहिंवरमजदा

टला ॥ ८५ ॥ यावरी केशिनी पाहे चिन्हें ॥ येतां जातां द्वारांतुन ॥ खालती न करी मान ॥ होऊन वामन जातसे ॥ ८६
रिता कुंभ ठेविला ॥ तो दृष्टीनें पाहतां च भरला ॥ तृण फुंकितां ते वेळा ॥ अग्नी प्रगटला तत्काळ ॥ ८७ ॥ अग्नीवरी
पडतां वस्त्र ॥ न जळे चि कांहीं अणुमात्र ॥ सुमनें चोळिलीं विचित्र ॥ सवेंचि माळा गुंती टवटवीती ॥ ८८ ॥ केशिनीनें
येऊन ॥ सर्व कथिलें वर्त्तमान ॥ भैमी ह्मणे वीरसेन ॥ सूत होय निश्चयें सी ॥ ८९ ॥ मातापितयास पाठवी सांगोनी
मीं बाहुकास पाहूं कायनयनीं ॥ रायें बाहुकास बोलाउनी ॥ भैमीकडे पाठविला ॥ ९० ॥ मुक्तकेशी अर्धवस्त्री ॥
बाहुकें भैमी देखिली नेत्रीं ॥ खालीं पाहे निशोककरी ॥ शब्द बाहेर फुटेना ॥ ९१ ॥ नेत्रास वस्त्र लाउन ॥ दमयंतीक
री रुदन ॥ ह्मणे हे उमारमण रमारमण ॥ नळरूप प्रकटवीं ॥ ९२ ॥ तों अंतरिक्ष वायु बोलत ॥ नळराया पाहूंन
को अंत ॥ आपलें स्वरूप पुण्यवंत ॥ प्रगट करीं ये धवां ॥ ९३ ॥ करून कर्कोटकस्मरण ॥ नळ पांघुरला प्रसाद व-
सन ॥ बाळसूर्यासमान ॥ पूर्वरूप प्रगटलें ॥ ९४ ॥ मग दमयंती धांवोन ॥ दृढ धरी नळाचे चरण ॥ कंठीं मिठी घा
लून ॥ पूर्वदुःख आठवलें ॥ ९५ ॥ वृंदारक पुष्पसंभार ॥ वर्षती तेव्हां वारंवार ॥ भीमक धांवला सत्वर ॥ वाद्यगज
र जाहले ॥ ९६ ॥ भीमक आणि नैषधपती ॥ सप्रेम एकमेकास आलिंगिती ॥ ऋतुपर्ण धाउनी प्रीती ॥ नैषधास वं-
दिलें ॥ ९७ ॥ जोडोनियां दोनी कर ॥ ह्मणे माझे अपराध अपार ॥ नेणोनि घडले साचार ॥ ते समग्र क्षमा करीं ॥ ९८
नळ आणि दमयंती ॥ वस्त्रालंकारें सप्रेमें पूजिती ॥ देशोदेशींचे राजे धांवती ॥ करभार घेऊनियां ॥ ९९ ॥ आज्ञा
घेऊन ऋतुपर्ण ॥ अयोध्येस गेला तेथून ॥ नैषध अपार सेना घेऊन ॥ निषधदेशाप्रती आला ॥ ३०० ॥ पुष्करास बो
लाऊन त्वरित ॥ ह्मणे आतां खेळ खेळूं द्यूत ॥ अथवा युद्ध करीं अद्भुत ॥ महानिष्ठुरा पापिष्ठा ॥ १ ॥ मग नळें द्यूत खे
ळोन ॥ राज्य घेतलें सर्व जिंकोन ॥ पुष्करास एक ग्राम देउन ॥ कृपा करून रक्षिला ॥ २ ॥ नळ दमयंती समवेत ॥ स्व
स्वरूप स्वराज्यीं नांदत ॥ यथाकाळीं मेघ वर्षत ॥ प्रजा समस्त सुखी बहु ॥ ३ ॥ हें ऐकतां नळाख्यान ॥ कलिना-

शकसुखवर्धन॥ श्रोतेवक्तेकल्याण॥ सुखरूपनांदती॥४॥ हीकथाबृहदश्वाऋषी॥ तेणेंसांगीतलीधर्मासी
ह्मणेतूंस्वराज्यपावसी॥ नैषधाऐसेंमागुत्यान॥५॥ बृहदश्वानेंअक्षहृदयपाहीं॥ धर्मासशिकविलेंसर्वहीं॥
ह्मणेआतांगजपुरांजाई॥ जिंकूनघेईराज्यसर्व॥६॥ पांडवप्रतापग्रंथविशेष॥ त्यांतहेंनळोपाख्यानसुरस॥ ऐ
कतांसंतुष्टहोयमानस॥ आसमासपुण्यजोडे॥७॥ ब्रह्मानंदश्रीधर॥ पंडितांसविनवीजोडूनिकर॥ नळोपा
ख्यानवारंवार॥ श्रवणकराआदरें॥८॥ स्फुरसपांडवप्रतापग्रंथ॥ वनपर्वव्यासभारत॥ त्यांतीलसारांश
यथार्थ॥ पंचविसाव्यांतकथियेला॥९॥ इतिश्रीपांडवप्रतापग्रंथ॥ वनपर्वटीकाश्रीधरकृत॥ बृहदश्व्यानें
धर्माप्रत॥ नळोपाख्यानकथियेलें॥३१०॥ ॥इतिश्रीपांडवप्रतापवनपर्वेपंचविंशोऽध्यायः॥२५॥
श्रीकृष्णार्पणमस्तु॥ ॥शुभंभवतु॥ ॥छ॥ ॥छ॥ ॥छ॥ छ

श्रीगणेशायनमः॥ ॥जन्मेजयासह्मणेवैशंपायन॥ऐकवनपर्वींचेंरहस्यपूर्ण॥जालियानळोपाख्यान
पुढेंकथनऐकपां॥१॥सिंहावलोकनेंकरून॥मागीलऐकाअनुसंधान॥अमरावतीयेअर्जुन॥शक्रेंराहविला
अतिप्रीती॥२॥राहिलापांचसंवत्सर॥पार्थेंआठऊनियुधिष्ठिर॥खंतीकरीतअपार॥स्नेहसमुद्रउचंबळला
॥३॥भीमनकुळसहदेवजाण॥पांचाळीखंतीकरीरात्रदिन॥केव्हांधनंजयाचेंवदन॥दृष्टीआह्मीविलोकूं॥
४॥दीपावीणजैसेंसदन॥कींनासिकावांचूनिजैसेंवदन॥प्राणेंवीणकलेवरपूर्ण॥पार्थाविणेंतैसेंआह्मी॥
५॥इंद्रपदाहूनऋषिलोमश॥येऊनभेटलाधर्मास॥ह्मणेकिरीटीसुखीआहेअमरावतीस॥सत्वरचियेईल
॥६॥परिधर्माऐकवचन॥फाल्गुनेंसांगीतलेंतुजलागुन॥तपआणितीर्थाटन॥अत्यादरेंकरावें॥७॥समुद्र
वलयांकितजींतीर्थें॥म्यांदोनवेळकेलींसमस्तें॥तूंयेसीमजसांगातें॥तरीकरवीनयथाविधि॥८॥ऐकोनिसंतो
षलाधर्म॥ह्मणेमाझेंभाग्यपरम॥तुझेसंगतीसुगम॥तीर्थयात्रासर्वपाहूं॥९॥पाहूनउत्तमसुमुहूर्त॥बं
धुद्रौपदीसमवेत॥धर्मतीर्थयात्रेसनिघत॥लोमशऋषीसांगातें॥१०॥प्रजाआणिब्राह्मण॥सहवासीधर्मा
चेपूर्ण॥त्यांप्रतीपंडुनंदन॥विनविताबहुतजाला॥११॥तुह्मीजावेंगजपुराप्रती॥अथवाराहावेंशक्रप्रस्थीं
कींपांचाळनगरींकरावीवस्ती॥कींद्वारकेसरहासुखें॥१२॥असेलपुण्यगांठीसअद्भुत॥जरीशरीरींशक्ति
बहुत॥तितुकेतीर्थयात्रेचलात्वरित॥वासनामुक्तकरूनियां॥१३॥धर्मआज्ञेकरून॥लोकस्थळींस्थळींराहि
लेजाउन॥त्यामध्येंबहुतब्राह्मण॥समागमेंचालिले॥१४॥धरामरह्मणतीधर्मासी॥तुह्मीशक्तिमंततेजो-
राशी॥सांभाळूनिन्यावेंआह्मासी॥कठिणस्थळींरक्षूनिया॥१५॥भीमह्मणेमातुमचादास॥असतांभय-
नाहींतुह्मांस॥तुमचीसेवानिर्दोष॥याहूनियशकोणतें॥१६॥समागमेंऋषिलोमश॥तीर्थेंदाखवीतजातध
र्मास॥वनपर्वींस्वामीवेदव्यास॥तीर्थेंअपारबोलिला॥१७॥अजातशत्रुधर्मराज॥तीर्थेंकरीतजाततेजःपुंज॥

सवेंवृकोदरमाद्रीतनुज ॥ महावीरप्रतापी ॥ १८ ॥ सकळप्रमदांचीस्वामिनी ॥ पद्मजातजनकाची भगिनी ॥ ते
सवेंहंसगमनी ॥ चरणचालीचमकत ॥ १९ ॥ सवेंधौम्यपुरोहित ॥ लोमशसकळतीर्थेंदारववित्त ॥ समागमेंवि
प्रअसंख्यात ॥ शापानुग्रहसमर्थजे ॥ २० ॥ तोंसमंगानामेंनदीतेथ ॥ वाटेसलागलीअकस्मात ॥ लोमशध
र्मासांगत ॥ तीर्थविधीकरायेथें ॥ २१ ॥ पूर्वीइचेंनाममधुबिळजाण ॥ आतांसमंगाह्मणतीऋषिजन ॥ धर्म
ह्मणेकायकारण ॥ समंगानामपडावया ॥ २२ ॥ लोमशह्मणेऐककथापवित्र ॥ जनकनृपेंमांडिलेंदीर्घसत्र ॥
तेथेंऋषिमिळालेअपार ॥ अपरसूर्यशास्त्रद्रष्टे ॥ २३ ॥ तोंबंदीवरुणसुतपुत्र ॥ गौतमशिष्यपढलान्याय
शास्त्र ॥ त्यासरसनायकेंपाठविलेंसत्वर ॥ विप्रआणावयागातें ॥ २४ ॥ तोपरमवादकदुष्टदुर्जन ॥ जनका-
सीभेटलायेउन ॥ त्याचीविद्यादेखोनितीक्ष्ण ॥ मिथिलाधिपसंतोषला ॥ २५ ॥ ह्मणेतूंकरिसीतेंप्रमाण ॥
आमचायागजालासंपूर्ण ॥ वादींजिंकोनहेब्राह्मण ॥ जायघेऊनवरुणसत्रा ॥ २६ ॥ आदींचवादकसबळ
त्यावरीपाठिराखेभूपाळ ॥ तेणेंवादींविप्रजिंकूनसकळ ॥ समुद्रांतबुडवीतसे ॥ २७ ॥ रसाधिपतीचेदूतअ
पार ॥ वरुणग्रहासनेतीसत्वर ॥ ऐसेब्राह्मणचवदासहस्त्र ॥ बंदीपाठवितपातला ॥ २८ ॥ राजदूतपाठउन
शोधूनआणवीसकळब्राह्मण ॥ वादींनिरुत्तरकरून ॥ बुडवीनेऊनसमुद्रांत ॥ २९ ॥ बंदीच्याभयेंब्राह्मण
पळतीआडमार्गेंघेतीरान ॥ वरुणग्रहींनेउन ॥ बंदीघालितोह्मणूनियां ॥ ३० ॥ बंदीसवादींजिंकोन ॥ सोड
वीसकळब्राह्मण ॥ ऐसाकोणीनाहींनिपुण ॥ तोंनवलपूर्णजाहलें ॥ ३१ ॥ उद्दालककन्यासुमती ॥ तेदिधलीक
होळऋषीप्रती ॥ तेगर्भिणीअसतांसती ॥ करितपतीवेदाध्ययन ॥ ३२ ॥ तिच्चेगर्भीनपुरुषअभिनव ॥ महाज्ञा
नीजेविशुकवामदेव ॥ योगभ्रष्टनिपुणसर्व ॥ वेदशास्त्रसंपन्नजो ॥ ३३ ॥ पिताकरितांअध्ययन ॥ अबद्धह्मण
तांबोलेआतून ॥ ह्मणेठांईठांईपडतन्यून ॥ क्षणक्षणासांगेत्यातें ॥ ३४ ॥ कहोळचहूंकडेपाहत ॥ ह्मणेकोणपु

रुषबोलतोयेथ॥ ऋषिपत्नीह्मणेमाझ्यागर्भांत॥ महापंडितवदतसे॥ ३५॥ क्षणक्षणाकादितोन्यून॥ क
होळक्षोभलाबोलेवचन॥ ह्मणेतुजनसतांद्विजखपूर्ण॥ नरकीराहूनगोष्टीवदसी॥ ३६॥ शापदिल्हापेरम-
तीव्र॥ होईआठांगाईआंगवक्र॥ यावरीतोकहोळविप्र॥ जातपृथ्वीपर्याटना॥ ३७॥ तोंबंदीनेंधरूनअकस्मा
त॥ वादींनिरुत्तरकरित॥ समुद्रांतनेऊनबुडवित॥ दूतनेतवरुणापाशीं॥ ३८॥ पापवर्तलेंबहुत॥ ऋषिप-
त्न्यावियोगेंआहळत॥ संततीखुंटल्यासमस्त॥ थोरअनर्थवर्तला॥ ३९॥ बंदीचेसंगेंजाल्यापापराशी॥ तेंने
णवेचिजनकासी॥ अहोइकडेकहोळस्त्रियेसी॥ पुत्रमागेंजन्मला॥ ४०॥ तेथेंउद्दालकयेउन॥ केलेंजातकर्मादि
संपूर्ण॥ अष्टावक्रनामठेउन॥ लालनपालनकरीत्याचें॥ ४१॥ उद्दालकपुत्रश्वेतकेत॥ तोहीत्यासमागमेंखेळ
त॥ दोघेहीअंकींबैसत॥ तानतानतह्मणतीतया॥ ४२॥ अष्टावक्राचेंउपनयन॥ उद्दालकेंकेलेंआपण॥ त्यावरी
वेदाध्ययन॥ आरंभिलेंउद्दालेंतयांसी॥ ४३॥ श्रवणमात्रेंचिसत्य॥ चारवेदहोतीमुखोद्गत॥ षट्शास्त्रींपारां
गत॥ नाहींअंतविद्येसी॥ ४४॥ दशग्रंथकरतलामळ॥ पुराणेंमुखोद्गतसकळ॥ चतुर्दशविद्येंतकुशळ॥ नि
पुणकितीसांगावा॥ ४५॥ परिपितृशापेंकरून॥ हीनअष्टांगेंपरिनदिसेन्यून॥ प्रतापेंचिसूर्यपूर्ण॥ अष्टावक्र
जाहला॥ ४६॥ योगभ्रष्टमहाज्ञानी॥ कींचिदंबरींचावासरमणी॥ मघवाकवीगुरूहुनी॥ विद्याविशेषतया
ची॥ ४७॥ एकदाउद्दालकाचेअंकींयेउनी॥ अष्टावक्रबैसलाप्रीतीकरुनी॥ तोंमातुलश्वेतकेतेंतेक्षणीं॥ अंका
हुनीदकलिला॥ ४८॥ ह्मणेमाझ्यापितयाचाअंकजाण॥ तेथेंतूंबैसावयाकोण॥ अष्टावक्रखेदपावोन॥ जननी
लागींपुसतसे॥ ४९॥ ह्मणेश्वेतकेतेंलोटिलेंमजलागुन॥ माझातातसांगकवण॥ तोंजननीकरीरुदन॥ कहोळ
पतीआठउनी॥ ५०॥ ह्मणेतुझापितापाहीं॥ बंदीनेंबदींघातलावरुणगृहीं॥ पूर्ववृत्तांतसकळही॥ वर्त्तला-
सांगेपुत्रातें॥ ५१॥ ऐकतांसर्ववृत्तांत॥ अष्टावक्रजालासंतप्त॥ जननीसनमूनित्वरित॥ मिथिलेप्रतीचालिला

॥५२॥ ऐकतां माता ह्मणे ते वेळीं॥ तुज ही बंदी कोंडील पाताळीं॥ मग द्यावया तिळांजुळी॥ वंशीं कोणी नाहीं
पां॥५३॥ अष्टावक्र बोले वचन॥ कहोळ पडिला बंदी जाउन॥ धिग् माझें पुत्रपण॥ कासया प्राण ठेऊं हा॥५४॥
अंबे तूं न करीं चिंता॥ बंदीस जिंकोनी तत्वता॥ घेऊन येईन कहोळ पिता॥ तरीच पुत्र तुझा मी॥५५॥ यावरी तो
अष्टावक्र॥ पावला वेगें मिथिलानगर॥ लक्षूनियां राजद्वार॥ बैसे चौबारा जाउनी॥५६॥ आठां ठाईं वांकुडा
देखोन॥ पहावया मिळती बहुत जन॥ शोभे कौपीन मुंजी मृगाजिन॥ सर्वांगीं भस्म चर्चिलें॥५७॥ तो मृगये
लागीं जनक निघत॥ सवें एतना चालली बहुत॥ जे ते पाहतां होती विस्मित॥ कहोळसुत बैसला तो॥५८॥
तों बंदी सुखासनीं बैसोन॥ पुढें येत वेगें करून॥ ह्मणे हा बैसला कोण॥ उठवा एथून एकीकडे॥५९॥ दूत
येऊन तेथ॥ ह्मणती बंदी आला सोडीं पंथ॥ बाळ ह्मणे येऊं द्या एथ॥ पुसेन सत्य मी त्यासी॥६०॥ तों बंदी आ
ला जवळी॥ अष्टावक्र क्रोधें न्यहाळी॥ ह्मणे महामूढा ये वेळीं॥ पंथ सोडावा कोणें कोणा॥६१॥ मनुष्यें अथ
वा नृपनाथें॥ अंधासि सोडावा आधीं पंथ॥ मूक बधिर पंगू यथार्थ॥ त्यासही मार्ग सोडावा॥६२॥ मुख्य ब्राह्म
णाचा पंथ॥ त्याही वरी मी अंगवक्र अशक्त॥ तरी तूं बंदी मूढ सत्य॥ मज पंथ सोड ह्मणसी॥६३॥ रायास सां
गती सेवक॥ पुढें बैसला विप्रबाळक॥ तों बंदी सह्मणे तूं शत मूर्ख॥ तृणप्राय मानुनी॥६४॥ तें पहावया कौतु
क॥ पुढें आला राजा जनक॥ त्यास देखोन कहोळबाळक॥ क्रोधें संतप्त बोलतसे॥६५॥ ह्मणे विप्र मी असें मे
दिनी॥ तूं क्षत्रिय कसा बैसलास वहनीं॥ भयाभीत जनक मनीं॥ सिबिकेखालें उतरला॥६६॥ कल्पांत रुद्रा
ऐसा तेथ॥ अष्टावक्र दिसे क्रोधयुक्त॥ रावथरथरां कांपत॥ भयें लागत चरणासी॥६७॥ वहनांत बैसऊन
अष्टावक्र॥ बंदीसह वर्त्तमान नृपवर॥ परतगेला वेगें सत्वर॥ सभा करून बैसला॥६८॥ घालूनियां श्रेष्ठासन
रायें पूजिला कहोळनंदन॥ यावरी नृपा प्रती परम तीक्ष्ण॥ अष्टावक्र बोलतसे॥६९॥ ह्मणे बंदीचा पाठिरा खोन

बुडविलेंचतुर्दशसहस्त्रब्राह्मण॥ पापेंघडलींतुजलागुन॥ सूर्यनंदनपुढेंपुसेल॥७०॥आधींचराज्यांतींनरक॥
त्यावरीहेंघडलेंमहत्पातक॥ ऋषींचीसंततीबुडालीसकळिक॥ तळमळतीस्त्रियात्यांच्या॥७१॥जालेद्वादशसं
वत्सर॥ विप्रांसहोत्तेबहुतपुत्र॥ त्यापापहत्यासमग्र॥ तुझ्यामाथ्यापडियेल्या॥७२॥ हाबंदीअपवित्र॥ महावा
दकसूतपुत्र॥ हामनुष्यरूपेंरासभसाचार॥ किंवाश्वानपिसाळलें॥७३॥आंधळेंहतिरूमाजलें॥कींडुकरवनीं
खव्ळीसआलें॥ कींबस्तथांवेबळें॥ थडकाद्यावयाभलत्यासी॥७४॥ कींलडियेसदादेपुर॥ कींमद्यपानेंमाज-
लेवानर॥ कींनीचासभाग्यआलेंअपार॥ मगतोनमानीकोणातें॥७५॥अंत्यजासीराज्ययेत्त॥ कींवेश्यापति
व्रताह्मणवित॥ कींविप्रवेषधरूनगुप्त॥ मेंदहिंडेयात्रेमध्यें॥७६॥ कोल्हाटीअसिलताघेउनी॥ तळपेपरिन
तगेरणीं॥ याणेंविप्रनिरुत्तरकरुनी॥ पाताळींबंदीघातले॥७७॥अष्टावक्राचेबोलरसाळ॥ त्यावरीबाळभा
षणकोमळ॥जनकासीआनंदप्रबळ॥ परमादरऐकावया॥७८॥ ह्मणेयाबंदीसविशेष॥ होताविद्येचाउत्क
र्ष॥ तोगर्वसांडावयानिःशेष॥ अष्टावक्रबराआला॥७९॥ उघडोनिश्रवणाचेंश्रवण॥ सभाबैसलीसावधान
यावरीबंदीप्रतीतीक्ष्ण॥ अष्टावक्रबोलतसे॥८०॥ ह्मणेतूंपढिलासिरेकाये॥ त्याचींनावेंघेलवलाहें॥ बंदी
ह्मणेषट्शास्त्रेंपाहें॥ मुखोद्गतमजअसती॥८१॥ अष्टावक्रह्मणेन्यायशास्त्र॥ पूर्वींचगोतमबोलिलापवित्र
मीमांसाहीअपार॥ जयमिनीबोलिलासे॥८२॥ सांख्यशास्त्रकपिलमुनी॥ पूर्वींचगेलासेबोलुनी॥ पातंज-
लदुर्वासकरुनी॥ गेलासेपहिलेंचि॥८३॥ पाणिनीयवदलाव्याकरण॥ वेदांतवदलासत्यवतीनंदन॥ हेंचिसि
द्धआहेपूर्वींहुन॥ तूंतेंकायबोलसी॥८४॥ तरितूंएकस्यापींपरिपूर्ण॥ ज्यावरीदुसरेंनचलेवचन॥ मगमीदोनी
स्थापिन॥ ज्यावरीतिसरेंचालेना॥८५॥ ऐसातूंकोठवरीचालसीसत्य॥ तेंऐकोतनृपआणिसभात॥ यावरी
एकबंदीस्थापित॥ तेंसावचित्तपरिसधर्मा॥८६॥ सूर्यआकाशसमुद्रधरणी॥ अग्निइंद्रकाळआदिकरुनी॥

हें एक चित्रिभुवनीं ॥ दुसरी प्रतीनाहींच ॥ ८७ ॥ अष्टावक्र ह्मणे ते समयीं ॥ दोन्ही स्थापितों एकलवलाही ॥ प्रकृ
तिपुरुष दोघें पाहीं ॥ अश्विनीकुमार दोघेचि ॥ ८८ ॥ नारद पर्वत दोघेजण ॥ दोनी पक्ष दोनी अयन ॥ पूर्व उत्तर मी
मांसा जाण ॥ सगुण निर्गुण दोघेचि ॥ ८९ ॥ बंदी बोले सरसावोन ॥ सत्व रज तम तिघेजण ॥ त्रिताप त्रिविध भे
द पूर्ण ॥ त्रिकांड संपूर्ण वेदकीं ॥ ९० ॥ त्रिदोष तीन लक्षण ॥ आदि मध्य आणि अवसान ॥ चवथें काय संपूर्ण ॥
बोल आतां यावरी ॥ ९१ ॥ अष्टावक्र बोले उत्तम ॥ चारी वर्ण चारी आश्रम ॥ चारी देहावस्था परम ॥ तत्ववेत्ते बो
लती ॥ ९२ ॥ खाणी चारि वाणी वेद ॥ स्थानें अभिमान भोग प्रसिद्ध ॥ चारी वाद्यें अन्नें चतुर्विध ॥ चारी मुक्ति युगें चा
री ॥ ९३ ॥ यावरी बोले बंदी वाणी ॥ सभ्य आवसथ्य गार्हपत्य आह्वनी ॥ दक्षिणाग्नी सहित पंचाग्नी ॥ पूर्वी हून
स्थापिले ॥ ९४ ॥ यज्ञ पंच भूतें जाण ॥ एक एक भूतीं पांच पांच गुण ॥ पंच प्रळय पंचकोश पूर्ण ॥ पंच मुद्रा पंच वन
द ॥ ९५ ॥ यावरी अष्टावक्र बोलत ॥ साहा कृत्तिका साहा ऋतु ॥ षडूर्मी षड्रिपु सत्य ॥ षड्रस षड्विकार ॥ ९६ ॥
षट्चक्रें षट्कर्म ॥ षड्गुण ऐश्वर्य निरुपम ॥ षड्भाया सहित उत्तम ॥ ही राग जाण पां ॥ ९७ ॥ साहा याग साहा द
क्षिणा ॥ साही अवधानें अनुक्रमें जाणा ॥ आतां सात बोलें विचक्षणा ॥ सूतपुत्रा वादका ॥ ९८ ॥ बंदी ह्मणे सप्त ऋ
षी सप्त धातू सप्त स्वर ॥ सप्त रंग सप्त द्वीपें सुंदर ॥ सप्त पाताळें सप्त समुद्र ॥ सप्त भूमिका चिरंजीव पैं ॥ ९९ ॥ स
भा सप्तांग लक्षण ॥ सप्त चक्रवर्त्ती सप्त पुऱ्या जाण ॥ सप्त संस्थानें सप्त ग्राम पशु जाण ॥ अरण्य पशु सप्त ही ॥
१०० ॥ अष्टावक्र ह्मणे अष्ट पाश ॥ अष्ट वसु दिक्पाळ विशेष ॥ अष्ट नायका अष्ट भोग सुरस ॥ अष्ट मद अष्ट भा
व ॥ १ ॥ अष्ट महासिद्धी अष्ट भैरव ॥ अष्टधा प्रकृती अष्ट गण भाव ॥ अष्ट दिग्गज अष्टांग योग अपूर्व ॥ अष्ट पदें
शरभासी ॥ २ ॥ मुक्तें निपजती अष्ट स्थानीं ॥ अष्टकोण मंडप अष्ट वर्ग लग्नीं ॥ यावरी बंदी ते क्षणीं ॥ नवम प्रका
र वर्णित ॥ ३ ॥ समिधा नव प्रकार ॥ नवविध रत्नें नव रस साचार ॥ नवविध भक्ती नव लग्न प्रकार ॥ नव नारा य

णनवखंडें ॥ ४ ॥ नवांकनवविधीजाण ॥ नवभद्रपूजानवसत्गुण ॥ यावरीदशमलक्षण ॥ अष्टावक्रबोलतसे ॥ ५ ॥
दशलक्षणेंदशावतार ॥ दशदिशादशेंद्रियेंसाचार ॥ दशदर्भदशचिन्हींमंडितविप्र ॥ क्षत्रियनिर्धारदशलक्षणी
॥ ६ ॥ दशनामेंमंडितनमस्कारी ॥ दशधाभेदशरीरीं ॥ यावरीअकरावेंनिर्धारीं ॥ बंदीकायबोलत ॥ ७ ॥ यागींपशु
एकादश ॥ मनसहितकरणेंविशेष ॥ एकादशरुद्रएकादशरूपेंनिःशेष ॥ अवतरलासेजाणपां ॥ ८ ॥ एकादशधा
रासतेज ॥ यावरीतोअष्टावक्रमहाराज ॥ कायबोलततेजःपुंज ॥ बाराप्रकारऐकाते ॥ ९ ॥ द्वादशराशीगुरुचिन्हें
निःशेष ॥ द्वादशमित्रद्वादशमास ॥ भुजंगप्रयातछंदअक्षरेंद्वादश ॥ द्वादशप्रकारबोलिले ॥ १० ॥ यमाचींद्वाद
शलक्षणें ॥ नियमाचींद्वादशजाणणें ॥ यावरीअष्टावक्रह्मणे ॥ बंदीबोलत्रयोदशतूं ॥ ११ ॥ बंदीउगाचअधोवद
न ॥ वरतेंनपाहेबोलेवचन ॥ अष्टावक्रआनंदघन ॥ सभासंपूर्णसंतोषली ॥ १२ ॥ अष्टावक्रह्मणेबंदीसी ॥ कां
रेप्रतिउत्तरनदेसी ॥ तेरास्त्रियाकश्यपासी ॥ कांरेनेणसीशतमूर्खा ॥ १३ ॥ अष्टावक्रह्मणेजगतीछंदविशेष
त्याचींअक्षरेंत्रयोदश ॥ केशिदैत्ययुद्धतेरादिवस ॥ द्विपतेराजातीचे ॥ १४ ॥ तेरावीतिथीश्रेष्ठ ॥ तेरारूपेंवा-
मूचींवरिष्ठ ॥ त्रयोदशगुणीअविट ॥ महापुरुषजाणपें ॥ १५ ॥ बंदीनेदीप्रतिउत्तर ॥ रायासह्मणेअष्टावक्र ॥ या
हातींआणवींविप्र ॥ किंवासमुद्रींबुडवींहा ॥ १६ ॥ बंदीअभाग्यतूंदेख ॥ जन्मूनिकायकेलेंसार्थक ॥ विद्याभ्या
सेंनरक ॥ साधनकेलेंतुवांकीं ॥ १७ ॥ यापापाचेझाडें ॥ यमपुसेलकींतुजपुढें ॥ तेव्हांमगहोसीलवेडें ॥ चहूंकडे
विलोकिसी ॥ १८ ॥ बंदीहोऊनसद्गदित ॥ अष्टावक्राचेचरणधरित ॥ ह्मणेमीअन्यायीयथार्थ ॥ विप्रबहुत
छळियेले ॥ १९ ॥ वरुणाचायागजालापूर्ण ॥ येतीलसमस्तब्राह्मण ॥ मीमारिलेनाहींद्विजजन ॥ आतांयेऊ
नभेटती ॥ २० ॥ तोंपाताळींहूनविप्रमेळो ॥ मिथिलानगराप्रतीआला ॥ अष्टावक्रेंबंदीजिंकिला ॥ कळलेंसर्व
विप्रांसी ॥ २१ ॥ ह्मणतीधन्यअष्टावक्र ॥ धन्यमहाराजविद्यापात्र ॥ धन्यमाउलीचीकुशीपवित्र ॥ ऐसापुत्रप्र

सवली ॥२२॥ धन्यधन्यत्याचेंज्ञान ॥ धन्यत्याचेंअनुष्ठान ॥ बंदीवादींजिंकोन ॥ सोडविलेंतेणेंआह्मां ॥२३॥ अ
ष्टावक्राचेंदर्शनघेउन ॥ वंदूंत्याचेआदींचरण ॥ धाकुटाबाळपरिपरमसगुण ॥ अगाधपणविद्येचें ॥ २४॥ चिम
णाचिदिसेवासरमणी ॥ परिप्रकाशेंभरलीधरणी ॥ वामनधाकुटाबळिसदनीं ॥ त्रिभुवनआटिलेंतीनपदीं
॥२५॥ धाकटेंचिदिसेवज्र ॥ परिमहानगकेलेचूर ॥ धाकुटाचिकलशोद्भवविप्र ॥ परिसागरप्राशिला ॥२६॥
धाकटेंचिउत्तमरत्न ॥ कायकरावेथोरपाषाण ॥ केतकीचेंलघुपत्रजाण ॥ कायकारणथोरासी ॥२७॥ ऐसें
धरामरबोलत ॥ जनकमंडपाआलेसमस्त ॥ अष्टावक्रआज्ञापित ॥ जनकरायासतेकाळीं ॥२८॥ साष्टांगें
नमूनसर्वब्राह्मण ॥ षोडशोपचारेंकरावेंपूजन ॥ अपेक्षितदेऊनधनधान्य ॥ आशीर्वादघेईंविप्रांचे ॥२९
जनकेंतेसेंचिकरून ॥ संतोषविलेसमस्तब्राह्मण ॥ विप्रतेव्हांबहुतस्तवन ॥ अष्टावक्राचेंकरितेजाले ॥३०
विप्रनमितीअष्टावक्रासी ॥ येरूसाष्टांगेंनमीतयांसी ॥ परिनामाभिधानेंसर्वांसी ॥ पुसेआधींअष्टावक्र
॥३१॥ पितानमीळआपणा ॥ ह्मणोनिपुसेनामाभिधाना ॥ तोंकहोळआलादर्शना ॥ अष्टावक्राचेतेकाळीं
॥३२॥ अष्टावक्रह्मणेनामकाय ॥ येरूह्मणेमीकहोळहोय ॥ ऐसेंऐकतांलवलाहें ॥ बाळघालीलोटांगण ३३
उभाठाकलाकरजोडून ॥ ह्मणेतुह्मीनकाकरूंनमन ॥ कहोळह्मणेतूंकोणाचानंदन ॥ धन्यनिधानजन्मला
सी ॥३४॥ येरूह्मणेमीतुझापुत्र ॥ शरीरतवशापेंअष्टावक्र ॥ पूर्वस्मरोनकहोळविप्र ॥ शोकेंव्याकुळजाहला
॥३५॥ अष्टावक्रासत्हृदयींधरून ॥ कहोळकरीदीर्घरुदन ॥ ह्मणेम्याऐसेंनिधान ॥ मतिमंदेंकायशापिलें ॥
३६॥ गर्भींचिज्यासीएवढीस्फूर्ती ॥ महाज्ञानीअगाधकीर्ती ॥ जळोक्रोधमहापापमती ॥ बाळम्यांकेसाशा-
पिला ॥३७॥ असोनिजांकींघेऊनबाळ ॥ मस्तकअवघ्राणूनिकहोळ ॥ भोंवतेविप्रसकळ ॥ आनंदमयपाह
ती ॥३८॥ मगपित्याचेंसमाधान ॥ अष्टावक्रकरीसुजाण ॥ ह्मणेशरीरप्राक्तनाधीन ॥ त्याचेंसुखदुःखका

यसें ॥ ३९ ॥ शरीरवक्रकिंवासरळ ॥ कृशकिंवाहेंस्थूळ ॥ एवंमृत्तिकाकेवळ ॥ आत्मानिर्मळअविनाश ॥ ४० ॥ येणें
जाणेंजिणेंमरण ॥ आत्म्यासनाहींशरीरकारण ॥ जैसेंघटमठसंगेंगगन ॥ व्यापूनवेगळाअसिजे ॥ ४१ ॥ अ-
ष्टावक्राचियेचरणीं ॥ जनकलागेतयेक्षणीं ॥ महाराजतूंपूर्णमुनी ॥ दिव्यज्ञानबोलकां ॥ ४२ ॥ बंदीच्यासंगें
करून ॥ तृप्तझालेंमाझेंमन ॥ वादविवादऐकोन ॥ परमश्रमपावलों ॥ ४३ ॥ बंदीवंदूनिसर्वांसी ॥ गेलोतेव्हां
वरुणापासीं ॥ यावरीराजाजनकासी ॥ अष्टावक्रबोलत ॥ ४४ ॥ चतुर्दशसहस्त्रब्राह्मण ॥ ऐकतीतेव्हां-
सावधान ॥ अष्टावक्रपीयूषघन ॥ वर्षिताजालाउदारत्वें ॥ ४५ ॥ ह्मणेसकळनृपचक्रचूडामणी ॥ वेदांतज्ञा
नऐकश्रवणीं ॥ मननकरितिनिदिध्यासकरुनी ॥ साक्षात्कारीसमरसें ॥ ४६ ॥ मुक्तिइच्छिसीजरीमनीं
तरीविषयविषवत्सर्वमानीं ॥ किंवावमनदेखोनी ॥ विटेजैसेंमानस ॥ ४७ ॥ कींउरगधुसधुसित ॥ त्या
वरीजैसानघालवेहात ॥ कींव्याघ्राचियागृहांत ॥ वस्तीजैसीनकरवे ॥ ४८ ॥ कांचनरसनकरवेप्राशन ॥
तैसेंविषयींविटेलमन ॥ मगस्वरूपींसमाधान ॥ पावसीलतत्वता ॥ ४९ ॥ ऐकरायासार्वभौमा ॥ ज्ञाना
चेंआभरणक्षमा ॥ जैसीपतिव्रताविणरमा ॥ व्यर्थसुंदरकासया ॥ ५० ॥ क्षमेविणवैराग्य ॥ जेविनटेंघेत-
लेंवरिवरीसोंग ॥ कींप्रेतासभोगविलेभोग ॥ उपहासव्यर्थचि ॥ ५१ ॥ सर्वभूतांचेंआर्जव ॥ कोणासीन
करावाविपरीतभाव ॥ हेंचराचरसर्व ॥ आपणचिहोइजे ॥ ५२ ॥ सर्वभूतींदया ॥ ज्ञानाचेंसर्वलक्षणराया
सत्यबोलणेंसत्यक्रिया ॥ कायावाचामानसें ॥ ५३ ॥ जेथेंपरिपूर्णज्ञान ॥ ज्ञानतेथेंचिविज्ञान ॥ विज्ञानीं
चसमाधान ॥ संतोषरूपसर्वदा ॥ ५४ ॥ संतोषतेथेंशांती ॥ शांतीतेथेंअभेदभक्ती ॥ भक्तीतेथेंविरक्ती
आनंदेंसींक्रीडत ॥ ॥ ५५ ॥ आनंदतेथेंसदाबोध ॥ बोधतेथेंसमाधिशुद्ध ॥ समाधीतेथेंब्रह्मानंद ॥ सुख
आलेंहातासी ॥ ५६ ॥ जैसाजीवासुधारसदुर्लभदृष्टी ॥ दैवेंदेखिल्याघातलीमिठी ॥ तैसीअद्वैतींआवडी

मोठी॥ नआणींपोटींदुसरी॥ ५७॥ निरपेक्षव्हावेंमानस॥ नांदेत्हृदयींउल्हास॥ प्रपंचआहेकिंवाबुडालानिः
शेष॥ नाहींस्मरणतयाचें॥ ५८॥ दशेंद्रियेंपंचप्राण॥ अष्टप्रकृतीचेंनाहींस्मरण॥ ब्रह्मानंदेंआनंदवन॥ न
सेभानदुसरें॥ ५९॥ पैंहामूर्खहाचतुर॥ हाद्विजन्माहाशूद्र॥ हादेहीहाविदेहीथोर॥ नाठवेचतयातें॥ ६०॥
घटमठव्यापूनिउत्तम॥ अखंडअद्वैतजैसेंव्योम॥ तैसेंस्वस्वरूपसम॥ आपणासहितपाहती॥ ६१॥ तोभे
दाभेदरहित॥ पुण्यपापासविवर्जित॥ निःसंदेहगुणातीत॥ अमूर्त्तमूर्त्तपुरुषतो॥ ६२॥ सुसेंतआटिलेअ-
ळंकार॥ तेथेंनदिसेद्वैतविकार॥ कींघटमठत्यागेंअंबर॥ सुवर्णचअभेदजैसेंकां॥ ६३॥ जस्यानानावर्णगाई
परिदुग्धींपालटनाहीं॥ कींनानासलिलेंमेळवितांही॥ ऐक्यहोतेंअभेदत्वें॥ ६४॥ जैसेंसैंधवमिळालेंसागरीं
शब्दनिमालाअंबरीं॥ तैसातोस्वरूपींनिर्धारीं॥ विश्वासहितविराला॥ ६५॥ हेंकरणेंहेंनकरणें॥ कांहींचने
णतीत्याचींकरणें॥ हारकींविखारपाहणें॥ निद्रिस्थाजेवींघडेना॥ ६६॥ मनबुद्धीअहंकार॥ कर्त्ताक्रियाक
र्मसमग्र॥ मावळतीतयांचेविकार॥ त्रिपुट्यातेथेंविराल्या॥ ६७॥ बाल्यतारुण्यवृद्धपण॥ हेंत्यासनाहींसु-
र्वोहुन॥ जीवशिवहेंमायाभान॥ मुळाहूनविरालें॥ ६८॥ जागृतीस्वप्नसुषुप्तीग्रासुन॥ समशेजेनिजलापूर्ण
तुर्याउन्मनीवोलांडुन॥ पूर्णानंदअभेदतो॥ ६९॥ स्थूळसूक्ष्मकारण॥ स्थावरजंगमनिरसून॥ पावलास्व-
रूपींसमाधान॥ साध्यसाधनआटलें॥ ७०॥ रूपरेखास्थानमान॥ वर्णावर्णआश्रमजाण॥ धारणाध्यानम
नन॥ विरोनगेलींतयाचीं॥ ७१॥ दृश्यद्रष्टादर्शन॥ श्वेतपीतआरक्तपूर्ण॥ वेदशास्त्रपुराण॥ पाहतांपाहणेंवि
रालें॥ ७२॥ मंत्रजपतपयज्ञ॥ विरालासर्वहीगळून॥ अधोर्ध्वओतपोतभान॥ गेलेंविरोनसर्वही॥ ७३॥ जन
ककरीतप्रश्न॥ हेंनिर्वाणदीक्षापरिपूर्ण॥ अंगींबैसावयाकारण॥ सांगावेंतेंदयार्णवें॥ ७४॥ त्यासप्रथमपाय
रीकोण॥ तोअनुक्रमसांगावापरिपूर्ण॥ यावरीअष्टावक्रकृपाघन॥ बोलताझालाऐकातें॥ ७५॥ सप्तभूमि-

कावेदांतपूर्ण॥ सांगीतल्याऐकासावधान॥ शुभेच्छाप्रथमजाण॥ विचारणानामदुसरी॥ ७६॥ तनुमानसा
तिजीनिश्चिती॥ चवथीजाणेसत्वापत्ती॥ पांचवीतेअसंसक्ती॥ पदार्थाभावनीसहावीहोय॥ ७७॥ तुर्यगासा
तवीपूर्ण॥ आतांऐकपहिलेंलक्षण॥ शुभेच्छाह्मणतीजीलागुन॥ ऐकविवरणतयेंचें॥ ७८॥ माझेंमूढत्वकेंजा
इलसमस्त॥ केव्हांभेटतीसाधुसंत॥ कैंमजहोईलज्ञानप्राप्त॥ तळमळमनांतवाटल्ये॥ ७९॥ आंगींवैराग्यअ
सेसरस॥ सर्वपदार्थावरीजोउदास॥ शरणरिघेसद्गुरुस॥ शुभेच्छायासह्मणावें॥ ८०॥ आचार्यमुखेंकरून
करीवेदशास्त्रश्रवण॥ तदनुसारकरीसाधन॥ विचारणाजाणदुसरीहे॥ ८१॥ मनविषयींहोयविरक्त॥
प्रवृत्तशास्त्रींनुपजेहेत॥ श्रवणीआवडीबहुत॥ तनुमानसातिसरीहे॥ ८२॥ मुख्यकरीआधींश्रवण॥ म
गश्रवणासहितमनन॥ श्रवणमननबिंबतांपूर्ण॥ निदिध्यासमगजडे॥ ८३॥ हींतीनीचदतांहातासी॥ तो
चिपावलासाक्षात्कारासी॥ महावाक्यतत्वमसी॥ विचारासीपावेतो॥ ८४॥ ज्ञानेंनिरसिलेंअज्ञान॥ वि-
श्रांतीसपावलेंमन॥ सत्वापत्तीसंपूर्ण॥ चवथीभूमीजाणिजे॥ ८५॥ सर्वपदार्थदेखत॥ परिकोठेंहिनगुंते
चित्त॥ आनंदरूपसर्वदावर्त्तत॥ असंसक्तीपांचवीहे॥ ८६॥ पंचभूमिकाभ्यासेंकरून॥ पदेंविसरलापदा
र्थज्ञान॥ सर्वचिन्मात्रचिभासेपूर्ण॥ पदार्थाभावनीसहावीहे॥ ८७॥ साहीभूमिकांचाबोध॥ निरसलेसर्व
भेदाभेद॥ स्वस्वरूपदेखेप्रसिद्ध॥ तुर्याभूमीसातवीहे॥ ८८॥ याभूमीसांगीतल्यासप्त॥ कोणतोकोणेभू
मीसराहत॥ कोणकितीभूमीओलांडित॥ जाणतीमहंततत्ववेत्ते॥ ८९॥ याभूमिकासाधितांसत्वर॥ जाला
नसतांसाक्षात्कार॥ तोमावळलाआयुष्यदिनकर॥ देहपतनजाहलें॥ ९०॥ साधूदेहांतकाळींपूर्ण॥ ह्मणेराहि
लेंमाझेंआत्मसाधन॥ मगकरूनभगवत्स्मरण॥ देहत्यागीसाधकतो॥ ९१॥ सत्यलोकवैकुंठकैलास॥ तेथें
वासकरीबहुदिवस॥ तुझेंसुकृतसरलेंत्यास॥ कोणीनह्मणेकल्पांतीं॥ ९२॥ क्षीणेपुण्येमर्त्यलोकंविशंती॥

हेइतरजीवांचीगती॥ तैसासाधकनव्हेनिश्चिती॥ सदावंदितीदेवत्यांतें॥९३॥ विरंचीसहस्त्राक्षमृगवाहन
हरिहरादिपदेंस्वइच्छेंपावोन॥ तेथेंहीत्यानेंविटेमन॥ ह्मणेराहोनकाययेथें॥९४॥ मगतोकर्मभूमीसउत
रून॥ त्यासयोगीकुळींहोयजन्म॥ मातापितायोगीपूर्ण॥ अंतीपावनदोनवंश॥९५॥ प्रारब्धेंहोयऐश्वर्यवंत
भोगभोगितांविरागबहुत॥ उरल्याभूमिकांसतोझगटत॥ साक्षात्कारव्हावयासी॥९६॥ त्यासप्रतिष्ठादेखो
न॥ वाटेसकळविष्ठेसमान॥ वांतीदेखोनविटेमन॥ विषयींजाणतेसातो॥९७॥ मगआचार्यवाक्येंसत्वर॥
वेगेंपावेतोसाक्षात्कार॥ दग्धपटवत्‌शरीर॥ भासमात्रउरलासे॥९८॥ तोयोगभ्रष्टअद्भुत॥ सप्तभूमीस
झेंपावत॥ जैसेंपळेंपळेंचढत॥ मित्रमंडळत्वरेनें॥९९॥ कींबीजेपासूनरोहिणीपती॥ कळाविशेषवाढती॥
कींअभ्यासेंकरूनवाढेमती॥ पंडिताचीविशेष॥२००॥ कींवटबीजापासूनअंकुर॥ भेदितजेविअंबर॥ कीं
गोमतीधांवेसत्वर॥ सागरासभेटावया॥१॥ कींअग्रापासूनमूळपर्यंत॥ इक्षुदंडगोडलागत॥ कींतपआ
चरतांशुचिष्मंत॥ वाटेअद्भुतपुण्यपें॥२॥ कींस्नेहादरेंधरितांबहुत॥ मित्रत्वअत्यंतवाढत॥ कींपरोपका
रेंअद्भुत॥ यशवाढेत्रिलोकीं॥३॥ तैसायोगभ्रष्टजाण॥ सदाब्रह्माभ्यासेंकरून॥ दयाक्षमाशांतीपूर्ण॥ दि
वसेंदिवसवाढती॥४॥ सप्तभूमिकाजिंकून॥ तोनिर्द्वंद्वविजयीअनुदिन॥ संचितआणिक्रियमाण॥ दग्ध
जाहलींतयाचीं॥५॥ तोदेहींचविदेहीपूर्ण॥ देहमिथ्यात्वेंगेलानिरसुन॥ तरीप्रारब्धकोठोन॥ उरलेंत्या
सीसांगपां॥६॥ आपल्यास्वसुखेंविचरत॥ जेविसागरींलहरीअभेदक्रीडत॥ कींसुवर्णमूर्तीसत्वासयेत
तैसावर्ततयोगीतो॥७॥ मगत्याचादेहपडोतीर्थीं॥ अथवाश्वानसृगालभक्षिती॥ परीयोगियासगर्भस्थि
ती॥ कल्पांतीहीनव्हेचि॥८॥ जैसेंउदकींमिळेलवण॥ कींजळगाराजायजळींविरोन॥ कींसागरामाजीये
उन॥ मेघधारामिसळती॥९॥ कींनादविरेनिराळीं॥ कींकर्पूरज्योतीएकजाली॥ कींझांकिलियेघटींविराली

दीपकळिकाजैसीकां ॥ १० ॥ ऐसातोमहाराज ॥ पावलानिर्वाणस्वशेज ॥ हेंजनकरायातुज ॥ दिव्यज्ञानक
थियेलें ॥ ११ ॥ हेंचिदीक्षामनींधरीं ॥ वादप्रतिवादकदानकरीं ॥ याचबोधेंअंतरीं ॥ ब्रह्मानंदतृप्तहोय ॥ १२ ॥
तुजपंचशीर्षाचेंहोईलदर्शन ॥ याज्ञवल्क्यकथीलज्ञान ॥ तेंचित्तूंहृदयींधरून ॥ विदहत्वेंविचरेंकां ॥ १३ ॥
जनकेंदृढधरिलेचरण ॥ केलेंअष्टावक्राचेंपूजन ॥ चतुर्दशसहस्रब्राह्मण ॥ स्वस्थानाप्रतीगेले ॥ १४ ॥ सवें
श्वेतकेतुमातुल ॥ महाराजतोपिताकहोळ ॥ अष्टावक्रनिघालातत्काळ ॥ स्वस्थानासीआपल्या ॥ १५ ॥ कहो
ळपुत्राकडेपाहुन ॥ कळवळलेंत्याचेंअंतःकरण ॥ ह्मणेयाचेंवक्रपण ॥ दूरकरूंयावरी ॥ १६ ॥ अष्टावक्रासह्म
णेकहोळ ॥ हेमधुबिळानदीनिर्मळ ॥ स्नानकरींतूंसकळ ॥ समअंगेंतुझीहोती ॥ १७ ॥ लोमशह्मणेधर्मराया ॥
अष्टावक्रेंपित्यासनमूंनिया ॥ स्नानकरितांदिव्यकाया ॥ अंगेंसमजाहलीं ॥ १८ ॥ कहोळपरमसंतोषोन ॥
हृदयींआलिंगिलानंदन ॥ यावरीनिजाश्रमपावोन ॥ सुखरूपराहिले ॥ १९ ॥ अष्टावक्राचेंगेलेंवक्रपण ॥ स
मंगानदीहेतेथपासुन ॥ सहकुटुंबेंकरींस्नान ॥ धर्मराजायेथेंआतां ॥ २० ॥ मगबंधुसहितयुधिष्ठिर ॥ स्नान
करीतेथेंसत्वर ॥ कृष्णाकृष्णाभगिनीकृष्णापवित्र ॥ स्नानकरीयथाविधी ॥ २१ ॥ तीर्थविधीसारून ॥ पुढेंचा
लिलेपृथानंदन ॥ हेंअष्टावक्रोपाख्यान ॥ लोमशानींकथियेलें ॥ २२ ॥ ब्रह्मानंदासगुणगंभीरा ॥ श्रीधरव
रदारुक्मिणीवरा ॥ श्रीमद्भीमातटविहारा ॥ अनंतनेत्राअभंगा ॥ २३ ॥ स्फुरसपांडवप्रतापग्रंथ ॥ वनप
र्वव्यासभारत ॥ त्यांतीलसारांशयथार्थ ॥ सविसाव्यांतकथियेला ॥ २४ ॥ इतिश्रीपांडवप्रतापग्रंथ ॥ वन
पर्वटीकाश्रीधरकृत ॥ अष्टावक्राख्यानसमस्त ॥ लोमशसांगेधर्मासी ॥ २२५ ॥ ॥ इतिश्रीपांडवप्रता
पवनपर्वेषड्विंशोऽध्यायः ॥ २६ ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥

श्रीगणेशायनमः॥ ॥अष्टावक्राचेंआख्यान॥मागेंसंपलेंसंपूर्ण॥यावरीलोमशाप्रतीपंडुनंदन॥धर्म
राजबोलत॥१॥याज्ञवल्कीनेंज्ञान॥उपदेशिलेंजनकालागुन॥तीपुण्यकथासांगपूर्ण॥करूंश्रवणसर्वही
॥२॥मार्गेजातांक्रमेलवेळ॥मुनीबोलेतीकथारसाळ॥यावरीलोमशपुण्यशीळ॥सुरसइतिहाससांग
तसे॥३॥दत्तात्रेयशुककपिलमुनी॥चौथायाज्ञवल्कीनिर्वाणज्ञानी॥ज्याचामहिमावेदपुराणीं॥वर्णि
जेअत्यादरें॥४॥योगभ्रष्टउत्पन्नज्ञानी॥याज्ञवल्कीमहामुनी॥वेदविद्येलागुनी॥ऊर्ध्वरेतागुरूकेला॥
॥५॥तेथेंकेलेंवेदपठण॥विधियुक्तअर्थपाहिलासंपूर्ण॥परिझालेंनाहींसमाधान॥ब्रह्मविद्येवांचुनी॥
६॥सकलविद्यांमाजिमुकुटमणी॥अध्यात्मविद्याज्ञानखाणी॥त्याविद्येलागिंदिवसरजनी॥गुरुसेवाक
रीबहु॥७॥तोब्रह्मविद्येचादाता॥तोगुरुनव्हेचितत्वता॥कर्मकांडींकुशळजाणता॥मीमांसकपुरतागुरुतो
॥८॥तोजनकरावपरमसज्ञान॥पोटींनाहींपुत्रसंतान॥बहुतयज्ञअनुष्ठान॥करीकदानव्हेचि॥९॥तोंघरा
सआलाएकद्विज॥तेणेंजनकासीसांगीतलेंगुज॥त्यायाज्ञवल्कीच्याअक्षतासतेज॥जरीमस्तकींपडती
तुझ्या॥१०॥तरीहोईलतत्काळसुत॥ऐकतांतोषलानृपनाथ॥मगधातृऋषीसमर्थ॥गेलादर्शनात्यानि
या॥११॥ऋषीससाष्टांगेंनमून॥जनकविनवीकरजोडुन॥तुमचायाज्ञवल्कीशिष्यसुजाण॥धाडाभोज
नाआमच्येयेथें॥१२॥ऋषिह्मणेतोव्रतस्थ॥येईलकींनयेईलतेथ॥तरीएकसांगतोंसुख्यार्थ॥तोचक-
रींनिर्धारें॥१३॥सप्तशतशिष्यपरियेसीं॥एकेकबोलावींप्रतिदिवसीं॥ज्येष्ठापासुनअनुक्रमेंसी॥शेव
टवरीपूजींकां॥१४॥याज्ञवल्कीचायेतांदिवस॥आपणचयेईलतोनेमास॥ऐकतांतोषलामिथिलाधीश
ह्मणेअवश्यऋषिवर्या॥१५॥प्रथमदिवसींपट्टशिष्य॥पूजीभोजनदेऊननरेश॥त्याच्यामंत्राक्षताविशेष॥
मस्तकींधरीआदरें॥१६॥ऐसेंचनित्यकाळहोत॥एकशिष्यभोजनकरूनजात॥परियाज्ञवल्कीचादिवसस

त्य ॥ नकळेकोणतानिश्चयें ॥ १७ ॥ त्याहीमाजिएकादेदिवसीं ॥ रावगुंतेराज्यकार्यासी ॥ किंवाजातमृगये
सी ॥ नसाधेपंक्तीदिवसतया ॥ १८ ॥ जनकसांगेपट्टराणीसी ॥ याज्ञवल्कीयेईलकोणेदिवसीं ॥ बहुतसाव
धानमानसीं ॥ अक्षतामस्तकीं घेयीतूं ॥ १९ ॥ प्रत्यहींयेतब्राह्मण ॥ अक्षतादेतमंत्रून ॥ समीपनसत्तायजमा
न ॥ नृपपत्नीसदेतीमग ॥ २० ॥ तीहीसमीपनसत्तांजाण ॥ राजमंचकींटांकितीनेउन ॥ तोंआपुलादिवसल-
क्षून ॥ याज्ञवल्कीआलाभोजना ॥ २१ ॥ तोंअदृष्टरेखाविपरीत ॥ मृगयेसगेलामिथिलानाथ ॥ राणीझाली
ऋतुस्नात ॥ तोंजेऊनपुसतयाज्ञवल्की ॥ २२ ॥ ह्मणतीअक्षताघ्यावयाकोणी ॥ आहेकींनाहींनृपराणी ॥
याज्ञवल्कीचेंस्वरूपनोळखोनी ॥ राजसेवकबोलती ॥ २३ ॥ राजमंचकींअक्षताटाकोनी ॥ द्विजाजाईआश्र
मालागुनी ॥ परित्तोमहाराजकेवळतरणी ॥ स्वरूपकोणीओळखेना ॥ २४ ॥ समीपअसत्तांनिधान ॥ अभा
ग्यासनकळेपूर्ण ॥ कींपुढेंपडलेंदिव्यरत्न ॥ अंधजैसानेणेचि ॥ २५ ॥ असोशयनशाळेंत ॥ याज्ञवल्कीअक्ष
ताटांकित ॥ मंचकस्तंभींजाऊनपडत ॥ महिमाअद्भुतकोणीनेणे ॥ २६ ॥ शयनशाळाघेतलीझांकून ॥ याज्ञव
ल्कीगेलाआश्रमालागुन ॥ नृपआलामृगयाकरून ॥ शयनस्थानीप्रवेशला ॥ २७ ॥ तोंस्तंभमंचकासीअभि
नव ॥ कोमळफुटलेपल्लव ॥ आश्चर्यकरीजनकराव ॥ निकटसेवकबोलाविले ॥ २८ ॥ शयनशाळेंतआलाहो
ताकोण ॥ सेवकबोलत्तीकरजोडून ॥ नित्यावळीचाब्राह्मण ॥ अक्षताटांकूनगेलाजी ॥ २९ ॥ जनकशोककरी
तपाहे ॥ ह्मणेयाज्ञवल्कीपूर्णहोये ॥ कारणज्याकाष्ठींलवलाहें ॥ नवपल्लवफुटलेकीं ॥ ३० ॥ गहनकर्मगत्तीवि
चित्र ॥ मजकैंचाआतांपुत्र ॥ महाराजतोपुण्यपवित्र ॥ दर्शनहीमजनव्हेचि ॥ ३१ ॥ अहावाउगीगोष्टजाली
कामधेनुसदनाप्रतिआली ॥ तेकाष्ठप्रहारेंमारूनपिटिवली ॥ परीकेलीतैसीचि ॥ ३२ ॥ ध्रुवणह्मणोनिअमृ
त ॥ अभागीउकर्डावोतित ॥ चिंतामणीगोफणींत ॥ दरिद्रीजैसाघालवी ॥ ३३ ॥ गृहासपातलासुपर्ण ॥ काग

ह्मणोनमारिलापाषाण॥कींपरिसजैसाफोडून॥पायरीसीघातला॥३४॥कल्पवृक्षदैवेंभेटला॥कुडाह्मणो
नितोतोडिला॥तैसायाज्ञवल्कीनवोळखिला॥हतदैवांहीकोणीही॥३५॥मागुतीऋषिजवळीजाउन॥जन
कघालीलोटांगण॥ह्मणेएकदांमागुत्यान॥याज्ञवल्कीधाडिजे॥३६॥ऋषिह्मणेतोपरमहट्टीहोय॥सर्वथा
हीभोजनानये॥जनकश्रमोनिपाहें॥मिथिलेप्रतीगेलाहो॥३७॥ऐकधर्मासावधान॥गुरूकर्मकांडींपरमनि
पुण॥याज्ञवल्कीवेदांतज्ञान॥पुसेत्यासक्षणक्षणा॥३८॥तेंअध्यात्मनकळेत्यासी॥गुरूक्षोभेपरममानसीं
कर्मकांडआचरतांदिननिशी॥संशयउपजेचित्तातें॥३९॥विधिनिषेधपाहतांअपार॥व्याकुळहोयपरम-
विप्र॥विधियुक्तपरमप्रकार॥घडलानाहींवाटेमज॥४०॥मनव्याकुळअत्यंत॥गुरूनेंआरंभिलेंप्रायश्चित्त
परिहून्द्रूआपणअशक्त॥प्रायश्चित्तनाचरवे॥४१॥आणीकहोतेशिष्यबहुत॥त्यांसह्मणेआचराप्रायश्चित्त
मजश्रेयद्यासमस्त॥विधियुक्तकरोनी॥४२॥तोंयाज्ञवल्कीबोलत॥हींतोबाळकेंसमस्त॥मीहेंआचरेंनप्राय
श्चित्त॥आज्ञात्वरितकरणेंजी॥४३॥अभिमानसांडून॥करूंनेणेबोलिलेंवचन॥तोंगुरुक्षोभलादारुण
ह्मणेअभिमानतुजझाला॥४४॥तुजदंडकरीनयथार्थी॥माझीवेदविद्याटाकींसमस्त॥ऐसात्याचागुरुबो
लत॥क्रोधेंसंतप्तकांपतसे॥४५॥मगयाज्ञवल्कीविद्यावमत॥जैसाखदिरांगारधगधगित॥ऋषीतित्ति
रीपक्षीहोत॥विद्याप्राशितआपुली॥४६॥वमिलावेदप्राशित॥तेतैत्तिरीयशाखाभेदहोत॥अद्यापितित्ति
रीपक्षीभक्षित॥विंगव्यांच्याआहारातें॥४७॥गुरूसकरूननमन याज्ञवल्कीनिघालातेथुन॥मगआच
रोनिअनुष्ठान॥निघेशरणसूर्यासी॥४८॥देवतात्रयस्वरूपपूर्ण॥प्रत्यक्षदैवतसूर्यनारायण॥याज्ञवल्की
सहोऊनप्रसन्न॥ब्रह्मविद्याउपदेशिली॥४९॥विदेहीपदलाअद्भुत॥अनुच्छिष्टमात्रसांगत॥अपरोक्षज्ञान
झालेंप्रास॥होयविख्याततिहींलोकीं॥५०॥अध्ययनतपज्ञान॥सर्वविषयींयाज्ञवल्कीपूर्ण॥कीर्तीनेंभर

दादेरव॥ करिती मागें जंबुक॥ आळिका ह्मणती विनायक॥ धरून आणूं क्षणमात्रें॥ ५३॥ यश धैर्य सद्गुण॥ सभा
ग्याचे कर्णीं ऐकोन॥ परम खेद करिती दुर्जन॥ नसतेंच दूषण लाविती॥ ५४॥ एवं निंदे स प्रवर्तले ऋषी॥ ह्मणती सू
र्यें कैसें उपदेशिलें यासि॥ आदित्य जाळील सकळांसी॥ हा तेथें कैसा वांचला॥ ५५॥ देहधारी होऊन सूर्यनारायण॥ यास
कैसें उपदेशिलें ज्ञान॥ मीमांसक हें न मानिती वचन॥ असत्य पूर्ण याज्ञवल्की॥ ५६॥ यास गुरू कैंचा सूर्यनारायण॥
येणेंच स्वर वर्ण भिन्न करून॥ वेद केला जनरंजन॥ जैसें भाषण नटाचें॥ ५७॥ वेद वमूनी गुरुत्यागिला॥ सूर्या·
सकधीं शरण गेला॥ ऐसा ऋषिजन निंदे प्रवर्तला॥ समाचार ऐकिला याज्ञवल्कें॥ ५८॥ परी समाधान रूप चित्त॥
विषाद नुपजे मनांत॥ निंदकांसी प्रीती वादवित॥ भावीत परम मैत्र हे॥ ५९॥ दुर्जनासी प्रीती भाषण॥ हें संतांचें·
मुख्य लक्षण॥ आणि दुसऱ्याचे दोष गूण॥ गेलिया प्राण न बोले॥ ६०॥ जनक इच्छिता झाला मानसीं॥ कीं शरण रि
घावें सद्गुरूसि॥ तरि सर्वज्ञ दयाळू निश्चयेंसिं॥ गुरू तोच करावा॥ ६१॥ यालागीं पूर्ण आत्मज्ञानी॥ जनक राव इच्छी
मनीं॥ सद्गुरू भेटावा ह्मणोनी॥ याग तेणें आरंभिला॥ ६२॥ परम सन्मानें करून॥ बोलाविले समस्त ऋषिजन॥ या
ज्ञवल्की लागुन॥ यागाप्रति आणिला॥ ६३॥ नवग्रहांमाजी मित्र॥ कीं त्रिदशांमाजी इंद्र दिशावर॥ कीं तपियांमाजी
पिनाकधर॥ तैसा ऋषींत याज्ञवल्की॥ ६४॥ यागाचें करू निमिष॥ याज्ञवल्की आणिला घरास॥ शरण रिघा
वें तयास॥ ऐसा अनुताप अंतरीं॥ ६५॥ जन्ममरण गर्भवास॥ संसाराचा आसोस॥ यालागीं शरण रिघावें गुरू
स॥ ऐसें मिथिलेश भावित॥ ६६॥ याज्ञवल्कीस बहुत वंदित॥ निंदीत कोणी दुष्ट किंचित॥ परि हा महाराज रवे
दरहित॥ शरण यास रिघावें॥ ६७॥ याज्ञवल्कीस रिघोन शरण॥ पुसूं जरी आत्मज्ञान॥ तरि बहु ऋषी मिळोन॥
गलबला येथें करितील॥ ६८॥ याज्ञवल्कीचें थोरपण॥ प्रगट दावया तेथें संपूर्ण॥ जनकें मांडिलें विंदान॥ साव
धान परिसावें॥ ६९॥ सुवर्णाच्या सहस्र गाई॥ वत्सासह केल्या तेस मयीं॥ शृंगारोन सकळही॥ दक्षणेस हीन-

देविल्या ॥ ७० ॥ दानकरावयानृपनाथ ॥ दोनोदकझारीकरींघेन ॥ ऋषीबोलाऊनसमस्त ॥ कायबोलतांजोहाला ॥ ७१ ॥ जोब्रह्मवेत्तापूर्ण ॥ निस्पृहआणिसर्वज्ञ ॥ नेणेंचयावेंउठोन ॥ गाईदेईनसर्वत्यासि ॥ ७२ ॥ हेंऐकोनिभूस्कर ॥ करितीआपलेठायींविचार ॥ आह्मींवक्तेनिस्पृहसाचार ॥ केविंउत्तरबोलावें ॥ ७३ ॥ मीब्रह्मवेत्ताह्मणवणें ॥ हेंचआधीलाजिरवाणें ॥ त्यावरीनिस्पृहतांमिरवणें ॥ गाईघेणेंकासया ॥ ७४ ॥ ऐशियागोष्टीकठिण ॥ कोणघेईलगाईदान ॥ त्यासिअत्यंतवादकरून ॥ टाकूंजिंकोनक्षणार्धें ॥ ७५ ॥ जनकह्मणेतत्वता ॥ कांकोणीनउठेब्रह्मवेत्ता ॥ सर्वप्रतिउत्तरनदेतां ॥ अधोमुखपाहाति ॥ ७६ ॥ करावयात्र्यंबकभंजन ॥ उठिलाजेसामित्रकुळभूषण ॥ तैसायाज्ञवल्कीउठोन ॥ उभाराहिलातेवेळे ॥ ७७ ॥ शिष्यालागींआज्ञापित ॥ गायीगृहान्याव्यासमस्त ॥ अळंकारदक्षणेसहित ॥ उचलायेथूनितत्वता ॥ ७८ ॥ याज्ञवल्कीह्मणेजनकाप्रति ॥ ब्रह्मज्ञानानंतस्वयंज्योति ॥ सर्वसाक्षीवेत्तानिश्चिती ॥ शुद्धबुद्धवेगळा ॥ ७९ ॥ सांडूनिसमस्तअहंकृतीसी ॥ ब्रह्मवेत्तातूंपुससी ॥ जोसर्वभूतांतरनिवासी ॥ ब्रह्मवेत्तातोएक ॥ ८० ॥ एकमेवद्वयंनास्ति ॥ ऐसेंबोलेवेदश्रुती ॥ एकावांचूनवस्ती ॥ नाहींदुजयाचीसर्वथा ॥ ८१ ॥ एकोदेवसर्वभूतेषुगाढा ॥ श्रुतीनेंवेदावरीवाहिलामेढा ॥ करूनदृश्याचारगाडा ॥ मतवादीविभांडिले ॥ ८२ ॥ अणुरेणुमहतोमहीयां ॥ ऐसेंश्रुतीबोलेगर्जोनियां ॥ हाअनुभवआंगींजया ॥ उरवूनियांजाणपां ॥ ८३ ॥ स्वप्रत्ययेंबोलेवेदश्रुती ॥ तोआत्मामीपूर्णनिश्चिती ॥ नंवतोअच्युतोहमनंतोहह्मणति ॥ जेवेदांतीमहंत ॥ ८४ ॥ नाहंदेहोनेवमिंद्रियाणि ॥ सर्वातीतमींश्रुतिवारवाणी ॥ केवळब्रह्मस्फूरवाचीखाणी ॥ क्षराक्षरांतमींच ॥ ८५ ॥ अजअव्ययसर्वज्ञ ॥ अवस्थात्रयनिरसोन ॥ जीवशिवाचासाक्षीपूर्ण ॥ आद्यअचळअमळमीं ॥ ८६ ॥ मजयेणेंजाणेंनाहीं ॥ तेथेंजन्ममरणकाई ॥ इंद्रियसुखविसुखपाहीं ॥ विदेहसाक्षीवेगळामीं ॥ ८७ ॥ नजायतेम्रियतेवापाहाहो ॥ स्वयेंबोलेरमानाहो ॥ तोअजनित्यशाश्वतडोहो ॥ निजसुखभरितमीं ॥

॥ ८८॥ उपनिषत्तउद्यानीं॥ विहारकर्तामीं चिन्मयरवाणी॥ दृश्यसागराचें आचमनकरोनी॥ विदेही विलसें कल-
शोद्भव॥ ८९॥ स्वानंदाचें स्फुरसअरविंद॥ अखंडभोगीमीं मिलिंद॥ मीउंदयअस्तादिअर्कविशद॥ दृश्यभगणें-
ग्रासकजो॥ ९०॥ तमद्विरदविहारकमृगेंद्र॥ भेदनगछेदकवज्रधर॥ शबररिपुजाळविकृतिसंहार॥ कर्तापरात्प-
रशिवमीं॥ ९१॥ दुर्धरमायावनसकळी॥ दहनकर्ताज्वाळमाळी॥ भयवल्लीविध्वंसकबळी॥ निरंकुशईश्वमीं॥
९२॥ पंचकोशाहूनवेगळा॥ षड्विकारांसनिराळा॥ त्रिधाहंकारकलुषझाला॥ जितेंद्रियवेगळामीं॥ ९३॥ दोष
त्रयविरहित॥ देहत्रयवर्जित॥ स्वानुभवेंवर्तत॥ ब्रह्मानंदमीं॥ ९४॥ ऐसें ऐकतां निरूपण॥ जनकें धरिले दृढच-
रण॥ ह्मणेमींतनमनधनेंसिंशरण॥ तुजप्रतिमहाराजा॥ ९५॥ अष्टभावेंसद्गदित॥ अलंकारदक्षिणेसहित॥
गोधनेंअर्पिलींसमस्त॥ अनन्यभावेंकरोनियां॥ ९६॥ ऐसेंदेखोनतेवेळीं॥ समस्तक्षोभलीऋषिमंडळी॥ स
कळसभागडबडलि॥ निंदेससर्वप्रवर्तले॥ ९७॥ कोणीउठोनीउभेठाकती॥ कोणीबैसलेठायींबोलती॥ एक
क्रोधेंथरथरांकांपती॥ प्रवर्तती वादासी॥ ९८॥ निर्भित्सितिअवघेजण॥ उच्चारिती दोषगुण॥ परियाज्ञवल्की
आनंदघन॥ संतापेंमनपोळेना॥ ९९॥ ब्राह्मणह्मणतीदेख॥ तूंज्ञाताकैसेनअधिक॥ शिष्यांहातींगोधनेंसक-
ळिक॥ न्यावयायेथेंकोणतूं॥ १००॥ ब्रह्मवेत्तामींह्मणविशी॥ निस्पृहताआंगींवागविशी॥ आशाधरोनिगो-
धनेंनेशि॥ अपमानूनआह्मातें॥ १॥ येरूह्मणेंशिष्यसद्विवेक॥ वृत्तिगाईवळिल्यादेख॥ गोरक्षणकरावेंसम्य
क॥ श्रुत्यर्थहाचनिर्धारी॥ २॥ चरमवृत्तीजोंवरीबाणे॥ तोंवरीगायीदृढरक्षणें॥ परपाराजोंवरीआहे जाणें॥ तों
वरीरक्षणकरणेंनोकेसि॥ ३॥ चरमह्मणजेशेवटीलस्थिती॥ जीहूनिथोरनाहींपरती॥ चंचळतानसोंनिश्चि-
ती॥ चरमवृत्तीतेंह्मणिजे॥ ४॥ गोरक्षणनकरितां॥ चरमवृत्तीनयेहाता॥ अळंकारसमवेतत्वता॥ गोधनाब-
रवेंरक्षावें॥ ५॥ तुह्मीह्मणालकोणतेअलंकार॥ श्रवणमननादिनवप्रकार॥ दयाक्षमाशांतीनिरंतर॥ शृंगारस

हरक्षाव्या॥६॥निजानुसंधानगोकंठपाश॥त्यावीणगाईनावरतीनिःशेष॥निरंजनीसावकाश॥गाईन्याव्या-
चरावया॥७॥वेदमर्यादाकाढीघेउनी॥गाईवळाव्याक्षणक्षणीं॥परीविषयक्षेत्रींजाउनी॥भरोनद्याव्यासर्व
था॥८॥ऐसेंकरितांगोरक्षण॥सप्तभूमिकावोलांडून॥चरमवृत्तीबाणेपूर्ण॥शेवटीलजीसह्मणती॥ऐसेंया-
ज्ञवल्कीबोलिला॥परित्तेंनमानेचतयाला॥आश्वलायनअर्थभागतेवेळां॥वादकेलातिहींबहु॥१०॥श्वेत-
केतूअजर्मीढजरत्कारादिक॥अवघेयाज्ञवल्क्येंजिंकिलेसत्य॥निरुत्तरकेलियाअधोमुख॥सर्वहीऋषीपाहा
ती॥११॥तोंतेथेंगार्गीनामेंयोगिण॥ब्रह्मवेत्तीसदांनग्न॥अकस्मातउभीठाकलीयेऊन॥ह्मणेकांरेभांडणकरि
तसां॥१२॥जाहालाजोपूर्ववृत्तांत॥जनकगार्गीप्रतिसांगत॥तेह्मणेऋषीहोऐकासमस्त॥निवडिलेंयेथेंवाद-
ह्मा॥१३॥सावधानऐकासर्वही॥जोसजीवकरीलअवघ्यागाई॥तेणेंचिन्याव्यालवलाहीं॥निश्चयपूर्णजाणि
जे॥१४॥समस्तऋषीतेव्हांबोलती॥सजीवगाईकेविहोती॥नघ्यायकतेथेंह्मणती॥आह्मींजीवऊंयथार्थ॥
१५॥निर्जिवासआणावाप्राण॥हेंकर्तृत्वईश्वराचेंपूर्ण॥आह्मीहोऊंईश्वरासमान॥कल्पांतींहेंघडेना॥१६॥
समस्तांच्याखुंटल्यावृत्ति॥मगतोयाज्ञवल्कीकेवळगभस्ति॥ह्मणेएकईश्वरसर्वांभूतीं॥जडाजडींव्यापक
१७॥जळस्थळकाष्ठपाषाण॥अष्टधातूऔषधीजाण॥सर्वईश्वरव्यापलापूर्ण॥हातोंसर्वश्रुत्यर्थ॥१८॥
तेप्रतिमाप्रत्यक्षहोउन॥भक्तासिअभयदेऊन॥साक्षातबोलोंलागेवचन॥निष्ठादेखोनतयाची॥१९॥धातूची
करोनिमूर्ती॥तेथेंद्विजप्राणप्रतिष्ठाकरिती॥आव्हानितांदेवतेंयेती॥करितीवस्तीधातूमाजी॥२०॥तरिस्व
वर्णगाईमाजीतत्वता॥ईश्वरवास्तव्यकरीलआतां॥याज्ञवल्कीनेंसंकल्पकरितां॥गायीजाहाल्यासजीव॥
२१॥वत्सेंकरितीस्तनपान॥अद्भुतवर्तलेंयेथेंपूर्ण॥जनकघालीलोटांगण॥धन्यह्मणेऋषीराव॥२२॥तों
बोलतीसकळब्राह्मण॥येणेंकौटाल्यकेलेंपूर्ण॥किंवाकेलेंदृष्टीबंधन॥आह्मींनमानूंसर्वथा॥२३॥आह्मीं-

यासनेदूंगोधन॥मगगार्गीबोलेवचन॥ह्मणेविप्रहोऐकाएकखुण॥निर्वाणप्रश्नदोनअसती॥२४॥तेप्रश्नयेणेंसां
गीतले॥तरिमगसर्वांसजिंकिलें॥तुमचेंसामर्थ्यखुंटलें॥नचलेबोलणेंसहसाही॥१२५॥सूर्यापुढेंजैसाधुरंधर
विनायकापुढेंपादोदर॥कींमहामण्यापुढेंगार॥मांडेलकोठेंसांगपां॥१२६॥तुह्मींगलबलासांडूनं॥स्वस्थचित्तेंक
रावेंश्रवण॥मगयाज्ञवल्कीप्रतिवचन॥गार्गीबोलतऐकानें॥२७॥मींहिंडत्येंनग्ननिःशेष॥द्देष्टीसनदिसेपुरु
ष॥स्त्रीनपुंसकपदार्थदृश्य॥नेणेकांहींसर्वथा॥२८॥कितेकमजदेखोन॥मूर्खभ्याडझांकितीनयन॥कोणीरवा
लींसुरवकरून॥मजसींगोष्टीसांगन॥२९॥कोणीआणिकेकडेपाहाती॥मगगोष्ठीमजशींबोलती॥कोणीउठूनप
ळती॥समोरनठाकतीकदांही॥३०॥परिविकाररहितपुरुष॥आजिमींदेखिलातुजनिःशेष॥इकडेनिकडेन-
पाहासीनिर्दोष॥समदृष्टीतुझीअसे॥३१॥जैसेनग्नपशूहिंडती॥तेथेंविकारनउठेचित्ती॥कींवृक्षपाषाणदि-
सती॥तैसेंभाविशीमजलातूं॥३२॥तुझीकेवळब्रह्मस्थिती॥वादींजिंकिलेसकळांप्रति॥तरिमाझेप्रश्नसांग
निश्चिती॥याज्ञवल्कीयावरीबोले॥३३॥तुझेप्रश्नाचेंकरीननिरशन॥तरितूंआडवेंघेशीजाणोन॥तरिशि
रपडेलतुटोन॥जाणखुणाहेच्चपें॥३४॥अंतरींजाणोनयथार्थ॥अन्यथाबळेंप्रतिपादित॥तरिहोईलअन
र्थ॥शरीरपडेलखालती॥३५॥यावरीकरीतूंआतांप्रश्न॥मगगार्गीकायबोलेवचन॥संतींपरिसावेंसाव-
धान॥ब्रह्मानंदेंकरूनियां॥३६॥गार्गीह्मणेयाज्ञवल्कीस॥म्यांघेतलेंसंदेहधनुष्य॥दोनप्रश्नबाणनिःशेष॥
लाऊनसोडित्येंतुजवरीं॥३७॥अविलंबेंसोडींदोनीशर॥याज्ञवल्कीबोलेउत्तर॥सद्गुरूमाझाभास्कर॥प्रति
उत्तरदेईलतो॥३८॥कायआहेएकवीसस्वर्गांवरी॥सप्तपाताळातळीं कायनिर्धारीं॥वोतपोतमध्यअवधा
रीं॥कायआहेसांगपां॥३९॥वस्तुव्यापकसर्वांतरीं॥हेंहीसांगकवणेपरी॥व्यापूनिवेगळेपणसर्वत्रीं॥कोणे
रीतीसांगपां॥४०॥हेस्त्रीकरित्येप्रश्न॥ह्मणोननकरींहेळण॥सांगतातूंनहोईभिन्न॥अभेदपणेंसांगावें॥

॥४१॥मगयाज्ञवल्कीमांडीधैर्यठाण॥काढीवेदांतींचेंदिव्यबाण॥आतांप्रश्नशरछेदून॥विदारीलआशंकेतें॥
४२॥तटस्थपाहेऋषिमंडळ॥सावधानऐकेजनकभूपाळ॥अंतरज्ञानीनिर्मळ॥सर्वद्रष्टायाज्ञवल्की॥४३॥पूस
सीतूंस्वर्गींवरुतें॥आणिपाताळींखालतें॥बोलतांत्यामर्यादेतें॥सांगतांजायविरोन॥४४॥तरिवरीखालींम·
ध्यजाण॥वोतपोतसंपूर्ण॥अवघेंचिंमात्रआनंदघन॥अद्वयनिरंजनसर्वही॥४५॥जळींबुडालीजळगार
तीसअंतरबाह्यअवघेंनीर॥स्वयेंतेंसलीलसाचार॥द्वैतविचारनसेचि॥४६॥कींसमुद्रींपडलेंसामुद्रिक॥तेंस्व
येंसागरचिदेख॥कींभूमीसघटऐक्य॥नमेळवितांमिळाला॥४७॥कींखगजायऊर्ध्वपंथीं॥त्यासखालींआणि
वरतें॥आकाशावांचूनरितें॥अणुमात्रनसेचि॥४८॥मेदिनीवसनाचेंपैलतीर॥दृश्यजरीनव्हेसमग्र॥परिअ·
वघाएकसाचार॥सरितानाथसत्यकीं॥४९॥तैसेंवरखालींमध्यसंपूर्ण॥अवघेंचिन्मात्रनिरंजन॥जेथेंसच्चि
दानंदघन॥ह्याहीसंशयवोसरे॥१५०॥एककोरूनिधराधर॥देउळेंकेलींअपार॥आकृतीचेनानाविकार॥प
रिअचळएकचि॥५१॥लहरीकल्लोळतरंगनानाविधि॥परिअवघाएकजळनिधी॥कींएकींअनेकउपाधि॥
चंचळत्वेंदिसती॥५२॥तैशाजळगाराविशाळ॥अरण्यांतपडल्यापुष्कळ॥लेंकरेंआनंदोनिसकळ॥खेळ
वयातेथेंगेली॥५३॥कोणीह्मणतीकरूभरती॥कोणीपात्रामाजीधरिती॥शेवटींजळचिभाशिती॥निव·
वितीतृषेतें॥५४॥ह्मणतीजळकायशीतळ॥जैशीगारचिकेवळ॥तेथेंजाणतेबोलतीसकळ॥गारजळए
कचि॥५५॥एकह्मणतीगारेचागुण॥एकबोलतीशीतळजीवन॥घटपृथ्वीअंशकठिण॥एकऐसेंस्थापिती
॥५६॥घटगारविरतांपूर्ण॥कोठेंपृथ्वीचेंकठीणपण॥अवघेंएकजीवन॥रूपअभिधानेंनिराळीं॥५७॥शे·
लियाचेदोरेउकलून॥मागुतीचिवटेंकेलेंजाण॥तेथेंपटहेंअभिधान॥सहजमगराहिलें॥५८॥तैसेंव्यापकत्व
सारून॥उरलेंअनामनिरंजन॥पूर्णब्रह्मसनातन॥दुजेंकांहींदिसेना॥५९॥ब्रह्मींअन्यथाभासदिसत॥

त्याचेंनावदृश्यसत्य॥ दोरावरीपादोदरभासन॥भ्रमेंकरूनितत्वता॥ ६०॥स्थाणूअसतांचोरदिसत॥कींशु-
क्तीवरीरजतभासत॥कींमृगजळतीरमिथ्याभूत॥भ्रांतालागींसत्यगमे॥ ६१॥तैशीनिरसतांभ्रांती॥मगस-
हजचिवस्तुप्रासी॥यालागींश्रीगुरूप्रति॥शरणजावेंअनन्या॥ ६२॥प्राशिलियाअर्क॥मगकोणपुसेदीपक॥कीं
रत्नपरीक्षाकरितांदेख॥गारदेतीभिरकाउनी॥ ६३॥करितांसुधारसपान॥मगसकळरसांपुसेकोण॥प्राप्तहोतां
नृपासन॥मगकोरान्नकासया॥ ६४॥तैसेंआचार्यकृपेनत्वतां॥स्वस्वरूपआपणहोतां॥मगदृश्यजाळपा
हतां॥शोधितांहीनसांपडे॥ ६५॥क्रियेसहितज्ञानशुद्ध॥तोचिह्मणिजेब्रह्मविद॥त्याचामहिमावेद॥वानी-
आपुलेनिमुखें॥ ६६॥ऐसेंदिव्यनिरूपण॥वर्षेयाज्ञवल्कीकृपाघन॥गार्गीआनंदलीपूर्ण॥प्रेमेंनेत्रलाविं-
ले॥ ६७॥परियाज्ञवल्कीचेंथोरपण॥प्रघटावयासमस्तांतजाण॥दाटूनघेतलेंआडवेंप्रश्न॥चमत्कारदा-
वावया॥ ६८॥तोंअकस्मातगा गींचेंशिर॥पृथ्वीवरीपडलेंसत्वर॥हाहाःकारकरितीऋषेश्वर॥जनकरा
वघाबरला॥ ६९॥याज्ञवल्कीबोलेवचन॥गार्गीसकोणीआणाप्राण॥तोत्वगायीजाईलघेउन॥वस्त्रालंका
रसमवेत॥ ७०॥याजडपदार्थगायी॥याचीणआह्मासचाडनाहीं॥विवेकशिष्याहातींपाहीं॥हत्तीगाईवळ्वि
येल्या॥ ७१॥वत्सांसमवेतगाईतेवेळा॥याज्ञवल्क्येंब्राह्मणासवांटिल्या॥दक्षिणाअळंकारसमर्पवीसक
ळा॥आपणराहिलाआनंदें॥ ७२॥जनकह्मणेऋषीहोसमस्त॥उठवागार्गीचेंप्रेत॥तेह्मणतीसत्यलोकींजें:
अघटित॥तेंकेविघडेमनुष्या॥ ७३॥आमुचेहातींकायआहेअमृत॥मगउठवावेंगार्गीचेंप्रेत॥मगयाज्ञव-
ल्क्येंअद्भुत॥प्रगटसामर्थ्यकेलेंतेव्हां॥ ७४॥उदकशिंपितांतेवेळीं॥गार्गीउठूनउभीठाकली॥याज्ञवल्कीचे
चरणींलागली॥ह्मणेत्वांजिंकिलेंत्रैलोक्य॥ १७५॥गार्गीह्मणेतेव्हांद्विजवरा॥यासतुह्मींनमस्कारा॥शरण
रिघोनसत्वरा॥आपुलेंस्वहीतसाधावें॥ १७६॥तेथेंकित्तेकआनंदती॥कित्तेकयेऊननमस्कारिती॥कित्तेकम

नींनळमळती॥ प्रवर्तती निंदेसि॥७७॥ त्यामध्यें विदग्ध ऋषेश्वर॥ तेणें निंदा केली अपार॥ ह्मणे हा कुटिळ थोर॥
प्रेतें उदवी कापस्यें॥७८॥ तेणें निंदा केली बहुत॥ कासया वर्णावी समस्त॥ मुख्य तेथींचा हा अर्थ॥ ब्रह्मनिष्ठ या-
ज्ञवल्की॥७९॥ निंदा ऐकतां कानीं॥ वाटे प्राण द्यावा तेक्षणीं॥ अथवा रागें उठोनि॥ त्याग करूं निजावेपें॥ ८०॥
तैसा नव्हे याज्ञवल्की॥ निंदा ऐकतां सर्वदा रुखी॥ बोलतां चालतां लोकीं॥ समाधी त्याची मोडेना॥ ८१॥ मेहुणे
विनोद करिती॥ त्यांतवर्में निंदोत्तरें बोलती॥ परंतु विषाद नुपजे चित्तीं॥ कौतुकें हांसती गदगदां॥ ८२॥ तैसें या-
ज्ञवल्कीस निंदितां॥ कौतुक वाटे त्याचिया चित्ता॥ एवं च सर्वलक्षणीं पुरता॥ जनकास दृढ समजलें॥ ८३॥ तो
ज्ञानगंगेचा लोट॥ कीं विवेकरत्नाचा मुकुट॥ कीं विज्ञानवैरागरींचा स्फटि॥ दिव्य हिरा जन्मला॥ ८४॥ तारावया
जग समग्र॥ त्याचरूपें अवतरला ईश्वर॥ असो गोरऊन समस्त ऋषेश्वर॥ जनकें तेव्हां बोळविले॥ ८५॥ जें-
शीं चपळा लवो न जात॥ तैशी गार्गी जाहाली गुप्त॥ जनकराव आश्चर्य करित॥ धन्य सामर्थ्य सद्गुरूचें॥ ८६॥
मग याज्ञवल्कीस शरण॥ जनक निघे सप्रेमें करून॥ यावरी जनकाचें लक्षण॥ पाहेल क्षून याज्ञवल्की॥ ८७
तूं तनुमनधनेंसि शरण॥ तरि मज हें राज्य देईं दान॥ तत्काळ उदक घेऊन॥ जनकें सोडिलें ऋषीपदीं॥ ८८॥
शरीर आणि मन॥ येरें केलें समर्पण॥ पाहावया जनकाचें शिष्यपण॥ याज्ञवल्की तेथून उठिला॥ ८९॥ म-
हाघोर अरण्यांत॥ ऋषी तेव्हां प्रवेशत॥ जेथें उदक फळ न मिळे किंचित॥ गेला तेथें महाराज तो॥ ९०॥ जन
कास ह्मणे ऐक॥ तूं येथें उभा राहें नावेक॥ मी एका ऋषीचें दर्शन देख॥ घेऊन येतों मागुती॥ ९१॥ जन
क तेथें उभा ठाकला॥ महाऋषी तेथून गेला॥ द्वादश वर्षें झालीं परि न आला॥ अंत पाहिला शिष्याचा॥ ९२
तोंड कडे जनकवनीं॥ उभा असे ते स्थानीं॥ सद्गुरू गेला ते दिशा लक्षोनी॥ करजोडून वाट पाहे॥ ९३॥ के
व्हां येईल स्वामी दयाळ॥ कैं वदन देखेन निर्मळ॥ त्याचे चरणकमळीं भाळ॥ ठेवीन मी केधवां॥ ९४॥ स्वामी-

ज्यामुखेंकरून॥ ऐकेनकथीं दिव्यनिरूपण॥ जेणेंगोधनासआणिलेप्राण॥ प्रेतउठविलें गार्गीचें॥ ९५॥ अक्ष
तापडतांज्याच्याअपूर्व॥ शुष्ककाष्ठीं फुटलेनवपल्लव॥ वक्रत्वज्याचेंअभिनव॥ ऋषीसर्वजिंकिले॥ ९६॥ चौ
दावर्षेंनपकरून॥ भरतइच्छीश्रीरामाचेंआगमन॥ तैसेंपाहावयागुरुचरण॥ जनकरायतिष्ठत॥ ९७॥
शरीरगेलेंवाळून॥ कंठीं ठेऊनियांप्राण॥ वाटपाहेरात्रंदिन॥ उदकेंनयनभरोनी॥ ९८॥ मातागेलीबाहे
री॥ तान्हेंवाटपाहेघरीं॥ तैसाजनकरावअंतरीं॥ आठवीतगुरुचरण॥ ९९॥ असोद्वादशवर्षेंहोतांपूर्ण॥ या
ज्ञवल्कीउभादाकलायेऊन॥ तोंडोळांउरलाअसेप्राण॥ गुरुदेखोनसद्गदजाहाला॥ १००॥ हृदयींआलिंगि
लाप्रेमेंकरून॥ तेणेंशरीरजाहालें पूर्ण॥ मगजनकघालीलोटांगण॥ प्रेमेंकरूनस्फुंदतसे॥ १॥ ब्रह्मविद्या-
संपूर्ण॥ उपदेशिलीजनकालागुन॥ तत्त्वमसिमहावाक्यविवरण॥ सांगश्रवणकरविलें॥ २॥ जैसायाज्ञ
वल्कीस्थिती॥ तैसाचजाहालाजनकनृपती॥ मगविदेहीजनकह्मणती॥ समस्तज्ञानीतयातें॥ ३॥ गेलि-
याचीखंतीनकरी॥ असतांहीआस्थानधरी॥ ब्रह्मानंदामाझारी॥ बुद्धीविराजेसर्वदां॥ ४॥ मगयाज्ञवल्कीनें-
जनकासि॥ मागुतीआणिलामिथिलेशीं॥ ह्मणेराज्यकरींनिश्चयेसी॥ विदेहस्थितीनसांडितां॥ ५॥ आत्मस्व
रूपसदनीं॥ स्वरवरूपराहेंसमाधानीं॥ विश्वाभासकौतुकपाहोनी॥ स्वानंदघनवर्तावें॥ ६॥ द्वेषप्रीतीनक-
रितां॥ निश्चळराहावेंतत्त्वतां॥ गुरुस्थानींसर्वसंतां॥ सर्वदाहीभजावें॥ ७॥ आणिकयाज्ञवल्कीबोलेवच-
न॥ बारेऐकेंसावधान॥ नानाशास्त्रेंकरावींश्रवण॥ देहींव्यसनकामानये॥ ८॥ नानाशास्त्रेंमतवादश्रव
ण॥ ऐकतांचित्तहोईलमलिन॥ अद्वैतसाधनश्रवणमनन॥ संतांच्यामुखेंकरींकां॥ ९॥ एकचिअहोरात्रप-
ठण॥ तेंहीपरमार्थासकरीमलिन॥ घोकितांकाळगेलापूर्ण॥ विश्रांतीनोहेचित्तासि॥ १०॥ तैत्तिरेयशाखेत॥
भारद्वाजेंवर्णिलेंयथार्थ॥ ऋषीएकनामेंत्रिपर्वत॥ तेणेंश्रवणपठणधरियेलें॥ ११॥ पांचशतसंवत्सर॥ वेद

पदलासमग्र॥ वादकरूनजिंकिलाइंद्र॥ विद्याअपारनयाची॥ १२॥ वादविवादेंनष्टशरीर॥ ब्रह्मद्रोहघडला
अपार॥ तळमळनवजायअहोरात्र॥ यादविवादकरितांबहू॥ १३॥ मगगुरूजवळकरितांवेदांतश्रवण॥ स
मूळटाकिलेंवादव्यसन॥ तैसेंचअहोरात्रअनुष्ठान॥ क्षुद्रसाधनीअनर्थ॥ १४॥ यदर्थीएकसावधान॥ ऋ-
भूनामेंऋषिप्रवीण॥ तेणेंनिदाघशिष्यकरून॥ वेदांतज्ञानउपदेशिलें॥ १५॥ ऋभूसहजनेथूनविचरत॥ गे
लाद्वादशवर्षेपर्यंत॥ निदाघआठवलामनांत॥ परतोनयेतशिष्यापाशीं॥ १६॥ तंवतोश्रीगुरूसींविसरोन॥ अ
द्वैतज्ञानसांडून॥ करूंलागलाअनुष्ठान॥ क्षुद्रसाधनदैवतें॥ १७॥ ऋभुगुरूआलाआश्रमासि॥ परिनिदाघ
नोळखेतयासी॥ ह्मणेतुह्मीकोणकोठीलऋषी॥ कायमानसींइच्छाअसे॥ १८॥ गुरुबोलेहांसोन॥ आह्मा-
सदेईमिष्टान्नभोजन॥ जेंअविनाशनविटेमन॥ क्षुधादुसरेंनलागेचि॥ १९॥ तूंर्सरहितमिष्टान्न॥ कच्चे-
पणादूरिकरून॥ अथवागेलेंकर्पोन॥ हठयोगेंकरूनियां॥ २०॥ तेंमीनजेवितत्वता॥ मींअसेंहातपांयापरता॥
मुखजिव्हाआणिदंता॥ विरहीतमीवंनें॥ २१॥ सकळइंद्रियांसचोरून॥ मजतेंघालींभोजन॥ निदाघेंशब्दा
वरून॥ गुरुनिधानवोळखिलें॥ २२॥ मगघातलेंलोटांगण॥ एकमासगुरूराहोन॥ पुनःअद्वैतज्ञान॥ यथा-
सांगनिरूपिलें॥ २३॥ गुरूगेलातीर्थाप्रति॥ बारावर्षेंभरलींनिश्चिती॥ पाहावयाशिष्यमागुती॥ येताझाला
आदरें॥ २४॥ तोंससिधाकुशघेऊन॥ निदाघपरतलावनीहून॥ तोंराजाहीमृगयाकरून॥ नगरद्वारासमीप
आला॥ २५॥ वेशींतदाटीजाहालीबहुत॥ निदाघउभाटाकलातेथ॥ तोंऋभुगुरूअकस्मात॥ तोहीतेथेंपात-
ला॥ २६॥ दृष्टादृष्टीजाहाली॥ निदाघेंवोळखसांडिली॥ अनुष्ठानींवृत्तिगुंतली॥ गुरुमाउलीनोळखेची॥ २७
गुरूह्मणेनिदाघासीं॥ कांयेथेंउभाआहेसी॥ येरूह्मणेकायनदिसेदृष्टीसी॥ राजभारपुढेंजातो॥ २८॥ गुरु-
ह्मणेआह्मीनिरंजनी॥ वसतअसोंदिनरजनी॥ तेथेंदुर्जनदेखोंनयनी॥ आपणावांचूनितत्वता॥ २९॥ तरि

सांगयेथेंराजाकोण ॥ वरकडकेसेनिलहान ॥ कोणमूर्खकोणसुजाण ॥ बंधमुक्तकोणाते ॥ ३० ॥ मीहीनिजसृ-
ष्टीपाहिन ॥ मजनदिसेथोरलहान ॥ येरूह्मणेकायगेलेनयन ॥ पुढेंतुजदिसेना ॥ ३१ ॥ गजारूढनृपवर ॥ भोंवतां
नदेखसीपरिवार ॥ येरूह्मणेहेंक्षणभंगुर ॥ मजडोळांदिसेना ॥ ३२ ॥ येरूह्मणेखालताहस्ती ॥ वरताबैसलाआ
हेनृपती ॥ येरूह्मणेखालींवरनिश्चिती ॥ दृष्टीमाझीनबैसे ॥ ३३ ॥ एकव्यापकचैतन्य ॥ दुजेंनदिसेमजलागुन ॥
गजराजाथोरलहान ॥ कोणीयेथेंनदिसेचि ॥ ३४ ॥ निदाघह्मणेतूंवेडा ॥ तूंजकांहींनदिसेमूढा ॥ गुरुह्मणेरेद
गडा ॥ व्यर्थगेलाश्रममाझा ॥ ३५ ॥ तूंकेवळपाषाण ॥ अंतरदृष्टीनाहींतुजलापूर्ण ॥ राजपरिवारदाविशीमजलागुन ॥
नेणशीखूणशतमूर्खा ॥ ३६ ॥ राजामजदाविशी ॥ रावह्मणावेतरिकोणासि ॥ जोसाक्षीवर्तवीसर्वांसी ॥ तोचनेमेसि
राजेंद्र ॥ ३७ ॥ निदाघेंगुरुबोलाविला ॥ ह्मणेथोरअन्यायझाला ॥ साष्टांगेनमीचरणकमळा ॥ स्फुंदतसेस्वापर-
राध ॥ ३८ ॥ मगगुरूनेंधरिलाहृदयीं ॥ बारेभेदनकरींकांहीं ॥ अनुष्ठानींसर्वदाहीं ॥ चित्ततुझेंभ्रमलेंसे ॥ ३९ ॥
अनुष्ठानाचातूंकर्ता ॥ सर्वव्यापकअससीतत्वतां ॥ तेथेंदृष्टीघालितां ॥ साधनसहजवोसरे ॥ ४० ॥ ऐसादृढ-
बोधकरून ॥ ऋभुगेलाआश्रमालागुन ॥ यालागींअनुष्ठानव्यसन ॥ मलीनकरीज्ञानासी ॥ ४१ ॥ त्याचादास
नामादुसराशिष्य ॥ तोहीप्रवर्तलाअनुष्ठानास ॥ जेंतेंअपवित्रदिसेत्यास ॥ बैसावयाठावदिसेना ॥ ४२ ॥
ह्मणवीमीसोंवळापवित्र ॥ हीपृथ्वीआहेअपवित्र ॥ मगवृक्षाग्रींनिरंतर ॥ आश्रमकरूनराहिला ॥ ४३ ॥ मे
घोदकेंस्नानपान ॥ ऐसाचकर्मींगेलाभुलोन ॥ तंवऋभूआलाधांवोन ॥ तंवतोवृक्षाग्रीबैसला ॥ ४४ ॥ ह्मणे
वृक्षाखालींउत्तर ॥ येरूह्मणेमेदिनीअपवित्र ॥ हांसतऐकोनिऋभुऋषेश्वर ॥ ह्मणेमूर्खअविवेकीतूं ॥ ४५
पंचभूतात्मकतुझेंशरीर ॥ विटाळाचेंपरमअपवित्र ॥ तूंमर्कटस्पर्शीळपवित्र ॥ तरित्याचासंगकांधरि
ला ॥ ४६ ॥ तुझीशुद्धतूंजनाहीं ॥ वृक्षाग्रींबैसोनिकरिशीकाई ॥ मगतेणेंउत्तरोनभुई ॥ चरणधरिलसद्गुरू-

चे॥४७॥असोनयागुरूनें बोधून॥ ब्रह्मनिष्ठकेलापूर्ण॥मगतोसत्कर्मेंकरूनब्रह्मार्पण॥ ब्रह्मानंदें विचर-
त॥४८॥दुर्वासिंशास्त्राभ्यासकरून॥पुस्तकभारसंग्रहून॥तीनशतेंअश्वमेधकरून॥कैलासाप्रतिचालिला
॥४९॥नारदह्मणेकैलासनाथा॥हाभारवाहीरासभतत्वता॥दुर्वासक्षोभलाऐकतां॥मगशांतकेलाक्षणार्धें॥
५०॥ह्मणेकासयाहेंपुस्तकवोझें॥येणेंनिवेनाअंतरतुझें॥स्वानुभवसदनीं विराजे॥निजानंदेंसर्वदां॥५१॥शंक
रेंबोधिलातोविशेष॥मगस्वरूपीझालातोदुर्वास॥पुस्तकभारनिःशेष॥सागरांतटाकिले॥५२॥याज्ञवल्की-
ह्मणेजनकालागुन॥तूंनधरींभलतेंव्यसन॥सांगीतलेंजेंअद्वैतज्ञान॥निजस्वरूपेंअनुभवीं॥५३॥ऐसेंजन
काससांगोन॥याज्ञवल्कीगेलातेथुन॥हेकथाकरितांश्रवण॥होयज्ञानसाधकां॥५४॥लोमेशऋषीपरमप्र-
वीण॥करितांतीर्थयात्रापर्यटण॥हेंयाज्ञवल्कीचेंआख्यान॥पुण्यपावनकथियेलें॥५५॥वैशंपायनह्मणे
जन्मेजया॥लावण्यचंद्राननवैडूर्या॥तुझ्यापूर्वजांची पवित्रचर्या॥वर्णितांनसरेकदापी॥५६॥अरण्यपर्वगो
डबहुत॥शौनकांप्रतसांगेसूत॥पुढेंचालिलेंपंडुसुत॥पाहातपाहाततीर्थमहिमा॥५७॥वनपर्वगोडबहुत
॥कथाअपूर्वरसभरित॥करूनिश्रीधरसुखनिमित्त॥पंढरिनाथबोलतसे॥५८॥पांडुरंगाब्रह्मानंदा॥जग-
दंकुरमूळकंदा॥श्रीधरवरदाअनादिसिद्धा॥अव्यंगअभंगअक्षया॥५९॥स्वरसपांडवप्रतापग्रंथ॥वनपर्व-
व्यासभारत॥त्यांतीलसारांशयथार्थ॥सत्ताविसाव्यांतकथियेला॥२६०॥ ॥श्रीकृष्णार्पणमस्तु॥ ॥

श्रीगणेशायनमः॥ लोमशऋषीपरमचतुर॥ बोलकाजेसाअंगिरापुत्र॥ याज्ञवल्कीचेंतेणेंचरित्र॥ धर्माप्रतिकथियेलें॥ १॥ तीर्थयात्रापावनपरम॥ त्याहीवरीसंतससागम॥ मार्गीजातांलोमशउत्तम॥ इतिहाससांगत॥ २॥ पुण्यश्लोकांच्याकथापावन॥ निर्दोषयशएकतांपूर्ण॥ चरणींचालतांनिर्भरमन॥ शीणनयेकोणासी॥ ३॥ धर्मह्मणेलोमेशमुनी॥ द्रौपदीसमसद्गुणखाणी॥ रूपवंतीमधुरवचनीं॥ पूर्वीकोणहोतीसांगा॥ ४॥ लोमशह्मणेसावधान॥ ऐकइतिहासपावन॥ स्त्रियाऐकतांसौभाग्यवर्धन॥ परमकल्याणपुरुषासी॥ ५॥ मद्रदेशींचानृपती॥ नामजयाचेंअश्वपती॥ वेदविहित चालवीनीति॥ उदारधार्मीकसर्वज्ञ॥ ६॥ त्यासनसेपुत्र संतान॥ तेणेंबहूततपकरून॥ सावित्रीचेंआराधन॥ करिताजाहालासाक्षेपें॥ ७॥ करीदाहालक्षजपपूर्ण॥ लक्षसंख्याप्रत्यहींहवन॥ पळमात्रदुग्धप्राशन॥ दाहादिवसांतएकदांकरी॥ ८॥ यावरीअष्टादशवर्षेंभरलीं॥ सावित्रीदेवीप्रसन्नजाहाली॥ अश्वपतीह्मणेतेवेळीं॥ पुत्रसंतानमजद्यावें॥ ९॥ देवीह्मणेपुत्रसंतान॥ तुझेअदृष्टीनसेजाण॥ परिलावण्यखाणीदिव्यरत्न॥ कन्याएकहोईल॥ १०॥ भूमंडळींविख्यातहोईल॥ त्रिभुवनींमहिमा वाढेल॥ पतिव्रताशिरोमणीसुशीळ॥ कीर्तीवर्णितीलपुराणीं॥ ११॥ ऐसेंबोलोनअर्कनंदिनी॥ गुप्तजाहालीनयेक्षणीं॥ हर्षखेदअंतरींमानुनी॥ रावआलास्वनगरा॥ १२॥ पट्टराणीझालीगार्भिण॥ नवमासभरतांपूर्ण॥ तिचेपोटींचिद्रत्न॥ कन्यासगूणजाहाली॥ १३॥ तेब्रह्मपत्नीसूर्यपुत्री॥ नामठेविलेंसावित्री॥ उमारमानिर्जरनारी॥ उपमेसरीत्याचीच॥ १४॥ तिचेंस्वरूपतेजःपुंज॥ देखोननाचेशफरीध्वज॥ कींलावण्यामृताचीसहज॥ निम्नगाभरूनचालिली॥ १५॥ बहूतवर्णिल्यानितंबिनी॥ सीतासुलोचनानैषधराणी॥ परिअश्वपतीचीनंदिनी॥ सावित्रीश्रेष्ठसर्वांतें॥ १६॥ मृगशावाक्षीसुहास्यवदनी॥ विद्रुमाधरीद्विजहिरेखाणी॥ पिकस्वरीताटंकेंकर्णीं॥ मित्रमृगांकासमान॥ १७॥ हरिमध्याहंसगमनीं॥ अंगसुवासनमा

येसदनीं॥सरळघ्राणीसुनक्तसुपाणी॥भुजंगवेणीकोमळांगा॥१८॥चातुर्यसरोवरमराळी॥परमसकुमार
शृंगारशाली॥दिवसेंदिवसथोरझाली॥नेवेल्हाळीगुणालया॥१९॥कन्याअवतरतांपरम॥वृद्धींगतहोतऐ-
श्वर्यद्रुम॥विस्तारलेसमस्तक्षेम॥रावविचारीवरतिजला॥२०॥योग्यवरनदिसेक्षिती॥मगनृपह्मणेकन्ये-
प्रति॥तूंपुरुषरत्नेंशोधूननिश्चिती॥वरवरींमानेलतो॥२१॥सवेंदळभारघेउनी॥आपणबैसलीदिव्ययानीं
छपन्नदेशस्वनयनीं॥देखतसेराजबाळा॥२२॥तोंद्युमत्सेनराजेश्वर॥सत्यवानत्याचाकुमर॥विधीचाअंश
साचार॥तिणेवरपाहिलातो॥२३॥ग्रामासआलीपरतोन॥सांगेबापासवर्तमान॥रावसंतोषलाऐकोन॥
तोंनारदमुनीपातले॥२४॥रायेंबैसऊनउत्तमासनी॥सुक्ताभिषेककेलानेक्षणीं॥पूजासंभारसमर्पुनी॥सां
गेवर्तमानकन्येचें॥२५॥नारदबोलेवचन॥सत्यवानपिताद्युमत्सेन॥त्याचेनयनगेलेदायादींयेउन॥रा
ज्यहिरोनघेतलें॥२६॥दरिद्रदुःखेंव्यापुनी॥भार्यापुत्रसंगेंघेउनी॥द्युमत्सेनहिंडेवनीं॥आपदानयनीं न
पाहावे॥२७॥कंदमुळेंसेउन॥वृक्षातळींकरितीशयन॥पिताह्मणेदुजावरपाहून॥लावण्यगंगाहेधावी॥२८
येरीह्मणेप्राणजावोनिर्धार॥मनेंवरिलानोनसांडीभ्रतार॥दुजावरितांव्यभिचार॥पतिव्रताधर्मबुडे॥२९॥स-
त्यवानावांचुन॥वडीलसमवयलहान॥पिताबंधूकींनंदन॥पुरुषमात्रसर्वमातें॥३०॥शक्लपक्षकृष्णपक्षवत॥
दरिद्रऐश्वर्ययेतजात॥भाग्याभ्रकाळींवितळत॥परिनिश्चयध्रुवनढळे॥३१॥नारदह्मणेतुझानेमसत्य॥प-
रितेथेंदिसतोअनर्थ॥एकसंवत्सरभरतांमृत्य॥सत्यवानासअसेहो॥३२॥तोमरणपावलियावरी॥तूंकायक
रिशीलराजकुमरी॥येरीह्मणेमींनिर्धारी॥प्राणदेईनत्यासवें॥३३॥कृतपदरींअसेलनिश्चय॥नरिविषतें
चअमृतहोय॥मृत्तिकाजेथेंखणींजाय॥तेथेंनिधानलागेल॥३४॥हातींधरितांपाषाण॥तोपरीसहोयसुव-
र्ण॥घरच्यादासीसिद्धीहोऊन॥कल्पिलेंमात्रपुरविती॥३५॥कृपाकरीलकमलदलाक्ष॥नरिआंगणींचेतरुहो

तीलकल्पवृक्ष॥शत्रूतेमित्रहोतीप्रत्यक्ष॥पूजाकरूनवंदिती॥३६॥क्षणनलगतांनिर्धारें॥तृणगृहेंहोतीस्व-
वर्णमंदिरें॥येऊनग्रहआदरें॥पाठीराखतीसर्वस्वें॥३७॥नारदह्मणेधन्य॥माझेंतुजआशीर्वचन॥तुझेमनो-
रथपूर्ण॥ममवरदेंहोतील॥३८॥यावरीविष्णुनाभनंदन॥तत्काळपावलाअंतर्धान॥अश्वपतीकन्याघेऊन॥
वनाप्रतिगेलाहो॥३९॥त्यांचीआपदादेखोनडोळां॥अश्वपतीसद्गदझाला॥द्युमत्सेनह्मणेतयाला॥मावळला
ममभाग्यसूर्य॥४०॥अवदशाआह्मांसंपूर्ण॥तुझेनबैसेकदामन॥हेकन्यास्वलक्षण॥देईंनेऊनआणिक्यावरा
॥४१॥रावह्मणेकन्येचानिर्धार॥वरूणदिशेंउगवेलमित्र॥हेंहीघडेलपरिकर॥दुसरानवरींनिर्धारें॥४२॥मग-
पाहोनियांसुदिन॥रायेंलाविलेंतेथेंलग्न॥चारदिवससंपादून॥दिधलेंआंदणबहुतचि॥४३॥कन्याठेऊनत्या
पासिं॥अश्वपतीगेलास्वनगरासिं॥सावित्रीभ्रतारसेवेसि॥दिवसनिशीसादर॥४४॥सासूसासराभ्रतार॥
तिघांचेसेवेसितत्पर॥हेंचतपपरमखडतर॥आचरेतेव्हांसावित्री॥४५॥स्त्रियांससाधनहेंचथोर॥पतीतोच-
आपलाईश्वर॥सेवाकरावीसादर॥दुजाविचारनसावा॥४६॥सकळांचेअन्यायसोसून॥दासदासीचेंराखेम
न॥अवघींनिजल्याकरीशयन॥सर्वांआधीजागीहोय॥४७॥चारप्रहररात्रस्वयें॥तळहातींभ्रताराचेपाय॥प
तीनेंआग्रहकरितांपाहें॥निद्राकरीतक्षणभरी॥४८॥दरिद्रीहोकुष्टीभ्रतार॥दीर्घरोगीदुःखेंजर्जर॥द्रव्यनजोडी
क्रूर॥परिनकंटाळेपतिव्रता॥४९॥सेवाकरीघडोघडी॥जितकीपडेतितकीह्मणेथोडी॥शरीरपोषणेंआवडी॥
सर्वहीसोडीसतीते॥५०॥पितावृद्धदरिद्रीभ्रतार॥अक्षीरगायअनाथप्रेतसंस्कार॥अंधपांगूळमुकेबधिर॥त्या
सिपाळितांहरितुष्टे॥५१॥व्यथाभूतगुरूचेंसेवन॥दरिद्रीब्राह्मणांचेकुटुंबपालन॥दरिद्रीयाचेंकरितांलग्न
हरितुष्टेत्यावरी॥५२॥असोतेपतिव्रतानारी॥भ्रताराआधीभोजननकरी॥षड्रसेंउत्तमसूलेंनिर्धारी॥नभ-
क्षीचपतीवीण॥५३॥ग्रामांजातांभ्रतार॥नलेईउत्तमवस्त्रेंअळंकार॥दर्पणींनपाहेवारंवार॥करीचिंताप-

तीची ॥ ५४ ॥ जारजारिणीचीसंगतीनधरी ॥ परवस्त्रननेसेनिर्धारीं ॥ न्याहाळूनक्षणभरि ॥ परपुरुषासनपाहे ॥
॥ ५५ ॥ एकांतजरीनिःसंग ॥ पडदणीवीणनधुईआंग ॥ पुरुषार्थीअभंग ॥ पतीचआपुलाभावित ॥ ५६ ॥ परघरीं
निद्रानकरी ॥ एकलीमार्गनचालेक्षणभरी ॥ क्रीडासमर्याचंविनोदकरी ॥ पतीचेंमनपाहुनी ॥ ५७ ॥ गुणसरिता
परमचतुर ॥ निजमनेंमोहीतप्राणेश्वर ॥ पतिकार्यादक्षगुणगंभीर ॥ साध्यसाधनभावजाणे ॥ ५८ ॥ दूरगेल्याप्रा
णनाथ ॥ सर्वभोगांचेधरीव्रत ॥ पांचदिवसपर्यंत ॥ रजस्वलादृष्टीसिपडेना ॥ ५९ ॥ भ्रताराचीप्रीतजेठायीं ॥-
तिचास्नेहतिकडेचपाहीं ॥ पतीद्वेषीसहमाही ॥ त्यातेंप्रीतीकरीना ॥ ६० ॥ जारजारीणयेऊंनेदीघरा ॥ आपणन-
जायत्यांचेमंदिरा ॥ संगेंनसतांभ्रतारचतुरा ॥ विवाहयात्रेनजाय ॥ ६१ ॥ पतीचेअवगुणलपवित ॥ कीर्तीसिद्धू-
णवर्णित ॥ पतीचेंआयुष्यचित्त ॥ कळोंनेदीचकोणातें ॥ ६२ ॥ भ्रतारासप्रियनिर्धारी ॥ त्यागोष्टीचासाक्षेपक
री ॥ अंतरबाह्यअहोरात्री ॥ तिरस्कारनसेतीतें ॥ ६३ ॥ पतीचेमनींचेंसर्वजाणे ॥ स्वामीवरीरुसोंकधींनेणें ॥ भ्रतारें
मारिलांहांसनचिह्मणे ॥ करतुमचेदुखतील ॥ ६४ ॥ नघेतांभ्रताराचीआज्ञा ॥ कोणीएकव्रतनेमकरीना ॥ आचरे
आयुष्यवर्धना ॥ पतीकारणेंनिर्धार ॥ ६५ ॥ भ्रतारदूरगेलियाजाण ॥ त्यासप्रियतेंनभक्षीआपण ॥ नानावस्त्रें-
भोगभूषण ॥ सतीसनावडेकदांही ॥ ६६ ॥ धनधान्यवस्त्रालंकार ॥ भ्रतारासनवंचीअणुमात्र ॥ असूननाहींह्म-
णणेंहें निर्धार ॥ प्राणांतींहीजाणेना ॥ ६७ ॥ कांहींएकसंकटव्यथा ॥ कदांनघालीप्राणनाथा ॥ पतीआनंदरूपअ-
सतां ॥ आपणसूखमानित ॥ ६८ ॥ भ्रताराहोयव्यथाभारी ॥ अन्ननघेउपवासकरित ॥ नानावस्तूनिर्धारीं ॥ म
नत्यावरीनसेतीचें ॥ ६९ ॥ भ्रताराचेंस्वरूपलेहून ॥ दूरगेलियापाहेविलोकुन ॥ अन्ननघेतीथेंविण ॥ पादुकापू
जोनहृदयींधरी ॥ ७० ॥ ऐशीउत्तमगूणखाणी ॥ पतीचावेधअखंडमनीं ॥ जागृतीसुषुप्तीस्वप्नीं ॥ नयंचीचप-
तीतें ॥ ७१ ॥ जाईलतरीजावोप्राण ॥ परिपतीचेंनबोलेन्यून ॥ जन्मोजन्मींहाचहोह्मणोन ॥ सर्वदेवांनमस्का

री॥७२॥भ्रतारासनकळत॥कांहींएकनटेवीवस्त॥ब्रह्माविष्णुउमाकांत॥स्वरूपभावीपतीचें॥७३॥पतीचेंमन-
रंजेजेणें॥तेंचबोलेकौतुकवचनें॥मनींह्मणेअहेवपणें॥मींजाईनयाआधीं॥७४॥पूर्ववतपाचारासीपूर्ण॥तं-
रीचऐशीस्त्रीपावेस्त्रलक्षण॥तीस इहलोकींबहुमान॥परत्रींसर्वधन्यह्मणती॥७५॥स्वर्गीच्यासर्वपतिव्रता॥
तीससामोऱ्यायेतीतत्वता॥वोंवाळतीघेऊनआरत्या॥पुष्पवृष्टीकरिताति॥७६॥यासद्गुणेंमंडीतपूर्ण॥सावि-
त्रीदेवीगुणनिधान॥परिनारदगेलासांगोन॥तोदिवसजवळआला॥७७॥मरणाचेदिवसचारी॥उरलेतेंक
ळलेंसुंदरी॥तीनदिवसनिर्धारी॥सावित्रीकरीउपोषण॥७८॥सावित्रीकरीउपोषण॥नेघेफळमूळजीवन
॥अंधश्वशूरबोलेवचन॥ह्मणेमायेकरिशीकांउपोषण॥कांनिर्वाणमांडिलें॥७९॥पतीचामृत्युदिवसआलाज-
वळी॥कोणानसांगेचवेल्हाळी॥तोंसत्यवानप्रातःकाळीं॥वनाप्रतिचालिला॥८०॥सावित्रीदेवीवारित॥परी
त्यासजवळीआलामृत्य॥फरशघेऊननिघत॥फळेंमूळेंआणावया॥८१॥सवेंनिघेसकुमार॥हिंडतीदोघे-
घोरकांतार॥पतीचेचरणवारंवार॥धुवोनचुरीवृक्षातळीं॥८२॥पर्यटणकरितांतयेवेळीं॥अस्ताचलागे-
लाहेळी॥निशाघोरप्राप्तजाहाली॥झगमगतीउडुगणें॥८३॥पतीसविनवीराजबाळा॥आश्रमाप्रतिस्वा-
मीचला॥तोंवटवृक्षींउभाठेला॥शुष्ककाष्टेंमोडित॥८४॥एककाष्ठबळेंमोडित॥तेंआदळलेंअकस्मात॥
पाषाणजैसावर्मीबैसत॥पडेमूर्छितसत्यवान॥८५॥देखोनिपतिव्रताधांवली॥मुखींमस्तकींउदक-
घालित॥मांडीउसांदीधली॥वाराघालीपल्लवें॥८६॥रात्रएकप्रहरपूर्ण॥तेव्हांगेलापतीचाप्राण॥लाव-
ण्यसागरीचेंनिधान॥शोकार्णवींपडियेलें॥८७॥ह्मणेउठाउठाजीप्राणनाथा॥वाटपाहतीमातापिता॥म
जसांडूनतत्वता॥दूरपंथासेविलें॥८८॥पिताअंधमाताअशक्त॥प्राणदेतीएकतांमात॥उठाजाहालांक्षु
धाक्रांत॥बोलाशब्दएकमजशीं॥८९॥माझेअन्यायबहुत॥समर्थेंघालावेपोटांत॥रुसणेंटाकोनिमात॥

मजसींबोलाप्रियकरा॥९०॥आपुलीप्रियासोडून॥उचितनव्हेकरितांगमन॥तुह्मासफळमूळजीवन॥आ
णूनकोणदेईल॥९१॥आहाकर्मकैसेंविचित्र॥भंगोनगेलेंमाझें छत्र॥दिसेंशून्यत्रिभुवनमात्र॥कायकरूंमी
यावरी॥९२॥मजटाकोनकांतारीं॥सांगातीकांगेलादुरी॥शोककरितांसुंदरी॥यमतेथेंपातला॥९३॥त्या-
चालिंगदेहकाढून॥चालिलादक्षिणपंथेंघेउन॥मगतेसुंदरीपाठीधांवोन॥आक्रोशेंकरूनबोलत॥९४॥सु
स्वेंकरीतसेस्तवन॥क्षणक्षणा घालीलोटांगण॥ह्मणेमहाराजातूंकोण॥नामरवूणसांगेकां॥९५॥येरूह्मणे
मीयममजाण॥तूंपतिव्रताह्मणऊन॥दूतनाहींदिलेधाडून॥मीचआलोंन्यावया॥९६॥ऋणानुबंधसरलापू-
र्ण॥जायशवाचेंकरींदहन॥येरीह्मणेगेलेयामाझाप्राण॥तुझेचरणनसोडीं॥९७॥पतीप्राणासंगातेंआ
तां॥मजहीनेईंसमर्था॥मीतुझीकन्यातत्वता॥उठवींजामाताआपुल्या॥९८॥तुझीकन्यावेल्हाळ॥तीसवै
धव्यनकोदयाळा॥मगप्रेतनाथबोलिला॥सहसानघडेहेगोष्टी॥९९॥पतिप्राणावेगळाकरून॥मागमीतुज
जाहालोंप्रसन्न॥मागसीतेंदेईन॥बोलवचनसकुमारे॥१००॥येरीह्मणेक्षमसेनश्वशुर॥देईंत्यांसमहारा
जानेत्र॥यमह्मणेतुझालागतांकर॥येतीलजाणनिर्धारें॥१॥यावरीमाघारीजायआतां॥ह्मणेसांडूनतुजऐ-
सापिता॥कोणीकेडेजावेंताता॥मजमाहेरानेईंकां॥२॥भ्रतारचरणींअसेलमन॥तरितूंहोशीलदयाघन॥सं
तमहंतसाधूजन॥भावेंवंदिलेअसतील॥३॥मगबोलेविश्वहंता॥पतीवेगळेंमागआतां॥पतीव्रताह्मणेअन-
न्तवना॥जाहालोंप्रसन्नदुसऱ्यानें॥४॥यावरीबोलेसुंदरी॥श्वशुराचेंराज्यदेझडकरी॥तथास्तुह्मणेभास्क
री॥आतांमाघारीजायेकां॥५॥येरीह्मणेदयाळावैवस्वता॥पतिसमागमेंमजनेआतां॥चक्रवाकासतत्वतां॥
आदित्यासजाऐक्यकरी॥६॥व्रतआणितपदान॥जरीघडलेंअसेलपूर्वीहून॥मातापितालक्ष्मीनारायण॥
जरीमानिलींअसतील॥७॥अनाथप्रेताचेंदहन॥केलेंतरुणदरिद्रीयाचेंलग्न॥सत्समागमसच्छास्त्रश्रवण॥

सद्गुरूसेवाभावार्थें॥ ८॥ नरितुजदयाउपजेलमनीं॥ मगनोबोलेशयमिनी॥ सत्यवानवेगळाकरोनी॥ माग॰
साजणीअभीष्ट॥ ९॥ माझेपित्यासशतपुत्र॥ देईंअर्कजासत्वर॥ धर्मराजदेतउत्तर॥ तथास्तुऐसेंत्रिवाचा॥ १०
बाईतुझीभीडफार॥ ह्मणूनदिधलेइतकेवर॥ आतांजायसत्वर॥ अग्नदेईंपतीसी॥ ११॥ बोलेपतिव्रताशिरोर
त्न॥ दुष्काळामाजीअन्नदान॥ तृषार्तासिजलपान॥ करविलेंअसेलउष्णकाळीं॥ १२॥ व्याधिग्रस्तदुर्बळक्षीण
त्याचेंकेलेंअसेलरक्षण॥ हरीस्वरूपमानून॥ जरिब्राह्मणपूजिले॥ १३॥ हरिहराअभेदपूर्ण॥ मानोनिकेलेंअसे
लभजन॥ हरिकथापुराणश्रवण॥ केलेंअसेलभावार्थें॥ १४॥ नरिचमजदेखोन॥ दयाळूहोयभानुनंदन॥ मग
यमबोलेहांसोन॥ चतुर्थवरमागेकां॥ १५॥ वंध्याशब्दतत्वता॥ मजनकोदयाळाआतां॥ शतपुत्रसफळताता॥
उदरलतिकाकरींमाझी॥ १६॥ पुत्रवतीगुणवंती॥ जन्मसावित्रीसौभाग्यवती॥ मंगळमाहेश्वरीह्मणती॥ करीं
ख्यातीत्रिभुवनीं॥ १७॥ फळेंवीणतरूजाण॥ कींवेदघोषेंवीणसदन॥ हरिस्मरणावीणवदन॥ व्यर्थजैसेंशव
वत॥ १८॥ तेविकुळीनसतांपुत्र॥ कैसाहोईलवंशपवित्र॥ मीतुझेंताताकृपापात्र॥ करींमाहेरकन्येचें॥ १९॥ तु
जसंगेंपंथक्रमिलाआतां॥ नाहींमजऐशीसौभाग्यसरिता॥ मजरिकामीसर्वथा॥ दवडूंनकोदयाळा॥ २०॥
श्राद्धदेवहोऊनिदयाळ॥ ह्मणेकन्येंतुजदिलेंसकळ॥ तुझेगूणदेखोनिनिर्मळ॥ संतुष्टजाहालोंमानसीं॥ २१॥
सावित्रीह्मणेसर्वज्ञमूर्ती॥ सत्यवानासआयुष्यकिती॥ येरूह्मणेतूंममकन्यानिश्चिती॥ महासतीविख्यात॥
२२॥ चारशतवर्षेंपर्यंत॥ सत्यवानआयुष्यमंत॥ तुजहोतीलशंभरसूत॥ पौत्रहीबहुदेखसी॥ २३॥ वैरीना॰
सतीसर्वथा॥ सकळराज्ययेईलहाता॥ तूंपतीपाशींजायआतां॥ स्पर्शतांप्राणयेईल॥ २४॥ मगनोदक्षणदे॰
शीचाइंद्र॥ अंतर्धानपावलासत्वर॥ सावित्रीसआनंदथोर॥ भ्रतारासन्निधपातली॥ २५॥ हनुवटीसलाऊ॰
निहात॥ ह्मणेप्राणवल्लभाउठात्वरित॥ तंवतोगडबडोनउठत॥ आलिंगितप्राणप्रिये॥ २६॥ ह्मणेतूंश्रमली॰

सफार॥फळेंभक्षींनकरींनिराहार॥येरीह्मणेसासूश्वशूर॥त्यावीणनभक्षींसर्वथा॥२७॥भाग्यप्रगटेदरिद्रसर
तां॥तेविंउदयपावेयमपिना॥स्वर्गींहूनसकळपतिव्रता॥सावित्रीदर्शनापातल्या॥२८॥कुंभिनीवरीलसर्वका-
मिनी॥षोडशोपचारेंपूजाघेउनी॥वटवृक्षातळींयेउनी॥पूजितीसावित्रीसत्यवान॥२९॥सौभाग्यद्रव्यअर्पून॥
वटवृक्षासकरितीप्रदक्षिण॥वटसावित्रीतैंपासून॥अद्यापपूजितीसर्ववनिता॥३०॥जीनपूजितांगर्वेंराहे॥
तीजन्मोजन्मीविधवाहोये॥अर्चीभावेंतेसौभाग्यलाहे॥सर्वदांहीवर्धमान॥३१॥असोयावरीसावित्री॥भ्र-
तारासधरोनिहातीं॥जातआपुलेस्थळाप्रति॥बोलेंनोषवीपतीतें॥३२॥सिंहव्याघ्रसर्पादियेऊन॥सावित्रीचे-
वंदितीचरण॥मानेतुझेघेतांदर्शन॥निपापआह्मीजाहालों॥३३॥सावित्रीह्मणेपतीलागुन॥तुमचेनिजकेशें
झाडीनचरण॥हळूचलाकंटकपाषाण॥चरणीरुततीसकुमारा॥३४॥कायनयेतीपुत्रसून॥दोघेंवृद्धेंकरिती
रुदन॥त्यांचाशोकऐकून॥समाधानकरितीजनसर्व॥३५॥तोंअकस्मातयेऊन॥उभीठाकलीपुत्रसून॥सावि
त्रीस्पर्शितांनयन॥उघडलेनकाळतयाचे॥३६॥जाहालाएकब्रह्मानंद॥गगनींपाहातीनिर्जरवृंद॥दिव्यसुम
नेंसुगंध॥वर्षतीतेव्हांउल्हासें॥३७॥वृद्धांसफळेंअर्पूनतत्वता॥देताजाहालामगसमस्ता॥तोंदळभारवाद्यस
हयेतां॥मंत्रीदेखिलेद्युमत्सेने॥३८॥वैरीप्रधानेंनिवटोन॥सर्वांसचाललाघेऊन॥रत्नजडितशिबिकेंतनिधा
न॥सावित्रीदेवीबैसली॥३९॥मागेंपुढेंदळभारघेऊन॥स्त्रीपुत्रसमवेतद्युमत्सेन॥दिव्यवहनींबैसोन॥वा-
द्यगजरेंचालती॥४०॥सत्यवानावरीछत्र॥पित्यानेंधरिलेंपवित्र॥सावित्रीसशतपुत्र॥पित्यासमानजाहा
ले॥४१॥ऐकोनकन्येचीकीर्ति॥दर्शनाधांवलाअश्वपती॥सावित्रीचावरेंनृपती॥शतपुत्रपावला॥४२॥लोम-
शह्मणेधर्माप्रति॥ऐशीसावित्रीचीकीर्ति॥तेविंहेंद्रौपदीसती॥श्रीरंगभगिनीपतिव्रता॥४३॥सावित्रीसत्यवा
नाचेपरी॥स्वराज्यपावालझडकरी॥हेंचरित्रऐकतांनरनारी॥दीर्घायुषीतेहोती॥४४॥स्त्रियांससौभाग्यपूर्ण

पुरुषास ऐश्वर्य कल्याण॥ महारोग होय हरण॥ गंडांतर मृत्यू निरसे॥ धर्म मार्गें तीर्थास जातां॥ लोमेशें सांगीतली कथा॥ कथारूपें तत्त्वता॥ चंपकमाळास्रुवासी॥ ४६॥ मूर्ख तें मतिमंद मिलिंद॥ त्यांस नावडे तेथिंचा स्रुगंध॥ पुढें चित्त द्यास सज्जन वृंद॥ कथेलागीं अत्यादरें॥ ४७॥ श्रीधर ह्मणे ब्रह्मानंद पिता॥ सावित्री माता गुणभरिता॥ त्यां स वंदिलें पुढें आतां॥ कथा परिसा नवलचि॥ ४८॥ धर्म ह्मणे लोमेश मुनी॥ कथा पवित्र ऐकिली श्रवणीं॥ तीर्थें ही दाखविसी मेदिनी॥ श्रेयस्कर परम जे॥ ४९॥ लोमेश ह्मणे कुरुभूषणा॥ तिसरी आवृत्ती तीर्थाटना॥ तुझे संगें पुण्यपरायणा॥ सौख्य अद्भुत वाटतें॥ ५०॥ असो यावरी या ब्रह्मांडभुवनी॥ सकळ तीर्थांस मुकुटमणी॥ तीर्थराज प्रयाग नयनीं॥ धर्मरायें देखिला॥ ५१॥ दृष्टी देखतां संगम त्रिवेणी॥ शतजन्मांची पापें जाती जळोनी॥ होतां स्पर्श जीवनीं॥ त्रिशतजन्मांचे दोष जाती॥ ५२॥ तेथें जे स्नान करिती॥ सहस्रजन्मांचीं दुःखें वितळती॥ त्याहून तीर्थ नसे जगतीं॥ साक्ष सरस्वती देतसे॥ ५३॥ तेथें जे देह समर्पित॥ त्यांस नसे पुनः जन्म सत्य ब्रह्मानंदसुख अद्भुत॥ होय हस्तगत तयाचे॥ ५४॥ यद्यपि प्राप्त जाहालें अंग सहज॥ बैसावया होय द्विजराज॥ भोगेंद्र तल्प कीं शेज॥ होय सहज नेमेंसि॥ ५५॥ चतुर्भुज होय तो सांग॥ शंख पद्म गदा रथांग॥ सच्चिदानंद तनू अभंग॥ होय अव्यंग हरिरूप॥ ५६॥ आपुले घरीं करितां स्नान॥ करिती जे प्रयागस्मरण॥ सकळ पापें संहारून॥ विष्णुपदा प्रति जाति॥ ५७॥ प्रयागमाहात्म्य संपूर्ण॥ धर्मराजें केलें श्रवण॥ तीर्थविधी करून आनंदवन॥ पाहावया सर्व चालिले॥ ५८॥ शास्त्रामाजी वेदांतज्ञान॥ देवामाजी इंदिरारमण॥ कीं शास्त्रामाजी स्रुदर्शन॥ वाराणसी क्षेत्रांत॥ ५९॥ जे पाहातां वाराणसी॥ घरोघरीं मुक्ती दासी॥ वाहाती पाणी दिवानिशीं॥ सिद्धी सेवेसि तिष्ठती॥ ६०॥ नंदीवर बैसोनि कैलासनाथ॥ क्षेत्रामाजी सर्वदा हिंडत॥ तारकमंत्र उपदेशित॥ प्राणी मरणपावतां॥ ६१॥ अहंकार टाकून शमदमी॥ नित्य स्मरे जो निजधामीं॥ त्यासि काशीवास नेहेमी॥ प्राप्त होतो निश्चयें॥

॥६२॥ असोकाशीमहात्म्य॥ श्रवणकरीमहाराजधर्म॥ तीर्थविधीकरूनउत्तम॥ गयादर्शनघेतले॥
॥६३॥ फल्गूचेवाळवंटींजाण॥ तिष्ठतीसर्वपितृगण॥ आह्मांयेथेंपिंडदान॥ स्ववंशीयेऊनकरीलकोणी॥
॥६४॥ गदाधरपदींपिंडदान॥ देजरीशमीपत्रप्रमाण॥ वरिसप्तगोत्रउद्धरोन॥ हरीपदपावेतो॥ ६५॥
धर्मरायेंगयावर्जन॥ यथाविधिकेलेंसंपूर्ण॥ अक्षय्यवटींविप्रभोजन॥ पितृगणतृप्ततेथें॥६६॥ गयावासी-
यांसधन॥ अपारदेतकुंतीनंदन॥ जेंलागेनेंरुक्मिणीरमण॥ द्वारकेहूनपुरवित॥६७॥ गयामाहात्म्यश्रवणक-
रित॥ पुढेंदेखिलेंअगस्तीतीर्थ॥ लोपामुद्रावंदूनिसमस्त॥ श्रवणकरीमहिमातो॥६८॥ आतापीवातापीइल्व-
ल॥ अगस्तीनेमारिलेसकळ॥ केलासमुद्राचाचूळ॥ मगभरिलाजान्हवीनें॥६९॥ कपिलाचेशापापासुन॥ सग-
रउद्धरलेसंपूर्ण॥ लोमेशऋषीसर्वप्रवीण॥ आख्यानेंश्रवणकरवित॥७०॥ शृंगऋषीमहिमाविचित्र॥ श्रवण
केलेंपरशुरामचरित्र॥ कार्तवीर्यमहिमाअपार॥ स्मरणेंनिर्भयजयाचे॥७१॥ कार्तवीर्याचेस्मरणें॥ बाराचाटा-
पळतीविघ्नें॥ धर्मराजकरूनिश्रवण॥ परमसूखपावला॥७२॥ पुढेंप्रभासतीर्थाआले॥ यादवसर्वतेथेंभेटले
गंधमादनपर्वतारवाले॥ वारासूटलाअद्भुत॥७३॥ वृक्षपडतीउन्मळून॥ उडोनजातीजडपाषाण॥ द्रौपदीस
मूर्छायेऊन॥ भ्रमिततेव्हांपडियेली॥७४॥ सूटलासेप्रळयवात॥ मार्गपुढेंनदिसत॥ मग घटोत्कचाचेंस्मर
णकरित॥ भीमसेनतेधवां॥७५॥ तोपावलासेनेसहित॥ ऋषीसमवेतचारीपार्थ॥ द्रौपदीसहस्कंदींघेत॥ म
गनेतद्विपांनरा॥७६॥ पुढेंदेखिलाबद्रिकाश्रम॥ अलकनंदापावनपरम॥ नरनारायणउत्तमआश्रम॥ दर्शन-
घेतचालिले॥७७॥ तोसहस्त्रदळकमळसूवास॥ द्रौपदीसयेतआसमास॥ जैसेसंतांचेगुणनिर्दोष॥ नसांग-
तांप्रगटहोती॥७८॥ द्रौपदीभीमाचाहातधरून॥ सुहास्यवदनेंबोलेवचन॥ ह्मणेयासूवासीककमळेंकरून॥
धर्मरायापूजावें॥७९॥ माझेंहृदयींचेंआर्त॥ तुजविणपुरवीलकोणयथार्थ॥ मगघटोत्कचाहितीयसून॥ वच-

नासरिसाचालिला॥ ८०॥ ऐकतांअवनिजेचेंवचन॥ मृगवधाधांवेमित्रकुळभूषण॥ त्याचप्रकारेंकरून॥ भी
मसेनधांवला॥ ८१॥ नानाघोरकांतारा॥ उल्लंघीतजायवृकोदरा॥ नानापक्षीश्वापदेंअपार॥ भयंकरदेखिलीं॥
॥ ८२॥ चंचूसहस्त्रीचारधरून॥ जेपक्षीजातीउडोन॥ नितक्ष्यांचाहीग्रासकरून॥ सवेंचधांवतीआणीक॥
॥ ८३॥ कर्दळीवनवोलांडिले॥ पुढेंमहापर्वतदेखिले॥ तेथेंहनुमंतबैसलाबळें॥ आगळाश्रेष्ठब्रह्मांडीं॥ ८४॥
जांभईदेतांवाटेआवेश॥ वाटेग्राशीलहेंआकाश॥ बुभुःकारदेतांआसमास॥ कमळब्रह्मांडगडबडे॥ ८५॥ भ
यानकभ्रूकुटीपाहातांपूर्ण॥ वाटेकृतांताचाघेईलप्राण॥ ऐसाअंजनीहृदयरत्न॥ संतापहरणादेखिला॥ ८६
शेषाकृतीलांगूलपसरुन॥ बैसलासेमार्गरोधून॥ देखोनिभीमेंकेलेंगर्जन॥ खेचरभूचरहडबडिले॥ ८७॥
कपींद्रह्मणेमानवा॥ हाकेंनेपळविलेंसर्वजीवा॥ हापुरुषार्थबरवा॥ पाहातांनभरेमानसीं॥ ८८॥ सर्वभूतींरा
मव्यापक॥ त्यावरीदयाअसावीसम्यक॥ पुढेंतूंनकोजाऊंएकाएकां॥ महाअनर्थदिसतसे॥ ८९॥ भीमह्मणेपु
च्छकाढींत्वरा॥ अंजनेयह्मणेमी ह्मातारा॥ मजउचलेनाचतुरा॥ वृकोदराकाढींतूं॥ ९०॥ मगतेणेंरगडूनि
अधर॥ मदोन्मत्तइभनवसहस्त्र॥ त्यांचेंबळसमग्र॥ पंडुपुत्रवेंचीतेव्हां॥ ९१॥ धापेदाटलाअद्भुत॥ नचले
कांहींपुरुषार्थ॥ ह्मणेसांगतूंकोणयथार्थ॥ विधिरमावरकींउमावर॥ ९२॥ मगबोलेवानरेश॥ दशकंठहर
णाचामीदास॥ तूंश्रीकृष्णभक्तमहापुरुष॥ गर्वरहितवर्ततूं॥ ९३॥ मगलोकप्राणेशसुत॥ भीमसेनातेंआलिं
गनदेत॥ भीमसेनस्तवनकरित॥ मींभावंडधाकुटेंतुझें॥ ९४॥ षोडशसहस्त्रयोजन॥ येतांजातांमार्गक्रमुन॥
तुवांआणिलागिरिद्रोण॥ लक्ष्मणाप्राणदानदिधलें॥ ९५॥ तोनव्हेचिगिरिद्रोण॥ साक्षातलक्ष्मणाचाप्राण
जातहोतारुसोन॥ समजाऊनआणिला॥ ९६॥ कींद्रोणाचळाचीनाटीजाण॥ महावल्लीवातीउजळोन॥ वोवा
ळिलाजनकजाप्राण॥ प्रेमेंकरोनिकपिराया॥ ९७॥ कींजयघेऊनगेलादशकंधर॥ कपिसेनेंतपडलाअंधार॥

तूंनगरूपआणोनिभास्कर॥जयसमग्रवोदिला॥९८॥माझीआळीपुरवीयेवेळे॥तुवांलंकादहनीरूपधरिले
तेंमजदाखवावेंदयाळें॥कृपाकरोनिक्षणभरी॥९९॥बोलेराघवचरणारविंदमिलिंद॥तेंभयानकरूपअगा-
ध॥उपप्रतिमाकृनांनविशद॥दृष्टीपाह्नंशकेना॥२००॥तूंपाहानांपडशीमूर्छित॥जीवाप्रळयहोईलअत्यंत॥ब्र
ह्मकटाहसमस्त॥डळमळीलएकदां॥२०१॥त्यारूपाचेसहस्रांशेंकरून॥रूपधरितोंआतांलहान॥मगभीमा
चेउभयनयन॥निजकरेंकपिनेंस्पर्शिले॥२॥ह्मणेभीमापाहेंसावधान॥तोंआकाशादिलेटेंकण॥तेंविक-
पिभयानकदारूण॥काळाचेनदेखवेना॥३॥ब्रह्मांडरगडीलदाढेखालें॥ऐसेंविशाळमूखपसरिलें॥सूर्यबिं
बवाटेहारपलें॥नेत्रप्रकाशेंत्याचिया॥४॥भीमभयाभीतनुघडीडोळे॥ह्मणेझांकींरूपयेवेळे॥ऐकतांलघुस्वरू
पप्रघटविलें॥सावधकेलेंवृकोदरा॥५॥प्रसन्नहोऊनमारुती॥मींसाह्यहोईनकिरीटीप्रति॥कौरवदैत्यपापमती॥
संहारीनवृकोदरा॥६॥ऐसेंबोलूनत्वरितगती॥गुप्तजाहालातेथेंमारुती॥पुढेंनिःशंकहोऊनपंथीं॥भीमजात
जातपवनवेगें॥७॥उल्लंघितनानावनेंगहनें॥बहूतकरूनकळतीनामाभिधानें॥नवलक्षपक्षीनिर्माण॥नानाव
र्णनानाध्वनि॥८॥स्कवर्णभूमीरत्नमयपाषाण॥सरोवरेंदेखिलींविशाळगहन॥दशदिशाकोंदल्यावासेंकरुन॥
कमळेंपाहिलींशतदळें॥९॥भीमेंघेतलींबहूतकमळें॥युद्धानिघालेराक्षसपाळे॥तेकुबेरदूतबहिले॥रक्षकहो
तेकमळांसी॥१०॥मांडलेंयुद्धदुर्धर॥भीमेंसंहारिलेबहुतअसुर॥धनेशाजाणवितीसमाचार॥पुरुषभयानक
एकआला॥११॥कुबेरह्मणेतोकृष्णाभक्त॥कमळेंनेऊंद्यात्यांसबहुत॥मगयातुधानझालेशांत॥भीमत्वरेंपातला
॥१२॥प्रभंजनसुतलाअद्भुत॥उडोनजातीथोरपर्वत॥तैसाचभीमगडगडीत॥धर्मदर्शनात्वरेंजाय॥१३॥चिंताक
रीतयुधिष्ठिर॥कमळेंआणूंगेलावृकोदर॥केव्हांपाहीनसहोदर॥त्यावीणसर्वदीनआह्मीं॥१४॥तोंअकस्मातक
मळेंघेऊन॥उभाठाकलाभीमसेन॥वंदिलेधर्माचेचरण॥वर्तमानसांगीतलें॥१५॥ऐकोनिसंतोषलाधर्म॥मग-

कल्हारें आणिलीं जीं उत्तमोत्तम॥ तेणें पूजिले द्विजोत्तम॥ लोमेश धौम्यादि सर्व ही॥१६॥ गुंफून कमळांच्या माळा॥
द्रौपदी घाली धर्माचे गळा॥ भीम नकुळ सहदेव पूजिला॥ अत्यादरें करूनियां॥१७॥ यावरी गंधमादनापरतोन॥
येते झाले कुंतीनंदन॥ तेथें ब्राह्मणवेष धरून॥ जटासुर पातला॥१८॥ नित्य सेवे सितिष्ठत॥ धर्मपंङ्कीस भोजन
करित॥ जैं बिंबें दयात्रे सयेत॥ वेष धरोन साधूचा॥१९॥ भीमन सतां अकस्मात॥ द्रौपदी सन्या वयाजपत॥ जों विं
दुर्जन उणें पाहात॥ सज्जनाचें सर्वदा॥२०॥ धटोत्कचासह भीमसेन॥ गेला वना मृगयेलागुन॥ धौम्य लोमेश अ-
नुष्ठानें॥ स्वर्धुनीतीरा गेले ते॥२१॥ तिघां बंधूसह द्रौपदी॥ असुरें उचलोनि घेतलीं खांदीं॥ अंतरिक्ष उडाला कुबु
द्धी॥ अंडजा ऐसा त्वरेनें॥२२॥ तिघांचीं शस्त्रें घेतलीं हिरोन॥ मागुती नदेच परतोन॥ धर्मराज बोले वचन॥ जटा-
सुराप्रति तेव्हां॥२३॥ शस्त्रें आसुचीं देझडकरी॥ समरंगणीं धर्मयुद्ध करी॥ तंव तो म्हणे गिरिकंदरीं तुम्हां तिघांस मा
रीन॥२४॥ भीमास हीं शोधून वर्धान॥ द्रौपदी समाझी स्त्री करीन॥ धर्में दशदिशा विलोकुन॥ वाट पाहे बंधूची॥-
२२५॥ तों ईश्वरगती विचित्र॥ त्याचि मार्गें आला वृकोदर॥ तोंचो घांस घेऊन असुर॥ पळतां देखिला ते वेळीं॥२६॥
गर्जना करी भीमसेन॥ म्हणे आसुचें अन्न भक्षून॥ बरा जाहालासि उत्तीर्ण॥ महापतिता राक्षसा॥२७॥ दैत्यें चौ
घांस उतरोन॥ युद्धा प्रवर्तला दुर्जन॥ दाहा घटिका संपूर्ण॥ युद्ध जाहालें सबळ तेथें॥२८॥ वाळी सुग्रीव जेविं भी-
डती॥ संदोपसंद जे वियुद्ध करिती॥ हिडिंबा ऐसा पापमती॥ जटासूर प्रबळ तो॥२९॥ बकासुर आणि किमिर॥ ते-
विं भीमासि झगटत असुर॥ मग त्यास भोवंडून सत्वर॥ वृकोदरें आपटिला॥३०॥ ते व्हां त्याचें शिर मोडुनी॥ महि
वरून भिरकाविलें गगनीं॥ शशि आणि तरणी॥ देखोन कंपित जाहाले॥३१॥ शरीर पडलें भूमंडळीं॥ आनंदें सर्व
ऋषिमंडळी॥ सुमनवर्षाव ते काळीं॥ सुरवरीं केला पैं॥३२॥ मग आश्रमा आले परतोन॥ चालिले ऋषिमंडळ घे
ऊन॥ घेत महापुरुषाचें दर्शन॥ गिरी उपगिरी वोलांडिती॥३३॥ यमनियम प्राणायाम प्रत्याहार॥ ध्यान धारणा

कमुहूर्त। कोणीहीनबोलेतेथ। पाहातीतटस्थउगेचि॥ १९॥ श्रीरंगाचेंवदन॥ समस्तपाहातीविलोकुन॥ यावरी
तोजगद्गुरूजीवन॥ बोलताझालातेधवां॥ २०॥ कौरवांचेंअन्यायबहुत॥ तुह्मींदेखिलेऐकिलेसमस्त॥ पंडुरायाचें
राज्ययथार्थ॥ हेंविख्यातजाणताकीं॥ २१॥ जेणेंस्वसत्तावसनेंकरूनी॥ पालाणिलीहेकुंभिनी॥ सर्वहीराजेजिंकुनी
॥ शतमखआचरला॥ २२॥ त्यापंडुनृपाचेहेसुत॥ त्रिभुवनीविख्यातबळाद्भुत॥ भीमार्जुनाचेपुरुषार्थ॥ देखिलेकीं
समस्तीं॥ २३॥ हिडिंबबकक्रूरमीर॥ कीचकमारिलेसमग्र॥ त्याभीमासहेधृतराष्ट्र॥ मारितांअशक्यकायअसे॥ २४
खांडववनदेऊनसमग्र॥ सुखीकेलावैश्वानर॥ निर्जरांसहितनिर्जरेंद्र॥ केलाजर्जरसमरंगणीं॥ २५॥ निवातकवचां
चापुसिलाठाव॥ शेवटींकौरवपळविलेसर्व॥ गोग्रहणकाळींअभिनव॥ पुरुषार्थकेलाधनंजयें॥ २६॥ ऐसाअंगीं
पुरुषार्थ॥ परियाहीरक्षिलेंसत्य॥ वनवासआणिअज्ञात॥ त्रयोदशवर्षेंक्रमियेली॥ २७॥ अजातशत्रुधर्मनृपती॥ के
वळभोळाचक्रवर्ती॥ त्यांसजिंकूनकपटद्यूतीं॥ गांजिलीसतीद्रौपदी॥ २८॥ तरिदुर्योधनाचासमाचार॥ घ्यावया·
कायआतांउशीर॥ राज्यविभागसमग्र॥ देतोकिंवानाहींतो॥ २९॥ नाहींतरीतुह्मींआह्मींआप्त॥ पांडवांचेआहों·
समस्त॥ युद्धकरूनअद्भुत॥ कौरवदुष्टसंहारावे॥ ३०॥ मातेचियाकैवारें॥ अवनीनिःक्षत्रकेलीपरशुधरें॥ आतां
द्रौपदीचेमिषेंसमग्रें॥ कौरवसपक्षआटती॥ ३१॥ पंडूचेपंचकुक्षदीपकसुदाळ॥ ममस्नेहेंभरिततेजाळ॥ प·
रिपडतीकौरवपतंगसकळ॥ भस्महोतीसपक्षतें॥ ३२॥ कींउगवलेपंचादित्य॥ तेथेंकायसेकौरवखद्योत॥ त्रयो
दशवर्षेंरजनीत॥ झगमगीतहोतेंपै॥ ३३॥ पंचपांडवकुठारतीक्ष्ण॥ मींधर्तास्वसत्तेकरून॥ छेदीनकौरववृक्ष
दारूण॥ शाखाउपशाखासमवेत॥ ३४॥ कींहेपांडवपंचप्रळयाग्न॥ मींसाहेसबळप्रभंजन॥ कौरवशुष्क·
कंटकविपिन॥ जाळीनक्षणनलागतां॥ ३५॥ यावरीबोलेरोहिणीसुत॥ होयधर्मदुर्योधनाचेंहित॥ तोप्रका
रकरावाबहुत॥ दीजेराज्यार्थवांटुनी॥ ३६॥ तरिएकशिष्टधाडावापाठऊन॥ यांचेंकरींसमाधान॥ विदुररूपा·

चार्यभीष्मद्रोण॥ तेथेंवडीलआहेती॥ ३७॥ युद्धनकरावेंसाचार॥ सामकरावेंहानिर्धार॥ धर्मेंद्यूतरवेळूनसम
ग्र॥ राज्यआपलेंहारविलें॥ ३८॥ शकुनीचाअन्यायकायतेथ॥ तोंसात्यकीबोलेक्रोधयुक्त॥ ह्मणेकृष्णाग्रजातूंय
थार्थ॥ दुर्जनाचापादिरारवा॥ ३९॥ धर्मराजभोळाअत्यंत॥ दुर्जनींकपटेंजिंकिलेंसत्य॥ उद्यांकोरवरणींमारूंसमस्त॥ धर्मा
पुढेंपहुडवीन॥ ४०॥ महापुरुषार्थीपंचवीर॥ हेप्रतिपांडवपंचकुमर॥ हाप्रतिअर्जुनसोभद्र॥ यापुढेंसमरींकोणतगे
४१॥ क्षत्रीयधर्महासाचार॥ दुर्जनसंहारावेसमग्र॥ दृष्टीदेरवतांमारकाकिरवा॥ नेंदउआधीचंठेंचावें॥ ४२॥ दृष्ट्रीक॰
दृष्टीदेरवोन॥ पादरक्षेनेंकरिजेचूर्ण॥ परपीडकसंहारून॥ आधीटाकावेधर्महा॥ ४३॥ धर्मेंयाबरीतत्वता॥ कदानध
रावीनम्रता॥ राज्यनदेतांसमस्ता॥ मृत्युनगराधाडावें॥ ४३॥ राज्यघ्यावेंहिरोन॥ अथवाआपलेवेचावेप्राण॥ मग॰
कायव्यर्थवांचोन॥ षंदवतसंसारीं॥ ४५॥ धर्माएेकमाझेंउत्तर॥ धाकटेअथवावडीलवीर॥ त्यांससांगोनीपाठवीं॰
नमस्कार॥ वचननम्रबोलावें॥ ४६॥ आपल्यासामर्थ्यवैभवेंकरून॥ शत्रूविभांडावेसंपूर्ण॥ इतकेंनव्हेतरीकृष्णावं॰
दन॥ करूनजावेंवनांतरा॥ ४७॥ पुरुषलक्षणहेंचिपरम॥ जोंकुडींतआहेआत्माराम॥ तोंचपुरुषार्थाचाश्रम॥ ब्र॰
ह्मांडभरीदाविजे॥ ४८॥ यावरीद्रौपदीबोलेवचन॥ परमपापात्मादुर्योधन॥ त्यासींगेलियाप्राण॥ मृदुवचनेंनबोला
वें॥ ४९॥ वृकव्याघ्रविरवारपाहे॥ यांसिमृदुबोलोनिसाध्यकाय॥ पत्रेंपाठऊनिसकळराय॥ सत्वरआधींबोलावा॥
॥ ५०॥ त्वराकराआतांबहुत॥ भगदत्तादिराजेसमस्त॥ छपन्नदेशींचेनृपनाथ॥ बोलावासत्वरत्यांआधीं॥ ५१॥ चतुः
समुद्रपर्यंत॥ सप्तद्वीपनवरवंडांत॥ वसतीराजेसमस्त॥ आधींयेथेंबोलावा॥ ५२॥ सहस्त्रकामेंसोडून॥ आधि
पत्रेंपाठवालिहुन॥ दुर्योधनप्रार्थून॥ नेईलआधीएकादा॥ ५३॥ पांचाळराजबोलिलातेव्हां॥ आमुचापुरोहितच
तुरबरवा॥ तोंपुढेंपाठवावा॥ कुंजरपुरासिययवेळे॥ ५४॥ श्रीरंगह्मणेरायासुजाणा॥ बोलिलासिउत्तमवचना॥ ए
कशिष्टपाठऊनआणामना॥ अंतरत्याचेंकैसेंअसे॥ ५५॥ सामभेददंडकरून॥ शत्रूकरावेआपणाधीन॥ बोल॰

खोनपरानेंचिन्ह॥ चतुरेंतैसेंचवर्नावें॥ ५६॥ मंत्रेंआकर्षिजेविषधर॥ उदकेंशांतवीवैश्वानर॥ वेदांत ज्ञानाचे
वैभवसमुद्र॥ उतरूनजावेंपैलपारा॥ ५७॥ कामक्रोधशत्रूसमग्र॥ तेविवेकीजिंकावेसाचार॥ भक्तिबळेंईश्वर
॥ आपणाधीनकरावा॥ ५८॥ शमदमबळेंकरून॥ मनोजयकरितिसज्ञान॥ विपत्तीचाबळेंगहन॥ अर्थकादि
तीपंडित॥ ५९॥ पाषाणाखालींसांपडेहस्त॥ तोयुक्तीनेंकाढावाअकस्मात॥ बळेंकरूनबोढितांतेथ॥ व्यथाभा
ग्रहोयपैं॥ ६०॥ तैसाआधींसामकरून॥ वश्यकरावासुयोधन॥ समयोचितजाणेचिन्ह॥ ऐसाशिष्टपाठवावा॥
६१॥ सभेसबैसतांजाऊन॥ दिसेजैसावाचस्पतीसमान॥ सरस्वतीजासिप्रसन्न॥ समयोचितशब्ददेत॥ ६२॥
वेदशास्त्रपुराण॥ हेंजासकरतलामलपूर्ण॥ तेजस्वीजैसाचंडकिरण॥ सभास्थानींतेविंदिसे॥ ६३॥ जरीवरी
शत्रूलोटलेसमस्त॥ त्यासमयींजैसावैवस्वत॥ दुसराकलशोद्भवसुत॥ शत्रुसागरप्राशावया॥ ६४॥ हृदयनि
र्मळकपटरहित॥ भोळाजैसाउमाकांत॥ श्रेष्ठत्वेंसभेतमिरवत॥ शचीनाथजयापरि॥ ६५॥ वारणचक्रांतनि
घोन॥ आपलेंकार्यसाधीपंचानन॥ कींएकलाचिजाऊनिसुपर्ण॥ अमृतघेऊनजेविंआला॥ ६६॥ कींएकला
चजाऊनगुरुपुत्र॥ साधूनयेसंजीवनीमंत्र॥ कींसागरउतरूनिरुद्रावतार॥ शुद्धिकरूनिपातला॥ ६७॥ तैसेंच
कार्यसाधून॥ सत्वरयेईजोंपरतोन॥ ऐसापाठवावानिवडून॥ शीघ्रकाळेंचतत्वता॥ ६८॥ आह्मींआलोंलग्ना·
सयेथें॥ जातोंआपलीयास्वस्थानातें॥ बोलाऊंपाठऊंमहिरत्नातें॥ आह्मासहितसर्वांसीं॥ ६९॥ मगबैसोनआ
पल्यारथीं॥ द्वारकेसगेलेरुक्मिणीपति॥ इकडेसर्वरायांधर्मनृपती॥ पाठवीबोलाऊंतेधवां॥ ७०॥ धर्माचीं·
पत्रेंघेउनी॥ अपारहेरधांवतीतेक्षणीं॥ देशोदेशींजाउनी॥ निघाह्मणतीसत्वर॥ दुर्योधनेंपत्रेंपाठऊनसत्व·
र॥ राजेआणिलेछत्रधर॥ दळेंमिळालींअपार॥ कुंजरपुराभोंवतीं॥ ७२॥ पांडवप्रियजेकांनृपती॥ तेविराट·
नगराप्रतिजाती॥ त्यासमोरजाऊनिप्रीति॥ धर्मआणीअत्यादरें॥ ७३॥ द्रुपदह्मणेउपाध्यालागुन॥ चौऱ्याशीं·

योनींतदिव्यरत्न॥नरदेहपरमपावन॥श्रेष्ठब्राह्मणत्यांततूंची॥७४॥त्याहीवरीतूं ब्रह्मवेत्ता वेदज्ञ॥बुद्धीनेंकविगु
रूसमान॥तुजसात्यनेथेंसंपूर्ण॥विदुरअसेधर्मात्मा॥७५॥तोंवरीआह्मींदळें॥येथेंमेळवितोंसकळें॥मगशिष्या
सहिततेंबैंळे॥विप्रगेलागजपुरा॥७६॥द्वारकेसिसुभद्रापती॥पातवीसत्वरधर्मनृपती॥दुर्योधनसमीरगती॥
त्याहीपुढेंधांवत॥७७॥कापट्यनिधीसुयोधन॥त्वरेंप्रवेशलाकृष्णसदन॥तेंजाणोनशतपत्रनयन॥निद्राकेली
निजसेजे॥७८॥तोंतेथेंआलादुर्योधन॥ह्मणेहागोवळछत्रहीन॥मीयाचापायथांबैसेन॥हेंकाळत्रयींघडेना॥
॥७९॥उशाकडेजाऊनसत्वर॥बैसलातोदुष्टगांधार॥सवेंचपातलासुभद्रावर॥तोपायथाबैसला॥८०॥ध्वजव
ज्रऊर्ध्वरेखासमवेत॥तेतळबैसुरंगअतिआरक्त॥सनकादिकजेह्रदयींध्यात॥विलोकितपार्थप्रीतीनें॥८१॥को
णवर्णीचरणरजथोरी॥उद्धरिलीकमळोद्भवकुमारी॥केलीकुबजादिव्यनारी॥स्पर्शोनियांचरणरजें॥८२॥वृंदा
वनींचेपाषाण॥उद्धरिलेचरणींचालोन॥बळिराजनेऊन॥रसातळींस्थापिला॥८३॥तेचतळवेआरक्त॥पार्थस्व
हस्तेंतळहातित॥तोंसत्वरउठोनभगवंत॥विजयाकडेपाहूंलागला॥८४॥ह्मणेकांआलासिसरवयापार्था॥येरु
ह्मणेविश्वव्यापकासमर्था॥तूंगुरुदेवमातापिता॥पाठिराखेंआमची॥८५॥सेनामिळालीसंपूर्ण॥परिदीपें
विणजेविंसदन॥जळेंवीणजेविंअन्न॥तैसेंतुजवीणदिसतसे॥८६॥मगबोलेदुर्योधन॥मींआधींबैसलोंयेउन॥
मगह्मणेवृष्णिकुळभूषण॥म्यांअर्जुनदेखिलाआधिं॥८७॥मजनाहींयुद्धकरणें॥अथवासमरींशस्त्रधरणें॥
फुकटनेऊनकायपाळणें॥अर्जुनेंहीआह्मासी॥८८॥माझेनारायणगणबहुत॥सेनाआहेअपरिमित॥पार्थदु
र्योधनासांगयथार्थ॥दोंनींतकायआवडतें॥८९॥पार्थह्मणेतूंशस्त्रनधरीं॥अथवासमरींयुद्धनकरीं॥तूंकृपादृ
ष्टीनेंमुरारी॥विलोकूनपाहेंआह्मां॥९०॥दुरूनपाहेकूर्मीण॥तेणेंपिलियांहोतअमृतपान॥तूंतुसताचयेऊन॥
उभाराहेंश्रीरंगा॥९१॥दुर्योधनह्मणेजगज्जीवना॥देईआह्मांसअवघीसेना॥तुजनिशस्त्रियानेऊनिजाणा॥का

यकारणसांगपां॥ ९२॥ झालेजेंवर्तमान॥ बळिरामासिसांगेदुर्योधन॥ तूंश्रीगुरूमाझायेऊन॥ करीसाहित्यसर्वही॥ ९३॥ बळिरामह्मणेऐकनिवाडें॥ कृष्णपरब्रह्मजाणतिकडे॥ त्यासटाकूनमजतुह्मांकडे॥ येतांनयेनिश्चयेंसिं॥ ९४॥ तरिमींतिकडेनतुजकडेपाहें॥ नहोयकदांतुजसात्य॥ नरिदुर्योधनातूंजाय॥ क्षत्रधर्मेंयुद्धकरीं॥ ९५
एकक्षोणीदळसहित॥ कृतवर्मायादवविख्यात॥ तोनेईं तूंसाह्यार्थ॥ युद्धअद्भुतकरावें॥ ९६॥ असोकृतवर्म्यासहीतदळघेऊन॥ गजपुरागेलादुर्योधन॥ इकडेधनंजयासबोलेमनमोहन॥ तूंकांमजघेतलें॥ ९७॥ पार्थह्मणेजगत्पती॥ तूंबैसमाझेमनोरथीं॥ तुजऐसाअसतांसारथी॥ शिक्षालावीनकृतांता॥ ९८॥ रथींबैसोनपार्थरुक्मिणीकांत॥ गेलाधर्मासभेटावयात्वरित॥ तिकडेसैन्यासबोलाऊननिश्चित॥ धर्मरायेंपाठविले॥ ९९॥ अर्धयोजनरुंदस्तनना॥ मार्गेजातहोतगर्जना॥ तोंमाद्रीचाबंधुपंडुनंदना॥ सात्यचालिलावेगेंसि॥ १००॥ तिकडेशल्यजानोजाणोन॥ शुभरूपेंदुर्योधन॥ चतुरसेवकपाठऊन॥ उपचारमार्गीसमर्पी॥ १॥ वस्तीगणीतसुंदरें॥ मार्गीनिर्मिलेंचंदनागारें॥ सुगंधउदकेंमनोहरें॥ अष्टभोगठाईंठाईं॥ २॥ तेअष्टभोगकोणकोण॥ ऐकतयाचीनामखुण॥ सुगंधवनितावस्त्रगायन॥ तांबूलभोजनअनुक्रमें॥ ३॥ शय्याआणिदीपक॥ अष्टभोगसम्यक॥ षड्रसअन्नेंसुरेख॥ अनुक्रमेंसमर्पिली॥ ४॥ सुयोधनाचेप्रधान॥ शल्यापुढेंराबतीप्रीतीकरून॥ समयोचितसमर्पितीआणुन॥ झालाप्रसन्नशल्यतेव्हां॥ ५॥ ह्मणेमागालतेदेईन॥ तोंगुप्तरूपेंप्रगटेदुर्योधन॥ ह्मणेहेमाझीसेवासंपूर्ण॥ होईंतूंप्रसन्नमजलागीं॥ ६॥ मजसात्यहोऊनदेईंयश॥ मगतोशल्यह्मणेंअवश्य॥ दुर्योधनातूंजायनगरास॥ मींधर्मासभेटोनयेतों॥ ७॥ दुर्योधनबोलेनम्रवचन॥ सांभाळींआपलेंवरदान॥ शल्येंअवश्यह्मणोन॥ उपलव्याप्रतिआला॥ ८॥ पांडवांप्रतिभेटोन॥ दिधलेंपरमसमाधान॥ ह्मणेतुह्मींवनवासभोगुन॥ परमकष्टपावलां॥ ९॥ धर्मातूंपरमपावन॥ नळहरिश्चंद्रासमान॥ असोतुझियापत्रावरून॥ सेनेसहितयेतहोतों॥ १०॥ मजदुर्योध-

नेंठकवून॥ गोंवून केलें आपणाधीन॥ मग अजातशत्रु बोले वचन॥ अवश्य जाईं मातुळा॥ ११॥ परि इतकें देईं मज ला-
गुन॥ तूं अश्वहृदय जाणसी संपूर्ण॥ तरि तूं कर्णाचें सारथ्य करून॥ तेजोभंग करीं त्याचा॥ १२॥ आमचा प्रताप कर्णी॥
करीं त्याचि या तेजोहानि॥ हें अयोग्य कर्म येक्षणीं॥ अंगीकारीं आह्मांकरितां॥ १३॥ अवश्य ह्मणे शल्य वीर॥ रणीं त्या
चे मोडीन हीर॥ बळक्षीण करून समग्र॥ यश येईल तुह्मातें॥ १४॥ सर्वोपचारीं तोषविला॥ शल्य गजपुरा प्रति गेला
॥ इकडे पांडवांकडे आला॥ सात्यकी निज दळेंसि॥ १५॥ धर्मा भोंवतें ते क्षणीं॥ दळ मिळालें सात क्षोणी॥ तिकडे एका-
दश क्षोणी वाहिनी॥ दुर्योधनें मेळविली॥ सकळ यादवांसहित॥ कृतवर्मा आला तेथ॥ सौबळ कांमभोज जयद्रथ॥
यवनमंडळींपातली॥ १७॥ पर्वती राजे अपार॥ सेनेसहित आले सत्वर॥ असो द्रुपदाचा पुरोहित विप्र॥ सत्वर भेट
ला दुर्योधना॥ १८॥ त्याचा करून सन्मान॥ दुर्योधन पुसे वर्तमान॥ विप्र ह्मणे मज लागुन॥ द्रुपदरायें धाडिलें॥ १९॥ तु-
ह्मीं राज्य करितां विशेष॥ पांडवांस कां वनवास॥ अनर्थ करून बहुवस॥ त्यास बाहेर घातलें॥ २०॥ नरी तुह्मी मैत्र
करून॥ कलह टाकावा वारून॥ परम महाबळी अर्जुन॥ साह्य भगवान तयासी॥ २१॥ अकरा क्षोणी दळ संपूर्ण॥
न होय एका अर्जुना समान॥ बलाधिक्य तो भीमसेन॥ रणकृतांत सबळ तो॥ २२॥ ऐसे पांडव बळवंत होनी॥ तुह्मा
सि मैत्री करूं इच्छिती॥ धन्य धन्य ते चजगतीं॥ बंधू तुमचे निर्धारीं॥ २३॥ यावरी बोले सूर्यनंदन॥ पांडव गेले प्रतिज्ञा-
बोलून॥ मूर्ख हो ते खरें करून॥ द्वारवे आर्ध ह्मणावे॥ २४॥ एक पाउलमात्र मेदिनी॥ नेदूं चिंत या सये क्षणीं
त्यासि सांग जाउनी॥ भय सांडूनि युद्धा सया॥ २५॥ विराटनगरीं गुप्त राहिले॥ परि आह्मीं ते व्हां नवोळखि
लें॥ पुनः वनवास करावा हिले॥ मग या बळें युद्धासि॥ २६॥ अथवा याचक वृत्ती करून॥ या आर्धी आह्मास शर
ण॥ मग एकादा ग्राम देऊन॥ करूं रक्षण तुमचें पैं॥ २७॥ गंगात्मज बोले वचना॥ गोग्रहणीं एकल्या अर्जुना॥
कां रे जिंकिलें नाहीं कर्णा॥ आतां वल्गना करितोसि॥ २८॥ शस्त्रें अस्त्रें सांडून॥ आलासि गजपुरीं पळोन॥ भी-

४

मेंकीच कदाकिलेमारुन॥तुझेमनआठवीकीं॥२९॥अनिवारअर्जुनाचेबाण॥घेतीलजेव्हांतुमचाप्राण॥ते
व्हांआठवालआम्हुचेंवचन॥कलेवरत्यागकरितां॥३०॥कौरवांचीआज्ञाघेऊन॥गेलाद्रुपदाचाब्राह्मण॥पां
चाळरायासवर्तमान॥झालेंतेंचसांगीतलें॥३१॥इकडेधृतराष्ट्रबोलेतेअवसरीं॥संजयातूंजायतेथवरी॥मा
झाआशीर्वादसांगोनलवकरी॥अंतरत्यांचेंशोधींकां॥३२॥मैत्रीकरावयाइच्छिति॥किंवासमरभूमीसिभि
डती॥तेआहेतपुण्यवंतरूमती॥स्नेहवाढवीसर्वांसी॥३३॥तेपंचहीप्रळयाग्न॥क्षणांतजाळितीशत्रुकानन॥
यादवकुळपंचानन॥त्यासमाध्यसर्वस्वें॥३४॥बहुतपेंपुण्यथोर॥प्रतिशंकरयुधिष्ठिर॥क्रोधदृष्टीनेंचसमग्र॥भ
स्मकरीलशत्रूंतें॥३५॥तरिसंजयातूंजाऊन॥बोलेंधर्मासीनम्रवचन॥मगचालिलारथींबैसोन॥उपलव्यासपा
वला॥३६॥पांचहीकौंतेयअनुक्रमेंकरून॥संजयासदेतीआलिंगन॥म्हणेवृद्धसुखीकींअवघेजण॥पुत्रपौत्रस
मवेत॥३७॥संजयम्हणेसुखीअवघेजण॥रायेंतुह्मासिसांगीतलेआशीर्वचन॥पांडवह्मणतीरात्रंदिन॥त्यांचे
चरणस्मरतोंआह्मीं॥३८॥हस्तनापुरींचेविप्र॥सुखीकींपुसेयुधिष्ठिर॥ब्राह्मणाचेंमानसमग्र॥दुर्योधनरक्षि-
तोकीं॥३९॥वृद्धआणिगुरुसेवन॥सदांकरितोकीमनातुन॥दानयागमित्ररक्षण॥प्रजापालनकरितोकीं॥४०॥
पांडवांसपाचारण॥घडलेंह्मणतनाहींकींजन॥भीमार्जुनाचापराक्रमपूर्ण॥दुर्योधनस्मरतोकीं॥४१॥गंधर्वीहा
तिंचासोडवून॥तुकविलामरणापासून॥तेंआठवितोकींसुयोधन॥उपकारबहूमानितोकीं॥४२॥संजयह्मणे-
धर्मात्मजा॥सोमवंशविजयध्वजा॥नागपुरींचासर्वप्रजा॥तुजकल्याणचिंतिती॥४३॥प्रज्ञाचक्षूआदिक-
रूनी॥द्रोणभीष्मादिकांचेमनीं॥दृढमैत्रीसाधुनी॥अर्धराज्यद्यावेंतुह्मां॥४४॥युयुधानविराटद्रुपद॥समस्त-
हीऐकानृपवृंद॥उभयपक्षींकल्याणआनंद॥तेंचसर्वकरातुह्मी॥४५॥स्वर्धुनीतनयभारद्वाजशारद्वत॥साम
करावेंसर्वांचेमनोगत॥यावरीयुधिष्ठिरबोलत॥हेंचमनींमाझिया॥४६॥परिप्रज्ञाचक्षूराजेश्वर॥पुत्रलोभेंअं

मलाथोर॥सद्बुद्धीपासूनिभ्रष्टलाज्येष्ठपुत्र॥त्यासविचारूनसांगें॥ ४७॥दुर्योधनाचेमनीं॥आपणविसर्वकुं
भिनी॥त्याचियागर्वारूढनठेंगणी॥वादीकेलीमेरूची॥ ४८॥परिहरिध्वजनयनीं॥देखिलानाहींजोंरणमेदि
नी॥खगवरध्वजस्यंदनी॥पुढेंआरूढलानाहींजों॥ ४९॥तोंवरीचहेवल्गना॥बोलतांगोडवाटेसुयोधना॥गदे
सहितजोंभीमसेना॥रणांगणींनदेखिलें॥ ५०॥सत्यसांगजाऊनित्वरित॥सत्वरहेपाकशासनप्रस्थ॥हेंपंडु
रायाचेंराज्यसमस्त॥परिआह्मींगजपूरदिल्हेंतूतें॥ ५१॥यावरीवैकुंठींचावेल्हाळ॥रुक्मिणीमानससरोवरम
राळ॥भक्तकामकल्पद्रुमतमालनील॥मेघगंभीरगिराबोले॥ ५२॥क्षत्रियधर्मआचरून॥राज्यपराक्रमेंकरू
न॥नरिइहपरत्रकीर्तिपूर्ण॥दुमदुमीलधर्मराया॥ ५३॥क्षत्रियधर्मआचरतांजाण॥जरिपावलासमरींमरण
नरिउत्तमलोकपावोन॥कीर्तीहोयत्रिभुवनीं॥ ५४॥संजयाजाऊनसांगसत्वर॥देपांडवांसराज्यसमग्र॥मगते
तुजदेतीलगजपुर॥बंधूह्मणऊनिप्रीतीनें॥ ५५॥मरणत्याचेंजवळीआलें॥नरिचतेणेंदळमेळविलें॥नाइ
केंकृष्णाचेंशिकविलें॥अवश्यकाळेंचुकेना॥ ५६॥कपटद्यूतखेळलेजेवेळीं॥दुःशासनधांऊनपांचाळी॥केंशीं
धरूनसभेसिनेली॥दीनअनाथजेसेंकां॥ ५७॥कौरवजनपरमदुर्जन॥कर्णादिकींसोडिलाशब्दबाण॥नेघाव
आजूनिजाण॥नाहींमिळालेसंजया॥ ५८॥दुर्योधनशकुनीदुःशासन॥याच्यारक्तेंभूलिंगाहोईलस्नपन॥
कर्णाचेंशिरजाईलउडोन॥घायमिळतीतेव्हांते॥ ५९॥पांचपांडवप्रळयाग्न॥ त्यांसनावठेविलेषंदतिळ॥
पांचाळीचींवस्त्रेंहिरूनसकळ॥सभेंतवल्कलेंनेसविलीं॥ ६०॥असोसर्वांसिविचारून॥संजयचालिलातेथू
न॥धर्मराजबोलेवचन॥वृद्धांसनमनसांगमाझें॥ ६१॥भीष्मद्रोणशारद्वत॥गजपुरींचेविप्रप्रतिआदि
त्यो॥प्रज्ञाचक्षुविदुरादिसमस्त॥सांगनमनमाझेंसर्वां॥ ६२॥कुंतीगांधारीमाता॥यांचियाचरणावरीमाझा
माथा॥आह्मींसुखरवीआहोंसांगसमस्तां॥श्रीकृष्णदयेकरूनियां॥ ६३॥धृतराष्ट्राचेचरण॥वंदूनसांगइतकें॥

वचन॥ ग्रामदेईं आह्मालागुन॥ नामाभिधान ऐकपां॥ ६४॥ अविस्थळ वृकस्थळ जयंत॥ वारुणावत आणि शक्रप्रस्थ॥ इतकें देऊन समस्त॥ कलहमूळ खंडीकां॥ ६५॥ मग वस्त्राभरणीं तेवेळां॥ संजय धर्में गौरविला॥ निजरथीं बैसोन पावला॥ गजपुरींत त्काळ॥ ६६॥ धृतराष्ट्रास भेटोन॥ झालें तें चवर्तमान॥ यावरी समस्तां वागृहा जाऊन॥ धर्मवचनें निरोपी॥ ६७॥ माघुती धृतराष्ट्राजवळी येऊन॥ संजय बोले हितवचन॥ ह्मणे आम्ह दूरी दव डून॥ अनाम जवळी केलें तुवां॥ ६८॥ चिंतामणी भिरकाउन॥ घेतलें रवांदां जड पाषाण॥ अमृतघट उल्लंघून॥ पिईजे धूणा जैसें पां॥ ६९॥ पूज्यमूर्ति वोसांडुन॥ गुरवाचे जैसे धरिले चरण॥ राजकुमर वर टाकून॥ नवरी वरी मृदंगिया॥ ७०॥ पाडून देवळाचें शिखर॥ भोंवतें घातलें आवार॥ नागऊन यात्रा समग्र॥ अन्नछत्र घातलें॥ ७१॥ फणस टाकून रसाळ॥ प्रीतीनें घेतलें कनकफळ॥ मुक्त टाकून तेजाळ॥ गुंज जैशी घेतली॥ ७२॥ गार घेउन टाकिला हिरा॥ नमदेऊन दवडिलें दिनकरा॥ पाचभिरकाऊन सत्वरा॥ काच जवळी रक्षिली॥ ७३॥ परीस टाकून घेतला खडा॥ पंडीत देऊन आणिला वेडा॥ कल्पवृक्ष देऊन रोकडा॥ पलांडु घेतला जैसा कां॥ ७४॥ निजसूख देऊन घेतलें दुःख॥ मृगमद त्यागें घेतलें पंका॥ चंदन टाकून सुरेख॥ गोमय जैसें घेतलें॥ ७५॥ तैसें रायाकेलें साचार॥ वना धाडून पंडूकुमर॥ कैंचें मेळऊन नृपवर॥ आप्तपरम मानिले॥ ७६॥ ऐक धृतराष्ट्रा नृपती॥ सर्वही लोक तुज निंदिती॥ यावरी संजयाचा वचनोक्ति॥ उपेक्षित दृष्ट्तो॥ ७७॥ मग दूत पाठऊन सत्वर॥ अंधें बोलाविला विदुर॥ ह्मणे संजय वचन निष्ठुर॥ बोलतो पहा मजलागि॥ ७८॥ विदुरा हित्त सांगें मजप्रति॥ आहे केसी उत्तम नीति॥ मज नगमे निश्चिती॥ चिंतानळीं पडियेलों॥ ७९॥ यावरी तो विदुर॥ वर्षेल ज्ञानाचा सागर॥ ते ब्रह्मानंद श्रीधर॥ वर्णील सार अभंग॥ ८०॥ स्फुररस पांडवप्रताप ग्रंथ॥ उद्योगपर्व व्यासभारत॥ त्यांतील सारांश यथार्थ॥ छत्तिसाव्यांत कथियेला॥ ८१॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु॥ ॥ शुभंभवतु॥ ॥ स्वार्थपरार्थम्॥ ॥ छ॥ ॥ छ॥ ॥ छ॥ ॥ छ॥ ॥

श्रीगणेशायनमः॥ प्रज्ञाचक्षूराजेश्वर॥ विदुरत्यासनीतीविचार॥ ऐकतांसाधकज्ञानीसमग्र॥ सुरवअपारपावती॥१
विदुर ह्मणेकुरुनृपती॥ शास्त्रज्ञत्यासीचतुर ह्मणती॥ जैसासावधानप्रपंचपरमार्थी॥ नसोडीनीतीश्रेष्ठाची॥२॥
इंद्रियांसहितमन॥ जिंकून केलें आपणाधीन॥ दुरोत्तरीं गांजितां दुर्जन॥ अंतःकरणदुरववेना॥३॥ प्रारब्धभोगेंऐ
श्वर्यभोगित॥ परीसर्वभोगीअनिविरक्त॥ क्षमेचाकेवळ दृषत्पर्वत॥ शांतदांतसर्वदाही॥४॥ दयेचातोभांडारके
वळ॥ निर्भयनिःशंकनिर्मळ॥ त्याचेंदातृत्वदेरवोनिविकळ॥ अमरतरूहोयपैं॥५॥ याचचिन्हेंमंडित॥ तोचह्म
णावारायापंडित॥ सर्वजाणोनिनेणीवयेत॥ देरवेअद्भुतसर्वभूतीं॥६॥ परिसरायासावधान॥ मृत्युलोकाजोआ
लास्वर्गींहून॥ कर्मभूमीसपावलाजनन॥ ऐकलक्षणेंचार त्याची॥७॥ सात्वीकज्ञानीअत्यंतभरा॥ सुधारसाहून
परममधूर॥ सेविकावैष्णवीदीक्षामनोहर॥ कायावाचामनेंधरी॥८॥ आवडतीप्राणाहुन॥ जीवेंभावेंजासब्रा॰
ह्मण॥ मातापितागुरुदेवजाण॥ यांचेंभजनकरीसदां॥९॥ पारधीयेवनींधरिलेंपाडस॥ तेंजननीचिंतीरात्रदिव
स॥ तैसेंजाचेंमानस॥ गुरूमाउलीसआठवी॥१०॥ तृषालागलीमहावनीं॥ ऊष्णकाळींधुंडीपाणी॥ तैसीआव॰
डीसंतभजनीं॥ दिवसरजनीजयाची॥११॥ एकनर्कींहूनआलेसंसारा॥ त्याचीचिन्हेंऐकराजेश्वरा॥ परमकृपण
कठूनरवरा॥ कवडीवेचितांप्राणदेत॥१२॥ देवद्विजगुरुनिंदा॥ तोदुष्टात्माकरितसदा॥ सोडूनदेवमर्यादा॥ वर्तेंभ
लतेंचिदुष्टतो॥१३॥ सदाकाळत्याचेंमन॥ जेथेंतेथेंइच्छितमन॥ आपलाधर्मदानअनुष्ठान॥ सांगेसत्कारून॰
सर्वदा॥१४॥ घातलेंविद्येचेंदुकान॥ वरिवरिदारववीआचारपूर्ण॥ धनवंतदृष्टीदेरवोन॥ भट्टचिहोयतयाचा॥१५
जैसावर्मीरुपेबाण॥ तैसासहज बोलेतीक्ष्ण॥ हिंसाकरावयामन॥ अनिउल्हासपावत॥१६॥ आपलीस्तुती
करितांकोण्ही॥ मगडोलेआनंदंकरूनी॥ कोणीनिंदितांतेचक्षणीं॥ जायसुकोनीफुलाऐसा॥१७॥ सज्जनाचीनिं
दाऐके॥ प्रतिउत्तरदेतपरमसुरवें॥ याससाधूह्मणतीसुरवें॥ आह्मीनह्मणोंकदाही॥१८॥ वरीशब्दहृंदावन॥

जोंजोंपिकेनोंतोंकडूपूर्ण॥तैसाष्टइहोनवयेंकरून॥कुबुद्धीजाणविशेष॥ १९॥ गुरूचेंनामसांगतां॥ लाजवाटेजाचि
याचित्ता॥लाजेभगवंताचेंनामघेतां॥ तरीअन्यवीर्यउपजला॥२०॥गुरुलोपकाचेंदेखतांवदन॥तत्काळकरावेंस-
चैलस्नान॥अनामिकाहूनविशेषजाण॥विटाळत्याचामानावा॥२१॥कीगंगेंतस्नानकरूनियां॥जायमळमूत्रशो
धावया॥तैसाआचारदारवऊनियां॥असत्यकर्मीरतहोय॥२२॥पाकशाळेंतरिघेश्वान॥सर्वपात्रांतघालीवदन॥
तैसेंवित्तासंपूर्ण॥स्पर्शावयाधांवतसे॥२३॥तीर्थेंक्षेत्रेंदेवसंत॥ह्मणेसर्वहीअसंमत॥यासिभजोनियांव्यर्थ॥-
धनकांहोनासावें॥२४॥मातलाजेसाबस्त॥तोभलत्यासिधडकदेत॥तैसावादविवादउदित॥धुधुःकारतेसाची
॥२५॥वादीजरीकेलानिरुत्तर॥तरिमगकोपेअनिवार॥वर्मेंबोलूनअपवित्र॥करीछळणतयाचें॥२६॥शंखकरा
वयाचीहोसफार॥त्यांतफाल्गुनपातलासत्वर॥आधींचअपवित्रजार॥तोस्त्रीराज्यप्रवेशला॥२७॥आधींचमद्य
पीउन्मत्त॥त्याहीवरीशिंदीवनदेखत॥कींतस्करासीनृपनाथ॥अभयदेतचोरावया॥२८॥मर्कटासीमद्यपाजिलें॥त्या
हिवरीवृश्चिकेंदंशिलें॥त्याहीवरीभूतसंचरलें॥मगअनन्यवर्तेजेवि॥२९॥तैसाअकर्मीआधींचबहुत॥त्यावरी-
भ्रष्टशास्त्रेंविलोकित॥नानामतेंनसतेग्रंथ॥मगतेदावीतवचनलोकां॥३०॥नस्तेंजोडीव्यसन॥नसावेंतरीवेचील
प्राण॥स्त्रीआणिधन॥करीउपासनदोहींचें॥३१॥चालेउताणाचवड्यावरी॥भावीभाग्यमाझेघरीं॥वाचस्पतीची
नपवेसरी॥बोलकेपणेंमाझिया॥३२॥दुसऱ्याचीसद्विद्यादेखोनी॥अंतरींमानीपरमहाणी॥कोकिळेचास्वरऐकोनीं
काकजेसासंतापे॥३३॥दीपापोटींनिपजेरत्न॥तेथेंकाजळझालेंकुलक्षण॥तैसापवित्रकुळींउपजोन॥डागलागला
वंशातें॥३४॥उभाकेलापाषाण॥तोनलगेचिकदाजाण॥तैसादेखतांदेवब्राह्मण॥कदानमनकरीना॥३५॥कुं
भपाकाहूनअधीक॥जन्मकाळींचेंमहादुःख॥मरणकाळींहीनिःशंक॥सहस्रवृश्चीकवेदना॥३६॥ऐशींदुः
खेंविशेषदेख॥आठवीनातोमहामूर्ख॥त्यासिवाटेबहुतेक॥चिरंजीवमीआहें॥३७॥स्त्रुषुम्नींतबुडेजोनर॥तो

तेणेंनागवितीतस्कर॥ तैसादेहक्षणभंगुर॥ तेणेंपामरदोघेही॥ ३८॥ जैसानलगतांएकक्षण॥ चपळापळेंरूप॰
दाऊन॥ तैसेंचतेंतारुण्य॥ मावळोनजायपैं॥ ३९॥ गंगेचावोहटतांपुर॥ मागेंदरडीउरेअपार॥ तैसेहृद्गत्वसा
चार॥ जवळीआलेंकळलेंत्या॥ ४०॥ मर्कटनाचवीबाजेगार॥ तैसेंस्त्रीपुढेंदावीविकार॥ मातापितावंचूनस॰
मग्र॥ द्रव्यवेचीस्त्रियेसी॥ ४१॥ ऐकरायासावधान॥ त्यापुत्राचेंकुलक्षण॥ हेंसज्जनींकरूनिश्रवण॥ अस॰
त्यगूणत्यागावें॥ ४२॥ देवधर्माचाद्रव्यार्थी॥ नवेचितांकदाअनृत॥ सद्गुरूसीसदाचाळवित॥ मिथ्याबोलबोलु
नी॥ ४३॥ अल्पहीनसेवेदाचेंज्ञान॥ परिउताणाचालेगर्वेंकरून॥ मींआहेंअत्यंतप्रवीण॥ आपलेठाईंभावी
तो॥ ४४॥ गारुडीयासविद्याकिंचित॥ परिसर्वांगींवादेचबहुत॥ विषथोडेंतरिअर्धवाहात॥ वृश्चीककंटक॰
जैसाकां॥ ४५॥ आपणविधिविधाननेणों॥ भल्यासनपुसेअभिमानें॥ मनासआलेंतैसेंचकरणें॥ यागन
पउपजोकीं॥ ४६॥ कोरफडजोजोंवादत॥ तोंतोंकडवटपणाचदत॥ तैसाजोंजोंजाणताहोत॥ करीउन्मत्तक्रि
यापैं॥ ४७॥ साधुचेंपाहेदोषगुन॥ जरितोनिर्दोषअसलापूर्ण॥ तरित्यावरीअसदारोपण॥ बळेंचकरीदुरात्मा ४८
ऐकोनियांहरिकीर्तन॥ बोटेंघालूनिबुजीकान॥ ह्मणेनपाहावेंवदन॥ ऐसादुर्जनअपवित्रतो॥ ४९॥ ब्रह्मचारीय॰
तीश्वर॥ तापसीविरक्तउदासथोर॥ त्यासदेखोनह्मणेसाचार॥ हेदंडिलेपूर्वदोषें॥ ५०॥ सोडूनपुत्रदाराधन॥ उगेच
हिंडतीरानोरान॥ भरलीयाठायावरून॥ यांसउठविलेंईश्वरें॥ ५१॥ दानवपुरोहितेंनिर्मिलीशास्त्रें॥ जींअभिचारि
केंअतिपवित्रें॥ तेथिचींवचनेंसर्वत्रें॥ दावीलोकांसकाढून॥ ५२॥ भोंवतेमिळऊनअज्ञानजन॥ त्यांसदाखवीयो॰
ग्यपण॥ आपल्यासौंदर्यासमदन॥ उणाभावेनिर्धारें॥ ५३॥ विबुधआचार्याहुन॥ दावीविपत्तीचेंथोरपण॥ आ॰
पल्यापुरुषार्थासीसहस्त्रनयन॥ उणाह्मणऊनबोलत॥ ५४॥ श्वानजैसेंपिसाळलें॥ किंवाडुकरवनींमाजलें॥ किं॰
वाहतरूआंधळें॥ सव्यापसव्यधांवत॥ ५५॥ बिडालकाचेगेलेनयन॥ परिमूषकाचीसाचळऐकोन॥ तळमळी॰

धरावयामान॥ वैराग्यपूर्णतेविस्याचें॥५६॥ जैसेंआंधारींदिवाभीत॥ डोळसपणेंमिरवत॥ कींस्फटिकाचेंमाणीकस
त्य॥ रंगदेऊनपैंकेलें॥५७॥ तैसेंत्याचेंथोरपण॥ दृष्टीसनाणीत्रिभुवन॥ विलोकितांआसजन॥ कुलालपणेंत्यांसस्था
पी॥५८॥ विष्णुब्रह्मचारीह्मणत॥ द्वंदेंचेस्मशानींकांलोळत॥ बहुरागीटकैलासनाथ॥ त्यासदेवनह्मणोंआह्मीं॥५९
सहस्रभगांकितइंद्र॥ गुरुदारागमनीचंद्र॥ तमांतकअत्यंततीव्र॥ ऋषीसमग्रक्रोधीबहु॥६०॥ व्यासादिकमहाऋ-
षी॥ दूषणअत्यंतठेवीत्यासी॥ एकसर्वांसउपहासि॥ पापराशिन्चांडाळ॥६१॥ त्रैलोकींचामदमत्सर॥ सर्वहीकरू
नएकपत्र॥ धृतराष्ट्रतुझापुत्र॥ दुर्योधनघडिलासे॥६२॥ आपादमस्तकपर्यंत॥ दुर्जनांचेंविषमयसमस्त॥ त्याची
करणेंजिकडेजात॥ तिकडेअनर्थघातकचि॥६३॥ जिवंतचिपांचजण॥ मेलेतेरायाऐककोण॥ दरिद्रीव्याधीनेंघे-
तलाकवळून॥ मूर्खजाणअविवेकी॥६४॥ प्रवासीनित्यसेवकजाण॥ हेजिवंतचिपावलेमरण॥ यांहीपेक्षेतोदुर्ज-
न॥ अपवित्रजाणावा॥६५॥ पडिलाआहेकाळकोण॥ मजमित्रतरीकितीजाण॥ कोणदेशकायवर्तमान॥ नेणेतोमू-
र्खजाणावा॥६६॥ अपारअसोनगांठी धन॥ जोमूर्खनकरीधर्मदान॥ त्याचियागळांबांधोनपाषाण॥ समुद्रांत-
बुडवावा॥६७॥ दरिद्रीनकरीजवअनुष्ठान॥ अथवानकरितीतीर्थाटन॥ त्याचियागळांबांधोनपाषाण॥ समुद्रां
तबुडवावा॥६८॥ अपात्रींकरितांदान॥ त्यासदरिद्रनसोडीकदांजाण॥ दरिद्रेंकरीपापाचरण॥ नर्कदारूणभोगी-
पुढें॥६९॥ आणीकहीउपजेदरिद्रीहोऊन॥ मागुतीकरीपापाचरण॥ शयाससत्पात्रींदेतांदान॥ ऐकहोयकेसेंतें॥७०
सत्पात्रीदानकृष्णार्पण॥ जैसेंवटबीजवर्धमान॥ मगलक्ष्मीअचळयेऊन॥ राहेगृहींत्याचिया॥७१॥ पुण्यवाढे-
जोंजोंविशेष॥ सहजयशपावेनिर्दोष॥ षड्वैरीअष्टपाश॥ याहूनवेगळातोझाला॥७२॥ थोरहेंचजाणसाधन॥
परललनापरधन॥ येथेंजाचेंउदासमन॥ तोचिधन्यशास्त्रह्मणे॥७३॥ आपणाहूनहीनपुरुष॥ त्यासनबोलावेंनिःशेष॥ संतांसीमैत्रीविशेष॥ दिवसेंदिवसवाढवावी॥७४॥ विद्यावंतज्ञानीपंडीत॥ तेसंग्रहावेदेऊनधन-

अमित॥ गृहच्छिद्रआयुष्यविन्न॥सहसाबाहेरनसांगावें॥ ७५॥ मंत्रऔषधमैथुन॥ दानमानअपमान॥सकृतआ
णितीर्थाटन॥ कदांकाळेंनबोलावें॥ ७६॥ जाणीवनधरावीकदां॥ कोणाचीहीनकरावीनिंदा॥ तुलुंघावीवेदमर्या
दा॥ निष्ठुरवाक्यनबोलावें॥ ७७॥ आपणकरावेंपापाचरण॥ दुसऱ्याचेदोषदाकावेआच्छादून॥ हेंसज्जनांचेंल
क्षण॥ बहुभाषणकासया॥ ७८॥ अपत्यहीनजेभगिनी॥ तेमातेऐशीपाळावीसदनीं॥ मातापितागुरूवृद्धपणीं
बहुतचिसांभाळिजे॥ ७९॥ युद्धगोष्टीवर्मवाणी॥ नघालावीस्त्रियेचेकर्णी॥ लेखनपठणशास्त्रशयनीं॥ आळ
सकदांनकीजे॥ ८०॥ सत्कर्मदानाध्ययन॥ येथेंआळसनकरावाएकक्षण॥ स्त्रीभोगनिद्राबहुभोजन॥ येथेंउ
दासअसावें॥ ८१॥ गोरक्षकग्रामकामकरी॥ कृषिरक्षकासनिद्राभारी॥ असावधानभांडारी॥ तरिअनर्थहोय
तेथें॥ ८२॥ भार्यादुष्टषंढमैत्र॥ अज्ञानगुरूपुत्रनिष्ठूर॥ प्रधानकुबुद्धीरावअविचार॥ व्यर्थभूभारकायहे॥ ८३॥
सुहृद्दासीनिष्ठूरदेख॥ जाणावातोआत्मघातक॥ श्वशुरगृहींराहेतोशतमूर्ख॥ आपलापुरुषार्थवानींसुखें॥
८४॥ विषभक्षूनप्रचीतपाहावया॥ उरेलकोणसांगराया॥ आत्महत्याकेलीशस्त्रखोंचुनियां॥ त्याचेंप्रायश्चित्त
कोणेंघ्यावें॥ ८५॥ वारितांसर्पावरीनिजेला॥ तोजागापुनः कोणेंदेखिला॥ ब्राह्मणद्वेषेंपरत्रगेला॥ देखिलाना
हींकोठेंही॥ ८६॥ मातापिताद्वेषीजोसदां॥ तोकधींपावलाभगवत्पदा॥ मद्यपानीपाळीवेदमर्यादा॥ काळत्रयीं
नघडेचि॥ ८७॥ मैत्रीइच्छीजरीविपुळ॥ तरिवागवादनकरावासमूळ॥ अर्थसंबंधकरितांकेवळ॥ कलहहोय
मित्रत्वीं॥ ८८॥ मित्रसमीपनसतां॥ त्याचेस्त्रियेसींएकांतींबोलतां॥ हेतिन्हीगूणत्यागितां॥ मित्रत्वचालेबहु
काळ॥ ८९॥ भलतेगोष्टीआतुर॥ दीर्घरोगीवादकथोर॥ पाषांडपक्षवादवीअपार॥ संगत्याचानधरावा॥ ९०
वेदपारायणशास्त्रींज्ञान॥ बहुश्रुतचिसमाधान॥ धनजासतृणासमान॥ संगत्याचानधरावा॥ ९१॥ सुंदरस
धनपरनारी॥ एकांतपाहोनप्रार्थनाकरी॥ कामविकारनउठेअणुभरी॥ तरितोईश्वरह्मणावा॥ ९२॥ द्रव्याचा

घटनिरंजनीं॥अवचितादेखिलानयनीं॥आस्थानधरीजायवोसंडूनी॥तरिईश्वरह्मणावा॥९३॥निंदकसोडि
तीवाग्बाण॥पुढेंकेलेंक्षमाबोडण॥खेदकदाउठेमनांतून॥तरितोईश्वरमानावा॥९४॥आपणआचरेसत्कर्मरा
हटी॥दुसऱ्याचेदोषीनपडेदृष्टी॥आत्मरूपपाहेसर्वसृष्टी॥तरितोईश्वरह्मणावा॥९५॥आपलेंमहत्कार्यसांडुन
परोपकारींयालीमन॥परपीडानावडेचित्तांतुन॥तरितोईश्वरह्मणावा॥९६॥गुरुद्वेषकरीजोचांडाळ॥त्याचीं-
विद्यानत्काळनिर्फळ॥तोअपेशपावेकुळ॥विजयनहोयकोठेंही॥९७॥मातृद्वेषकरीत्रिशुद्धी॥भार्यानास
तीभरेव्याधी॥पितृद्वेषियाकुबुद्धी॥पिशाचहोऊनहिंडेतो॥९८॥बंधुद्वेषकरितांसाचार॥होयधनाचासंहार॥
भार्यापतिव्रतानिर्धार॥अर्धांगजायनिचाद्वेषें॥९९॥सुमनसुवासघेतभ्रमर॥परित्यासदकानलावीअणुमा
त्र॥तैसाप्रजापाळीजोनृपवर॥न्यायधनघेऊनियां॥१००॥घ्यावेंवृक्षाचेंसुमन॥परिवृक्षनउपडावासुळींहून-
न॥नखआगळेंसाहिजे छेदून॥परितेंबोटरक्षावें॥१॥केशक्षणक्षणावादतीबहुवस॥ह्मणूनकायछेदावें-
शिर॥क्षुधालागत्येबहुवस॥ह्मणोनपोटनफाडावें॥२॥तैसेंविहिताविहितजाणोन॥करावेंप्रजेचेंपालन॥
गोत्रजासीविरोधजाण॥प्राणातेहीनकरावा॥३॥जाणेसारासारनीती॥वृद्धह्मणावेत्यांचप्रति॥स्वर्गतेचसं
तसंगती॥सत्शास्त्रश्रवणसर्वदा॥४॥दुर्जनसंगतोचनर्कजाण॥प्रतिवादावेंगुरुवचन॥करावेंवृद्धांचेंसेव
न॥अकार्यपूर्णत्यागावें॥५॥तत्ववेत्तादयाळूउदासजाण॥तोचगुरुआधीजावेंशरण॥गुरुवचनीअवज्ञा
पूर्ण॥विषदारूणमारकतें॥६॥दिवसाऐसेंवर्तावेंपाहें॥जेणेरात्रीसुखरूपजायें॥संसारींऐसेंवर्तावेंस्वयें॥
जेणेइहपरत्रसुखरूप॥७॥कार्यत्वरितहेंचकरणें॥जन्ममरणाचेंमूळछेदणें॥क्रियेसमवेतज्ञानबोलणें॥-
मोक्षतरूचेंबीजहेंचि॥८॥धर्मतोचशुद्धपंथ॥मनशुद्धतोशुचिष्मंत॥विवेकीतोचिपंडित॥सर्वभूतींसमद
र्शन॥९॥मदिरानघेतांभुलत॥तोपुत्रस्नेहजाणनिश्चित॥तस्करतेपंचविषयसत्य॥एकक्षणांतनागविती॥१०

जाचीतृष्णानिमाली॥ तेणेंसमूळउपडिलीभयवल्ली॥ विषयींसदां वृत्तीवेधली॥ अंतरबाह्यअंधतो॥११॥ सुदतीललनांचेंनयनशर॥ व्यथीनव्हेतोमुख्यशूर॥ प्राणीमात्रसर्वमैत्र॥ तोचथोरशास्त्रह्मणे॥१२॥ स्त्रीचरित्रेंखंडिलानवजाय॥ तोचचतुरहानिश्चय॥ सदाहळहळजासीहोय॥ दरिद्रीपाहेंतोचएक॥१३॥ तृणापरिसनीचपण॥ परयाचेंजायलागून॥ विचाररहितनकरीकारण॥ जागाजाणतोचसदां॥१४॥ ऐसानीतीचामेघडंबर॥ वर्षलामहाराजविदुर॥ आनंदोनीधृतराष्ट्र॥ बोलताझालातेधवां॥१५॥ ह्मणेविदुरापूर्णज्ञान॥ तेंमजसांगकरीनश्रवण॥ यावरीतोसज्ञान॥ बोलिलाकायतेंऐका॥१६॥ ह्मणेयेथेंसनत्सुजात॥ येईलआतांब्रह्मसुत॥ तोज्ञानउपदेशीलअद्भुत॥ श्रवणकरीरायातें॥१७॥ धृतराष्ट्रह्मणेसांगसत्वर॥ ऐक ह्मणेमजनाहींअधिकार॥ सर्ववर्णासगुरुविप्र॥ ज्ञानअन्यत्रसांगसी॥१८॥ वर्णानांब्राह्मणोगुरु॥ हामुख्यशास्त्रविचार॥ येथेंआग्रहकरितीतेसाचार॥ पाखंडीयेशतमूर्ख॥१९॥ आचारहीनमलीनजरी॥ परिगायत्रीमंत्राचाअधिकारी॥ मुखापासूनजन्मलेनिर्धारी॥ आदिपुरुषपवित्रते॥२०॥ ब्राह्मणांचेंउत्तमाचरण॥ गायत्रीमंत्रवेदाध्ययन॥ जरीकरितीइतरवर्ण॥ तरीदारूणनरकभोगिती॥२१॥ खरचर्मीभरलेंगोक्षीर॥ तेंप्राशननकरितीजेंसेपवित्र॥ तैसेंइतरांमुखींचेंवेदशास्त्र॥ श्रवणसहसानकरावें॥२२॥ ऐसेंबोलतांविदुर॥ तोंनिशीझालीदोनप्रहर॥ यावरीश्रीकृष्णाकृपापात्र॥ सनत्सुजातचिंतित॥२३॥ सूर्यउतरेआकाशाहुनी॥ तेविसनत्सुजातउभाठाकलायेउनी॥ विदुरधृतराष्ट्रउठोनी॥ पायवंदितीसप्रेमें॥२४॥ षोडशोपचारेंपुजुन॥ तोषविलेंसनत्सुजाताचेंमन॥ यावरीकरिताझालाप्रश्न॥ सावधानऐकातें॥२५॥ ह्मणेमहाराजतूंईश्वर॥ तरीबोलेषट्शास्त्र॥ आणिमृत्यूहापरमघोर॥ ऐसेंस्वरूपयाचेंअसे॥२६॥ मृत्यूचेंभयकोणासनाहीं॥ तेंसुजाणाआतांसांगसर्वही॥ सनत्सुजातेंतेसमयीं॥ अगाधज्ञानवर्षला॥२७॥ अप्रमादजेकांअनर्थ॥ भ्रमेंकरूनभुलोनजात॥ तेथेंचजाणवसेमृत्य॥ पूर्ण॰

गुह्यार्थराजेंद्रा॥ २८॥ स्वमृत्यूरहितस्वर्गीशूर॥ अप्रमाद नकरिती साचार॥ ह्मणोनिझालेनिर्जर॥ सत्कर्मध
र्मआचरोनी॥ २९॥ यांसहीआंगींचढतांभ्रम॥ पावतीकल्पांतीविराम॥ सदांसावधाननिःसीम॥ जन्ममरणा
तीतजे॥ ३०॥ जैसेंएकचिउदक॥ विषांतजाऊनिहोयमारक॥ अमृतामाजीतारक॥ तेंचसहजझालेंपैं॥ ३१॥ जा
जारंगांतनीरजाय॥ तदनुसारस्वरूपहोय॥ तैशीवस्तूसर्वांतसामाय॥ परिआतांनह्मेयकर्तृत्वें॥ ३२॥ दैत्यम-
द्यप्राशकसमस्त॥ भ्रमेंकरूनपावतीमृत्य॥ भ्रमरहिततेंचअमृत॥ घेऊनतृप्तसर्वदा॥ ३३॥ अंतरबाह्यजोभ्र
मला॥ त्यासमृत्यूनेंसर्वदागिळिला॥ ब्रह्मांडगोळसगळा॥ भ्रमेंभरलातयातें॥ ३४॥ जनवनसर्वआस॥ भ्रमरू
पचिसर्वदिसत॥ ह्मणेईश्वरकेंचायेथ॥ भ्रमभूतसर्वही॥ ३५॥ पिंडब्रह्मांडभ्रमभूत॥ वेदशास्त्रभ्रमरूपभा
सत॥ त्यासमृत्यूनेंग्रासिलायथार्थ॥ नसुटेसत्यकल्पांतीं॥ ३६॥ गेलाविषयध्यानभुलूनियां॥ सत्यमानीगृहसु
तजाया॥ केंचाईश्वरमिथ्यामाया॥ भजोनियांव्यर्थचि॥ ३७॥ ऐसेसर्वदाजेभ्रमरूप॥ तेफेरेघेतीकोटिकल्प॥
अंधतमनर्कपापरूप॥ भोगितीगणितनव्हेतें॥ ३८॥ कितीवेळांतरीमरावें॥ हाहाकितीदांउपजावें॥ चौऱ्यासील
क्षयोनीफिरावें॥ कितीभोगावेंदुखतें॥ ३९॥ ऐसेजेगानृपनाथा॥ त्यांसमृत्यूनेंगांजिलेंपाहातां॥ आतांमृत्यूवेगळे
तत्वता॥ त्याचीकथाऐकपां॥ ४०॥ भक्तिज्ञानवैराग्यमेळे॥ सत्समागमेंसदाबोधले॥ सत्शास्त्रश्रवणभरले॥
जिहींजिंकिलेषड्वैरी॥ ४१॥ जेगुरुकृपाजीवनीचेमीन॥ तळपतीस्वानंदसुखेंकरून॥ जन्ममरणाचेंबीजभोजन॥
सनातनअक्षयतें॥ ४२॥ जीवनत्वमारूनजाले॥ तेमृत्यूसहीवाटूनप्याले॥ जन्ममरणाचीमूळें॥ जाळिलींत्यांहींस
मस्त॥ ४३॥ तेमृत्युरहितअक्षयपूर्ण॥ ऐकतयांचेसांगतोंचिन्ह॥ जींचिन्हेंऐकतांजन्ममरण॥ रहितेहोतीसाधक॥
॥ ४४॥ आपलेंसुकृतजोपाही॥ स्वसुखेंनबोलेकाळत्रयीं॥ आपलेविद्येचीनवाई॥ लोकांमाजीदावीना॥ ४५॥ नक-
रीदांभीकभजन॥ नबोलेकोणाचेंनिंदास्तवन॥ चराचरजीवसंपूर्ण॥ आत्मरूपपाहेपैं॥ ४६॥ जेणेंत्हृदयहोयशीत-

ळ॥ तैसाशब्दबोलेकोमळ॥ अहिंसादयानिर्मळ॥ ह्रदयकोशींविराजित॥ ४७॥ कोणीलोकस्तवनकरितां॥ ह्म
णेमजगर्वचढेलआतां॥ यालागींगजबजीचित्ता॥ वाटेतयाचेतेकाळीं॥ ४८॥ अंतरबाह्यनिर्मळ॥ जैसेंकेवळ
गंगाजळ॥ चंद्राहूनिशीतळ॥ मानसतयाचेंजाणावें॥ ४९॥ गगनाहूनमृदुपूर्ण॥ त्यापुरुषाचेंअंतःकर्ण॥ निजबो
धेंसंपूर्ण॥ बुद्धीत्याचीबोधली॥ ५०॥ स्नेहदृष्टीकरूनसबळ॥ कूर्मिणीपाहेजैसेंबाळ॥ तैसेंहेंविश्वसकळ॥ वि
लोकीतकृपेनें॥ ५१॥ सकर्दमसरोवरदेखोन॥ मराळजायवोसंडून॥ तैशींसत्कर्मेंलोटून॥ उत्तमपंथेंजायतो
॥ ५२॥ दग्धवनींशुष्ककांतारीं॥ कोकिळानबैसेक्षणभरी॥ तैसेंजीवजेदुराचारी॥ संगतीनधरीतयाची॥ ५३॥
विश्वहेंआहेकिंवानाहीं॥ हेंस्मरणेंचनसेपाहीं॥ आपणसतोविदेही॥ खेळखेळेएकत्वें॥ ५४॥ जैसेचंदनाचेसंग
ती॥ इतरवृक्षसुवासिकहोती॥ तैसीत्यांचीपाहतांरीति॥ बहूततरतीमुमुक्ष॥ ५५॥ अनुभवकमळींमकरंद॥
सेवणारहोतीमुक्तमिलिंद॥ कींतोआनंदवनींचाप्रसिद्ध॥ मृगेंद्रचिवसततसे॥ ५६॥ तोवैराग्यकैलासींचाशिव
॥ स्वानंदवैकुंठींचामाधव॥ तोसत्यपदींचाकमळोद्भव॥ अवतरलास्वलीलें॥ ५७॥ कींसद्विवेकअमरपुर॥ ते
थिंचाराहाणारअनंतनेत्र॥ कींदयाकाशींचासहस्रकर॥ प्रकाशकसर्वांसी॥ ५८॥ दशसमुद्रांचेंआचमन॥
करितांतोअगस्तीसंपूर्ण॥ कींसारासारविचारप्रवीण॥ सत्यवतीकुमरतो॥ ५९॥ कितीवर्णावेत्याचेगुण॥ वर्णि
तांभागलासहस्रवदन॥ विश्वात्मातोजगज्जीवन॥ त्याचाप्राणझालातो॥ ६०॥ तोसुखींघालितांग्रास॥ तेणेंतृ
प्तहोययज्ञपुरुष॥ त्याचाउदकपानेंअवकाश॥ रसनाएकआनंदे॥ ६१॥ तोहीनिर्विकल्पस्थिती॥ तेणेंपावनझा
लेंह्मणेक्षिती॥ त्याच्यापाहुण्यासाजीदिनपती॥ सुखप्राप्तीभावित॥ ६२॥ त्याचेनिद्रेंतउन्मनी॥ विश्रांतीघेत
येउनी॥ समाधीविलासेंचरणीं॥ करजोडूनसर्वदा॥ ६३॥ चंद्रउगवतांसोमकांत॥ पाझरोनिसरोवरेंभरित॥
तैसाअनुभवींतोविरत॥ विश्वासहितआपण॥ ६४॥ तोभोगीजरीभोग॥ परीतोविदेहीनिःसंग॥ जैसासती

चेचित्तींविरागा॥देहभेदनाठवे॥६५॥सतीचाहोतबहुसोहळा॥परितीकांहींनदेखेडोळां॥तैसातेणेंभोगभोगि
ला॥नकळेकांहींत्यालातें॥६६॥चित्रपाणीआणिअन्न॥दोनींदाविलींरेखुन॥चित्रपटनजळेनभिजेपूर्ण॥
मुक्तहीजाणतैसातो॥६७॥कार्यकर्मकारण॥तियांसींस्वरूपींजालालीन॥विधिनिषेधगिळून॥तृप्तझाला
सर्वदा॥६८॥वेडीयासनकळेजाण॥मीझांकलोंकींआहेंनग्न॥तैसातोप्राप्तसज्ञान॥विधिनिषेधनेणेचि॥
॥६९॥न्यायकींअन्यायहोत॥हेंबाळकासनकळेकिंचित॥तैसातोवृत्तिरहित॥स्मरणकांहींनसेचि॥१७०॥
चांदणेंआणिअंधार॥सूर्योदयींदोहींचाविसर॥तैसाप्रवृत्तीनिवृत्तीसमग्र॥उरतीनस्वरूपोदयीं॥७१॥नि
र्विकल्पसमाधीतमग्न॥चहूंदेहांचेंनाहींस्मरण॥त्याचेंकर्मराहिलेंपूर्ण॥ह्मणेलकोणतयासी॥७२॥राहि
लेप्रवृत्तीचेभाव॥वोलांडिलीनिवृत्तीचीशींव॥ब्रह्मसाम्राज्यराणीव॥प्राप्तझालीतयातें॥७३॥हारकिंवावि
कार॥जनअनुमानितीसमग्र॥परिनिद्रिस्थजोसाचार॥दोनीयासनेणवती॥७४॥स्थाणुकिंवाचोरभासत॥शु
क्तिकाकिंवाहिरेंजात॥मृषानीरकींजळसत्य॥हेंकांहींनेणतो॥७५॥तैसेंआकारकींनिराकार॥भ्यासूरकिं
वामनोहर॥निःशब्दकिंवागजर॥नेणेंकांहींमुक्ततो॥७६॥जैसाकल्पांतींनीरीं॥लपाल्याआडगंगाविहिरी॥
वणवापेटतांकांतारीं॥भासमावळेवनस्पतीचा॥७७॥यात्रासरल्यासहज॥निवातराहेगजबज॥तैसातो
पावतांस्वरूपतेज॥दृश्यजाळमावळे॥७८॥तोनिर्विषयसर्वकाळ॥पंचविषयजडकेवळ॥शब्दविषयप्रस
वेनिराळ॥मुक्तवेगळादोहींतें॥७९॥स्पर्शतयासीपवन॥योगीतयासीझालाभिन्न॥रूपआणितेजगाळून॥
निरंजनझालातो॥८०॥जीवनआणिरस॥दोहींवेगळातोनिर्दोष॥पृथ्वीआणिगंधविषयांस॥नातळेचिसोंव-
ळातो॥८१॥भिंतीवरीचित्रें॥चिरवलेंबुजवितांगेलींसमग्रें॥तैसेभेदाभेदएकसरें॥आत्मतत्वींविराले॥८२
मठमोडिलेघटफोडिले॥आकाशनफुटेसगळें॥तैसेंदशत्वहारपलें॥आहेसंचलेंस्वरूप॥८३॥कींअलंका

राचाआकृती॥सुसेंतविरतीएकवृत्ती॥तैसेंजगहारपोननिश्चिती॥जगदीश्वरउरलासे॥८४॥नातरीजोजा-
गाझाला॥स्वप्नभासहारपला॥परिआपलाउरला॥अखंडीतअद्वयें॥८५॥तोनिरापेक्षविचरत॥स्वर्गादिसु
खेंजीसमस्त॥तृणाहूननीचमानीत॥आशारहितनिरापेक्षजो॥८६॥विषयत्यागूनगेलासवेग॥देवासमो
क्षमागेमग॥तरितोनिरापेक्षनव्हेसांग॥मोक्षकामधरिलातेणें॥८७॥तैसानव्हेतोज्ञानी॥मोक्षासहीन
धरीमनी॥मोक्षहीयेऊनचरणीं॥लागेतयाचानिर्धारें॥८८॥जोजन्ममृत्यूचीकथाविसरे॥शुभाशुभमाव
ळलेंएकसरें॥जेविदीपआणिअंधारें॥सूर्योदयींमावळे॥८९॥विश्वहेंनानाकार॥हेअवघेचित्याचेअवता
र॥आपलींस्वरूपेंपाहूनसमग्र॥आपणचिडोलतसे॥९०॥जीवभुलोनिगेलेअपार॥त्याससोडवावयाईश्व
र॥परमदयाळूकरुणाकर॥त्याचरूपेंअवतरला॥९१॥उदयअस्ततीव्रताटाकुन॥सोज्वळजैसासूर्यनारा-
यण॥तैसातोप्रकाशेपूर्ण॥ब्रह्मानंदएकचि॥९२॥जगाचियानयनद्वारें॥आपलेस्वरूपींचराचरें॥दुजेपणां
चेंवारें॥अणुमात्रस्पर्शेना॥९३॥निःकलंकक्षयरहित॥शीतलत्वटाकूनसमस्त॥उदयअस्तनाहींतेथ॥
आल्हादकारचंद्रतो॥९४॥तोहोऊनसकळांचेमन॥साक्षीवेगळाचैतन्यघन॥कींतोहोऊनसहस्रनयन॥ह
स्तक्रियासकळकरवी॥९५॥कींतोस्वयेंहोऊनविधि॥चाळीसकळजनाच्याबुद्धी॥तोसकळआकाराचिआ
दि॥निरवधीनिर्द्वंद्व॥९६॥तोविष्णुरूपकरून॥होयसकळांचेंअंतःकरण॥असोविश्वसंपूर्ण॥तोचिझाला
निजांगें॥९७॥तेणेंधूतलेअवघेंगगन॥तेणेंमोडिलेवायूचेचरण॥तेणेंतेजहीजाळून॥दाहकत्वदूरकेलें
॥९८॥तेणेंआर्द्रत्वहिरोन॥वोपघूनिशुद्धकेलेंजीवन॥अवनीचेंकठिणपण॥हिरोनियांघेतलें॥९९॥तेणें
मनासकेलामार॥तोडिलेंवासनेचेंमंदिर॥भूतदयेचेंअंबर॥नेसोनियांमिरवेतो॥२००॥बोधवनांतत्रिशु
द्धी॥तेणेंमोकळीसोडिलीबुद्धी॥चैतन्यसागरींआधी॥चित्ततेणेंबुडविलें॥१॥स्वरूपांबरींवृत्ति॥आनंद-

मयत्याक्रीडति॥ कींतोब्रह्मारणींचाभद्रजाती॥ निरंकुशक्रीडत॥ २॥ तोआपआपणासिबोलत॥ आत्मस्थि
तिपाऊलटाकीत॥ आहेतितकींकर्मेंकरीत॥ निराकारसर्वदांतो॥ ३॥ कींवैरागगरींमहामणिनिर्मळ॥ माणीक
करींभेटतहरळ॥ त्याचेंदृष्टीनेंसकळ॥ जीवपावतीनिजपदा॥ ४॥ तोआपणतरोनसाचार॥ बहुतांचाकरी
उद्धार॥ तोनसांडीस्वशरीर॥ व्रतउपासेंकरूनियां॥ ५॥ तोंशृंगारीकनबोलेकधीं॥ तोभगवद्भक्तीप्रतिपादी
तोउद्योगीनिजबोधीं॥ साधकाआणिमुमुक्षा॥ ६॥ लोकींस्तुतीकरितांनफुगे॥ निंदाकरितांनविरंगे॥ तोआ
नंदसदनींवागे॥ द्वैतमागेंघालुनी॥ ७॥ तोवाग्वादसोडूनसकळ॥ अबोलणेंबोलेरसाळ॥ जेणेंसर्वांचेंहृद
यशीतळ॥ होऊनियांआनंदे॥ ८॥ तोज्ञानमदनधरीअंगीं॥ तोअहंपणनमिरवीजगीं॥ तोयथाविधभोगभो
गी॥ हटयोगीनव्हेचि॥ ९॥ तोंआह्मींतरलोंह्मणोनी॥ सहसानबोलेचिजनी॥ शिष्यकरावेंहेंमनीं॥ नावडेचि
सर्वथा॥ १०॥ तेणेंलौकिकाचीसोडिलीलाज॥ तेणेंजन्ममरणाचेंभाजलेंबीज॥ तेणेंदृश्यसारूनशेज॥ निरा-
लंबीपैंकेली॥ ११॥ साकरपेरिलियाजाण॥ इक्षुदंडनव्हेचिउत्पन्न॥ कर्पूरहोतांदहन॥ रक्षामगनुरेचि॥ १२
त्याचेंसकळकामसिद्धीगेलें॥ नामरूपाचेंनामपुशिलें॥ करणेंनकरणेंउरलें॥ कांहींचनाहींतयासी॥ १३॥ तो
ब्रह्मचारीहोगृहस्थ॥ भिक्षूकअथवावानप्रस्थ॥ शरीरप्राक्तनेंहोनृपनाथ॥ अथवाविरक्तनग्नहिंडे॥ १४॥
तोसंसारींदिसेगुंतला॥ जैसासूर्यथिल्लरींबिंबला॥ तैसाअलिप्ततोसकळां॥ क्रियाकरूनसर्वदांही॥ १५॥ ग
ळोनगेलीसर्वममता॥ अंगींविराजेशांतीसमता॥ देहींअसतांविदेहता॥ नमोडेसहसाही॥ १६॥ सारूनियां-
त्रिविधभेद॥ त्रिगुणातीतजोझालाशुद्ध॥ त्रयअवस्थातीतनिजबोध॥ रूपझालानिश्चयें॥ १७॥ त्रितापस-
मूळजाळून॥ त्रिपुत्यासकळजाळून॥ देहत्रयसंहारून॥ निरंकुशविराजेतो॥ १८॥ तोदेहत्रयाचानिहंता॥
जोभुवनत्रयाचाप्रतिपाळिता॥ दोषत्रयतत्वता॥ दृष्टीनेंत्याचाविनळती॥ १९॥ तोभवरोगवैद्यसाचार॥ जीवा

च्याडोळ्यांचें पडळ काढणार। कीं तो जो मुहूर्त देणार। अक्षय पद पावावया॥ २०॥ त्याचेनि सकळ तीर्थें पावन। त्याचेनि व्रतें धन्य धन्य। तो सांवळ्याच निर्वाण। दशवो वळे आतळेना॥ २१॥ तेणें दुर्वासनेचें वाझ फोडिलें। तेणें त्रिगुणांचें जानवें तोडिलें। मन दंडून निज बळें। तोच दंड घेतला॥ २२॥ हृदय कांबळी संपूर्ण। न पांघुरे चीज्ञान जीवन। आनंद करपात्रीं भोजन। अत्यंत दीप तयाचें॥ २३॥ सहजी सहज निश्चित। प्रणव जपत याचा होत। तो ज्ञालाक्षराक्षरातीत। प्रणवाचाही निज साक्षी॥ २४॥ ऐसा न करितां सायास। सहज तेणें घेतला संन्यास। सर्व पदार्थी उदास। वायू जैसा निरंतर॥ २५॥ तो निरालंब मंदिरीं। निजला स्वानंद डोल्हारियावरीं। जागा होऊन क्षणभरी। प्रवृत्तीकडे न पाहे॥ २६॥ तो शेजे पहुडतां समस्तें। हरपून गेलीं पंचभूतें। वेद निःशब्द होऊन तेथें। उगा चतत टस्थ राहिला॥ २७॥ समाधी आणि उन्मनी। विलासती त्याचे चरणीं। कर्णासि ही चोरुनी। अंतर सदनीं पहुडला॥ २८॥ तो ऐक्यवर दिगंबर। शांति विभूती चर्चिली सुंदर। शाब्दीक घालूनि बाहेर। मौन्य निरंतर सेविलें॥ २९॥ मीं करितों सत्कर्माचरण। हा त्यास नउरे अभिमान। हिंडतां फिरतां पूर्ण। समाधी त्याची मोडेना॥ ३०॥ जो शिबिकेत झाला निद्रिस्थ। वहनवाहकरूप पंथें जात। भूमंडळ क्रमितां बहूत। परि त्याची निद्रा न मोडे॥ ३१॥ तैसी जीवन्मुक्तांचीं करणें। आचरती सत्कर्माचरणे। परी मीं कर्ता ऐसें न म्हणे। समाधी सुखें डोलतो॥ ३२॥ तो अद्वय पदींचा नृपजाणा। सद्विवेकाचें उद्यान। कीं कृपेचें पांघुरण। विश्वावरी करितां तो॥ ३३॥ कीं तो चिदंबरींचा चंद्र। कीं तो आत्मसुखाचा समुद्र। कीं तें आनंदाचें अंबर। उभारलें तेणें रूपें॥ ३४॥ सर्वत्र करितो गमन। परि तो योगी सकुमार पूर्ण। निद्रेचे समयीं कठिण। अंगीं रूपत नयाच्या॥ ३५॥ जगद्भोग समूळीं॥ भोजनीं बैसला गिळूनि। रसना बाहेर घालूनी॥ सर्व रसाचा खवत। सेजे न लावितां अंग। निद्रा मोडे त्याची अभंग। मागें लोटून दृश्य भाग। पहुडे स्वसुखी सर्वदा॥ ३७॥ तो ऐके तेच श्रवण। तो बोले तेंच कीर्तन। आप

ल्यास्वरूरवींसमाधान॥ तेंचस्मरणतयाचें॥ ३८॥ करिगुरुचरणओपासन॥ परोपकारींसदांमन॥ तेंच-
तयाचेंअर्चन॥ समाधानसर्वभूतीं॥ ३९॥ सर्वभूतींनयाचेंवंदन॥ सर्वांहूनह्मणतीसान॥ हेंचदास्यसंपूर्ण
॥ निरहंकारकृतीकरीतो॥ ४०॥ सर्वभूतेंपाहेआत्मवत॥ हेंचसख्यत्याचेंनिश्चित॥ सस्वरूपींसमरस-
पाहत॥ हेंचआत्मनिवेदन॥ ४१॥ तोनिजेलापरिजागत॥ जागातोपरिसमाधिस्थ॥ समाधीपासूनस
मस्त॥ निजरूरवेंडोलतो॥ ४२॥ डोलतोहीविसरोन॥ धरिलेंअसेंसदांमोन॥ मौननमोडतांजाण॥ बोल
बोलेरसाळ॥ ४३॥ रसनेंसहितरस॥ गिळूनतृप्तसावकाश॥ सावकाशपणेंअवकाश॥ विश्वालागीं-
झालातो॥ ४४॥ विश्वगिळूनसगळ॥ स्वच्छंदेंचिरवेळेरवेळ॥ खेळरवेळूनअचंचळ॥ निजमूळसोडीना॥
॥ ४५॥ मूळनसोडितांसाचार॥ आपणचिझालाविश्वाकार॥ विश्वहेंकधींरचलेंसाचार॥ हेंतोंनेणेसर्व-
था॥ ४६॥ तेथेंकैंचेंनेणतेपण॥ तरितोअक्षयज्ञानघन॥ ज्ञानाभिमानसमूळींहुन॥ नाहींकिंचितनयातें॥
॥ ४७॥ तेव्हांधृतीसमूळविराली॥ शांतिशांतपणांतमुराली॥ दिवसतीरात्रीसंभवली॥ स्वप्रकाशेंतयाचा
॥ ४८॥ देहींचाविरालाकाम॥ त्यजिलेंसकळनिजकर्म॥ संगेंआलानिजधर्म॥ नामअनामातीतजो॥ ४९॥
तेथेंमोक्षमुक्तझालापूर्ण॥ साधनांचेंकेलेंउद्यापन॥ अहिंसाक्षमानिशिदिन॥ ह्रदयसदनींरवेळती॥ ५०॥
जागृतीस्वप्नसुषुप्ती॥ त्यासमाधींतविश्रांतपावती॥ तुर्याउन्मनीनिश्चिती॥ स्वानंदींहोतीलीनपें॥ ५१॥ ते
थेंशोकद्वेषमावळती॥ कामनाकल्पनादग्धहोती॥ ध्याताध्यानधैर्यहारपती॥ वचनेंरवुंटतीसर्वही॥ ५२
दारवविणेसिदेरवणेविरे॥ भज्यभजकभजनहीसरे॥ यज्ञज्ञाताज्ञानझरे॥ ग्रीष्मकाळींतोयजेसें॥ ५३॥
हारपलीसकळमती॥ गलितझालियासर्ववृत्ती॥ गमनागमनमती॥ सहजचिरवुंटलीकीं॥ ५४॥ तेथेंअ-
भ्यासर्वहीमुरे॥ विस्मयआणिअनुभवभरे॥ बोधआनंदेंगजरें॥ जयवाद्येंवाजविती॥ ५५॥ सनत्कु-

जातबोलेगर्जोन॥ इहींलक्षणींमंडितपूर्ण॥ तेंजन्ममृत्यूसगिळून॥ पूर्णत्वासीपावले॥ ५६॥ तोंउगवलाआ
दित्य॥ अंतरधानपावलेंसनत्सुजात॥ प्रज्ञाचक्षुआणिविदुरभक्त॥ वारंवारस्तवितीत्यातें॥ ५७॥ म्हणेके-
वढेंअद्भुतज्ञान॥ महाराजवर्षलानिर्वाणघन॥ रत्नाचीरवाणीपुण्येंकरून॥ घडलीअसेसभाग्येंत्या॥ ५८॥ -
जान्हवीपावनसर्वत्र॥ परिप्रयागींमहिमाअपार॥ तैसासततीसावाअध्यायपरिकर॥ तीर्थराजप्रत्यक्षजो
॥ ५९॥ पांडवप्रतापदिव्यग्रंथ॥ त्यामाजीअध्यायहासनत्सुजात॥ ज्ञानवैराग्यरींचायथार्थ॥ दिव्यहिराप्रक
टला॥ ६०॥ सततिसावाअध्यायमहामणी॥ हृदयपदकींजडिलासंतसज्जनीं॥ भक्तपंडितदिवसरजनीं॥
वारंवारविलोकीजो॥ ६१॥ सनत्सुजातपाहतां॥ नपडेज्ञानाचीकदाचिंता॥ प्रियठेवणेंतत्वता॥ संतांचाहाच-
अध्याय॥ ६२॥ पांडवपाळकाअव्यंगा॥ ब्रह्मानंदापांडुरंगा॥ पुंडरीकहृदयारविंदभृंगा॥ श्रीधरवरदाअवि
नाशा॥ ६३॥ पुढेंकथासुरसपूर्ण॥ कौरवबैसतीलसभाकरून॥ संजयासपुसतीवर्तमान॥ हृद्गतकायपांड
वांचें॥ ६४॥ यावरीक्षीराब्धीचाजांवई॥ तेथेंकरूंयेईलशिष्टाई॥ सुधारसाहूनगोडपाहा॥ रसिककथापुढें
असे॥ ६५॥ तेकथासुरसगहन॥ श्रीधरमुखद्वारेंकरून॥ ब्रह्मानंदरुक्मिणीरमण॥ बोलेलतेंचऐकाहो
॥ ६६॥ स्फुरसपांडवप्रतापग्रंथ॥ उद्योगपर्वव्यासभारत॥ त्यांतीलसारांशयथार्थ॥ सततिसाव्यांतकथि
येला॥ ६७॥ ॥ ओंव्या २६७॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु॥ ॥ शुभंभवतु॥ ॥ छ॥

श्रीगणेशायनमः॥ वैशंपायनह्मणेनृपा॥ ऐकजन्मेजयानराधिपा॥ चारयामसरलीक्षपा॥ सनत्सुजातसमागमे॥-
॥१॥ मेघापरीसउदार॥ ज्ञानवर्षलातोविधिपुत्र॥ तोउदयावरीयेतांमित्र॥ तमनिःशेषहारपलें॥२॥ परमदेदीप्यमा
नतरणी॥ भीष्मशारद्वतद्रोणद्रौणी॥ सुयोधनदुःशासनकर्णशकुनी॥ सभास्थानीबैसले॥३॥ अर्कजसोबळबा-
ल्हीक॥ प्रज्ञाचक्षकुरुनायक॥ सभाधनवदलीसम्यक॥ शक्रस्थानासारिखी॥४॥ तोंसंजयपरमप्रवीण॥ सभेस
बैसलायेउन॥ मगसांगतेझालेवर्तमान॥ पंडुकुमरांचेंसर्वही॥५॥ धर्मेंवन्हृकनिष्ठालागुन॥ सांगीतलाआशीर्वा
दनमन॥ दुर्योधनह्मणेसंजयासंपूर्ण॥ सांगअर्जुनबोलिलातें॥६॥ संजयह्मणेजेंजेंबोलिले॥ तेंचिकथितोंनाहीं-
आगळें॥ तुह्मीजरीनकोपावहिलें॥ तरीवर्तलेंसांगेनमीं॥७॥ प्रज्ञाचक्षुह्मणेकांकोपावें॥ बोलिलेतेंचत्वांसांगावें॥
संजयह्मणेऐकावें॥ सर्वसादरहोउनी॥८॥ क्रोधेंबोलिलाअर्जुन॥ दुरात्माजोसुतपुत्रकर्ण॥ त्याचासमरींघेईन-
प्राण॥ तरीचगांडीवचापधरीनमीं॥९॥ धर्मराजउघडीलदिव्यदृष्टी॥ तेव्हांभस्मकरीलसर्वकौरवसृष्टी॥ हाद्दको
दरवीरजेठी॥ यापुढेंदृष्टीकृतांतदावी॥१०॥ माद्रीसुतइच्छीतमनीं॥ जेव्हांमाजेलरणमेदिनी॥ द्वारावतीचीभ-
वानी॥ श्रीरंगरूपिणीचतुर्भुजा॥११॥ तीसआह्मींनवशिलेंउदंड॥ कींतुजपुढेंकरीनकुंड॥ कौरवबस्तप्रचंड॥ द
ळासहीतबळदेऊं॥१२॥ आह्मींअरण्यांतश्रमलोंबहुत॥ कौरवसमरींलोळऊंसमस्त॥ धर्माचाक्रोधसांचलाबहु
त॥ कौरवसंहारकरीलतो॥१३॥ कुठारधारछेदीसर्ववनें॥ कींतृणजाळिजेत्रिचरणें॥ भीमसूर्यशत्रूउडुगणें॥ तें-
जहीनपैंहोती॥१४॥ शत्रुजळदजाळसघन॥ भीमसुदतांप्रभंजन॥ क्षणेंजातीवितळोन॥ शीघ्रकाळेंयावरी॥
॥१५॥ कौरवमूषकांचामार्गलक्षी॥ सहदेवभुजंगधुसधुशी॥ नकुळव्याघ्रआफटीशेंपटी॥ शत्रुबस्तांसलक्षित॥
॥१६॥ तोमहावीरधृष्टद्युम्न॥ नरवीरांमाजीपंचानन॥ तोसात्यकीप्रळयाग्न॥ शत्रूवनजाळूंइच्छि॥१७॥ हेप्रति
विंध्यादिपांचकुमर॥ उदितयुद्धासअहोरात्र॥ हाकृष्णासादृश्यसौभद्र॥ कृतांतासिगणीना॥१८॥ मेरुमांदार

सदट॥ तैसेंद्रौपद आणिविराट॥ देशोदेशींचेराजेअचाट॥ त्यांचापराक्रमनवर्णवे॥ १९॥ दुर्योधनदुःशासन॥ यां
चाकाळभीमसेन॥ हेहरिहरकमळासन॥ नव्हेअप्रमाणत्यांचेनी॥ २०॥ भीष्माचाकाळशिखंडीजाण॥ द्रोणासव-
धीलधृष्टद्युम्न॥ सार्वभौमधर्मआपण॥ शैल्यासमारूंइच्छित॥ २१॥ सहदेवशकुनीचाकाळ॥ उलुकासमारीन॥
कुळ॥ कौलिकपुत्राचेंशिरकमळ॥ मीचछेदीनक्षणार्धें॥ २२॥ उरलेजेकांधृतराष्ट्र॥ सर्वांचाकाळहावृकोदर॥ प्र-
ज्ञाचक्षूंचेंपालनसमग्र॥ आह्मींकरूंशेवटीं॥ २३॥ वीजतळपेजैशीअंबरीं॥ तैसाश्रीरंगसमरीरथफेरी॥ तेव्हांप
ळतीलदशदिशांतरीं॥ शस्त्रेंवस्त्रेंटाकोनियां॥ २४॥ कौरवतस्करसंपूर्ण॥ यांचेतोडीनहस्तचरण॥ जयद्रथाचें-
शिरछेदून॥ द्रौपदीसयेऊनपळतहोतां॥ २५॥ त्यांहींशब्दशस्त्रेंसोडिलींअपार॥ लोहशस्त्रेंआह्मीदेऊंप्रत्योत्त
र॥ कृष्णद्वेषीचांडाळसमग्र॥ संहारीननेमहा॥ २६॥ माझियाचापासआहेगंवसणी॥ परिप्रतिचापक्षणाक्षणा-
झणाणी॥ तूणीरभरलाबाणीं॥ करकरतीबाहेरयावया॥ २७॥ काळफोडीनरणांगणीं॥ यद्यपिष्टवतकरीनधर-
णीं॥ आकाशमंडपउयडोनी॥ पाडीनस्वर्गरवालता॥ २८॥ माझियारथाचाध्वजअद्भुत॥ वायुनसतांफडकावित॥
भूतांसहहनुमंत॥ वाटपाहातरणाची॥ २९॥ सर्पाचियापरीझडकरी॥ असिलतानियतीमेणाबाहेरी॥ शक्तिजा
ळमाझेंथरथरी॥ अस्त्रेंविचारकरिताती॥ ३०॥ परमप्रतापीमीपंडूकुमर॥ परीधृतराष्ट्रआणिगंगापुत्र॥ शारद्व
तआचार्यगुरुवर॥ यांचेचरणनविसरती॥ ३१॥ मगबोलेगंगानंदन॥ विधीनेंकेलेंप्रजापालन॥ भूभारउतरावं-
यासंपूर्ण॥ नरनारायणअवतरले॥ ३२॥ तेचहेकृष्णार्जुन॥ भूभारउतरतीलसंपूर्ण॥ दुर्योधनाहोईंसावधान॥ वं-
शवनजाळूंनको॥ ३३॥ कपिवरध्वजरणांगणीं॥ देखिलानाहींतुह्मींनयनीं॥ तोंवरीधर्मासिआणोनी॥ राजविभा
गदेइजे॥ ३४॥ आतांनायकालआमुचेंवचन॥ समरींसोडालजेव्हांप्राण॥ तेव्हांहोईलआठवण॥ आमुचियाव-
चनाची॥ ३५॥ कर्णशकुनीदुःशासन॥ यांचेंनायकेंकदांवचन॥ मगवाक्यसुधारससेऊन॥ अमरहोऊननांदे-

कां॥ ३६॥ सक्रोधबोलेवीरकर्ण॥ अरेहाभयाभीतहृद्‌पूर्ण॥ क्षत्रीयधर्मसांडोन॥ दीनवदनगोष्टीसांगे॥ ३७॥ सेनेस-
भवेतपांडव॥ मीरणींसंहारीनसर्व॥ एकछत्रीराणीव॥ दुर्योधनांचेंकरीनमी॥ ३८॥ भीष्मह्मणेरेकर्णा॥ कांकरिशी-
व्यर्थवल्गना॥ गोग्रहणींघेऊनवदना॥ कांरेसर्वपळाला॥ ॥ ३९॥ गंधर्वींकौरवधरूननेले॥ तेव्हांतुझेंबळकोठेंगे
लें॥ अधमहोतुह्मासोडविलें॥ भीमार्जुनेंधांवोनि॥ ४०॥ यावरीमाहाराजगुरुद्रोण॥ धृतराष्ट्रासबोलेवचन॥
जेंबोलिलादेवव्रतगर्जोन॥ असत्यनव्हेकाळत्रयीं॥ ४१॥ मांजलीनाहींरणकुंभिनी॥ तोंमैत्रीकराजाउनी॥ तों
अंधह्मणेतेक्षणी॥ मजभयवाटेभीमाचें॥ ४२॥ भीमाचियाबळापुढें॥ नतुळतीउभयदळेंपडिपाडें॥ त्याच्यागं
दाघायज्यावरीपडे॥ तेथेंउरीउरेना॥ ४३॥ मीतयाचेंसमाधान॥ पहिलेंचकरितोंजाउन॥ तरिहाअनर्थचुकतापू
र्ण॥ आतांकदानाटोपती॥ ४४॥ उपजतमूढमाझेनंदन॥ नायकतीश्रेष्ठांचेंवचन॥ भीमऐरावतदारुण॥ वंशवन
उपडील॥ ४५॥ जेणेंजरासंधमारिला॥ किर्मीरहिडंबबकवधिला॥ सबळकीचकाचामेळा॥ मृत्युनगराधाडिला
॥ ४६॥ तोयासकळांसमारीलदेव॥ माझ्यानेंनायकवेसुनांचाशोक॥ मीत्यांचेद्वारींलोळेनबहुतक॥ पुत्रशोकेंक
रूनियां॥ ४७॥ धन्यपांडवबळवंत॥ माझीमर्यादापाळितीअद्भुत॥ येह्रवींहेदुर्जनसमस्त॥ नेतीलक्षणांतबांधो-
नी॥ ४८॥ संजयह्मणेद्रौपदीसभेसि॥ आणिलीतेव्हांउगाचहोतासी॥ आतांकायगोष्टीकरिसी॥ भयमानसीं-
धरोनी॥ ४९॥ तुझेपुत्रबांधून॥ गंधर्वीनेलेधरून॥ तेव्हांधांवलेभीमार्जुन॥ पराक्रमेंत्यांहींसोडविले॥ ५०॥ पर
मपराक्रमीवृकोदर॥ करीलतवपुत्रांचासंहार॥ तुझीबाळबुद्धीसाचार॥ मोहेंकरोनितत्वता॥ ५१॥ दुर्योधन-
बोलेवचन॥ हाअनिवारकृतांतासिद्रोण॥ रणपंडीतपरमनिपुण॥ कृपाचार्यपराक्रमी॥ ५२॥ संहाररुद्राची-
अपरप्रतिमा॥ तोहानरलोकींअश्वत्थामा॥ याकर्णाचायुद्धमहिमा॥ एक्यावक्त्रेंनवर्णवे॥ ५३॥ निःपांडवीधरि
त्री॥ करीनसत्वरयावरी॥ हेराजेमजकारणेंसमरीं॥ प्राणदेतीलभरवसा॥ ५४॥ पांडवनिर्बळपक्षहीन॥ त्यांस

सात्यस्वर्गींहुन ॥ शक्रशिवरमारमण ॥ कमळासनजरिआला ॥ ५५ ॥ त्यांसहीसंहारूंसमरीं ॥ हानिश्चय आसुन्वे अंत
रीं ॥ रेवतीरमणगुरुसरीं ॥ बळमांझेंजाणपां ॥ ५६ ॥ धर्मभ्याडअतिदीन ॥ पांचगांवमागतोकरजोडून ॥ परीएकपाऊल
धरणीजाण ॥ त्यासनेदींनिर्धारें ॥ ५७ ॥ मींगदापडताळीनजेव्हां ॥ समरींमजशींनतगेमघवा ॥ यासर्वराजांचावर्ण
वा ॥ पराक्रमकितीहो ॥ ५८ ॥ करूनीएकत्रद्वादशमित्र ॥ हाघडिलाकींस्वर्धुनीपुत्र ॥ याद्रोणासिंमाजवीसमर ॥ ऐसा
वीरनसेचि ॥ ५९ ॥ आह्मीदंढेसिअवघेजण ॥ एकीकडेबळेंसंपूर्ण ॥ एकलाहावीरकर्ण ॥ पराक्रमेंआगळा ॥ ६० ॥ वी
रचक्रचूडामणी ॥ उदारधीरसमरंगणीं ॥ तरिकवचकुंडलेंमागोनी ॥ गेलाघेऊनसुत्रामा ॥ ६१ ॥ हीवासवीशक्तिसो
डीलकर्ण ॥ तेव्हांकुदांनवांचेअर्जुन ॥ भीष्मप्रतिज्ञाअतिदारुण ॥ वीरमारावेदशसहस्त्र ॥ ६२ ॥ संजयह्मणेपंडुकुम
र ॥ निर्भयनिःशंकप्रळयरुद्र ॥ समरींठाकतीलसमोर ॥ पंचादित्यप्रतापी ॥ ६३ ॥ सभोंवतेंएकयोजन ॥ दिसेअर्जु
नाचाउंचस्यंदन ॥ कपिवरध्वजभेदीतगगन ॥ दशयोजनभोंवतादिसे ॥ ६४ ॥ तिंहींवांटूनघेतलेवीर ॥ शिखंडीचा
भागगंगापुत्र ॥ धृष्टद्युम्नमहावीर ॥ द्रोणगुरूसवधील ॥ ६५ ॥ शैल्यासवधीलधर्म ॥ दुर्योधनदुःशासनासभीम ॥
समरींमारीलहानेम ॥ शतहीबंधूसमवेत ॥ ६६ ॥ कर्णासमघवावतार ॥ मारीलसमरींनिर्धार ॥ सहदेवाहातेंशकु
नीवीर ॥ मृत्युसदनाजाईल ॥ ६७ ॥ शकुनीचापुत्रउलूकजाण ॥ नकुळत्याचाघेईलप्राण ॥ बृहद्वळआणिलक्ष्म
ण ॥ यांसअर्वंतिलेंअभिमन्ये ॥ ६८ ॥ यादववीरयुयुधान ॥ तेणेंनेमिलाचेकितान ॥ तुमचेंअकराक्षोणीसैन्य ॥ दृष्टी
नाहींतयांचें ॥ ६९ ॥ एकल्याअर्जुनेंगोग्रहणीं ॥ केलापुरुषार्थआठवामनीं ॥ शतहीकीचकमारुनी ॥ निशीतटाकिले
वृकोदरें ॥ ७० ॥ दुर्योधनबोलेपराक्रम ॥ उद्यांपांडवांचाकरीनहोम ॥ धृतराष्ट्रबोलेअतिसंभ्रम ॥ कांवल्गनाव्यर्थ
करिसी ॥ ७१ ॥ अरेप्राणांतसमयींजाण ॥ माझेंतुह्मांआठवेलवचन ॥ पराक्रमींभीमार्जुन ॥ संहारितीलसर्वांसी
॥ ७२ ॥ संजयह्मणेएकांतीजाण ॥ दिव्यस्यंदनींश्रीकृष्णार्जुन ॥ एकशय्येवरदोघेजण ॥ पहुडलेनयनींदेखिलेम्यां ॥

॥७३॥ नकुळसहदेवसौभद्र॥ जाऊंनशकती द्रौपदीपुत्र॥ तेंपरमसुवासएकांतमंदिर॥ जेथेंपार्थश्रीधरपहुडले॥
॥७४॥ ध्वजरेषांकितबरवे॥ देखिलेश्रीरंगाचेतळवे॥ तेसुभद्रावरप्रेमभावें॥ तळहातितांदेखिला॥ ७५॥ सनकादि
ककमळासन॥ करितांयोगयागसाधन॥ त्याचेंहीदृष्टीसजाण॥ अगोचरपदतळवेते॥ ७६॥ तेंपदआपुलेअंकींधरु
न॥ क्षणक्षणांतळहातीअर्जुन॥ सवेंचहातींधरूनश्रीकृष्ण॥ पहुडवीतपार्थातें॥ ७७॥ भोजनशयनपान॥ गमनागम
नसंभाषण॥ एकेठायींदोघेजण॥ क्षणभरीदूरनहोती॥ ७८॥ तेंनिजलेअसतांदोघेजण॥ तेथेंमींनिजभाग्येंकरून॥
उभागकलोंजाऊन॥ तोंउभयतळवेदेखिले॥ ७९॥ श्रीकृष्णातळवींचिन्हेंअद्भुत॥ तेंशींचपार्थाचेपायींझळकत॥
मींदेखोनआलोंतटस्थ॥ धन्यभाग्यपार्थाचें॥ ८०॥ अर्जुनासनिद्रानाहींनिःशेष॥ ह्मणोननामगुडाकेश॥ मजदे-
खतांतोनरवीरेश॥ उठोनियांबैसला॥ ८१॥ श्रीरंगाचेचुरितांचरण॥ सावधझालाजगजीवन॥ मजआसनावरीबै
सऊन॥ गौरवबहुतपैंकेला॥ ८२॥ मींबोलिलोंतेथेंवचन॥ कींजातोंकुंजरपुरालागुन॥ मगमजप्रतिरुक्मिणीरम
ण॥ बोलिलातेंचऐकापां॥ ८३॥ सांगभीष्माद्रोणदुर्योधना॥ सकळभूभुजांथोरलाहाना॥ भगदत्तशैल्यकर्णा॥ सं
जयासांगसर्वांसी॥ ८४॥ जपतपयागदानें॥ अष्टभोगललनासिदेणें॥ पुत्रकन्येचींसमाधानें॥ संभाषणेंमैत्रांसीं
॥८५॥ करादिव्यान्नभोजना॥ ठेऊंनकोकांहींवासना॥ तुह्मांआलेंमरणाचुकेना॥ सत्यसत्यत्रिवाचा॥ ८६॥ द्रौ-
पदीच्यादुःखेंकरून॥ मींआरंबळेंरात्रदीन॥ अर्जुनाचीपाठीराखोन॥ संहारकरीनसर्वांचा॥ ८७॥ त्रिदशांसह
शचीरमण॥ तुह्मांरक्षूंआलियाजाण॥ क्षणांतहेंब्रह्मांडजाळिन॥ सुदर्शनसोडूनियां॥ ८८॥ पार्थाचेहस्तेंकरून
॥ एकादशक्षोणीदळसंहारिन॥ नानरीहेंसुदर्शन॥ मींसोडीनशेवटीं॥ ८९॥ यापांचांतुनएकवीर॥ करीलतुमचा
संहार॥ अवघेजाहलियाएकत्र॥ तरीमगउरीकायशी॥ ९०॥ ऐसेंएकांतीकृष्णार्जुन॥ बोलिलेतेव्हांमजलागु
न॥ दोघांचेंबोलणेंएकचिजाण॥ नसेअन्यदुसरें॥ ९१॥ ऐसेंऐकतांअंबिकानंदन॥ भयाभीतहोऊनबोलेव

चन॥ दुर्योधनावर्तमान॥पुढें बरेंदिसेना॥९२॥ हेंदळमेळविलें त्वांनिर्धारीं॥ याचाभरवसाकदांनधरी॥ पार्थासिसा
त्यसमरीं॥ हरिहरइंद्रादिजाणिजे॥९३॥ मगबोलतीसुयोधनकर्ण॥ तुह्मीसुखरूपकरामंदिरीशयन॥ क्षणांतपांड
वसंहारून॥ दळासहटाकूं आह्मी॥९४॥ गंगात्मजह्मणतकर्णा॥ कांकरिशीव्यर्थवल्गना॥ गोग्रहणींकृष्णावदना॥
करूनपळालांसर्वही॥९५॥ श्रीरंगसोडीलसुदर्शन॥ मगकेंचेंउरेलतुमचेंसैन्य॥ नकाकुळटाकूंसंहारून॥ ऐक
वचनशिकविलें॥९६॥ क्रोधेंबोलेकर्णवीर॥ जोंवाचलाआहेगंगाकुमर॥ तोंमीकदांनधरीशस्त्र॥ नेममाझाजाणि
जे॥९७॥ शस्त्रेंटाकूनरागेंकर्ण॥ गेलासभेंतूनउठून॥ भीष्मासह्मणेसुयोधन॥ तुह्मिपाठिराखेपांडवांचे॥९८॥
तुमचेबळेंआह्मीपाहीं॥ समरींसहसाभीतनाहीं॥ आह्मीचौघेमिळूनसर्वही॥ पांडवसेनासंहारूं॥९९॥ दुःशास
नशकुनीकर्ण॥ चौथामीपराक्रमीसुयोधन॥ टाकूंसर्वसंहारून॥ भरवसापूर्णअसोंद्या॥१००॥ विदूरबोलेतेव्हां
नीती॥ जेस्वजातीशींविरोधकरिती॥ वृद्धासक्षणक्षणाअपमानिती॥ तेअनर्थींपडतील॥१॥ धृतराष्ट्रह्मणेसुयो
धना॥ बारेऐकवृद्धाचेंवचना॥ द्रौपदीस्वयंवरींभीमार्जुना॥ सांग्यकवणहोतेपां॥२॥ गोग्रहणींसांग्यनवताकृ-
ष्ण॥ आतांमिळालेंसकळसैन्य॥ तोंदुर्योधनसभामोडून॥ रागेंगेलास्वसदना॥३॥ अंधासऐकांतीयेऊन॥ भेटे
लासत्यवतीनंदन॥ ह्मणेहेंएकीकडेत्रिभुवन॥ एकजनार्दनएकीकडे॥४॥ श्रीकृष्णमहिमाअपार॥ नेणाचतु-
र्मुखीपामर॥ क्षणेंसृष्टीक्षणेंसंहार॥ कर्तासाचारश्रीकृष्ण॥५॥ पांडवांचेंनिमित्तकरून॥ भूभारउतरीलसंपूर्ण॥
भवपंकजोद्भवकरजोडून॥ याचेंस्तवनकरीतसे॥६॥ गांधारीनेंदुर्योधन॥ एकांतीं आणिलाबोलाउन॥ ह्मणेऐ-
कवडिलांचेंवचन॥ भेटेंजाऊनधर्मराजा॥७॥ उतरावयाभूभार॥ अवतरलासेश्रीकरधर॥ नऐकसीशिकवि
लेंसाचार॥ तरीमरणजवळीआलें॥८॥ भीमयालीलगदाउचलोन॥ मगमाझेंआठवेलवचन॥ हेंकाळत्रयींन
चुकेजाण॥ सत्यवचनसांगत्यें॥९॥ इकडेजगद्वंद्यजगजीवन॥ त्याप्रतिधर्मबोलेवचन॥ तुजवांचूनिरक्षिता-

जाण॥ दुजाकोणअसेआह्मां॥ १०॥ बाळाचेंपालनकरींबरवें॥ हेंमातेसकायसांगावें॥ शांतिक्षमादयाधराह्मण
वें॥ नलागेचसज्जना॥ ११॥ श्रीरंगाशामसुंदरा॥ आपणजावेंहस्तनापुरा॥ कौरवांचेशोधावेंअंतरा॥ सामभेद
करोनी॥ १२॥ त्रयोदशवर्षेंवनींक्रमिलीं॥ कुंतीमातामजअंतरली॥ तिचीभेटहोयवनमाळी॥ त्वरितचिकरींऐसें
॥ १३॥ परमउन्मत्तदुर्योधन॥ राज्यमदेंगेलाभुलोन॥ स्त्रीविषयधनयौवन॥ साभिमानविषयांध॥ १४॥ यावरी
बोलेराजीवनयन॥ मीतेथवरएकदांजाईन॥ शिष्टाईकरूनबोधीन॥ दुरात्मादुर्योधनातें॥ १५॥ युधिष्ठिरह्मणेज
गन्नाथा॥ तोतुझेंनऐकेबोधितां॥ मजऐसेंवाटतेंचित्ता॥ त्वांनवजावेंयेथुनी॥ १६॥ मगबोलेरुक्मिणीरमण॥ मी
एकदांतेथवरीजाइन॥ संदेहसर्वफेडिन॥ जेणेंकरूनबोलनलागे॥ १७॥ तेथेंवर्ततांविपरीत॥ तरिसुदर्शनसोडी
नअकस्मात॥ करीनदुष्टांचानिःपात॥ एकक्षणांतधर्मराया॥ १८॥ धर्मह्मणेश्रीहरी॥ सर्वभावेंकरावीमैत्री॥ भीम
ह्मणेमुरारी॥ पंचग्राममागत्यांतें॥ १९॥ पार्थह्मणेसमान॥ अर्धराज्यदेतीलवांटून॥ आणिदुर्योधनेंयेथेंयेऊन॥
धर्मरायासनमावें॥ २०॥ तंवबोलेनकुळ॥ जरदुर्योधनशरणयेईल॥ अर्धराज्यदेईल॥ तरीचमैत्रीकरावी॥ २१॥
ऐसेंऐकोनद्रुपदनंदिनी॥ ह्मणेश्रीरंगासीतुझीभगिनी॥ अद्यापघातलीनाहींवेणी॥ त्रयोदशवर्षेंजाहालींकीं॥ २२
हातींधरोनियांकेश॥ ह्मणेहेजगन्निवासहृषीकेश॥ दुःशासनेंधरूननिःशेष॥ नेलेंवोढीतसभेमाजी॥ २३॥ ऐसें
बोलतांद्रुपदबाळा॥ नयनींअश्रूकंठदाटला॥ ह्मणेविश्वव्यापकातेवेळा॥ वस्त्रेंपुरविलींत्वांअसंख्य॥ २४॥ मज
सभेंतकरितांनग्न॥ हेपांचहीपाहातीअधोवदन॥ आतांहोऊनियांदीन॥ पंचग्राममागती॥ २५॥ आंगींबळप्रता
पअसतांपूर्ण॥ मगकांअवगावेंयाचकपण॥ प्रतापेंसमरमाजऊन॥ राज्यासनमगघ्यावें॥ २६॥ हेंजरीनहोयतु
मचेन॥ तरिजामागुतीसेवाअरण्य॥ पंचपुत्रआणिअभिमन्य॥ दुर्जनसंहारीनयांहातीं॥ २७॥ ऐसेंबोलतांद्रुप
दनंदिनी॥ आसुवेंभिजतकुंभिनी॥ श्रीरंगह्मणेवोमायबहिणी॥ खेदमनींकरूंनको॥ २८॥ यावरीसत्वरत्रिजा-

णा॥ एकेक कौरव येती रणा॥ स्यानास जातील कौरव ललना॥ तें तूं डोळां विलोकिशी॥ २९॥ ऐसें बोलोन जगज्जीवन॥ करोनियां जपहवन॥ आपले स्यंदनावरी आरूढोन॥ निघता जाहाला गरुडध्वज॥ ३०॥ वारू योजिले अतिसुरेख॥ शैब्य सुग्रीव बलाहक॥ मेघपुष्प चौथा देख॥ पुढें दारुक धुरेसी॥ ३१॥ शंख चक्र गदा पद्म॥ घेऊनि बैसला मेघःशाम॥ सवें सात्यकी वीरोत्तम॥ निघाले वेगें करोनी॥ ३२॥ पांडव आणि भूभुज सकळी॥ बोळवीत चालिले वनमाळी॥ मग श्रीरंगें राहऊन ते वेळीं॥ निघाला वेगें गजपुरा॥ ३३॥ वाटे सजातां जगदीश्वर॥ भेटती बहुत ऋषेश्वर॥ ह्मणती आह्मी येतों समग्र॥ कौरवसभेस श्रीरंगा॥ ३४॥ तूं तेथें बोलसी कवणे रिती॥ तें आमुचे श्रवण ऐकूं इछिती॥ अवश्य ह्मणे रुक्मिणीपति॥ यावें सत्वर मागूनियां॥ ३५॥ मेघीं विद्युल्लता देदीप्यमान॥ तैसें हातीं झळके सुदर्शन॥ कोटिमदनतात जगन्मोहन॥ शोभायमान दिसताहे॥ ३६॥ क्षीराब्धीचें टवणें देख॥ तैसा लखलखीत हातीं शंख॥ गदा ते वाटे बहुतेक॥ आदित्यतेजें घडियेली॥ ३७॥ चंडकीर्ण आटून उत्तम॥ घडिलें हाती चें दिव्य पद्म॥ सच्चिदानंद मेघःशाम॥ निगमागम वर्णिती जया॥ ३८॥ प्रळयाग्नीचा कल्लोळ भडकत॥ तैसें उत्तरीय वस्त्र झळकत॥ दशांप्रति मुक्तें तळपत॥ कृत्तिकापुंज ज्यापरी॥ ३९॥ तो परम तेजाळ क्षीरोदक॥ कीं शुद्ध यशाचा टलें बिक॥ कीं शुद्ध श्वेत मृडानीनायक॥ कर्पुरें करून उटिला॥ ४०॥ कीं दिव्य रजन गाळोनि ओतिलें॥ कीं परोज कैलास डवरिलें॥ कीं जान्हवी तोयें वोपिलें॥ दिनकरनाथें स्वहस्तें॥ ४१॥ तो सच्चिदानंद तनु सगुण॥ अतसिकुसुम समभास पूर्ण॥ त्याचिया रंगें करून॥ नीलोत्पलें शबविलीं॥ ४२॥ नभास चढला तो चि रंग॥ त्याच प्रभेने रंगले मेघ॥ इंद्रनीळ सुरंग॥ त्याच प्रकाशें जाहाले॥ ४३॥ तेथींचें सौंदर्य अद्भुत॥ गरुडपाचू सतेज दीसत॥ मर्गजाशिबीक चढत॥ तनु सांवळी देखोनी॥ ४४॥ तो वैकुंठीचा सकुमार॥ भक्तमंदिरा गुणमंदीर॥ कुरवंडी करावी साचार॥ कोटि मकरध्वज वरूनी॥ ४५॥ ब्रह्मांड कोंडोन बाहेरी॥ आंगींचा सुवास धांवत वरी॥ लावण्यामृत सागर कैटभारी॥ लीलावनारी वेधक जो॥ ४६॥ पूर्णब्रह्मानंदयाद

ह्मणेहें नघडे कांळत्रयीं॥ मजहें वर्तमानसर्वही॥ श्रीकृष्णें पूर्वीसांगीतलें॥ २२५॥ पांडवांससांभाळीद्वारका
नायक॥ तेंसामीकौरवांचारक्षक॥ आह्माक्षत्रियांचेंभाग्यदेख॥ समरंगणीपडावें॥ २२६॥ आतांपांडवांसजिं
कीना॥ कींसमरंगणीवेंचीनप्राण॥ भीष्मामाझेअपराधसंपूर्ण॥ क्षमाकरींयावरी॥ २७॥ मगनमूनभीष्मचर
णा॥ स्वस्थळाप्रतिगेलाकर्ण॥ भीष्मह्मणेयेथुन॥ मजकोणीबोलऊंनका॥ २८॥ मींध्यातोंश्रीहरीचेंरूप॥ ये
थेंकरूंनकाकोणीविक्षेप॥ मगबोलुणेंटाकूनतोपुण्यरूप॥ समाधिस्थस्वस्वरूपीं॥ २९॥ वैशंपायनह्मणे
जन्मेजया॥ भीष्मपर्वसंपलेंयेथोनियां॥ संजयह्मणेकुरुवर्या॥ द्रोणपर्वऐकापुढें॥ ३०॥ नैमिषारण्यींऋषीस
मस्त॥ त्यांसहेकथासांगेसूत॥ एकशतचारअध्यायसमस्त॥ यापर्वाचेजाणिजे॥ ३१॥ तीनअध्यायांमाजी
सर्व॥ आणिलातोअर्थअपूर्व॥ ब्रह्मानंदपंदरीराव॥ सांगतोतेंचलिहितोंमीं॥ ३२॥ हेंअपूर्वश्रवणकरितां॥
क्षत्रियां
शत्रुक्षयहोयतत्वता॥ संततीसंपत्तीवाचितां॥ अंतींमुक्ताप्राप्तहोय॥ ३३॥ ब्राह्मणासविद्याप्राप्त॥ क्षत्रियां
आगळेंशूरत्व॥ वैश्यासिधनअद्भुत॥ पावतीइच्छितशूद्रही॥ ३४॥ श्रवणेंहोयरोगहरण॥ स्त्रियांससौभा
ग्यसंपूर्ण॥ ऐसेंबोलिलावैशंपायन॥ सत्कारकरूनसर्वही॥ ३५॥ आदिपुरुषश्रीदिगंबर॥ श्रीमद्भीमातीर
विहार॥ ब्रह्मानंदअभंगसाचार॥ सर्वथाहीविटेना॥ ३६॥ सुरसपांडवप्रतापग्रंथ॥ भीष्मपर्वव्यासभारत॥
त्यांतीलसारांशयथार्थ॥ त्रेचाळिसाव्यांतकथियेला॥ ३७॥ ॥श्रीकृष्णार्पणमस्तु॥ ॥ छ॥

श्रीगणेशायनमः॥ ॥पुंडरीकवरदापुरुषोत्तमा॥भक्तमानसउद्यानविहंगमा॥भीमातटविहारामेघःश्या
मा॥निगमागमावंद्यतूं॥१॥पांडवरक्षकापंढरीशा॥विलासियापरमपुरुषा॥भगिनीमातुनीपंडुस्नुषा॥पार्थाप्र
तीरक्षिसी॥२॥पांडवांचेभाग्यदेखा॥नवर्णवेचीसहस्रमुखा॥तूंनयाचापाठिराखा॥अंतरबाह्यरक्षिसी
॥३॥मागेंभीष्मपर्वसंपलें॥हेंद्रोणपर्वआरंभिलें॥जेंअत्यंतरसागळें॥सादरश्रोतीपरिसिजे॥४॥प
दकामध्येनायकीहिरा॥तैसाद्रोणपर्वअवधारा॥उरीनउरेदोषमात्रा॥श्रवणकरितांसाक्षेपें॥५॥जेथेंमाज
लावीररस॥ऐकतांचतुरपरमसुरस॥जन्मेजयपुसेवैशंपायनास॥सांगविशेषकथापुढें॥६॥गंगात्मजपहु
डलाशरपंजरीं॥मगसमरमाजविलाकोणेपरी॥व्यासशिष्यह्मणेअवधारीं॥जन्मेजयराजेंद्रा॥७॥शंतनु
जपडिलियावरी॥शोभानदिसेपृतनेवरी॥जैशीविगतधवानारी॥कींनिम्नगासलिलेंवीण॥८॥भंगिली
नौकामहाजळीं॥बुडावयातैसीडळमळी॥तैशीचमूतेकाळीं॥भयेंव्याप्तदिसतसे॥९॥भीष्मासबाणउशी
देऊन॥कौरवपांडवकरितीनमन॥करूनियांप्रदक्षिणा॥मगयुद्धासीप्रवर्तले॥१०॥दशदीनपर्यंत॥तेणेंयु
द्धकेलेंअद्भुत॥दहासहस्ररणपंडित॥महारथीनित्यपाडिले॥११॥भीष्मप्रतापआठऊन॥शोककरितीकौर
वसंपूर्ण॥द्रोणआणिशारद्वतकर्ण॥अतिउद्विग्नजाहाले॥१२॥दुर्योधनतेचरात्रीं॥चिंतानळेंआहाळेंचित्तीं॥
मगजाऊनिगुरुशिबिराप्रति॥नमूनबोलताजाहाला॥१३॥ह्मणेकवेंद्रगुरुह्मणियां॥तुझामहिमाद्रोणाचार्या
॥यावरीचमूरक्षावया॥तुजवांचुनीथोरनसे॥१४॥काळमृत्यूभयंकर॥यापासूनरक्षींतूंआचार्य॥तुझेशि
रींअसतांपाय॥सदांनिर्भयआह्मीअसो॥१५॥मगवस्त्रेंभूषणेंआणून॥प्रीतीनेंपूजिलागुरुद्रोण॥से
नापतित्वरणपदपूर्ण॥आचार्यासींदिधला॥१६॥चारीवेदमुखेंबोद्धत॥सकळशास्त्रपारंगत॥पाठीसींतूं
गीरविराजित॥विजुऐसेंसायकासन॥१७॥पांडवकौरवयादवसमस्त॥हेंद्रोणाचेंशिष्यअंकित॥जाचा

वरदहस्तें मिरवत॥ मुकूट स्वभद्रापतीचा॥१८॥ तो प्रसन्न होऊनी गुरुराणा॥ ह्मणे वर मागें सुयोधना॥ म
गतो लागोन आचार्यचरणा॥ कौरवेश बोलतसे॥१९॥ तरि अजातशत्रु कुंतिसुत॥ धरूनि देईं आह्मासि
जित॥ धर्माचा वध निश्चित॥ मी कल्पीत नाहीं आचार्या॥२०॥ धर्मास वधितां जाण॥ आह्मास उरों नेदी अ-
र्जुन॥ जित धरितां शरण॥ सर्व येतील आह्माते॥२१॥ पुढती रचोन द्यूत॥ वनास पाठवूं पांडव त्वरित॥ मग
ह्मणे भारद्वाज रुसून॥ तूं यथार्थ बोलसी॥२२॥ माझा शिष्य होय अर्जुन॥ परि विद्येनें आगळा मजहुन॥ त्रिपुर
कारीजनकपाकशासन॥ केलें प्रसन्न स्वर्गीं तिणें॥२३॥ शस्त्रें अस्त्रें मंत्रविशेष॥ जे त्रिभुवनीं नठाउके को-
णास॥ ते विद्या ठाउकी सव्यसाचीस॥ तरि फोडा त्यास वेगळे॥२४॥ वेगळा होतांच फाल्गुन॥ क्षणमात्रें धर्म
धरिन॥ ऐसें ऐकतां दुर्योधन॥ परम आनंद बोलत॥२५॥ ह्मणे नाना उपाय करून॥ वेगळा नेतों श्वेतवाहन॥
अजातशत्रु धरून॥ जीत आह्मांस द्यावा तुह्मीं॥२६॥ ऐसा नेम होतां तात्काळ॥ गाजली रणवाद्यें तुंबळ॥ तो-
समाचार सकळ॥ पांडवपांचाळां समजला॥२७॥ धर्म ह्मणे आचार्यप्रतिज्ञा॥ कळली कीं तुह्मां अर्जुना॥ सांव
रूनी सकळ सैन्य जना॥ सावधान असावें॥२८॥ पार्थ ह्मणे आलिया कृतांत॥ मी तुज रक्षीन यथार्थ॥ परि एक
कर्म अद्भुत॥ सहसा माझेन न करवे॥२९॥ मर्यादा सांडील मेदिनीवसन॥ वरुणदिशे उगवे सहस्त्रकीर्ण॥
हेंही घडले परि माझेन॥ आचार्यवध न करवे॥३०॥ मृगजळीं बुडेल अगस्ती॥ तमकुपीं पडेल गभस्ती॥ तृ-
नाळिका धरून नेती॥ अरुणानुजासी घडे हें॥३१॥ मशक धरील सौदामिनी॥ भोगेंद्र सांडील कुंभिनी॥ परि
द्रोणवध माझेनी॥ कल्पांतीही करवेना॥३२॥ जो वाचस्पतीची अपर प्रतिमा॥ ज्याचा त्रिभुवनीं नमाये म-
हिमा॥ पृथ्वीहोन आगळी क्षमा॥ तो माझेन धर्मे न वधवे॥३३॥ द्रोणस्नेहाचे समुद्रीं॥ म्यां बुडी दिधली अहो
रात्रीं॥ जेणें पुत्राहोन मजवरी॥ प्रीती ठेविली अपार॥३४॥ या शरीराच्या पादुका करून॥ आचार्यपदीं ले-

वचीन॥ परिमीनं व्हेचीउत्तीर्ण॥ कांहींएक नयाचे॥ ३५॥ समरंगणीं टाकुनी बाण॥ त्यांसिं धर्मयुद्ध करीन निर्वा
ण॥ परी गुरूचा प्राण॥ कदा माझेन न घेववे॥ ३६॥ तुज धरावया येतो द्रोण॥ माझी प्रतिज्ञा तुज रक्षीन॥ असो उ
दय पावला सहस्रकिरण॥ दरिद्रा अतिभाग्य जेसें॥ ३७॥ वाद्यें गर्जती नानाविध॥ दोनीं दळें झालीं सिद्ध॥ पांच
जन्य देवदत्ताचा नाद॥ गगनांत न सांठवे॥ ३८॥ तों गजर जाहला तुंबळ॥ नादें डळमळिला भूगोळ॥ चतुर्दश लो
कसकळ॥ भयें काळ कांपतसे॥ ३९॥ वाटे गगन येईल तुटोनी॥ वर्ती जाईल अवनी॥ भगणें रिचवती मेदिनी॥
दचके मनीं उरगेंद्र॥ ४०॥ कूर्म खालें पृष्ठी सांवरित॥ आदिसूकर न टावी दंत॥ तो कोल्हाळ ऐकतां कांपत॥ म-
हाबळवंत धों कडजे॥ ४१॥ नाना वाद्यांचे बोभाट॥ उभय दळांचा कडकडाट॥ त्या मध्यभागीं उभा अचाट॥ वि
जयरथ पार्थाचा॥ ४२॥ ध्वजस्तंभीं महारुद्र॥ वेळोवेळां करी बुभुःकार॥ रणसागरीं जहाज थोर॥ कर्णधार ह-
नुमंत वरी॥ ४३॥ रथीं सारथी इंदिरावर॥ जो लावण्याब्धि शतपत्रनेत्र॥ पांडवभाग्य सहस्रवक्त्र॥ तोही वर्णूं श-
केना॥ ४४॥ सर्वांत श्रेष्ठ वैकुंठधाम॥ तैसा दिसतो रथोत्तम॥ प्रळयचपळ ऐसा ध्वज परम॥ पालवीत परवीरां
॥ ४५॥ जैसा सुपर्ण पक्ष फडकत॥ तैसें ध्वजांचे तेज तळपत॥ हरिहर दोघे रक्षित॥ धनंजयासी रणांगणीं॥ ४६
इकडे कौरवदळीं गुरुद्रोण॥ जैसा निरभ्र गगनीं चंडकीर्ण॥ पांडवचमू परम दारुण॥ न धरी दृष्टींत पुरुषार्थें॥ ४७
आचार्यतेज अद्भुत॥ पाहतां पांडव पृतना भयाभीत॥ वाटे समरंगणीं कृतांत॥ द्रोणरूपें अवतरला॥ ४८॥ पां-
डवसेना सरितापती॥ घोटूं इच्छी द्रोण अगस्ति॥ तेव्हां वाघ गजरें जगती॥ थरथरित क्षणार्धें॥ ४९॥ तरूवरी
चपळा पडे तुटोन॥ तैसा पुढें धांवला गुरुद्रोण॥ तेव्हां सायकासनापासुन॥ बाणघन वर्षत॥ ५०॥ शिरवीजा
ळी तृणकानन॥ कीं द्विजेंद्र सारी होमद्रव्य जाण॥ तैसी पांडववाहिनी गुरुद्रोण॥ संहारित गणावेना॥ ५१॥ कण-
सें छेदुनी कर्षक बाळ॥ ठेविती दंड दिसती सरळ॥ शीररहीत वीर सबळ॥ केले बहुत आचार्यें॥ ५२॥ पराक्रम-

वर्णक्रमेंकरून॥द्रोणेंकेलेंवेदाध्ययन॥तेचत्वरेनेमार्गण॥सुटतीचापापासुनियां॥५३॥कीं्पमेघअनिवार
शरधारासुटल्याअपार॥चालिलेरुधिराचेआरक्तपूर॥पुसतीमार्गसिंधूचा॥५४॥ऐसेंद्रोणेंकेलेंअभिनव॥
तोंस्यंदनारूढसहदेव॥शकुनीवरीवर्षाव॥बाणांचाकरीतधांवला॥५५॥तंवपरमक्रोधेंशकुनी॥बाणव
र्षततयेक्षणीं॥जैसासव्यापसव्यवचनीं॥पंडितांपुढेंमूढवदे॥५६॥संवत्सरसंख्याबाणीं॥शकुनीरिवळि·
लासहदेवेंरणीं॥तूणीरचापरथछेदुनी॥क्षणमात्रेंटाकिला॥५७॥मारिलेअश्वआणिसारथी॥शकुनीहो
नीविरथी॥गदाघेऊनीत्वरितगती॥सहदेवावरीलोटला॥५८॥गदाघायेंरणांगणीं॥सारथीमारिलात·
येक्षणी॥सहदेवेंशक्तिटाकुनी॥शकुनीत्हृदयीं भेदिला॥५९॥तोरथारूढभीमसेन॥पुढेंधांवलावर्षत·
बाण॥दुर्योधनाचेंसैन्य॥अपारभेदिलेंतेव्हां॥६०॥तोंदुर्योधनबंधूनिश्चिती॥जयाचेंनामविंशती॥तोंपुढें
धावलात्वरितगती॥मागेंटाकुनीसैन्यातें॥६१॥त्याचेत्हृदयींवीसबाण॥विंधिताझालाभीमसेन॥तेणें·
तीसबाणटाकुन॥वृकोदरभेदिला॥६२॥भीमाकरिचेंसायकासन॥तेणेंछेदिलेंनलगतांक्षण॥मगपव
नात्मजगदाघेऊन॥पवनवेगेंधांवला॥६३॥रथसारथीअश्वपाहें॥चूर्णकेलेंएकाचघायें॥जैसाकाम·
क्रोधलोभज्ञानियें॥मनोजयेंजिंकिजे॥६४॥तोंनकुळाचामातुळ॥माद्रीबंधूशैल्यसबळ॥त्यावरीनकु
ळपरमचपळ॥मनोजवेंधांवला॥६५॥शैल्याचेअंगीबाण॥नकूळभेदीबळेंकरून॥रथसारथीतुरंग
जाण॥पाडीछेदूनतात्काळ॥६६॥शल्यदुसरेरथीबैसत॥दशबाणटाकूनीत्वरित॥त्हृदयींभेदिला·
भगिनीसुत॥पराक्रमेंरणांगणीं॥६७॥चैद्यदेशींचाराजाधृष्टकेत॥तेणेंदेखिलाशारद्वत॥दोघांचेंयु
द्धअद्भुत॥होतेंझालेंनेधयां॥६८॥विद्युल्लतापडेअकस्मात॥तैसासात्यकीधांवलात्वरित॥सत्तरबाणीवळ
द्भुत॥कृतवर्मारिवळिलातेणें॥७०॥तेणेंसत्याहात्तरबाणीं॥सात्यकीभेदिलातयेक्षणीं॥सभापतीपांडवांकडून॥

सुशर्मा धांवला ॥ ७१ ॥ कर्ण आणि विराट ॥ युद्ध करिती तेव्हां अचाट ॥ भगदत्त द्रुपद विराट ॥ रणांगणीं भिड-
ती ॥ ७२ ॥ शिखंडी आणि भूरिश्रव ॥ दाविती युद्धाचें लाघव ॥ घटोत्कच बळार्णव ॥ तेणें अलंबुष पाचारिला ॥ ७३
पांडवदळांतून चेकितान ॥ धांविला विंदा सलक्षून ॥ श्रीरंगभगिनीनंदन ॥ स्यंदनारूढ धाविला ॥ ७४ ॥ उद्यानीं
संचरे सौदामिनी ॥ तेविं अरिसेनेंत प्रवेशे तेक्षणीं ॥ कौरव जर्जर केले निजबाणीं ॥ निर्जर नयनीं पाहाती ॥ ७५ ॥
सुयोधनबंधु नाम पौरव ॥ तेणें सौभद्रावरी घातला घाव ॥ जैशी अळिकेनें घातली हांव ॥ उरगरिपु जिंकावया ॥
॥ ७६ ॥ तो महावीर प्रति अर्जुन ॥ त्यावरी निर्वाण सोडिले बाण ॥ ध्वज रथ सूत शरासन ॥ न लगतां क्षण छेदिलें ॥
७७ ॥ हृदयीं भेदिले दश बाण ॥ पौरव पाडिला मूर्छा येऊन ॥ तों कृतवर्म्यानें अभिमान्य ॥ सिंहनादें पाचारिला ॥ ७८
कृतवर्मा वर्षे बाणजाळ ॥ तें छेदी सुभद्रेचा बाळ ॥ बाळ नव्हे हा काळ ॥ कौरवचमूसंहारी ॥ ७९ ॥ कृतवर्मा शतबा-
णीं ॥ जर्जर केला समरंगणीं ॥ तंव तो पौरव मागुत्यानी ॥ गदा घेउनी धांविला ॥ ८० ॥ गदा भिर्कावितां जाण ॥ छेदुनी
पाडी अभिमन्य ॥ मग तो पौरव केशीं धरून ॥ मुष्टिप्रहारें धुमसिला ॥ ८१ ॥ कुंजरें मार्जार धरूनी ॥ मर्दिलें शुंडादंडें क-
रूनी ॥ तों जयद्रथ खड्ग घेउनी ॥ सौभद्रावरी धांवला ॥ ८२ ॥ तंव दुर्योधनाचा शालक ॥ मस्तकीं धरूनी खेटक ॥ रथा
खालें निघोनि देख ॥ अश्व स्यंदन छेदितसे ॥ ८३ ॥ श्येनपक्षी उडे बळाद्भुत ॥ तैसा उडाला पार्थसुत ॥ गदाघायें ज-
यद्रथ ॥ विकळ केला भूतळीं ॥ ८४ ॥ सवेंच उठोन जयद्रथ ॥ शक्ति दोहीं हातीं वोपित ॥ तों अभिमन्यें धरूनी अकस्मा-
त ॥ त्यावरी भिरकाविली ॥ ८५ ॥ विपरीत देखोनि दैवत ॥ साधका वरी जें विपरतत ॥ तैसा शक्तीनें जयद्रथ
॥ भुजास्थानीं भेदिला ॥ ८६ ॥ सवेंच रथीं चढे पार्थसुत ॥ बहु बाणीं भेदिला जयद्रथ ॥ अव घे भूभुज मानवत ॥
युद्ध देखोन तयाचें ॥ ८७ ॥ इंदिरावरभगिनीसुत ॥ त्याचा पराक्रम देखोनि अद्भुत ॥ कौरव लोटले समस्त ॥
काक जैसे हंसावरी ॥ ८८ ॥ शल्यें टाकुनी बाण ॥ छेदिला अभिमन्याचा स्यंदन ॥ उणें देखतां भीमसेन ॥ पं-

चाननापरीधांवे॥ ८९॥ देखोनियांमहाव्याघ्र॥ पळतीजैसेमृगांचेभार॥ तैसाकौरवसेनासागर॥ पळालाभी
मभयें॥ ९०॥ पळतांगजपाईंधरी॥ आपटूनभिरकावीअंबरीं॥ गदाघायेंचूर्णकरी॥ स्यंदनआणिवीरांतें॥
॥ ९१॥ पर्वतावरीपडेपर्वत॥ तैसाशल्यभीमावरीधांवत॥ दोनघटिकापर्यंत॥ महायुद्धजाहालें॥ ९२॥ वर्मणा
हुनीरणमंडळीं॥ गदाहाणितीमहाबळी॥ नानामंडळेंगतीआगळी॥ रथचक्रमकदाविती॥ ९३॥ एकमेरू
एकमांदार॥ एकसमुद्रएकअंबर॥ एकवासुकीएकसहस्रकर॥ तैसेदोघेदीसती॥ ९४॥ दोनीदळींचेनृप
ती॥ युद्धपाहोनथोवातुकाविती॥ पर्वतकुंकुमचर्चिजेती॥ तैसेदिसतीदोघेही॥ ९५॥ गदाघायेंदोघेजण॥
पडिलेतेव्हांमूर्छायेऊन॥ मगशैल्यस्यंदनींघालोन॥ नेलकृतवर्मातेधवां॥ ९६॥ जैसाखगनाप्रभंजन॥ ज
लदजाळजायपिटाळोन॥ तैशीकौरवसेनाभयेंकरून॥ पळतीझालीतेधवां॥ ९७॥ यावरीकर्णपुत्रवृषसेन॥
धांवेरहंवरींआरूढहोऊन॥ तोंशतानीकतिकडून॥ पार्थपुत्रधांवला॥ ९८॥ युद्धझालेंघटिकाएक॥ किंचि
तमाघारलाशतानीक॥ तोंप्रतिविंध्यादिचौघेदेख॥ पाठिराखेधांवले॥ ९९॥ पंचकुमारमिळोनीजाण॥ खि
ळिलीसकळकौरवसेना॥ हस्तलाघवपाहातांनयना॥ पांचपांडवआनंदले॥ १००॥ तोंकौरवसमस्तलोटले॥
देखतांकौंतेयपांचाळउठले॥ कोट्यावधीबाणसोडिले॥ क्षीणकेलेमहावीर॥ १॥ मगतोयंतापार्कअद्भुत॥
आचार्यधांवलाजैसाकृतांत॥ त्यावरीधर्मराजअकस्मात॥ परमवेगेंधांवला॥ २॥ द्रोणेंपांचबाणपाहीं॥ धर्म
राजभेदिलाहृदयीं॥ तोंयुधिष्ठिरेंलवलाही॥ उसणेंघेतलेंतेधवां॥ ३॥ शतार्धबाणसोडून॥ सर्वांगींभेदिलागु
रुद्रोण॥ तोंधांवलाधृष्टद्युम्न॥ अपारबाणवर्षत॥ ४॥ प्रळयींखवळेकाळ॥ तैसाद्रोणकोपलापुण्यशीळ॥ धृ
ष्टद्युम्नतात्काळ॥ शतबाणेंखिळियेला॥ ५॥ सूर्यकळासंख्याबाणीं॥ शिखंडीखिळिलात्तयेक्षणीं॥ दशमुख
नेत्रसंख्याबाणीं॥ उत्तमौजभेदिला॥ ६॥ भूतसंख्याशकुनीबाण॥ नकुळभेदीगुरुद्रोण॥ सागरसंख्याबाणें

करून॥ सहदेवरिवळियेला॥ ७॥ विद्यासंख्यादिव्यशरीं॥ धर्मराजभेदिलाशिरीं॥ द्रौपदीचापंचपुत्रांवरीं॥
वेदसंख्यासमान॥ ८॥ शशिकळासंख्याइतुकीं॥ समरींखिळिलासात्यकीं॥ पुराणसंख्याबाणेंएकाएकीं॥
भीमसेनविंधिला॥ ९॥ मगजितुकावीरमात्र॥ अवतारसंख्याप्रमाणटाकूनशर॥ विराटपांचाळभूभुजसर्व
त्र॥ केलेंजर्जरआचार्यें॥ १०॥ द्रोणपराक्रमदेखोन॥ डोलविनीग्रीवासुरगण॥ पृथ्वीचेनृपसंपूर्ण॥ धन्य-
धन्यद्रोणह्मणती॥ ११॥ ऐसेंदेखोनविपरीत॥ जेंविंउदयाचळींउगवेआदित्य॥ तैसाविजयरथारूढअकस्मा
त॥ सुभद्रानाथधांवला॥ १२॥ तेवेळींसायकाचाघन॥ द्रोणावरीपाडीतअर्जुन॥ बाणजाळेंकरून॥ अंबरमं
ग़ीआच्छादिला॥ १३॥ द्रोणेंतैसाचघालोनशरा॥ आच्छादिलेंतेव्हांअंबरा॥ तमदाटलाधुमधुमकार॥ को-
णीकोणादिसेना॥ १४॥ द्रोणआणिसुभद्रापती॥ एकासएकनदिसती॥ तोंमावळलागभस्ती॥ शिबिराप्र-
तिचालिले॥ १५॥ परमघोरनिशीकाळी॥ कृष्णवर्णवस्त्रनेसली॥ भगणेंअपारउगवलीं॥ नगझळकतीदा-
ईदायीं॥ १६॥ आचार्यशिबिराप्रतिजाऊन॥ बोलताझालासुयोधन॥ ह्मणेतुमचेंनेमवचन॥ धर्मजीतधरावा
॥ १७॥ श्रेष्ठींबोलिलेंजेंवचन॥ तेंदावावेंसत्यकरून॥ तरिचपुरुषार्थपरिपूर्ण॥ त्रिभुवनभरेलहें॥ १८॥ मगबो
लेभारद्वाजनंदन॥ धर्मासरक्षितोअर्जून॥ त्यासीयुद्धकंदन॥ कृतांतकरूनशकेचि॥ १९॥ वैकुंठींचावेल्हाळ
तोसारथीजाचातमालनील॥ ध्वजस्तंभींकेवळ॥ महारुद्ररक्षीतसे॥ २०॥ अर्जुनस्वयेंअमरपती॥ निर्वैरक
रावयाहेक्षिती॥ अवतरलानिश्चिती॥ कायकीर्तीसांगावी॥ २१॥ हरिहरमघवापाही॥ तिघेझालेएकेठाई॥
विजयरथनहालेकांहीं॥ गांडीवतूणीरअक्षय॥ २२॥ तरितोविजयधर्मापासुनी॥ वेगळान्यावातुह्मींफोडुनी॥
आजिएकमहारथीमारूनी॥ प्रतिज्ञापूर्णकरीनमीं॥ २३॥ तोंसुशर्मासुवर्मासुरथ॥ सुधन्वासुबाहुबळाद्भुत॥
मेळवूनअवघेत्रिगर्त॥ बोलतीशपथनेधवां॥ २४॥ समसप्तकासमेळऊन॥ उद्यांनेतोंफोडूनअर्जुन॥ रणींघे

ऊंत्याचाप्राण॥ स्रुयोधनाजाणोहें॥ २५॥ हेंजरीनकरवेंतत्वता॥ तरीपंक्तीभेदगुरुहत्या॥ तीपापेंआमुचामा-
था॥ जरीपार्थनजिंकूं॥ २६॥ रणींजिंकूंअर्जुन॥ अथवादेऊंआपुलाप्राण॥ देहांतप्रायश्चित्तघेऊन॥ होमदान-
करितीतेव्हां॥ २७॥ परमसंतोषोनदुर्योधन॥ हृदयींआलिंगीपांचजण॥ वस्त्रेंभूषणेंदेऊन॥ ह्मणेविजयध्व-
धूनसत्वरया॥ २८॥ उदयावरीरविचक्रआलें॥ सिद्धझालींदोनीदळें॥ रणतुरेंरवारखातसबळें॥ हाकानींभर-
लेंअंबर॥ २९॥ मगदुर्योधनेंकायकेलें॥ समसप्तकवेगळेनिवडिले॥ तीसलक्षवीरदिधले॥ स्रुशर्मोश्रेष्ठ-
त्यामाजी॥ ३०॥ जोबोलावीलयुद्धासी॥ निकडेचजाणेंपार्थासी॥ धनंजयायुद्धकरीआह्मासी॥ समसप्तक-
बोलिले॥ ३१॥ वृषभमाजलेबहुत॥ सिंहासीयुद्धकरूंपाहात॥ कींद्वंदशूकउन्मत्त॥ पाचारितीविनायका॥ ३२
चंद्रार्धव्यूहरचून॥ ह्मणतीकांनयेअर्जुन॥ अवघेकोलाहलकरितीमिळोन॥ शस्त्रेंउचलोनउदित॥ ३३॥ श्रीर-
गासह्मणेपार्थ॥ हाकोल्हाळकरितीत्रिगर्त॥ आजियांचाकरीनअंत॥ झालेमत्तबहुतहे॥ ३४॥ भीमासह्मणे
अर्जुन॥ नकूळसहदेवआदिकरून॥ पांचाळविराटमिळोन॥ धर्मरायारक्षावें॥ ३५॥ नलागतांएकहीक्षण॥
समसप्तकांसयेतोंमारून॥ श्रीकृष्णासह्मणेअर्जुन॥ चालवास्यंदनत्वरेंनें॥ ३६॥ धन्यधन्यपार्थवीर॥ सच्चि-
दानंदसर्वेश्वर॥ वैकुंठपतीइंदिरावर॥ सारथीझालानयाचा॥ ३७॥ सांवळेंअनुपम्यवदन॥ आकर्णविशा-
ळराजीवनयन॥ मुकुटकुंडलेंअधरपूर्ण॥ पवळवेलीसारिखे॥ ३८॥ विशाळभाळींदिव्यकेशर॥ कौस्तुभ
वैजयंतीमनोहर॥ कांसींकसिलापीतांबर॥ चरणींतोडरब्रीदावळी॥ ३९॥ चतुर्भुजश्यामसुंदर॥ ध्वजस्तंभीं
महारुद्र॥ रथीसारथीरमावर॥ केलाबुभुःकारसत्राणें॥ ४०॥ हनुमंताभोंवतींभुतेंअपार॥ तींहीहाकफोडि-
तीअनिवार॥ विष्णुवाहनपक्षांचाफडत्कार॥ तैसाध्वजतळपतसे॥ ४१॥ घडघडिलाविजयरथ॥ पवनवेगें
वारूजात॥ पांचजन्यदेवदत्त॥ रमानाथवाजवी॥ ४२॥ आलाआलारेअर्जुन॥ बुभुःकारेंगर्जेवायुनंदन॥ स

कळदळकंपायमान॥धुळीनेनभपूर्णझालें॥ ४३॥पार्थकृष्णाकडेपाहेविलोकुन॥धुळीनेंभरलेंमुकुटवदन॥सी
रसागरिंचेंनिधान॥होहोह्मणोनीवारूंथोपी॥ ४४॥गांडिवधनुष्यचढविलें॥अर्जुनेंनिर्वाणमांडिलें॥अमर्षो
दरणपडिलें॥वीरपळतीदशदिशा॥ ४५॥पळत्याससुशर्माह्मणत॥धीरधरापरतासमस्त॥दुर्योधनासीश
पथ॥केलाव्यर्थआजिकां॥ ४६॥मगसमस्तनयेक्षणीं॥विजयरथझांकिलाबाणीं॥जैसेबहूतमूरर्वमिळो
नी॥पंडितासिवादकरिती॥ ४७॥चपळेंऐसात्वरेंकरून॥रथफिरवीतभगवान॥समसप्तकांचेंभारमोडून
॥जायस्यंदनपलीकडे॥ ४८॥अलातचक्राऐसारथ॥फिरतांकोणानदिसेव्यक्त॥शस्त्रसोडितीअमित॥परी
तेनलगतीपार्थातें॥ ४९॥लक्षचुकोनीसत्वर॥आपल्याचवीरासलागतीशर॥पार्थरूपयेरायेर॥परस्परें
दिसती॥ ५०॥येकासयेकमारितीघाय॥ऐसाचजाहलासेनाक्षय॥कबंधेउठतीपाहे॥टाळीवाजवितीं
नाचती॥ ५१॥इकडेधृष्टद्युम्नद्रोण॥युद्धकरितीनिर्वाण॥परस्परेंसोडूनबाण॥घेऊंपाणइच्छिती॥ ५२॥
आचार्यपराक्रमअद्भुत॥पांडवसैन्यभंगलेंसमस्त॥तोंमहावीरसात्यकीजित॥द्रोणावरीधांवला॥ ५३॥
तेणेंसोडूनसातशर॥द्रोणाचार्यकेलाजर्जर॥उडविलेंसारथीयाचेंशिर॥ध्वजछेदूनपाडिला॥ ५४॥पर
मतसहोऊनद्रोण॥वीचारूनटाकिलाबाण॥त्याचेंकरावयानिवारण॥कृतांतशक्तनव्हेची॥ ५५॥कल्पांतीं
चपळेसमान॥अकस्मातआलाबाण॥सत्यजिताचेंशीरछेदुन॥आकाशपंथेंउडविलें॥ ५६॥विराटबं
धूशतानीक॥तोशरसोडीद्रोणसन्मुख॥जैसापर्वतगिळावयामशक॥मूखपसरूनधांवला॥ ५७॥सोडू
नएकअर्धचंद्रशर॥शतानीकाचेंउडविलेंशिर॥वसुनामद्रुपदकुमर॥तोहीधाडिलायमालया॥ ५८॥भ
याभीतयुधिष्ठिर॥सेनावितळलीसमग्र॥आचार्यस्तवनअपार॥सुयोधनकरीतेव्हां॥ ५९॥सकळपापांव
रीएकनाम॥जाळूनक्षणेंकरीभस्म॥तैसामारीतउठलाभीम॥पराक्रमनवर्णवे॥ ६०॥धर्मसहदेवनकुळा॥

उठिलेविराटपांचाळ॥ द्रौपदीचेपांचबाळ॥ शरसोडीतधांवती॥ ६१॥ घालूनियांबाणजाळ॥ आच्छादिलें-
कौरवदळ॥ गांधारधांवलेसकळ॥ एकदांचिपराक्रमें॥ ६२॥ दुर्मर्षणकुबाहुजयद्रथ॥ विंदानवीरबलाद्भुत॥
शल्यबाल्हीकगुरुसुत॥ कुयोधनदुःशासन॥ ६३॥ दुःशासनीलक्ष्मणविकर्ण॥ दुर्मुखपुरुजितकर्ण॥ वार्ध्य
क्षमीसोमदत्तमणिमंतजाण॥ अलंबुषराक्षस॥ ६४॥ इतुकेउठलेमहावीर॥ करितीपांडवचमूसंहार॥ पूर्वी
युद्धेंझालींअपार॥ हाप्रकारनाहींकोठें॥ ६५॥ पूर्वींहित्रारिशत्रुजनक॥ आणिश्रावणारीतनयदेख॥ यांचेंयुद्धव
र्णिलेंबहुतेक॥ परीहेंअद्भुतत्याहुनी॥ ६६॥ अजाभारींप्रवेशेवृक॥ तैसागजसेनेंतवृकोदरदेख॥ संहारीतअ
संख्य॥ महाउन्मत्तइभतेव्हां॥ ६७॥ निबिडजलदजाळगहन॥ क्षणांतनिवारीमृगवाहन॥ तैसाकुंजरभीम-
सेन॥ संहारूनअक्षयउभा॥ ६८॥ हेंदेखोनिकुयोधन॥ धांवलावर्षतमार्गण॥ भीमेंतूणीरसायकासन॥ र
थध्वजछेदिला॥ ६९॥ ऐसेंदेखोनसवेग॥ सूंढमेळाघेऊनिधांवेअंग॥ धर्मानुजावरीसवेग॥ बाणघनवर्षत
से॥ ७०॥ दिव्यशरसोडीवृकोदर॥ उडविलेंअंगरायाचेंशिर॥ केलायवनसंहार॥ गगनीसूरपाहाती॥ ७१॥ नो
मागधदेशीचानृपनाथ॥ नरकसूतजोभगदत्त॥ महागजारूढबलोन्मत्त॥ बाणवर्षतधांवला॥ ७२॥ सोडू-
निशशिवदनबाण॥ भीमाचास्यंदनकेलाचूर्ण॥ मगतोवृकोदरगदाघेऊन॥ नरकसुतावरीधांवे॥ ७३॥ कुलों
लचक्रापरीदेख॥ महाद्वीपफिरतोभगदत्त॥ भीमगजासिआकळित॥ वायुसुतानाटोपेतो॥ ७४॥ गदाघायें
तोडीवृकोदर॥ परिकधींनाटोपेअनिवार॥ जिकडेपळेकुंतीकुमर॥ पाठिलागनसोडी॥ ७५॥ द्रौपदीचेपंचन
दन॥ शिखंडीद्रुपदधृष्टद्युम्न॥ भगदत्तावरीबाण॥ जाळवर्षतीतेधवां॥ ७६॥ परीतोभगदत्तमहावीर॥ इत
रांचेतोडूनशर॥ आपल्यासायकींजर्जर॥ सकळवीरकेलेत्याणें॥ ७७॥ सात्यकीनेंशतबाण॥ भगदत्तावरीसो
डिलेनिर्वाण॥ परितितुकेहीछेदून॥ गजलोटिलासात्यकीवरी॥ ७८॥ गजेंधरूनिस्यंदन॥ अश्वासहितकेला

चूर्ण॥सात्यकीचपळउसळोन॥एकीकडेनिघाला॥७९॥ऐरावतारूढशक्रनंदन॥तैसाचदिसेनरकनंदन॥
वीरांसहीतगजअश्वधरून॥आपटूनटाकीतसे॥८०॥कित्येकगजींमारिलेरथी॥बहुतांचेमारिलेसारथी॥भ
गदत्तेंलाविलीख्याती॥कोणीनयेतीसमोर॥८१॥रुचिपर्वाभिताप्ती विराटपुत्र॥त्यावरीभगदत्तेंटाकूनशर॥ऊ
र्ध्वपंथेंउडविलेंशीर॥महावीरपाहाती॥८२॥गोरक्षकपिटीगोभार॥तैसेमहावीरांचेसंभार॥पळविताझा
लाकुंजर॥अनिवारसर्वांसी॥८३॥हेंधर्मराजदेखोन॥सोडीत्यावरीशतबाण॥नवदबाणींधृष्टद्युम्न॥भेदि
ताझालानयातें॥८४॥अर्धशतदिव्यशर॥सोडिताझालावृकोदर॥द्रौपदीचेपंचपुत्र॥शतशतटाकिती॥८५
इतक्यांचेंहीबाणजाळ॥भगदत्तेंतोडिलेंतात्काळ॥गजेंसंहारिलेंबहुतदळ॥झालाकोल्हाळतेधवां॥८६॥
परमआनंदलादुर्योधन॥वाद्येंवाजविती विजयवर्धन॥वारंवारकरितीगर्जन॥तेंअर्जुनऐकतसे॥८७॥घा
लूनियांब्रह्मास्त्र॥समसप्तकांचाकेलासंहार॥सुशर्मासांडूनिसमर॥पळताझालातेधवां॥८८॥कृष्णाश्री
कृष्णाह्मणेतेक्षणीं॥धन्यतूंवीरचक्रचूडामणी॥आतांचलाभगदत्तेंवाहिनी॥आटलीसर्वतिकडेआमुची॥८९
करावयाधर्मरक्षण॥वेगेंधांवलेकृष्णार्जुन॥अहोतेघोडेसुपर्णासमान॥जगन्मोहनधांवडी॥९०॥कडकडू
नचपळापात॥तैसारथासहीतकृष्णापार्थ॥भगदत्तापुढेंआलेअकस्मात॥दोनीदळेंदेखती॥९१॥कौरवदळ
भयाभीत॥ह्मणतीकरीलसैन्याचानिःपात॥तोंबाणवर्षोलागलापार्थ॥नव्हेगणीतत्याचें॥९२॥वणवाजा
ळीतृणविपिन॥तैसेंपाडीतअपारसैन्य॥तेंभगदत्तेंदेखोन॥किरीटीवरीलोटला॥९३॥कृष्णार्जुनावरीबाण
भगदत्तटाकीलक्षून॥परीरथफेरीजगन्मोहन॥एकमार्गणलागोनेदी॥९४॥अलातचक्राहुन॥चपळफेरी
स्यंदन॥दशबाणेंनरकनंदन॥भेदीततेव्हांसुरहरा॥९५॥सच्चिदानंदतनूसगुण॥भेदूनगेलेदशबाण॥प
रीरथावरीमधुसूदन॥अणुमात्रनचळेचि॥९६॥बाणसोडीश्वेतवाहन॥तोडिलेंहातींचेंशरासन॥नरक

स्फ़ुर्तें भिरकाउन॥ चौदा तोमर दीधले॥९७॥ इतुकेही छेदुनी पार्थें॥ निःफळ दवडिले गगनपंथें॥ यावरी सुभद्राकांतें॥ द्वादश बाण सोडिले॥९८॥ भगदत्ताचे हृदयी॥ बाण भेदिले तेसमयीं॥ यावरी शक्ती टाकिली लवलाहीं॥ कृष्णावरी दैत्य स्फ़ुर्तें॥९९॥ नेवरिन्चेवरी अर्जुनें॥ त्रिखंड केली त्याचि क्षणें॥ सवेंचि पार्थें वज्रबाणें॥ इभ भेदिला कुंभस्थळीं॥२००॥ भयाभीत झाला वारण॥ नाटोपेचि घेतले रान॥ जैशी दुर्बळाची स्त्री वैरिण॥ नाटोपेचि तयां जैशी॥१॥ सवेंचि पार्थें बाण सोडिले॥ गजाचे अंगींचे कवच छेदिलें॥ चारी चरण तोडिले॥ क्षण एक न लागतां॥२॥ वृक्ष पडे उमळोन॥ तैसा गज जाहला गतःप्राण॥ भगदत्त परीघ घेऊन॥ कृष्णावरी लोटला॥३॥ मग सव्यसाची काढी बाण॥ धारीं अग्निदैवत सहस्रनयन॥ सहस्रकरा तुल्य वदन॥ शरासनीं योजिला तो॥४॥ भगदत्ताचा कंठ लक्षून॥ बाण गेला न लगतां क्षण॥ ऊर्ध्वपंथें उडऊन॥ शीर नेलें क्षणमात्रें॥५॥ मुकुट कुंडलें मंडित॥ शीर पडलें कौरवदळांत॥ जयवाद्यें वाजवित॥ पांडवदळीं तेधवां॥६॥ कौरवदळीं हाहाकार॥ ह्मणती पडला महावीर॥ शकुनीचे बंधु सोडीत शर॥ किरीटीवरी धांवले॥७॥ नामें वृषकेतु आणि अचळ॥ पार्थें सांडिले शरजाळ॥ दोघांची शिरें तात्काळ॥ छेदुनी नेली ऊर्ध्वपंथें॥८॥ हाहाकार झाला ते क्षणीं॥ क्रोधें युद्धा आला शकुनी॥ कापट्यकोश पापखाणी॥ अनर्थासी मूळ जो॥९॥ कापट्यविद्या करोन तेथें॥ पार्थावरी सोडिली भुतें प्रेतें॥ घेऊनियां पार्थाचिया रथातें॥ हाक देत भीडती॥१०॥ विक्राळवदन नानावर्ण॥ देखतां अशक्ती कंपायमान॥ त्यावरी पार्थ ब्रह्मास्त्र सोडून॥ एकदांचि संहारिली॥११॥ जैसें घेतां एक नाम॥ महत्पापें होती भस्म॥ कीं काम क्रोध मोह भ्रम॥ आत्मविज्ञानें वितळती॥१२॥ आणीक अस्त्रांचे भार॥ शकुनी सोडी कापट्यसागर॥ परि तो श्रीरंगभगिनीवर॥ क्षणमात्रें निवारी॥१३॥ पार्थ ह्मणे रे शकुनी॥ दुरात्मा तूं पापखाणी॥ मजशीं संघटोनरणीं॥ जय के सा पावशी॥१४॥ आपलें तेज रवि द्योत॥ वासरमणी प्रतिदिन नित्त॥ कीं मृगेंद्रापुढें

दावीउन्मत्त॥ मार्जारिंआपलींउड्डाणें॥१५॥ पंडिनापुढेंमूढ॥ कैसाकरीत बडबड॥ कींब्रीदें बांधोन प्रचंड॥ रासभ
गायनतुंबरूपुढें॥१६॥ राजहंसासमोरजाण॥ काकदाखवीजेविउड्डाण॥ कींमूषक दगकोरून॥ भोगेंद्रावरी
चालिला॥१७॥ ऐसेबोलूनतत्काळ॥ शकुनीवरी घातलेंशरजाळ॥ पांचशनवीरप्रबळ॥ शकुनीचेमारिलेते
धवां॥१८॥ अश्वसारथीस्यंदन॥ शकुनीचाकेलाचूर्ण॥ धनुष्यकवचतूणीरतोडून॥ क्षणमात्रेंटाकिला॥१९
विपरीतसमयदेखोन॥ शकुनीपळालासोडूनरण॥ जैसाभ्रष्टलानोटाकूनिस्वजेन॥ परदेशाप्रतिजाय॥२०
कौरवसेनाझालीजर्जर॥ वाहनेंटाकूनिपळतीवीर॥ त्यासधीरदेतद्रोणपुत्र॥ बाणवर्षतधांवला॥२१॥ न-
यावरीभीमसेन॥ सोडीबाणापाठींबाण॥ नोअस्तासगेलासहस्रकिरण॥ जाताझालातेधवां॥२२॥ पांडवप्र-
नापग्रंथथोर॥ द्रोणपर्वरसअपार॥ पुढेंश्रीरंगभगिनीकुमर॥ भगेलरणींपरिसानो॥२३॥ श्रीधरवरदाब्र
ह्मानंदा॥ पांडुरंगापुंडलीकवरदा॥ पांडवरक्षकागोविंदा॥ पार्थसारथीझालासतूं॥२४॥ सुरसंपांडव-
प्रतापग्रंथ॥ द्रोणपर्वव्यासभारन॥ त्यांतीलसारांशयथार्थ॥ न्यूनेंचाधिकसाव्यांनकेंथियेला॥२२५॥ इ
तिपांडवप्रतापचतुश्चत्वारिंशोऽध्यायः

श्रीगणेशायनमः॥ ॥जोसच्चिदानंदकमलापती॥तोजाहलापार्थाचासारथी॥जोनिजभक्तांचेमनोरथीं॥
बैसोनसूत्रहालवी॥१॥मारोनियांभगदत्त॥विजयविजयीझालाअद्भुत॥यावरीसमसप्तकांकडेरथ॥चा
लविलात्वरेनें॥२॥मिळालेत्रिगर्तसमसप्तक॥सुशर्मात्यांतश्रेष्ठमुख्य॥वेगळेंबंडयुद्धदेख॥अनर्थकार
कवोढवलें॥३॥युद्धासगोंविलाअर्जुन॥इकडेकायजाहालेंवर्तमान॥चक्रव्यूहगुरुद्रोण॥रचिताजाहला॰
अद्भुत॥४॥सुपर्णव्यूहपांडवरचित॥धर्मासअवघेरक्षित॥युद्धमांडलेंअद्भुत॥द्रोणआणिभीमासि॥५॥
नकुळसहदेवपांचाळ॥अवघेयुद्धकरितीतुंबळ॥परिचक्रव्यूहभेदावयाबळ॥कोणासहीदिसेना॥६॥ध
र्मह्मणेअसतापार्थ॥तरिहाव्यूहभेदितानिश्चित॥तोंपुढेंयेऊनसुभद्रासुत॥अभिमन्यूविनवीतसे॥७॥ताता॰
मजआज्ञाद्यालजरी॥तरिहाव्यूहभेदीननिर्धारीं॥धर्मह्मणेतेअवसरीं॥तूंबाळकसकुमार॥८॥मगबोले
पार्थनंदन॥आह्मांक्षत्रियांचेंरणतेंधन॥तातातुमचेदयेकरून॥व्यूहफोडूनजाईनमी॥९॥परमसुंदरसुभ
द्रासुत॥रूपासितुळणाउणामन्मथ॥दुसराकृष्णाचिमूर्तिमंत॥विराटजोमाततोहोय॥१०॥घनःश्यामवर्ण
राजीवनयन॥अजानबाहूसुहास्यवदन॥जोपांडवांसप्राणाहून॥आवडतापांचासही॥११॥ऐसातोउत्त
रावर॥रथावरीचढलासत्वर॥उदयाद्रीवरीदिनकर॥तैसासुंदरदिसतसे॥१२॥केलाधर्मासनमस्कार
॥युद्धानिघालापार्थकुमर॥तोंशतएकराजपुत्र॥व्यूहपूर्णरक्षिती॥१३॥व्यूहभेदीतजायसौभद्र॥दाहा
सहस्रमारिलेकुंजर॥एकअयुतमहावीर॥अश्वासहीतपाडिले॥१४॥येतअयुतमहारथी॥तत्काळपा
डीउत्तरापती॥जेथेंशंभरराजपुत्ररक्षिती॥त्यास्थळासिपातला॥१५॥दळासमवेतराजकुमर॥एकल्या
वरीसोडितीशर॥परितोआनकदुंदुभीकन्याकुमर॥तितुकेतोडीक्षणमात्रें॥१६॥तितुक्यांचेंबाणजाळ॥
एकशरेंछेदीसुभद्राबाळ॥जैसेंउगवतांसूर्यमंडळ॥भगणेंसर्वलोपती॥१७॥एकउठतांविनायक॥अ॰

संख्यसंहारीद्वंद्वशक्र॥ कींस्फुटतांचंडवातदेख॥ जलदजाळवितुळे॥ १८॥ कींविष्णुनामेंकरून॥ असंख्यदु-
रितेंजातीजळोन॥ कींचेततांकृशान॥ असंख्यवनेदग्धहोती॥ १९॥ कींमूढांचेंवाग्जाळसमस्त॥ एकाचशब्दें
खंडीपंडित॥ एकसिंहगजबहुत॥ पडतीगतप्राणहोउनी॥ २०॥ हृदयींप्रगटतांबोध॥ सहपरिवारेंपळतीकाम
क्रोध॥ कींप्रत्ययायेतांब्रह्मानंद॥ क्षुद्रानंदविरती॥ २१॥ तैसाएकलानिधनंजयकुमर॥ परिसैन्यकेलेंअ-
वघेंजर्जर॥ कोणीउचलितांचकर॥ शस्त्रासहितभुजाछेदी॥ २२॥ दुर्योधनपुत्रलक्ष्मण॥ त्यासींयुद्धकेलेंनि
र्वाण॥ घेतलातत्काळत्याचाप्राण॥ शिरउडऊनपाडिलें॥ २३॥ पृथक्पृथक्युद्धकेलें॥ शतहीराजपुत्रपाडिले
अष्टकौरवमारिले॥ सुयोधनाचेबंधूपैं॥ २४॥ बाणसोडीनधांवलाकर्ण॥ दोंबाणींभेदिलेत्याचेकर्ण॥ अंगटा
कूनभानुनंदन॥ पळताझालाएकीकडे॥ २५॥ दशबाणींसुयोधनखिळिला॥ द्रोणपंचबाणींविंधिला॥ ज
यद्रथपळविला॥ एकाचबाणेंकरूनी॥ २६॥ अश्वत्थामाकृपाचार्य॥ हेहीपळतीगतवीर्य॥ देखोनअभिमन्यू
चेंशौर्य॥ द्रोणमस्तकडोलवी॥ २७॥ पूर्णहोयप्रतिअर्जुन॥ ऐसेंबोलेगुरुद्रोण॥ क्रोधेंसंतप्तदुर्योधन॥ आचा
र्याप्रतिबोलत॥ २८॥ जैसामदेंमातलाशूर॥ जिव्हेनेंचोखितांछेदीजिव्हार॥ तैसातूंआम्हुचाहितकर॥ पाहा
सीक्षुद्रसर्वदां॥ २९॥ माझाप्रियपुत्रलक्ष्मण॥ येणेंमारिलानलगतांक्षण॥ अजुनीकायपाहातांनिर्वाण॥ घ्या
वाप्राणयाचाआजी॥ ३०॥ विहूमाजीसांपडलापार्थकुमर॥ साहाजणमहावीर॥ सोडितेझालेनिर्वाणशर॥
एकलियाबाळावरी॥ ३१॥ सकुमारतोसौभद्र॥ एकल्याहाणितीमहावीर॥ चहूंकडेपाहेसुंदर॥ आपुलें-
कोणीदिसेना॥ ३२॥ असतापिताअर्जुन॥ तरिसाह्यकरितायेथेंपूर्ण॥ जयद्रथविहुद्वारधरून॥ शिववरदेंना
टोपे॥ ३३॥ आक्रांतभोंवेपांडवदळीं॥ जवळीनाहींपार्थवनमाळी॥ विहूफोडीऐसाबळी॥ कोणीनाहींपांडवां
त॥ ३४॥ युद्धकरितांअभिमन्य॥ कर्णेंसोडिलेनिर्वाणबाण॥ हातींचेंधनुष्यतोडून॥ बाणभाताछेदिला॥ ३५

सारथीघोडेतेवेळे॥ द्रोणाचार्येंमारिले॥ मगअभिमन्येंशस्त्रघेतलें॥ रथावरूनउतरला॥ ३६॥ जैशीवीज
लवूनजाये॥ तैसाअभिमन्यतळपताहे॥ तोंदुर्योधनेंलवलाहे॥ खड्ग छेदिलेंहातींचें॥ ३७॥ मगगदाघेऊनपा
र्थसुत॥ अमितवीरांनेंपाडित॥ तोंदुःशासनेंत्वरित॥ गदाछेदिलीहातींची॥ ३८॥ मगघेतलेंरथचक्र॥ तळ
पतसेसुभद्राकुमर॥ जैसाकृष्णचक्रधर॥ तैसावीरदिसतसे॥ ३९॥ कर्णद्रोणदुर्योधन॥ सोडितीबाणापा
ठीबाण॥ हातींचें रथचक्रजाण॥ अश्वत्थाम्यानेंछेदिलें॥ ४०॥ तोंदुःशासनपुत्रदुःशासनीं॥ वेगेंआलाग-
दाघेउनीं॥ अभिमन्येंतयेक्षणीं॥ गदाघेतलीदूसरी॥ ४१॥ दोघींगदायुद्धमांडिलें॥ सकळींबाणजाळघातलें
॥ दुःशासनीसकेलें॥ अभिमन्येंमूर्छित॥ ४२॥ सवेंचदुःशासनसुतें॥ हाणितलेंअभिमन्यातें॥ दोघेपावले
मूर्छेतें॥ गदाघातेंएकमेकां॥ ४३॥ मूर्छासांवरोनदुःशासनी॥ वेगेंआलागदाघेउनी॥ विकळसौभद्रपड-
लारणीं॥ त्याचेमस्तकींघातली॥ ४४॥ तेणेंचूर्णझालेंशीर॥ पडिलापडिलापार्थकुमर॥ तोंआश्रणीवदेउत्त-
र॥ धर्मयुद्धनव्हेहें॥ ४५॥ सकळदळभारएकवटला॥ भोंवतापाहावयापाळापडला॥ त्यांतजयद्रथेंहाणीत
ला॥ अभिमन्यूलातेनें॥ ४६॥ द्रोणेंधिःकारिलेंजयद्रथा॥ दुर्जनावीरासहाणिसीलाता॥ त्याअभिमन्येंबाणसोडि
तां॥ पळालासित्वरेनें॥ ४७॥ कौरवगेलेसमस्त॥ अभिमन्यूयायेंविलपत॥ श्रीहरीचेंनामस्मरत॥ वाटपाहा
तपार्थाची॥ ४८॥ पांडवदळींआकांतदारुण॥ धर्मराजकरीरुदन॥ आतांयेईलअर्जुन॥ त्यासवदनकायदा
खवूं॥ ४९॥ दिवसगेलाअस्तमानासी॥ वधोनयेतांसमसप्तकासी॥ अपशकुनपार्थासी॥ मार्गींयेतांबहूहो
ती॥ ५०॥ धर्माजवळीआलाअर्जुन॥ अवघेबैसलेअधोवदन॥ पार्थपुसेकोठेंअभिमन्य॥ कांउत्साहमंदिरीं
नदिसे॥ ५१॥ धर्मबैसलाअधोवदन॥ कांमौनधरिलेंभीमसेन॥ ह्मणतीसंसारमायात्यागून॥ अभिमन्यूगेला
स्वर्गातें॥ ५२॥ रथाखालींपडलाअर्जुन॥ पुत्रशोकेंकरीरुदन॥ मगश्रीकृष्णेंसांवरून॥ सावधकेलेंपार्थातें॥

॥५३॥ अर्जुनअवध्यांसधिः कारित॥ जळोजळोतुमचापुरुषार्थ॥ इतुकेअसतांमाझासुत॥ कांपाठविलासंग्रामा॥५४
धर्मभीममाद्रीसुत॥ धिक्जळोतुमचापुरुषार्थ॥ हेविराटपांचाळभूभुजसमस्त॥ धिक्जीतहिंडतां॥५५॥ उपल
व्यनगरींतुनी॥ उत्तरासुभद्राद्रौपदीधांवोनी॥ येत्याजाहल्यातेचक्षणीं॥ हृदयपिटितीअतिदुःखें॥५६॥ सुभद्रे
नेंआपुलेंशरीर॥ पृथ्वीवरीटाकिलेंनधरवेधीर॥ माझाअभिमन्यूसकुमार॥ दाखवाएकदांपाहीनमी॥५७॥ हेअ
भिमन्याकमळलोचना॥ हेसौभद्राचंद्रवदना॥ हेकोमळांगमृदुभाषणा॥ येवोनियांमजभेटें॥५८॥ हेबाळाघनः
श्यामवर्णा॥ हेअभिमन्यूप्रतिअर्जुना॥ महावीरासुहास्यवदना॥ येथांवोनमजभेटें॥५९॥ हेमातुळलक्षणाआ
कर्णनेत्रा॥ हेअजानबाहोकोमलगात्रा॥ हेयादवपांडवप्रियकरा॥ वीरउदाराधांवेंकां॥६०॥ द्रौपदीह्मणेअभि
मन्या॥ हेवत्सासद्गुणनिधाना॥ तरुणतुझीअंगना॥ उतराआतांकरीलकाय॥६१॥ हेकिशोरापरमउदारा॥ स
मरधीराप्रतापशूरा॥ पांडवकुळदीपासुंदरा॥ केलीत्वरासर्वांआधी॥६२॥ उत्तरेचागळांमिठीघालित॥ सुभद्रा
द्रौपदीशोककरित॥ तेंदेखोनपार्थरमाकांत॥ शोकार्णवींबुडाले॥६३॥ संसारमायापरमदुस्तर॥ जोजगद्गुरूज
गदोद्धार॥ त्यासहीदाटलागहिंवर॥ सुभद्रादेवींदेखोनी॥६४॥ पूर्णब्रह्मसनातन॥ मायातीतशुद्धचैतन्य॥
परिसमयाचाअभिप्रायपूर्ण॥ नारायणदावित॥६५॥ बोलेसुभद्रावेल्हाळ॥ सांपडलाव्यूहामाजीबाळ॥ इतुके
वीरअसतांसबळ॥ पाठीकोणीनराखेची॥६६॥ विकळपडतांमाझाकिशोर॥ जयद्रथेंदिल्हालत्ताप्रहार॥ धि
क्गांडीवधिक्तूणीर॥ धिग्यदुवीरपार्थपैं॥६७॥ याहीवेगळाअपरमित॥ धर्माचेशोकासनाहींअंत॥ तोंव्या
सआणिब्रह्मसुत॥ नारदस्वामीप्रकटला॥६८॥ सर्वांचेंहीसमाधान॥ करीतसत्यवतीहृदयरत्न॥ ह्मणेसुभद्रे
तूंसुजाण॥ भगिनीहोशीहरीची॥६९॥ वीरपत्नीवीरजननी॥ वीरकुमरीयदुवीरभगिनी॥ अभिमन्यूपडला
समरंगणीं॥ शोकनकरीतयाचा॥७०॥ व्रतेंतीर्थेंकरिती॥ योगयागदानेंदेती॥ त्याहूनिवीराउत्तमगती॥ वेदीं

शास्त्रीं बोलिलीसे॥ ७१॥ विधियुक्त कोटी गोदान। पर्वतातुल्य दिल्हें सुवर्ण॥ समरीं वीर अर्पितां प्राण॥ गती त्या-
हूनत याची॥ ७२॥ प्रयागीं आजन्म स्नान॥ करिती कुंभिनी प्रदक्षिणा॥ समरीं वीर त्यजितां प्राण। गती त्याहूनत
याची॥ ७३॥ ऐका धर्म भीमार्जुना॥ शोक करितां कोण्या कारणा॥ हे अवघी ब्रह्मांड रचना॥ लया जाईल कल्पांतीं।
॥ ७४॥ आकारा आले जे पदार्थ॥ नितुके मायामय नाशिवंत॥ मिथ्या मायास्वभवत। दीर्घदृष्टी विचारा॥ ७५
शुक्तिके वरी दिसे रजत॥ स्थाणू असतां तस्कर दिसत॥ दोर असतां भुजंग भासत॥ मिथ्याभूत सर्व ही॥ ७६॥
बहुतीं भोगिली हे जगती॥ नितुके हि गेले मृत्यु पंथीं॥ आतां आहेत पुढें होती॥ सर्व ही जाती चुकेना॥ ७७॥ गृह
धन सुत वल्लभा॥ दास दासी स्वजन प्रभा॥ भास्कराची जळांत शोभा॥ मिथ्यामय लटकीच॥ ७८॥ संसार हा दी
र्घ स्वप्न॥ व्यर्थ मी माझें ह्मणोन॥ सावध व्हाउ घडा नयन॥ निज मानसीं विचारा॥ ७९॥ असो व्यासें सांगून बहु
त कथा॥ सावधान केले कुंतीसुतां॥ नारद आणि श्रीशुकपिता॥ अंतरधान पावले॥ ८०॥ मग सुभद्रेस ह्मणे पा
र्थ॥ उद्यां च वधीन जयद्रथ॥ कौरव दळ समस्त॥ तृणवत सर्व जाळीन॥ ८१॥ हें जरी न व्हे माझेनी॥ तरि व्यर्थ प्र
सवली पृथा जननी॥ डाग लागला कुरुवंशा लागोनी॥ कृष्णदास्यत्व वृथा गेलें॥ ८२॥ कोठें पडला रणीं बाळ
तो पाहावया रणीं बाळ॥ तो पाहावया पार्थ घननीळ॥ निघते जाहाले तत्काळ॥ निशीमाजी तेधवां॥ ८३॥ रथ
वेगें चालविला॥ चंद्रज्योती चा प्रकाश पडला॥ रणशोधूं निघाला॥ पार्थवीर तेधवां॥ ८४॥ अभिमन्येंरण-
पाडिलें देखोन॥ आश्चर्य करिती कृष्णार्जुन॥ बहुत केलें रणशोधन॥ परि बाळ कोठें न सांपडे॥ ८५॥ नोंमं
जूळ हरीनें स्मरण॥ ऐकता जाहाला अर्जुन॥ हे जगन्निवास मनमोहन॥ मधुसूदना श्रीहरि॥ ८६॥ कृष्णा
गोविंदा नारायणा॥ अच्युतानंता जगजीवना॥ रमारमणा आनंदघना॥ जनार्दना सर्वेशा॥ ८७॥ क्षीरसा-
गरविहारा॥ शेषशायी विश्वंभरा॥ भक्तविसाविया श्रीधरा॥ करुणाकरा धांवें कां॥ ८८॥ ऐसे अभिमन्यू-

चेशब्दकोमळ॥ अर्जुनें वोळखिलेतत्काळ॥ रथारूढ पार्थघननीळ॥ आलेजवळी धांवोनी॥ ८९॥ अभि
मन्येंनेत्रउघडिले॥ पार्थें आंग धरणीस घातलें॥ अभिमन्यूस पोटासीं धरिलें॥ पार्थें मांडिलें शोकातें॥ ९०
अरे माझिया सकुमारा॥ बाळा अभिमन्या सुंदरा॥ मजवांचून राजकुमरा॥ कां आलासि रणभूमी॥ ९१॥ अ
भिमन्यूस्मरतनामावळी॥ जवळी आला कृष्णवनमाळी॥ उकसाबुकसी तेवेळीं॥ पार्थवीर स्फुंदत॥ ९२
पार्थाचिया कानीं॥ हळूच अभिमन्यू बोलेवाणी॥ मीं पडिलों घोररणीं॥ याचा खेद मज नाहीं॥ ९३॥ मींनि
चेष्टीत पडिलों येथें॥ मजलत्ताप्रहार केला जयद्रथें॥ तेणें सर्वांगतिडकतें॥ माझें कांहीं न चालेचि॥ ९४॥
यारे सकुमारा परियेसीं॥ उद्यां न जरी मारीं जयद्रथासि॥ तरि अग्निकाष्ठें भक्षीन निश्चयेंसी॥ तुझीच आ
ण अभिमन्या॥ ९५॥ त्याहाळीत श्रीकृष्णवदन॥ मुखें करीत हरिस्मरण॥ अभिमन्यें सोडिला प्राण॥ कृष्ण
आपण पाहातसे॥ ९६॥ अंतरीं हरीचें ध्यान॥ वदनीं करीत नामस्मरण॥ हरीपद अभिमन्य॥ पावला पूर्ण
निर्धारें॥ ९७॥ असो श्रीकृष्णें पार्थ संबोखिला॥ रथीं बैसऊन शिबिरास नेला॥ निद्रान येअवघ्या दळाला॥
चिंताग्नींत पाडियेलें॥ ९८॥ पार्थें प्रतिज्ञा केली दुर्धर॥ सिद्धी पाववील यादवेंद्र॥ आपुले शिबिराप्रति श्रीधर
॥ जाताजाहाला तेधवां॥ ९९॥ पार्थप्रतिज्ञा चित्तीं देखा॥ निद्रा न ये विश्वव्यापका॥ तो श्रीकृष्ण परमसखा॥ दा
रुकाप्रति बोलत॥ १००॥ उदयीक निर्वाणपण॥ कैसा सिद्धीस नेईल अर्जुन॥ धनंजय माझा प्राण॥ मजत्या
वीण नगमेचि॥ १॥ दारुका ऐकएक वचन॥ उद्यां सिद्ध करीं माझा स्यंदन॥ घोडे चार जुंपून॥ शैल्य सुग्रीव वा
दिशृंगारीं॥ २॥ सतेज आयुधें परम॥ शंखचक्रगदापद्म॥ वरी ठेऊनि उत्तमोत्तम॥ सिद्ध स्यंदन असों दे॥ ३॥
पार्थास जालिया विपरीत॥ तूं जमीं दावीन संकेत॥ मनोवेगें आणीं रथ॥ बैसावया सिमज तेव्हां॥ ४॥ सोडो
नियां सुदर्शन॥ संहारीन कौरव दुर्जन॥ ऐसें सांगोन जगन्मोहन॥ पार्थाजवळी पातला॥ ५॥ केशवासि

ह्मणेपार्थ॥म्यांजीकेलीदृढशपथ॥तीतूंजवीणसमर्थ॥सिद्धीकोणपाववविना॥ ६॥भक्तकैवारियामाधवा॥पण
आतांसिद्धीसन्यावा॥दीनबंधूकरुणार्णवा॥ब्रीदआपुलेंसांभाळीं॥ ७॥द्विजेंद्रवदनाक्षीराब्धिनिकेतना॥ग
रुडध्वजादुर्जनवनदहना॥वाढविलेंत्वांआह्मांजगजीवना॥मधुसूदनालाजरारवें॥ ८॥अद्यापीकाष्ठनबुड
वीजीवन॥आपणवाढविलेंहाअभिमान॥पांडवपाळकहेंब्रीदसंपूर्ण॥ब्रह्मांडामाजीगाजत॥ ९॥काष्ठेंकोरीत
भ्रमर॥परिकमळनफोडीअणुमात्र॥आह्मांरक्षितासुरहर॥त्याचपरीसर्वस्वेंतूं॥ १०॥मागीलउपकारआठविता
॥पृथ्वीनपुरेयशलिहितां॥विश्वव्यापकाअच्युता॥ऋणाईतआसुचातूं॥ ११॥यावरीउठोनप्रातःकाळीं॥स्ना॰
नादिसत्कर्मेंसारिलीं॥दोनीदळेंसिद्धझालीं॥याईलागलीवाद्यांची॥ १२॥धर्मेंयेऊनत्वरितगती॥मन्मथतातस्त
विलाप्रीती॥अर्जुनासधरोनहातीं॥श्रीकृष्णाकरींदीधला॥ १३॥जयद्रथेंवेदबुडविलाकौरवसागरीं॥तोकाढीं
मत्स्यरूपियाश्रीहरी॥शंखासूरपूतनारी॥जयद्रथवधींकां॥ १४॥पांडवलज्जाकुंभिनी॥बुडत्येसांवरीं पृथ्वीदे॰
उनी॥कूर्मदृष्टीकरूनी॥विलोकींआजबाळकांतें॥ १५॥असोदशावतारलीला॥येथेंदारवीघननीळा॥ज॰
नकजननीगोपाळा॥तूंचआमुचींसर्वस्वें॥ १६॥धर्मेंहृदयींधरिलाअर्जुन॥ह्मणेलवकरयेईंविजयीहोऊन॥
कृष्णार्जुनधर्मासिनमून॥रथावरीबैसले॥ १७॥तेवेळेपार्थक्रोधाग्नी॥नसायेचब्रह्मांडभुवनीं॥जेसाउन्मि
ळानाथपडतांरणीं॥भूमिजावरसंतापला॥ १८॥अर्जुनेंकेलीदृढशपथ॥जयद्रथमनींभयाभीत॥दुर्योधना॰
सनिरोपमागत॥मींकरितोंदेशत्यागा॥ १९॥द्रोणह्मणेव्यूहकरून॥तूजआह्मीरक्षितोंपूर्ण॥मगसाहागांवें
लंबायमान॥शकटव्यूहरचियेला॥ २०॥शकटव्यूहाचेंमध्यकमळ॥त्यामाजीजेंकेशरस्थळ॥भ्रमरप्रायज
यद्रथकेवळ॥संकोचूनबैसला॥ २१॥इकडेरणमाजलेंअपार॥पुढेंआलापार्थवीर॥लागलावाद्यांचागजर॥
भूगोळतेणेंकांपतसे॥ २२॥ध्वजींजनकजाशोकहरण॥सत्राणेंकेलेंघोरगर्जन॥आरोळ्यापिटितीदारुण॥

भोंवनीं भूतें नेधवां ॥ २३ ॥ पांचजन्य देवदत्त ॥ उभय कृष्णा वाजविन ॥ घडघडिला विजयरथ ॥ दोनी दळें विलोकिती ॥ २४ ॥ अर्जुनास ह्मणे मनमोहन ॥ तूं आधीं सोडीं सवेग बाण ॥ मग मी धांवडितों स्यंदन ॥ पुढें कोण जाय पाहूं ॥ ॥ १२५ ॥ धनंजयें सोडिला शर ॥ रथ धांवडी यादवेंद्र ॥ बाण टाकून रहंवर ॥ गेला पुढें चपळत्वें ॥ २६ ॥ कौरव भार फोडून रथ ॥ मनोवेगें माघारा येत ॥ तों रथा पुढें अकस्मात ॥ बाण येऊन पडियेला ॥ २७ ॥ पार्थें ओळखिला आपला बाण ॥ ह्मणे हे जगन्निवास भक्तरक्षण ॥ अश्वा माजी वेग पूर्ण ॥ ऐसा कैंचा परमात्मया ॥ २८ ॥ त्या तुरंगांचा अंतरात्मा ॥ तूं जाहाला समेघःश्यामा ॥ भक्तकामकल्पद्रुमा ॥ तुझा महिमा कोण जाणें ॥ २९ ॥ पार्थास ह्मणे इंदिरावर ॥ आज ऐसाच चालवीन रहंवर ॥ छेदीं तूं जयद्रथाचें शिर ॥ विजयध्वज उभारीं ॥ ३० ॥ द्रौपदी सुभद्रा उत्तरा ॥ यांस सुख देई माहावीरा ॥ निर्दोष यशा चातुरा ॥ रखोवीं मुकुटीं आजि पां ॥ ३१ ॥ व्यूह पाहे अर्जुन ॥ द्वारीं उभा असे गुरु द्रोण ॥ पार्थें टाकिला दंडवत बाण ॥ सव्य घालून चालिला ॥ ३२ ॥ महांवीरांस ऐसें वाटत ॥ पार्थ न व्हे हा आला कृतांत ॥ एक ह्मणती मांडला अंत ॥ सेना तत्वता उरेना ॥ ३३ ॥ तों पुढें धांवला दुःशासन ॥ वर्षता झाला अमित बाण ॥ गजभार चालती दारूण ॥ महागिरिवर ज्यापरी ॥ ३४ ॥ सव्यसाची नामाभिधान ॥ दोहीं हातांचें समसंधान ॥ अलातचक्रवत सायकासन ॥ वोढितें वेळीं दिसतसे ॥ ३५ ॥ विद्युल्लते ऐसे शर ॥ आंगीं रूपती अपार ॥ केला दुःशासन जर्जर ॥ पळे सत्वर एकीकडे ॥ ३६ ॥ एक एक शर दारूण ॥ घेत पांच सातांचा प्राण ॥ गजकलेवरें फोडून ॥ पर्वतप्राय पाडिली ॥ ३७ ॥ तों तेथें वर्षत शर ॥ आचार्य आला समोर ॥ नमून बोले महावीर ॥ मी तुझा पुत्र गुरुवर्या ॥ ३८ ॥ मज आशीर्वाद देईं ये अवसरीं ॥ प्रतिज्ञा माझी करीं खरी ॥ युद्धलाघव क्षणभरीं ॥ द्रोणासत तेथें दाखविलें ॥ ३९ ॥ द्रोणास ह्मणे पार्थवीर ॥ आह्मा तुह्मां नाहीं वैर ॥ मग प्रदक्षिणा करून सत्वर ॥ करीत संहार चालिला ॥ ४० ॥ देशोदेशींचे नृपवर ॥ एकदांच धांवती समग्र ॥ सो-

डितीबाणांचेपूर॥एकलियाअर्जुनावरी॥४१॥सर्वांचेहीशरतोडून॥शरीं रिचिलेरावसंपूर्ण॥जेसामेघमं
डपदेखोन॥पिच्छेंशिखीपसरती॥४२॥कृतवर्माधांवलासमोर॥सोडीतशरापाठीशर॥चतुराचेमुखांतू
नसत्वर॥शब्दजेसेनीघती॥४३॥कृतवर्म्यांचेंहृदयलक्षोन॥पार्थेंसोडिलेपांचबाण॥कींपंचसौदामिनी
येऊन॥हृदयामाजीसंचरल्या॥४४॥तेव्हांकृतवर्मामूर्छायेऊन॥ध्वजस्तंभींदेकलाजाण॥सूतेंकाढूनि
यांस्यंदन॥नेलातेव्हांएकीकडे॥४५॥पार्थाचीपाठिराखेवतिघेजण॥आलेदळासहधांवोन॥सात्यकीआणि
युधामन्य॥उत्तमौजतीसरा॥४६॥रणींरक्षतीजेपाठी॥तेचमित्रधन्यसृष्टी॥त्यासदेखोनिजगजेठी॥हृद
यामाजीतोषला॥४७॥श्रुतायुधवरुणपुत्र॥कौरवांचापरममित्र॥तोरथारूढसत्वर॥बाणसोडीतधांव
ला॥४८॥त्यासप्रसन्नहोऊनवरूण॥शस्त्रेंअस्त्रेंदिधलींसंपूर्ण॥एकगदादेऊननिर्वाण॥पुत्राप्रतिबोलि
ला॥४९॥शस्त्रधरपरमयोद्धा॥त्याचवरीसोडींहेगदा॥निःशस्त्रियावरकंदा॥सर्वथाहीसोडूनये॥५०॥
यद्यपीसोडिशीलजाण॥तरिपरतोनघेईलतुझाप्राण॥तोंश्रुतायुधबाणेंकरून॥समरीं रिचिलाधनं॰
जयें॥५१॥पार्थाचेरथींवैकुंठपती॥रथचालवीतपवनगती॥श्रुतायुधकोपोनिचित्तीं॥गदाप्रेरिलीहरी
वरि॥५२॥विजेऐशीगदाआली॥जनार्दनाचेंहृदयींआदळली॥सच्चिदानंदमूर्तीसांवळी॥नाहींढळली
रथावरूनी॥५३॥तेवरुणगदापरमदारुण॥मेरुमांदारकरीलचूर्ण॥तोषड्विकाररहितभगवान॥तेणें
चसमरींसोशिलीते॥५४॥परिनिःशस्त्रींकंसांतकजाण॥गदाफिरलीमनोवेगेंकरून॥श्रुतायुधाचेंहृद
यींभरोन॥घेतलाप्राणतयाचा॥५५॥उभयदळीं आश्चिर्यजाहालें॥ह्मणतीहेंअद्भुतवर्तलें॥आपलेआ॰
पणशस्त्रपरतलें॥कोणीहातींनधरितां॥५६॥कांभोजपुत्रसुदक्षिण॥श्रुतायुअच्युतायुतिघेजण॥अपा
रसैन्यभारघेऊन॥विजयावरीधांवले॥५७॥तितक्यांचीहीशिरें॥पार्थेंछेदिलींक्षणमात्रें॥तेंदेखोनप्र॰

ज्ञानचक्षूचेज्येष्ठपुत्रें॥ द्रोणाप्रतिबोलतसे॥५८॥ आजिरक्षाजयद्रथ॥ वासरमणीपावतांअस्त॥ अग्निकाष्ठें
भक्षीलपार्थ॥ टळेलअनर्थनितकेनी॥५९॥ द्रोणह्मणेव्यूहद्वार॥ मीरक्षितोंदृढसाचार॥ तुह्मींमिळूनसम
स्तवीर॥ जयद्रथरक्षावा॥६०॥ येरीकडेविंदअनुविंद दोघेजण॥ अवंतीदेशींचेराजेदारुण॥ धनंजयेंसोडूनबा
ण॥ शिरेंत्यांचींछेदिलीं॥६१॥ शिवदत्तकवचअभेद्यजाणा॥ द्रोणेंलेवविलेंदुर्योधना॥ ज्यावरीशस्त्ररूपेंना॥ कोणाचेंहीकल्पांतीं॥६२॥ त्याकवचबळेंकरून॥ युद्धकरीदुर्योधन॥ पार्थेंटाकिलेनिर्वाणबाण॥ परीकवच-
नभेदे॥६३॥ मधुसुरनरविनाशकपूर्ण॥ युक्तीसांगेपार्थालागुन॥ हस्तआणिचरण॥ उघडेबाणेंखिळींते॥६४॥
मगचरणआणिमणगटेंदोनी॥ पार्थेंफोडिलींतीक्ष्णबाणीं॥ त्याचभयेंकरूनी॥ दुर्योधनपळाला॥६५॥ इकडे
धर्मभीमसहदेवनकुळ॥ पांचाळीचेपांचहीबाळ॥ द्रोणावरीबाणजाळ॥ घालितेझालेंतेधवां॥६६॥ सोडू
नसात्यकीनेंशर॥ मारिलाव्याघ्रदंतमहावीर॥ अलंबुशनामाअसुर॥ घटोत्कचेंसंहारिला॥६७॥ रुक्मि-
णीहृदयींचेरत्न॥ तोधर्मासरक्षीप्रद्युम्न॥ जरासंधगजारूढहोऊन॥ सात्यकीसीयुद्ध करी॥६८॥ परमलाघ
वीसात्यकीवीर॥ परिजळासंदेंआटिलेंदळअपार॥ मगसोडूननिर्वाणशर॥ छेदिलेंशिरजळासंदाचें॥-
॥६९॥ तयाचेकैवारेंभूरिश्रवा॥ सात्यकीवरीधांवलाजेव्हां॥ कर्णआणिभीमतेव्हां॥ शिमेरहितभांडती॥७०
भूरिश्रव्याचेंसिरतेथें॥ सात्यकीनेंउडविलेंपुरुषार्थें॥ चिंतासागरींअंधसुतें॥ पेणेकेलेंतेधवां॥७१॥ पार्थें
वीरसंहारिलेअपार॥ वेगकरींह्मणेसर्वेश्वर॥ दिवसआलादोनप्रहर॥ तृषाक्रांतवारूजाहाले॥७२॥ धनं
जयजाहालातृषाक्रांत॥ अश्वहीविकळझालेबहुत॥ कौरवदेखोनह्मणत॥ इतक्यांतपार्थजिंकावा॥७३
अर्जुनेंबाणधाडोनिपाताळा॥ काढिलेंभोगावतीच्याजळा॥ अक्षोभसरोवरभरला॥ भोंवतेवृक्षविराजती
॥७४॥ विशाळसरोवरशीतळजळ॥ तीरींविराजतीमराळ॥ सुवर्णकमळेंअळिकुळ॥ रुंजीवरीघालिती॥

॥१७५॥ कौरवदळविस्मितपाहातां॥ ह्मणती धन्य धन्य वीर पार्था॥ अर्जुन उदक सेवित॥ घोडे सोडीत श्रीकृष्ण॥७६॥
वारुवांचे वागदोरें॥ हातीं धरिले रमावरें॥ सच्चिदानंद सर्वेश्वरें॥ चाबुक माथां रवोंविला॥७७॥ वारुवांचे मुखींची
लाळ॥ स्वकरें धूत तमाळनीळ॥ आंगींचे बाण उपटून सकळ॥ हस्त फिरवी परमात्मा॥७८॥ तो हस्त फिरवावया मा
थां॥ इच्छिती शिव पुरंदर विधाता॥ तो हस्त यांस लागतां॥ क्षतें सर्व बुजालीं॥७९॥ अश्वाचे आंगींचा कंडू सकळ॥
नरवें करून निववी गोपाळ॥ अंजुळी भरून सलील वेळोवेळां वरी घाली॥८०॥ तुरंग होतां चंचळ॥ होहो ह्मणे वैकुं
ठपाळ॥ त्रिभुवन विस्मित सकळ॥ पांडवभाग्य वर्णिती॥८१॥ इतक्यांत कौरव बाणजाळ॥ विजयावरी घालिती
सकळ॥ पार्थास ह्मणे घननीळ॥ बाणजाळ छेदीं हें॥८२॥ रथाखालीं उभा अर्जुन॥ गांडीव चाप चढवून॥ अपा
र सोडून मार्गण॥ बाणजाळ छेदिलें॥८३॥ अश्व धुवोन जगज्जीवन॥ रथीं योजीत न लगतां क्षण॥ अर्जुनासहि
त देवोन॥ रथावरी आरूढला॥८४॥ बाप बाप बोलोन तेव्हां॥ थापटी तुरंगाच्या ग्रीवा॥ सादर होऊन मघवा॥ वि
लोकीत प्रेमप्रीती॥८५॥ माझा पुत्र सभाग्य परम॥ नीच कर्में करी पुरुषोत्तम॥ आनंदाश्रू उत्तम॥ शक्राचे नयनीं
लोटले॥८६॥ घोडे धुवोन आणिले॥ स्यंदनीं जेव्हें जुंफिले॥ सरोवर तत्काळ आटलें॥ युद्ध मांडलें पुढती॥८७॥
उभय कृष्ण एके रथीं॥ पवनवेगें वारू जाती॥ कौरवदळींचे सारथी॥ विलोकिती कौतुक॥८८॥ सव्यसाची क्रो॰
धायमान॥ वामसव्य समसंधान॥ पार्था त्वरा करीं ह्मणोन॥ खगकेतन बोलतसे॥८९॥ साहा गावें व्यूह रचिला॥
जिंकितां तिसरा प्रहर जाहाला॥ प्रहर एक दिवस उरला॥ कृष्ण विचारी मानसीं॥९०॥ दिवस उरला किंचित॥ अ॰
साध्य आतां जयद्रथ॥ प्राण त्यजील माझा पार्थ॥ मग कृष्णनाथ काय करी॥९१॥ सुदर्शन आड घातलें॥ दिनक॰
रास लपविलें॥ अर्जुनास तें न कळे॥ वीरश्रियेचे निमाजें॥९२॥ घे घे ह्मणे अर्जुन॥ मग बोले जगज्जीवन॥ सरलें स
रलें दिनमान॥ आलें मरण तुजलागीं॥९३॥ अर्जुनें सूर्याकडे पाहिलें॥ तों सूर्यबिंब मावळलें॥ गांडीव हातींचें ठे॰

विलें ॥ कुंडरचिलेंतेधवां ॥ ९४ ॥ अग्निकाष्ठें भक्षितो अर्जुन ॥ सिद्ध जाहाला जाणोन ॥ धर्मभीमसकळसैन्य ॥ शोक-
करितीतेधवां ॥ ९५ ॥ कौरवांसहर्षथोर ॥ अनायासें मरतोपार्थ ॥ पाहावयाससमग्र ॥ पांडवकौरवपैं आले ॥ ९६ ॥ ध
डाडिलातेव्हां अग्नी ॥ अर्जुन आलास्नानकरोनी ॥ श्रीकृष्णासनमोनी ॥ प्रदक्षिणातीनकेल्या ॥ ९७ ॥ पाहावया
आलेसमस्त ॥ चोरूनपाहेजयद्रथ ॥ तेंदेखोनश्रीकृष्णनाथ ॥ कायबोलतपार्थासि ॥ ९८ ॥ स्त्रीभ्रतारासवेंजा-
य ॥ तैसाअग्निप्रवेशकरिसीकाय ॥ आपुलेंधनुष्यलवलाहें ॥ समागमेंघेईकां ॥ ९९ ॥ धनुष्यासबाणचढऊन ॥
कुंडासकरींप्रदक्षिण ॥ तैसेंचकरीश्वेतवाहन ॥ कौरवसर्वपाहाती ॥ २०० ॥ चोरूनपाहेजयद्रथ ॥ तेंदेखोनकौ
रवसमस्त ॥ ह्मणतीतुजसाठींहाहोतोअनर्थ ॥ तूंकांयेथेंआलासी ॥ १ ॥ जयद्रथह्मणेबरेंजाहालें ॥ अर्जुनासतों
मरणआलें ॥ आतांपांडवएकेचवेळे ॥ उद्यांसर्वजिंकीन ॥ २ ॥ इकडेप्रदक्षिणाकरीअर्जुन ॥ धनुष्यवोढूनआक
र्ण ॥ हळूचकानींसांगेजगजीवन ॥ पैलजयद्रथपाहेंपां ॥ ३ ॥ इतक्यांतकाढिलेंसुदर्शन ॥ तोंअर्धघटिकादिवस
पूर्ण ॥ पार्थाहासूर्यतोजयद्रथदुर्जन ॥ सोडींबाणवेगेंसि ॥ ४ ॥ ऐसेंबोलतांजगजीवन ॥ निमिष्यनलगतांगेला
बाण ॥ जयद्रथाचेंशिरछेदून ॥ आकाशपंथेंउडविलें ॥ ५ ॥ ज्याचेहस्तींपडेलशिर ॥ त्यासतत्काळमृत्युसाचा
र ॥ अर्जुनासह्मणेसर्वेश्वर ॥ शीरवेगेंउडवींपां ॥ ६ ॥ सिंधुराजजयद्रथाचापिता ॥ पश्चिमसमुद्रींतपकरित-
होता ॥ संध्यावंदनींअर्घ्यदेतां ॥ शिरपडलेंहातांत ॥ ७ ॥ तेणेंहातिंचेंटाकिलेंशिर ॥ तोंतेथेंचमृत्यपावला-
साचार ॥ सूत्रधारीतोयदुवीर ॥ नानाकौतुकदावीतसे ॥ ८ ॥ दिनमणीपावतांअस्त ॥ इतक्यांतमारिलाजयद्र
थ ॥ विजयवाद्येंवाजवित ॥ पार्थतेव्हांपरतला ॥ ९ ॥ दुर्धरपणसाधिलादेख ॥ कौरवांसिदिल्हेंमहादुःख ॥
शोकेंविव्हळसकळिक ॥ भ्रमेंविवेकसमजेना ॥ १० ॥ दुःशीलादुर्योधनभगिनी ॥ जयद्रथाचीहोयगृहिणी ॥
॥ गांधारीधृतराष्ट्रऐकोनी ॥ दुःखेंकरोनीविव्हळ ॥ ११ ॥ धर्मासमांगतीदूत ॥ रणींमारूनजयद्रथ ॥ पैलकपीवर-

ध्वजझळकत ॥ शिबिराप्रतियेतसे ॥ १२ ॥ विजयवाद्यांचे गजर ॥ पांडवदळीं होती अपार ॥ पुष्पवृष्टी वारंवार ॥ पुरंदर करीतसे ॥ १३ ॥ रथाखालीं उतरतां कृष्णार्जुन ॥ धर्मराज पुढें येऊन ॥ श्रीरंगाचे चरणीं नमन करूनस्तवन करीतसे ॥ १४ ॥ ह्मणे कुंतीउदरीं नूतन ॥ आजि जन्मला हा अर्जुन ॥ जनक जननी बंधू स्वजन ॥ तुजवीण कोण श्रीहरी ॥ १५ ॥ कृतांताचे मुखींहून ॥ आजि त्वां पार्थ काढिला वोढून ॥ सर्वांगाची छाया करून ॥ प्रल्हाद जैसा रक्षिला ॥ १६ ॥ विजयास विजय करून ॥ हरि त्वांच दिधला आणून ॥ थोरपणा सकळ सांडून ॥ घोडे आजि धूतले ॥ १७ ॥ यदुकुळविकाशभास्करा ॥ पद्मजातजनका पद्माक्षीवरा ॥ पद्मनाभा पद्मधरा ॥ नाहीं उपकारा मीति तुझ्या ॥ १८ ॥ हे जननी विश्वसंभूत ॥ समरभूमीसि होसी रूत ॥ होऊन आसुचा दूत ॥ शिष्टाई करूं गेलासि ॥ १९ ॥ पांडवकुलपालका पांडुरंगा ॥ ब्रह्मानंदन विटेअभंगा ॥ श्रीधरहृदयाब्जभृंगा ॥ उभा अव्यंगा विटेवरी ॥ २० ॥ सुरसपांडवप्रतापग्रंथ ॥ द्रोणपर्व व्यासभारत ॥ त्यांतील सारांश यथार्थ ॥ पंचेचाळिसाव्यांत कथियेला ॥ २२१ ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥

श्रीगणेशायनमः ॥ ॥रणीपडलाजयद्रथ॥ पांडवदळआनंदभरित॥ संजयाप्रतिअंबिकासुत॥ पुसताझालातेधवां ॥१॥ संजयासांगनिश्चय॥ कोणाकडेसंपूर्णजय॥ माझ्यापुत्रांचेंकैसेंहोय॥ चिंतापाहेंमजलाहे॥२॥ येरूह्मणेऐकेसा चार॥ ब्राह्मणतेथेंआचार॥ पंडीततेथेंविचार॥ सर्वदाही वसतसे॥३॥ मित्रतेथेंप्रकाश॥ सूरवतेथेंउल्हास॥ सद्विद्यातेथेंविशेष॥ मानजेसावसतसे॥४॥ भक्तीतेथेंप्रेम॥ औदार्यतेथेंधर्म॥ ज्ञानतेथेंनिःशीम॥ शांतिसुखवसतसे॥ ॥५॥ शांतीतेथेंदयावसे॥ दयातेथेंक्षमावसे॥ क्षमातेथेंविलसे॥ निजबोधजैसाकां॥६॥ बोधतेथेंआनंद॥ आनंदतेथेंब्रह्मानंद॥ तोब्रह्मानंदगोविंद॥ पार्थरथींसर्वदां॥७॥ तोपार्थआणिजगत्पती॥ ज्याचेदळींविराजती॥ तरिजयतिकडेनृपती॥ कायपुससीवेळोवेळां॥८॥ पुढेंऐकवृत्तांत॥ युद्धानिघालाशारद्वत॥ तोंतिकडूनअभिमन्यूताता॥ अतिआवेशेंधांवला॥९॥ परस्परेंशरमारित॥ युद्धझालेंअत्यद्भुत॥ वर्मींबाणबैसलेबहुत॥ मूर्छायेतकृपाचार्या॥१०॥ कृपाचार्यपडलाह्मणउनी॥ चमूमाझीउठलीध्वनी॥ सारथीरथकाढुनी॥ नेताझालाएकीकडे॥११ धनंजयसद्गदहोऊनपरम॥ ह्मणेजळोहाक्षत्रियधर्म॥ जाचापादुकाशिरींधरिजेसप्रेम॥ त्यासियुद्धकरणेंपडे॥१२ निर्वाणअस्त्रकपटभावें॥ गुरूवरीसहसानटाकावें॥ कृपाचार्यकृपाळुवें॥ सांगीतलेंपूर्वींमज॥१३॥ माताक्रोधावलीपूर्ण॥ देतजरीगाळीप्रदान॥ तरिपुत्रासव्हावेंमरण॥ सहसाहीकल्पिना॥१४॥ तैसेशारद्वतआणिद्रोण॥ मजवरीप्रेरितीजरीबाण॥ परिजावामाझाप्राण॥ सहसाहीनसेहें॥१५॥ जळोहादुर्योधनचांडाळ॥ याच्यापायेंआटलेंकुळ ॥असोऐसाफाल्गूनव्याकुळ॥ आचार्यस्नेहेंझाला॥१६॥ तोंरथारूढसूर्यनंदन॥ येतवेगेंपवनाहुन॥ श्रीकृष्णासिह्मणेकृष्णा॥ रथप्रेरींकर्णाकडे॥१७॥ नंवतोभक्तकाजकैवारी॥ ह्मणेकर्णजातोसात्यकीवरी॥ तूंत्यासयुद्धानपाचारी॥ आजिचादीनतत्वता॥१८॥ त्यापाशींआहेवासवीशक्ति॥ तेतुजवरीटाकीलअवचिती॥ तेशक्तिभयअहोराती॥ माझेचित्तींवसतसे॥१९॥ तोशक्तीसीनिवारीपाहीं॥ ऐसापुरुषझालाचिनाहीं॥ तेतुजवरतीघालीलवलाहीं॥ उत्कंठास-

दांकर्णाची ॥ २० ॥ नरितेशक्तिआजिरात्री ॥ टाकीलएकमहावीरावरी ॥ मगनूंत्यासियुद्धकरीं ॥ निर्भयसमरींमनेच्छा ॥ ॥ २१ ॥ इकडेसात्यकीसीभास्करी ॥ युद्धकरीतघटिकाचारी ॥ परस्परेंतीक्ष्णशरीं ॥ खिळिलाआंगींउभयानीं ॥ २२ ॥ आदित्यात्मजसोडूनबाण ॥ छेदिलासात्यकीचास्यंदन ॥ सात्यकीतुरंगमारून ॥ विरथकेलातेधवां ॥ २३ ॥ ऐसेंदेखोनिजगदीश्वर ॥ दारुकासहितआपुलारहंवर ॥ ध्वजींजाचियाखगवर ॥ सात्यकीप्रतिदिधला ॥ २४ ॥ सात्यकीबसूनतयेरथीं ॥ युद्धकरीतसर्वपाहती ॥ कर्णाचारथआणिसारथी ॥ समरींचूर्णकेला ॥ २५ ॥ यावरीतोभास्करी ॥ आणिकेरथींआरोहणकरी ॥ बाणजाळतेअवसरीं ॥ सात्यकीवरिघालित ॥ २६ ॥ मित्रपुत्रमहारथी ॥ सात्यकीखिळिलाशरपंथीं ॥ तोंआलाद्रुपदनृपती ॥ उत्तमौजधांवला ॥ २७ ॥ शरसोडीतअपार ॥ सर्वांगींखिळिलारविपुत्र ॥ दिसेजैसामयूर ॥ पिच्छेंपसरीस्वइच्छे ॥ २८ ॥ द्रुपदेंछेदूनरथ ॥ राधेयकेलासमरींविरथ ॥ ऐसेंदेखोनकौरवसमस्त ॥ एकदांचिधांवले ॥ २९ ॥ परमबळमैत्रकर्ण ॥ दुर्योधनासआवडेप्राणाहून ॥ यालागींत्वरेंहातदेऊन ॥ आपलेरथींबैसविला ॥ ३० ॥ सात्यकीमहाराजयादववीर ॥ कौरवबाणींकेलेजर्जर ॥ दारुकेंफेरिलारहंवर ॥ कुलालचक्रासारिखा ॥ ३१ ॥ प्रज्ञाचक्षूसंजयबोलत ॥ भीमेंतुझेयेकतीससुत ॥ ॥ मारिलेजाणआजिपर्यंत ॥ पुढेंहीअनर्थदिसतो ॥ ३२ ॥ सात्यकीनेंमहावीर ॥ समरंगणींमारिलेअपार ॥ भीमासह्मणेअर्कपुत्र ॥ बाळयुद्धकायकरिती ॥ ३३ ॥ अस्त्रविद्यापाहीं ॥ तुजपाशींदिसतनाहीं ॥ अर्जुनह्मणेतेसमयीं ॥ सूतपुत्राऐकतूं ॥ ३४ ॥ सात्यकीनेंतुजकेलेंविरथ ॥ तूंह्मणविसीरणपंडित ॥ गर्वधरिलाआहेबहुत ॥ तूजसीसत्यमारीन ॥ ३५ ॥ तूंआपुलेभोगभोगून ॥ येईंसकळमैत्रासीपुसोन ॥ मागेंइच्छाठेऊन ॥ कांहींआतांयेऊंनको ॥ ३६ ॥ तुजमीरणींमारीनसत्य ॥ ह्मणऊनगांडिवावरीठेविलाहात ॥ कर्णह्मणेबोलसीबहुत ॥ गर्वअंगींधरूनियां ॥ कायबोलोनबहुतवाणी ॥ रणींकरूनदावीनकरणी ॥ चिंतार्णवींकौरववाहिनी ॥ पडिलीतेव्हांजाणपां ॥ ३८ ॥ ह्मणतीपडलेवीरसबळ ॥ उरलेतेदिसतीनिर्बळ ॥ रोगिष्टऐसेविकळ ॥ दळसकळदिसनसे ॥ ३९ ॥ दुर्योधनबोलेसंतप्त ॥ इतुके

असतां रणपंडित॥ रक्षिला नाहीं जयद्रथ॥ केला घात शत्रूनीं॥ ४०॥ परम संतप्त कौरवेश्वर॥ कपाळशूळें तळमळ व्याघ्र॥ कीं उदरशूळी पादोदर॥ आरंबळत जैसा कां॥ ४१॥ वणव्यांत आहाळला अजगर॥ कीं महाकूपीं पडला मृगेंद्र॥ तैसा दुःखी दुर्योधन सत्वर॥ द्रोणाप्रति बोलतसे॥ ४२॥ पाहा कैसें कर्म प्रबळ॥ सात क्षोणी आटलें दळ॥ एकतीस बंधू सबळ॥ मृत्युनगराप्रति गेले॥ ४३॥ अहो यावरी गुरुवर्या॥ पृथ्वी ठाव नेदी मज लपावया॥ तरि मी आतां युद्ध करूनियां॥ मारीन किंवा मरेन॥ ४४॥ तुझी कृपा पार्थावरी फार॥ वरिवरि युद्ध करिशी हळुवार॥ जैसा कमळीं बसे भ्रमर॥ परि केशर विटों नेदी॥ ४५॥ तरी तूं गुप्त आह्मासी॥ मृत्युरूप वाटतोसि॥ द्रोण ह्मणे विंधितोसि॥ वाग्बाणें व्यर्थ नितूं॥ ४६॥ पार्थासि भिडे समरंगणीं॥ ऐसी कोण प्रसवली जननी॥ कपटद्यूत खेळोनी॥ तुह्मीं त्यासि जिंकिलें॥ ४७॥ नैसत्य धर्में निश्चिती॥ समरीं तुह्मांस जिंकिती॥ सभेस तुह्मीं आणून महासती॥ गांजिली कैसी अधर्में॥ ४८॥ तीस सात्य जगन्निवास॥ वस्त्रें पुरविलीं आसमास॥ पांडव धाडिले वनवासास॥ बहुत श्रेष्ठीं वर्जितां॥ ४९॥ द्रौपदीचें समाधान॥ करितां बोलिला जगन्मोहन॥ कौरव मिळोनी जाण॥ गांजिली पूर्ण देवकीमाय॥ ५०॥ त्याचें फळ हें निजाण॥ पांडवांस साह्य होऊन॥ कौरवकुळ संहारिन॥ प्रतिज्ञा केली श्रीधरें॥ ५१॥ पार्थ तो केवळ वासव॥ साह्य हे माधव उमाधव॥ त्यासि समरंगणीं धरी हाव॥ ऐसा पुरुष कोण असे॥ भगवद्भक्तांसीं करितां द्वेष॥ त्यास निर्दाळी लक्ष्मीकेश॥ तुज आह्मीं शिकविलें बहुवस॥ नायकसी सर्वथा॥ ५३॥ तुझ्या दोषें करून॥ आह्मीं समस्त गेलों बुडोन॥ शिष्याचें पाप दारुण॥ मस्तकीं बैसे गुरूच्या॥ ५४॥ मैत्रेय विदुर व्यासीं॥ इहीं तुज शिकविलें बहुवसीं॥ परि तूं मतिमंद नायकसी॥ आतां रडतोस कासया॥ ५५॥ तरि आतां प्रतिज्ञा हेच॥ आंगींचें मी न काढीं कवच॥ सर्वांसी जिंकीन मीच॥ किंवा परधाम पावेन पैं॥ ५६॥ त्यावरी तो कौरवनायक॥ करी कर्णाजवळी परम शोक॥ ह्मणे गुरूचें मन अधिक॥ पार्थाकडे असे पां॥ ५७॥ व्यूहद्वारीं वाट देउन॥ येणेंचि प्रेरिला अर्जुन॥ येणेंचि जय-

द्रथराहऊन॥ घेतलाप्राणत्यांचापैं॥ ६०॥ कर्णह्मणेनिर्धारीं॥ गुरुनिंदानूंसहसानकरीं॥ धनंजयनाटोपेसमरीं॥ इंद्रा
दिकांसहसाही॥ ५९॥ जाचारथावरीहरिहर॥ विजयचापविजयतूणीर॥ समरींविजयरहंवर॥ नदळेअणुमात्र-
-माघारा॥ ६०॥ गुरुनिंदाकरितांपाहे॥ तत्काळहोयकुळक्षय॥ तूंआचार्याचेंहृदय॥ दुःखीसहसाकरूंनको॥ ६१॥
स्वकर्मसुरव्यप्रधान॥ आम्हुचेंरुद्रक्षोणीदळदारुण॥ त्याचेंसप्तक्षोणीचमूसंपूर्ण॥ पराजयजाणत्याकडे॥ ६२॥ आ
ह्मीतुझास्नेहेंकरून॥ समरंगणींवेंचूंप्राण॥ परिजिकडेआहेरुक्मिणीजीवन॥ शेवटींजयतिकडेचि॥ ६३॥ असो
यावरीरणतुरांचीघाई॥ दोहींदळींगाजनसेतेसमयीं॥ दुर्योधनलवलाही॥ रथारूढझाला॥ ६४॥ अपारसोडिले
बाण॥ द्विरदविध्वंसीकमळनयन॥ तैसेंपांडवदळसंपूर्ण॥ विध्वंसिलेंसुयोधनें॥ ६५॥ तीक्ष्णवर्षेबाणजा-
ळ॥ पुत्रासहीतपळविलापांचाळ॥ कुंतीचातृतीयपुत्रसबळ॥ शतबाणींविंधिला॥ ६६॥ सत्तरबाणींसबळ॥ विं
धिलेसहदेवनकुळ॥ धर्मावरीतेजाळ॥ ऐंशींबाणघातले॥ ६७॥ नघदबाणेंकरून॥ सात्यकीविंधीसुयोधन॥ वि
राटावरीक्रोधेंकरून॥ पन्नासबाणघातले॥ ६८॥ द्रौपदधृष्टद्युम्नतेवेळे॥ साठबाणींखिळिले॥ अवघेंदळजर्ज
रकेलें॥ दुर्योधनेंतेधवां॥ ६९॥ कर्णपिताअस्ताचळीं॥ मावळतांरजनीप्रवर्तली॥ युद्धाचीझाजलागली॥ अ-
धिकाधिकतेधवां॥ ७०॥ वायुसंगेंचेतलाकृशान॥ तैसाखवळलाभीमसेन॥ बहूतसोडूनिमार्गण॥ कौरव
सैन्यखिळियेलें॥ ७१॥ दुर्योधनाचेबंधूतिघेजण॥ दीर्घबाहूदुर्मददुष्कर्ण॥ याचींशिरेंबाणेंकरून॥ भीमसेनेंउ
डविलीं॥ ७२॥ भीमावरीएकशक्ती॥ कर्णेंप्रेरिलीशीघ्रगती॥ येतांदेखोनिहस्तीं॥ भीमेंधरिलीपराक्रमें॥ ७३
भीमेंस्वबळेंकरूनी॥ कर्णावरीदिधलीझोंकुनी॥ तेशकुनीवरीजाउनी॥ पडावीजोंअकस्मात॥ ७४॥ कर्णेंश
रसोडूनिनिवाडे॥ शक्तीपाडिलीएकीकडे॥ यावरीचपळाअकस्मातपडे॥ तैसाआचार्यधांवला॥ ७५॥ सा
त्यकीसोडीसायक॥ परितोद्रोणप्रतापार्क॥ तूळराशीजाळीपावक॥ तैसेंसैन्यसंहारिलें॥ ७६॥ तेव्हांशिरां-

च्यालाखोल्या॥गुरूनेंभूलिंगासस्समर्पिल्या॥ एकचिआकांतवर्षला॥पांडवदळीतेंधर्वा॥७७॥तोंसमसप्तकपरा-
भवून॥अकस्मातआलाअर्जुन॥तैसासंकटींधावेभगवान॥ भक्तालागींएकाएकीं॥७८॥जैसाप्रभंजनजल
दजाळ॥ पुरुषार्थेंविदारीतत्काळ॥तैसेंकौरवांचेंदळ॥ केलेंविकळशरपंथीं ॥७९॥ प्रगटलाकेवळकृ-
तांत॥तैसापुढेंआलावृकोदरक्रुद्ध॥अष्टचक्रजाचारथ॥ कींपर्वतदूसरा॥ ८० ॥आरक्तध्वजवरीगृध्र-
चिन्ह॥तोंघटोत्कचभयानकवदन॥त्याचीगर्जनाऐकुन॥ कौरवदळदचकलें॥८१॥ एकह्मणतीआला
काळ॥ग्रासीलहेंअवघेंदळ॥सर्वेराक्षससेनाप्रबळ॥भयानकेंनलक्षवे॥ ८२॥ घटोत्कचसोडीतशर॥
तेचपळतेसमानअनिवार॥ वल्मिकांतसंचरेविखार॥ वीराआंगीरुततो॥८३॥ ऐसेंदेखोनिअद्भुत ॥-
त्यावरीघालविलागुरुसुत॥तीक्ष्णसायकशत॥ घटोत्कचावरीटाकी ॥८४॥कुंजरावरीक्रमनभार॥तै
सेनगणीतीक्ष्णशर॥गुरुपुत्राधरींधीर॥ ह्मणोनहाकफोडित॥ ८५॥काळदंडवतसत्तरबाणीं॥भीमात्म
जखिळिलाद्रोणी॥तोंघटोत्कचपुत्रतेक्षणीं॥अंजनपर्वाधांवला॥८६॥चक्रेंसोडीअनिवार॥ निवटीत-
कौरवांचेभार॥ मिळोनसर्वकौरववीर॥ वर्षतशरउठले॥८७॥दुर्योधनकर्णद्रोणी॥शरींराक्षसखिळि
लेतेक्षणीं॥असुरवर्षतवृक्षपाषाणीं॥ कौरवबाणींउडविती॥ ८८॥कर्णअद्भुतसोडोनिशर॥ छेदिलेंअं
जनपर्व्याचेंशिर॥ कौरवदळींआनंदथोर॥ महावीरपडियेला॥८९॥ देखोनपुत्राचेंमरण॥ घटोत्कचखव-
ळलादारुण॥पर्वतवृक्षउपटून॥अरिसेनेवरीवर्षे॥९०॥साठसहस्त्रसबळदळघेउनी॥पांडवांवरीधांवला-
शकुनी॥ दोनीदळेंमिसळलींतेक्षणीं॥झोटधरणीहोतसे॥ ९१॥ होतयुद्धाचेंघनचक्र ॥गुरुसुतांप्रेरिलें
अग्निअस्त्र॥ असुरजाळिलेअपार॥ प्रळयथोरवर्तला॥९२॥अनिवाररजनीचर॥ वर्षतीशिळातरुवर॥
घटोत्कचेंशक्तीतीव्र॥ द्रोणीवरीभिरकाविली॥९३॥ तेशक्तीपरमअचाट॥ सबळघंटाबांधल्याआठ ॥

करीतप्रळयबोभाट ॥ अश्वत्थाम्यावरीआली ॥ ९४ ॥ परमपराक्रमींवीरद्रोणी ॥ शक्तीधरिली करें करुनी ॥
घटोत्कचावरीपरतोनी ॥ टाकिलीनेव्हांअतिबळें ॥ ९५ ॥ घटोत्कचाचामहारथ ॥ शक्तीनेंजाळिलाक्षणांत ॥
आणिकेरथींभीमसुत ॥ आरूढलसवेंचि ॥ ९६ ॥ परमपुरुषार्थीगुरुपुत्र ॥ इयदळींवर्णितीसर्वत्र ॥ रथजाळूनि
शक्तिअनिवार ॥ पृथ्वीगर्भीप्रवेशली ॥ ९७ ॥ सुरथआणिशत्रुंजय ॥ द्रुपदाचेपुत्रपाहें ॥ गुरुपुत्रापुढेंयेऊनिलवला
हें ॥ युद्धकरितीअपार ॥ ९८ ॥ गुरुपुत्राचेदोनबाणीं ॥ दोघांचींशिरेंउडविलींगगनीं ॥ कुंतिभोजाचेदशपुत्ररणीं ॥-
प्रेतेंकरूनीटाकिले ॥ ९९ ॥ भूरिश्रवापिताअद्भुत ॥ नामजाचेंसोमदत्त ॥ तोमहावीररणपंडित ॥ मारी बहूपांचाळसे-
ना ॥ १०० ॥ तोंसात्यकीनेंसमरंगणीं ॥ त्याचेंशीरउडविलेंगगनीं ॥ भीमेंचौघेपुत्ररणी ॥ शकुनीचेसंहारिले ॥-
॥ १ ॥ तोंबाल्हिकेंनिजशरेंकरून ॥ रणींरिखिळिलाभीमसेन ॥ जैसामयूरपिच्छेंपसरून ॥ तेसाभीमशोभतसे ॥ २
भीमेंगदाभोंवडूनि ॥ बाल्हीकमारिलासमरंगणीं ॥ दुर्योधनाचेबंधूनेक्षणीं ॥ दाहाजणवधियेले ॥ ३ ॥ त्यावरी-
घाळूनिगदाघात ॥ मारिलेकर्णाचेचौघेसुत ॥ देशोदेशींचेराजेबहुत ॥ धर्मराजेंआटिले ॥ ४ ॥ परमपुरुषार्थी-
युधिष्ठिर ॥ मारीतउठिलाअनिवार ॥ सहस्रांचेसहस्र ॥ शत्रूआटिलेरणांगणीं ॥ ५ ॥ धर्माचापराक्रमदेखोन ॥
आचार्यधांवलावर्षतबाण ॥ दाहासहस्रसोडून ॥ धर्मभेदिलाहृदयावरी ॥ ६ ॥ साठबाणेंद्रोणसमरीं ॥ धर्मेंखि
ळिलातेअवसरीं ॥ धर्माचारथझडकरी ॥ चूर्णकेलाआचार्यें ॥ ७ ॥ तीसबाणेंतात्काळ ॥ धर्मेंरणीकेलाविकळ ॥
मगरथींवाहूनकिंकळ ॥ नेताझालातेधवां ॥ ८ ॥ दुर्योधनह्मणेकर्णावीरा ॥ रणपंडितासमधीरा ॥ माझेमनोर
थचतुरा ॥ करिशीलपूर्णकेव्हांतूं ॥ ९ ॥ अर्कजह्मणेऐकनृपती ॥ आतांसोडीनवासवशक्ति ॥ रणांगणीसुभद्रा
पती ॥ पहुडवीनक्षणार्धे ॥ १० ॥ मगबोलेशारद्वत ॥ वल्गनाकांकरिशीव्यर्थ ॥ जोंदेखिलानाहींवीरपार्थ ॥ कप-
िवरध्वजश्रेष्ठतो ॥ ११ ॥ निवातकवचयोद्धाअभिनव ॥ त्याचापार्थेंपुशिलाठाव ॥ व्योमकेशआणिवासव ॥

श्रीगणेशायनमः॥ ॥जोपांडवांचाकैवारी॥नंदाघरींचाखिल्लारी॥पांचाळीचासाह्यकारी॥द्वारपाळबळीचा॥१॥जोक्षीराब्धिचाजामात॥होयकमळोद्भवाचाताता॥सनकादीकसमस्त॥आराध्यदैवततयाचें॥२॥जोआनकदुंदुभीचाकुमर॥जोत्रिनेत्राचाप्राणमित्र॥जोनिगमाचाआद्यसूत्र॥पाठीराखाशतमखाचा॥३॥जोपुराणपुरुषप्रल्हादवरद॥उद्धवअक्रूरहृदयाब्जमिलिंद॥तोअर्जुनरथींमुकुंद॥बैसोनकायबोलतसे॥४॥अर्जुनाहोयींसावधान॥तुवांमारिलाकर्णनंदन॥त्यादुःखेंकरून॥नमजाहालावीरतो॥५॥तोंकाळानेमनींबैसेदचक॥ऐशीअर्जुनेंफोडिलीहाक॥तैशीचकर्णेंदेख॥गर्जनाकेलीसमरंगणीं॥६॥दोघांचेरथश्वेतवर्ण॥श्वेततुरंगगतीसमान॥दोघांचेंसौंदर्यदेखोन॥मीनकेतनतटस्थ॥७॥समवयसमविद्यासमठाण॥समानवोढीसमसंधान॥॥दोघेही पृ थे चे नंदन॥तेजेंसंपूर्णउजळतीदिशा॥८॥कर्णरथींरेखिला॰कुंजर॥पार्थध्वजींवायुकुमर॥दोहींदळींवाद्यगजर॥तुंबळजाहालातेधवां॥९॥सर्ववीरांचीआरोळी॥दोहींदळींयेकचिजाहाली॥शैल्यकृष्णामहाबळी॥सारथ्यकरितीदोघांचें॥१०॥एकमेरूएकमांदार॥एकभार्गवएकरघुवीर॥एकरमावरएकउमावर॥तैसेदोघेदीसती॥११॥एकसागरएकआकाश॥एकवासुकीएकशेष॥एकधैर्यएकयश॥तैसेदोघेदीसती॥१२॥एकसूर्यएकप्रळयाग्न॥एकवसिष्ठएकगाधिनंदन॥तैसेकर्णआणिअर्जुन॥समरंगणींशोभले॥१३॥एकस्मार्तएकवैष्णव॥एकसद्भावएकगौरव॥विजयश्रीवरावयाअभिनव॥रणनोवरेकेळवती॥१४॥दोनींदळेंचिंतेनेंव्याकुळ॥कोणासविजयश्रीघालीलमाळ॥सर्वदेशींचेभूपाळ॥पक्षीबोलतीआपुलालिया॥१५॥कित्तेकवर्णितीवीरकर्ण॥कितेकह्मणतीधन्यअर्जुन॥सूर्यआणिशचीरमण॥चिंतितीकल्याणनिजपुत्रां॥१६॥पार्थाचेंकल्याणचिंतिती॥सुरवरसर्वनिश्चिती॥कर्णासजयप्राप्ती॥दैत्यइच्छितीमनांत॥१७॥ब्रह्मयासिपुसतीदेवआणिमुनी॥सांगजयप्राप्तकोणालागुनी॥

तेऐकावयाविधीचीवाणी॥शक्रसादरजाहाला॥१८॥मगबोलेविष्णुनाभ॥जिकडेअसेलरुक्मिणीवल्लभ॥
जयआणिलाभ॥तिकडेसर्वविलोका॥१९॥ऐसेंऐकतांपाकशासन॥आनंदभरीतझालापूर्ण॥जयवाद्येंवाज-
ऊन॥वर्षेसुमनेंपार्थावरी॥२०॥अमरदाटलेविमानीं॥नरनरेश्वरेंभरलीमेदिनी॥निजभारेंसिदुरोनी॥किते-
ककौतूकविलोकिती॥२१॥असोकौरवपांडवरणीं॥झुंजतांपडल्याशीर्षांच्याश्रेणी॥कंपायमानझालीधरणी॥
उरगेंद्रमस्तकसरसावी॥२२॥दिग्गजचळचळांकांपत॥आदिवराहसरसावीदांत॥कूर्मपृष्ठीसरसावीत॥
चिंताग्रस्तभुवनत्रयें॥२३॥आकाशमंडपआसडत॥भडभडांनक्षत्रेंरिचवत॥महाथाकडबळवंत॥हिमज्वरें
कांपती॥२४॥तयाकोल्हाळांतउभयकृष्ण॥वाजवितीदेवदत्तपांचजन्य॥तेव्हांसृष्टीगेलीगेलीह्मणोन॥एक
चिहाकजाहाली॥२५॥त्यामाजीअंजनीनंदन॥बुभुःकारेंगाजवीत्रिभुवन॥वेष्टीतभूतेंआवेशेंकरून॥हाका-
फोडितीतेवेळीं॥२६॥अगाधजीवनींनौकाडळमळी॥तैशीकुंभिनीडोलोंलागली॥तोंहनुमंतेंकवघातली॥-
ध्वजावरीकर्णाचे॥२७॥कुंजररेखितकर्णध्वज॥विदारीतवायुतनुज॥कौतुकपाहावयाधर्मराज॥पाठीसिउ-
भापार्थाचे॥२८॥शैल्याकडेशेषशयन॥क्रोधेंपाहेविलोकुन॥तुरंगावरीतुरंगजाण॥रथींचेथांवलेसक्रोधें॥
॥२९॥विजयह्मणेचक्रपाणी॥जरिमजकर्णेंमारिलेंरणीं॥तरितूंकायकरिशीलयेक्षणीं॥सांगसजलागोविं-
दा॥३०॥यादवकुळदिवाकर॥बोलतकायश्रीकरधर॥अघटीतघडेलसाचार॥परिपराजयनव्हेतुतें॥३१॥
सूर्यमार्गत्तुकेलकरितांभ्रमण॥नेत्रींअंधत्वपावेलअग्न॥मशयकाचीथडकलागून॥जरीमेरूउपडेल॥३२॥
पाषाणप्रहारेंकरून॥जरिवायूपडेलमोडूनचरण॥पिपीलिकाशोषीसिंधुजीवन॥विज्जूसथांवोनशलभध-
री॥३३॥धडधडीतप्रळयज्वाळ॥कर्पूरतुषारेंहोयशीतळ॥हेंहीघडेलएकवेळ॥परिपराजयनव्हेतुतें॥३४॥
पार्थह्मणेब्रह्मांडनायका॥सूत्रधारकाविश्वव्यापका॥तुझीकरणीभक्तपाळका॥ब्रह्मादिकांनेणवे॥३५॥कं

र्णाच्यानितंबिनीसकळ ॥ विगतविधवाआजिहोतील ॥ वैकुंठींचावेल्हाळ ॥ करीभविष्यआधींचहें ॥ ३६ ॥ तोंदुर्यो
धनगुरुसुत ॥ कृतवर्माशारद्वत ॥ बाणाचीवृष्टीकरित ॥ पार्थावरीलोटले ॥ ३७ ॥ गजभाररथभार ॥ पायदळअ
श्वभार ॥ लक्षोनियांसुभद्रावर ॥ हाणितीशस्त्रेंएकदांची ॥ ३८ ॥ तितुक्यांचींशस्त्रेंछेदुन ॥ टाकिताझालाअ
र्जुन ॥ आपुलेआंगींएकबाण ॥ लागोंनेदीकुशळतो ॥ ३९ ॥ स्वभारेंसिधांवलेजेवीर ॥ तितुकेपार्थेंशरेंकेलेजर्ज
र ॥ शिरेंउडविलींअपार ॥ कंदुकाऐशींतेधवां ॥ ४० ॥ पक्षीउडतीवृक्षावरूनी ॥ तैशींशिरेंधांवतीगगनीं ॥ तोंमहा
प्रळयदेखोनीं ॥ द्रोणीह्मणेसुयोधना ॥ ४१ ॥ अर्जुनतरीहोईसावधान ॥ ऐकमाझेंहितवचन ॥ मित्रकरींपंडुनं-
दन ॥ समसमाननांदादोघे ॥ ४२ ॥ माझेबोलांतनिश्चित ॥ आहेतपांचहीपंडुसुत ॥ तूंऐकतांआपुलेंहित ॥ कल्याणयां-
तसर्वांचें ॥ ४३ ॥ दुःखार्णवभरलादेखा ॥ ममवचनहृदनोंका ॥ बैसोनपावशीपरतटाका ॥ विरोधवार्तासांडींकां
॥ ४४ ॥ कर्णासआवरींतूंसत्वर ॥ मींआवरितोंसुभद्रावर ॥ अभिमानहाममहाक्रूर ॥ सांडींसंगनयाचा ॥ ४५ ॥
धृतराष्ट्राचेंवंशवन ॥ विरोधेंगेलेंशुष्कहोऊन ॥ तेथेंपांचपांडवप्रळयाग्न ॥ जाळीतपूर्णचालिले ॥ ४६ ॥ गुरु-
सुतमींगुरुसमान ॥ सुधारसमानींममवचन ॥ दूरहोईलसर्वांचेमरण ॥ सांडींअभिमानसुयोधना ॥ ४७ ॥ दुर्यो
धनबालेवचन ॥ आतांसोडूनअभिमान ॥ पांडवांसजाऊंशरण ॥ मैत्रीकराह्मणोनी ॥ ४८ ॥ वेचूंसमरंगणीप्राण
॥ कीर्तीनेंभरूंत्रिभुवन ॥ अर्जुनासमारीलकर्ण ॥ पाहेंकौतुकआतांचि ॥ ४९ ॥ इभमस्तकींचेंमुक्त ॥ घेऊंगेलामृग
नाथ ॥ तोहोऊनभयाभीत ॥ परतेलकायघडेहें ॥ ५० ॥ माझ्यादुःशासनाचेंरक्तपान ॥ केलेंभीमेंसमरींजाण ॥ त्या-
चामींघेईनप्राण ॥ किंवादेईनआपुला ॥ ५१ ॥ माझामस्तकींचामुगुट ॥ लत्ताप्रहारेंकरीनपिष्ट ॥ समरींभीमबोलि
लास्पष्ट ॥ तुवांश्रवणकेलेंकीं ॥ ५२ ॥ आतांकरूनपुरुषार्थ ॥ प्राणद्यावाहाइत्यर्थ ॥ असोइकडेकर्णआणिपार्थ ॥ र
णरंगींभीडती ॥ ५३ ॥ पूर्वींइंद्रआणिवृत्रासूर ॥ कींश्रावणारिसुतमयजावर ॥ शक्रारिआणिऊर्मिळाप्रियकर ॥

तैसेदोघेदीसती ॥ ५४॥ व्योमकेशआणित्रिपुरासुर ॥ कींतारकासुरआणिकुमार ॥ तैसाकर्णआणिकृष्णाप्रिय
कर ॥ निःशंकवीरदोघेही ॥ ५५ ॥ कर्णेंपार्थासलक्षून ॥ सोडिताजाहालादाहाबाण ॥ तेअर्जुनेंछेदून ॥ सोडिले
द्विगुणतयाने ॥ ५६ ॥ कर्णेंसोडिलेबाणशत ॥ सहस्त्रबाणींताडीपार्थ ॥ लक्षबाणींसूर्यसुत ॥ ताडिताझालातं
यानें ॥ ५७ ॥ यावरीतोवीरजेठा ॥ सोडिताझालाबाणकोटी ॥ अक्षयतूणीरपृष्ठी ॥ अर्जुनाचाभरलाअसे ॥ ५८
अमोघधनंजयाचे बाण ॥ सुटतेझालेचापापासून ॥ जैसेचतुराननाचेमुखांतून ॥ अपारशब्दनीघती ॥ ५९ ॥
कींरथक्रमवर्णक्रमेकरून ॥ पंडीनकरितीवेदाध्ययन ॥ तैसेचपळत्वेंअर्जुन ॥ शरसोडीअसंख्य ॥ ६० ॥ कीं
मेघाहूनअवधारा ॥ अपारपडतीतोयधारा ॥ कींओंकारापासोनअपारा ॥ ध्वनीजैशानीघती ॥ ६१ ॥ कींमू
ळमायेपासोनिएकसरें ॥ असंख्यजीवसृष्टीउभारे ॥ चपळलेखकापासावक्षरें ॥ असंख्यअक्षरेंउमटती ॥
६२ ॥ कर्णाचेंजेबाणजाळ ॥ एकाशरें छेदीकुंतीबाळ ॥ जैसेंउगवतांसूर्यमंडळ ॥ भगणेंसर्वझांकिती ॥ ६३ ॥
कींएकउठतांविनायक ॥ अपारसंहारीदंदशूक ॥ कींसुटतांचंडवातदेख ॥ जळदजाळवितुळे ॥ ६४ ॥ कींए
कविष्णुनामेंकरून ॥ असंख्यदुरितेंजातीजळोन ॥ कींचेततांद्विमूर्धान ॥ होतीविपिनेंदग्धपें ॥ ६५ ॥ असंख्य
बाणजाळसमस्त ॥ छेदूनपाडीएकक्षणांत ॥ जैसाएकहरीकरीबहुत ॥ पडतीगतप्राणहोउनी ॥ ६६ ॥ हृदयीं
प्रगटतांबोध ॥ सहपरिवारेंपळतीकामक्रोध ॥ कींप्रत्ययायेतांब्रह्मानंद ॥ क्षुद्रानंदवीरती ॥ ६७ ॥ अर्कजसो-
डीएकशर ॥ त्यापासावनिघतीअपार ॥ जैसाएकुलताएकपुत्र ॥ संततीवादेबहुत्याची ॥ ६८ ॥ तैलबिंदूजळीं
पडतां ॥ तोंपसरेचहुंकडेअवचिता ॥ तैसाकर्णेंएकबाणसोडितां ॥ पसरतीचहूंकडे ॥ ६९ ॥ बाणासझगटतां-
बाण ॥ तेव्हांवर्षतप्रळयाग्न ॥ बाणखंडपडतांउसळोन ॥ कित्तेकवनेंदग्धहोती ॥ ७० ॥ शस्त्रासिझगटतांश-
स्त्रें ॥ भयेंरिचवतीनक्षत्रें ॥ सप्तसमुद्रांचींनीरें ॥ तप्तझालींतेधवां ॥ ७१ ॥ कळाहीनशशीतरणी ॥ विमानेंप

ळविती सुधापानीं॥ वायु फिरोन लाहे धरणी॥ दिवस रजनी वाटत॥ ७२॥ जळती सकळ पांडव भार॥ ऐसें क
र्णे सोडिलें अग्निअस्त्र॥ वीरांचे रथ शस्त्रें समग्र॥ जळों लागलीं तेधवां॥ ७३॥ हरिनामें निरसती दोष समग्र॥
तेवि पार्थें सोडिलें जलदास्त्र॥ अग्नि विझाला समग्र॥ जैसी मत्सरें प्रीति मरे॥ ७४॥ जळमाजलें अद्भुत॥ कौर॰
वांची सेना वाहात॥ जैसा विवेक होतां प्राप्त॥ काम क्रोध निरसती॥ ७५॥ लोकप्राणेश अस्त्र॥ सोडिता झाला
सूर्यपुत्र॥ पार्थसेना समग्र॥ वायुचक्रीं पडियेली॥ ७६॥ पार्थें सोडून पर्वत॥ प्रभंजन कोंडिला समस्त॥ जैसा॰
मद अहंकार महंत॥ सत्यज्ञानें विभांडी॥ ७७॥ मग वज्रास्त्र जपोन॥ सोडिता झाला सूर्यनंदन॥ पार्थें माहेश्व
रदाकून॥ संहारिलें तेधवां॥ ७८॥ पार्थें कर्णाचा रहंवर॥ निजबाणें भेदिला समग्र॥ जैसे शोभती तृणांकुर॥ तेवि
रथ दिसतसे॥ ७९॥ निजरथीं शोभे सूर्यकुमर॥ जैसा निरभ्र नभीं सहस्त्रकर॥ कर्णें तेव्हां कार्तवीर्यास्त्र॥ अनि॰
वार सोडिलें॥ ८०॥ सहस्त्रकरांचे वीर॥ कोट्यावधी उठिले अपार॥ मग पार्थें भार्गवअस्त्र॥ असंभाव्य सोडिलें॥
८१॥ कर्णें सोडिलें महिषासुर॥ पार्थें शक्ती सोडिल्या समग्र॥ कर्णें जपतां सर्पास्त्र॥ गरुडास्त्र फाल्गुन जपे॥ ८२
कर्णें सोडिला अपांपती॥ किरीटिनें पाठविला अगस्ती॥ कर्णें प्रेरिली काळराती॥ सोडी गभस्ती पार्थ तेव्हां॥ ८३
यावरी कृष्णार्जुन॥ शरधारीं खिळिले संपूर्ण॥ मग पार्था प्रति भीमसेन॥ बोलता जाहाला तेधवां॥ ८४॥ कर्णें सं
हारिली पृतना॥ कौतुक काय पाहासी अर्जुना॥ मग बाणजाळीं शैल्य कर्णा॥ पार्थें खिळिलें तेधवां॥ ८५॥ शैल्य
आणि सोती॥ मयूर ऐसे दीसती॥ पांडवांचे बहुत हस्ती॥ कर्णें मारिले तेधवां॥ ८६॥ रथी आटले बहुत॥ स्वारां
स नाहीं तेथें गणित॥ धर्मराज कौतुक पाहात॥ कर्णार्जुनाचें तेधवां॥ ८७॥ गांडीवाचा गूण जाण॥ कर्णें छेदि॰
ला टाकूनि बाण॥ सवेंच अर्जुनें नूतन॥ लाविला गूण तात्काळ॥ ८८॥ थोर युद्धाचा कडकडाट॥ वाऱ्यास मध्यें न
फुटे वाट॥ तेथें द्विजाचा संघट॥ होईल केसा त्या ठाया॥ ८९॥ कृष्णावरी साठ बाण॥ सोडिता झाला वीर कर्ण॥ शैल्या

वरीशतमार्गण॥पार्थेंतेव्हांघातले॥९०॥दोहींदळींचेवीर॥पाहातीउगेचभयातुर॥जैसेचित्रींलिहिलेभार
॥तैसेदिसतीतेधवां॥९१॥हस्तलाघवदावीकर्ण॥त्याहूनविशेषदावीअर्जुन॥तोंकर्णाचेभातांयेऊन॥तक्षक
पुत्ररिघाला॥९२॥त्याचीमातारवांडववनीं॥पळतांमारिलीपार्थेंबाणीं॥तेथीलवैरस्मरोनी॥शरहोवोनिगुप्तव
से॥९३॥कर्णार्जुनश्रमलेफार॥आंगींचालिलेघर्मपूर॥विंजणेघेवोनिसेवकनर॥वाराघालितीदोघांवरी॥९४॥
चंदनकर्पूरमिश्रितनीर॥सेवकशिंपितीवारंवार॥दोघेहीकौंतेयसुंदर॥तनूसकुमारदोघांच्या॥त्यावरीतक्षक
बाण॥कर्णेंकाढिलाजेविसहस्रकीर्ण॥अर्जुनाचाकंठलक्षून॥अकस्मातसोडिला॥९६॥तोबाणअनिवार॥अ
र्जुनाचाप्राणघेणार॥शक्रादिदेवसमग्र॥हाहाःकारकरितीतेव्हां॥९७॥नित्यपूजिलातोबाण॥चर्चिलाचंदनें
करून॥त्याचबाणींतक्षकनंदन॥गुप्तरूपेंसंचरला॥९८॥कळवळिलाशचीरमण॥त्यासशांतवीचतुरानन॥
तूंधीरधरींएकक्षण॥व्याकूळमनहोऊंनेदीं॥९९॥अर्जुनासरक्षकपाहीं॥आहेक्षीराब्धीचाजांवई॥कौतुक
करीलयेसमयीं॥सावधानपाहातें॥१००॥प्रळयचपळेसमागेंटाकून॥निघताझालानिर्वाणबाण॥द्वादश
सूर्यांचेंतेजसंपूर्ण॥एकवटलेंशरींतया॥१॥कींस्फुटलाकाळदंड॥विदारीलवाटेब्रह्मांड॥मेरुमांदारशतखं
ड॥घायेंकरीलवाटतसें॥२॥सहस्रविजाकडकडति॥तैसाबाणजायसत्वरगती॥दोनीदळेंमोहपावती॥वी
रपळतीदशदिशा॥३॥धर्मभीमनकुळसहदेव॥भयाभीतवीरसर्व॥ह्मणतीहेविश्वव्यापककमळाधव॥
रक्षींरक्षींनिजदासा॥४॥परमआनंदलादुर्योधन॥आतांसर्वथानउरेअर्जुन॥माझेंराज्यआणिप्राण॥ओं
वाळीनकर्णावरूनी॥५॥वृक्षाचेंफळपाहोन॥पक्षीयेतीधांवोन॥तैसापार्थकंठलक्षून॥प्रळयबाणआला
तेव्हां॥६॥पांडवकैवारीजगन्नाथ॥बळेंदडपिलाविजयरथ॥गुडघेटेंकूनतेथ॥तुरंगबैसतरथाचे॥७॥च
क्रांसहीतरथ॥खालींलवलाहेंअद्भुत॥तोंमुकुटछेदूनअकस्मात॥बाणेंनेलातेधवां॥८॥तिळप्रायतुकडेक

रून॥ मुकुटपडिलाचूर्णहोउन॥ तोमुकुटचतुराननेंनिर्मुन॥ शक्रासपूर्वीदिल्हाहोता॥ ९॥ तोपरमप्रीतीनें॥
पार्थासदिधलासहस्त्रनयनें॥ असोअर्जुनजावाप्राणें॥ मुकुटावरीचपैंगेलें॥ १०॥ सूत्रधारकयादवेंद्र॥ भक्तरः
क्षकदयासमुद्र॥ विमानांतूनिपुरंदर॥ आनंदाश्रुढाळीतसे॥ ११॥ लक्षोनिपार्थश्रीधर॥ सुमनेंवर्षेवारंवार॥
पांडवकरितीजयजयकार॥ स्तवितीतेव्हांश्रीरंगा॥ १२॥ अस्तमानाजायचंडकीर्ण॥ तैसाकिरीटनेलाउडऊन
मगपार्थेंमूर्ध्निजसावरून॥ वस्त्रबांधलेंतेधवां॥ १३॥ यावरीतोतक्षकसुत॥ कर्णापाशीयेऊनिबोलत॥ ह्म
णेसंधानचुकलेंयथार्थ॥ पुन्हासोडींमजलागीं॥ १४॥ कर्णपुसेतूंकोण॥ तोसांगेपूर्ववर्तमान॥ मींमातेच्यापो
टघेईन॥ करीसंधानमागुती॥ १५॥ कर्णह्मणेमींकायबळहत॥ तुझाआश्रयेंयुद्धकरूंयेथ॥ वीरहांसतीलसः
मस्त॥ जायतूंत्वरितनिजस्थाना॥ १६॥ मगसर्पास्वरूपधरून॥ चालिलापार्थासलक्षून॥ कृष्णह्मणेपार्थाला
गुन॥ तक्षकपुत्रशत्रुतुझा॥ १७॥ मगबाणासोडूनिकृष्णमित्रें॥ खंडविखंडकेलींगात्रें॥ यावरीमगकुंतीपुत्रें॥
द्वादशशरसोडिले॥ १८॥ तेकर्णाचेंफोडूनिअंग॥ पलीकडेगेलेसवेग॥ सवेंचकर्णाचामुकुटसुरंग॥ चूर्णके
लाशरघायें॥ १९॥ कवचआंगींचेंछेदून॥ हृदयींभेदलेनवबाण॥ मूर्छनायेऊनिकर्ण॥ ध्वजस्तंभीटेंकला॥ मू
र्छनाजायनिरसोन॥ तोंवरीअर्जुननमारीबाण॥ मगसावधहोऊनकर्ण॥ सरसाऊनिबैसला॥ २१॥ अस्तमाना
जातांवासरमणी॥ तैसाकर्णआरक्तदिसेतेक्षणीं॥ मगसवेंचशतबाणीं॥ श्रीरंगासखिळियेलें॥ २२॥ सवेंचः
टाकोनिशतशर॥ कर्णेंपार्थकेलाजर्जर॥ मगपार्थासह्मणेंश्रीकरधर॥ काढींबाणशिवदत्तजो॥ २३॥ पृथ्वीः
आपतेजवायुअंबर॥ यांचींसत्वेंकाढूनिसमग्र॥ एकादशरुद्रद्वादशमित्र॥ त्यांचींतेजेंघेऊनी॥ २४॥ तोबाण
हिमनगजामात॥ रचीत्रिपुरवधानिमित्त॥ मगप्रसन्नहोऊनिदेत॥ पार्थालागींप्रीतीनें॥ १२५॥ तोंकर्णाचेंकर्म
गहन॥ नसुटेकदाभोगिल्यावीण॥ गुरुशापविप्रशापदारुण॥ सरसावलेअंतकाळीं॥ १२६॥ समीरगतीचालः

तांरथ॥ पृथ्वीनेंचक्रेंगिळिलीअकस्मात॥ मंत्रआठवेनासमयोचित॥ अस्त्रहिकदांस्मरेना॥ २७॥ शस्त्रेंशक्तिअद्भु
तबाण॥ असतांकदानव्हेस्मरण॥ हस्तलाघवगेलेंगळोन॥ तेजहीनमुखझालें॥ २८॥ दशदिशावाटतीशून्य॥
वाटेजवळआलेंमरण॥ परीतोभास्करीधैर्यधरून॥ पुढतीरणमाजवीत॥ २९॥ चापओढूनिआकर्ण॥ कर्णेंसोडिले
सातबाण॥ सच्चिदानंदतनूभेदून॥ बाणगेलेपैलीकडे॥ ३०॥ समबाणभेदूनगेले॥ परीकृष्णाचेंआसननढळे॥
जैसेंपंचशराचेनिमेळें॥ नचळेजेसामारुती॥ ३१॥ हाणतांकुठारतीक्ष्ण॥ वृक्षनजायसोडूनस्थान॥ कींवर्षतांअ
पारघन॥ अचळस्थानसोडीना॥ ३२॥ कींनिंदकनिंदितांअपार॥ नचळेसाधूंचेंअंतर॥ प्रल्हादासलाविलेविखार॥
परितेणेंधीरसोडिलानाहीं॥ ३३॥ जोषड्विकाररहिततनू॥ जोनरवीरपंचानन॥ तोपुराणपुरुषचक्रपाणी॥ सप्त
शरींभेदिला॥ ३४॥ पार्थाचेंहृदयींजाण॥ कर्णेंभेदिलेद्वादशबाण॥ सवेंचलघुचापछेदून॥ गांडीवाचेंटाकिलें॥
॥ ३५॥ पार्थलावीनूतन॥ सवेंचतोडूनटाकीकर्ण॥ असोएकामागेंएकगूण॥ शंभरतोडूनटाकिले॥ ३६॥ अर्जुनेंनि
र्वाणशरीं॥ कर्णखिळिलातेअवसरीं॥ तेव्हांकर्णाचारथधरत्री॥ गिळितीजाहालीविप्रशापें॥ ३७॥ तेवेळींसूर्यनं
दन॥ रथाखालींउतरोन॥ रथचक्रेंकाढीतउपटून॥ परीकदांनुपटेचि॥ ३८॥ धन्यकर्णाचेंअद्भुतबळ॥ डळमळलें
उर्वीमंडळ॥ परिसमीपआलाकाळ॥ चक्रसहसाउपडेना॥ ३९॥ तोंअर्जुनाचेयेतीबाण॥ मगबोलताझालाउदारक
र्ण॥ ह्मणेहेपार्थपंडूनंदन॥ क्षणेकस्थीरराहें॥ ४०॥ तूंवीरख्यातीवंत॥ अवकाशदेईंएकमुहूर्त॥ मजचक्रउपडूंदे
येथ॥ संकटींबहूपडलोंअसें॥ ४१॥ पार्थेंमुगुटनेलाछेदुन॥ कर्णाचीवीरगुंठीस्फुटोन॥ स्फवासकेशपसरले
जाण॥ शोभायमानदीसती॥ ४२॥ असोतोकर्णउदार॥ पार्थासविनवीवारंवार॥ मींव्यसनीपडलोंसाचार॥
भीतनाहींमरणातें॥ ४३॥ धर्माधर्मविचारबहुत॥ तूंसर्वजाणसीरणपंडित॥ त्याप्रतिहारकानाथ॥ प्रतिउत्त
रदेतसे॥ ४४॥ ह्मणेकर्णाधर्मन्यायनीती॥ तुजआतांकायस्मरलीचित्तीं॥ सभेसनेलीद्रौपदीसती॥ कपटद्यूत

रवेळोनी॥ ४५॥ तेव्हांधर्मन्यायनीती॥ तुजनाठवेकदाचित्ती॥ अजातशत्रूधर्मनृपती॥ कपटेंकरोनिनाडिला॥ ४६
विषघालोनमारिलाहृकोदर॥ वर्मीदंशविलेविखार॥ लाक्षासदनीलाविलावैश्वानर॥ तेव्हांधर्मनविचारिला॥
४७॥ वनाधाडिलेपंडूकुमर॥ शत्रीसमिळूनितुह्मीसमग्र॥ घालाघालावयादुराचार॥ येतहोतांकपटीहो॥ ४८॥ मि
ळूनअवघ्याजणीं॥ बाळअभिमन्यूमारिलारणीं॥ तूजधर्मनाठवेतेक्षणीं॥ मदेंकरूनिभुललासी॥ ४९॥ द्रौपदीन
व्हेदेवकीजाण॥ सभेंतगांजलीनेऊन॥ वस्त्रेंघेतलींफेडून॥ तेव्हांधर्मनविचारिला॥ १५०॥ आतांनिवटूनिसर्वत्र॥
धर्मावरीधरीनछत्र॥ ऐसेंबोलतांशतपत्रनेत्र॥ सूर्यपुत्रउगाचि॥ ५१॥ पार्थावरीसोडीशर॥ सवेंचिउपडीरथच
क्र॥ पार्थासह्मणेनीलगात्र॥ सोडीअस्त्रकायपाहासि॥ ५२॥ कर्णतिकडूनशरसोडी॥ सवेंचरथचक्रेंबळेंउपडी॥
शतबाणसोडूनिभेदी॥ अर्जूनमूर्छीतपाडिला॥ ५३॥ इतक्यांतउपटीरथचक्र॥ परितेंनदळेचिअणुमात्र॥ ब्रह्म
शापपरमदुस्तर॥ कदांमिथ्यानहोय॥ ५४॥ कृष्णह्मणेपार्थापाहीं॥ यासवधींजोरथावरीचदलानाहीं॥ मगबाण
सोडूनलवलाहीं॥ ध्वजछेदिलाकर्णाचा॥ ५५॥ हाहाःकारकरितीकौरवजन॥ आतांनवांचेकदाकर्ण॥ जयपारखा
झालायेथून॥ कर्मगहनपूर्वीचें॥ ५६॥ तोंपार्थेंशिवदत्तबाण॥ प्रळयविजेऐसादिल्हासोडून॥ कींतोमाध्यान्ही
चाचंडकीर्ण॥ तैसामार्गणदिसतसे॥ ५७॥ कींशिवहस्तींचात्रिशूळ॥ किंवावज्रस्फुटलेंप्रबळ॥ कींस्फुदर्शनतेजा
ळ॥ कृष्णहस्तींचेंचालिलें॥ ५८॥ पार्थकरीतेव्हांशपथ॥ जरीसत्यविद्याहेशिवदत्त॥ आणिविबुधेश्वराचेंसा
मर्थ्य॥ अपरमीतअसेल॥ ५९॥ द्रोणगुरूचेंपदकमळ॥ माझेंचित्ततेथेंअसेल॥ कायावाचामनेंनिर्मळ॥ कृष्णउ
पासकजरीअसें॥ ६०॥ तरियाबाणेंतत्काळ॥ तुटोकर्णाचेंशिरकमळ॥ तोबाणस्फुटतांतेजाळ॥ मूर्छीतजाहालीं
दोनीदळें॥ ६१॥ पर्वतावरीपडेचपळा॥ तैसाशरकंठीबैसला॥ कींसूर्यअस्तमानागेला॥ तैसेंशीरउडविलें॥ ६२
शीरऊर्ध्वगेलेंदेखा॥ मुखांतूननिघालीतेजकळिका॥ तेमिळालीजाऊनअर्का॥ लवणजळन्यायेंसि॥ ६३॥ जय

वाद्यांचागजर॥ पांडवदळींझालाअपार॥ वरिआनंदलापुरंदर॥ दुंदुभीवाद्येंवाजवी॥ ६४॥ दिव्यसुमनाचावर्षावते-
व्हां॥ वारंवारकरीमघवा॥ कौरवदळींतेधवां॥ शिरपडलेंकर्णाचें॥ ६५॥ कर्णपडतांरणमंडळीं॥ दुःखाश्रूढाळीअं-
शुमाळी॥ निजकरेंस्पर्शोनिअस्ताचळीं॥ सागरींस्नानकरीतसे॥ ६६॥ उरलेपांडवांचेवीरसंपूर्ण॥ एकमेकांदेतीआ
लिंगन॥ उत्तमदानींसंपूर्ण॥ भूसुरजाणतोषविले॥ ६७॥ रिताग्थघेऊनतेवेळीं॥ शैल्यप्रवेशलाकौरवदळीं॥ धर
णीवरीआंगघाली॥ दुर्योधनअतिशोकें॥ ६८॥ नेत्रोदकेंकरूनी॥ खालींभिजलीअवनी॥ आहाबाळमित्रामजटा-
कुनीं॥ कर्णवीरागेलासि॥ ६९॥ अहाकर्णापरमउदारा॥ अहांकर्णापरमसुंदरा॥ अहाकर्णासमरधीरा॥ गूणमीं
कितीआठवूं॥ ७०॥ हेकर्णवीराचंडकीर्णा॥ पावलासआजअस्तमाना॥ उदयोनव्हेचिपुन्हा॥ पडलीसेनाआंधारीं॥
७१॥ तुझियास्वरूपावरून॥ शंबरारिटाकावाओंवाळुन॥ कवचकुंडलेंमागोंआलाजाण॥ ब्राह्मणवेषेंशक्रतो॥ ७२
तूंउदारांचाराणासाच॥ तत्काळदेशीकुंडलेंकवच॥ कार्पण्यतानधरिशीसाच॥ कायावाचामानसें॥ ७३॥ औदार्य-
सत्वस्थपरोपकार॥ धर्मरायासमगंभीर॥ पराक्रमपुण्यपवित्र॥ तुजऐसानसेचि॥ ७४॥ रणमंडळसांडुनी॥ पळे-
तेव्हांकौरववाहिनी॥ इकडेभीमेंआनंदकरूनी॥ हाकफोडिलीआवेशें॥ ७५॥ प्रतिशब्दउठलानिराळीं॥ कौरवसे
नाकांपेचळीं॥ स्वदेशासतेकाळीं॥ कितेकजातीजीवभयें॥ ७६॥ वीरबोलतीभयेंकरून॥ पैलपाहाआलाअर्जु
न॥ एकह्मणतीदुःशासनाचेंरक्तपान॥ कर्ताभीमआलाहो॥ ७७॥ अहोतेव्हांभयसमुद्रांत॥ कौरवसेनाअवघीर
डत॥ कर्णाचेंस्तवनअद्भुत॥ शैल्यकरीतेधवां॥ ७८॥ ह्मणेकर्णाऐसावीरपाहीं॥ नोहेचकदांभुवनत्रयीं॥ होणा
रनटळेसहसाही॥ रणींमारिलाफाल्गुनें॥ ७९॥ इकडेधर्मराजकृष्णार्जुना॥ प्रीतीनेंदेतआलिंगना॥ ह्मणेहेकृ-
ष्णाजनार्दना॥ कितीउपकारआठवूं॥ ८०॥ आमुचीशोभासंपत्तीबळ॥ तूंचअवघातमाळनीळ॥ तूंचब्रह्मानंद-
निर्मळ॥ सगुणपणाआलासि॥ ८१॥ चिंतामणीचेदवळारी॥ जोपहुडलासुरवसेजेवरी॥ तोवोसणातांबोलिला

जरी॥ प्राप्तहोयसर्वही॥ ८२॥ तैसाआमुचेमनोरथीं॥ हरितूंजाहालासिसारथी॥ जेंजेंआह्मीइच्छितोंचित्तीं॥ तूं श्रीपतीपुरवीसी॥ ८३॥ खाऊनिकरकरांदांत॥ दुर्योधनधांवलासेनेसहित॥ पांडवसेनासंहारित॥ वीरपळतीद शदिशा॥ ८४॥ जैसाचापापासूनिस्फुटेबाण॥ तैसाधांवलाभीमसेन॥ गदाधायेंकरून॥ कौरवसेनाविभांडिली ॥ ८५॥ पंचवीससहस्रवीर॥ मारीततेव्हांवृकोदर॥ धृतराष्ट्राचाज्येष्ठकुमर॥ पराभऊनपळविला॥ ८६॥ रात्रजाहा लीपरमघोर॥ शिबिरींबैसलाचिंतातुर॥ कर्णासिआठऊनिवारंवार॥ दुर्योधनअश्रुगाळी॥ ८७॥ जेणेंद्रव्याचेप र्वत॥ ब्राह्मणांसदिधलेंअमित॥ रणाआलासूर्यसुत॥ करूनिसमस्तग्रहदानें॥ ८८॥ हरिवरध्वजाचेरथी॥ द्विज वरध्वजझालासारथी॥ ह्मणोनियांजयप्राप्ती॥ झालीनिश्चितीतयातें॥ ८९॥ देवऋषीस्वस्थाना॥ चालिलेवर्णीत- भीमार्जुना॥ कोणीवर्णितीकर्णा॥ धीरउदारह्मणोनियां॥ ९०॥ धर्मराजरथींबैसोन॥ सुगंधस्नेहदीपिकालाउन॥ क पूरदीपिकापाजळुन॥ सहस्रसेवकचालती॥ ९१॥ कर्णपडिलारणमंडळीं॥ धर्मजवळयेऊनन्याहाळी॥ महावीरपड लेस्थळोस्थळीं॥ अळंकारेंमंडित॥ ९२॥ नक्षत्रेंक्षितीसपडती॥ तेविंअळंकारशस्त्रेंझगमगती॥ असोपांडवशिबि राप्रति॥ जातेजाहालेतेधवां॥ ९३॥ कृष्णकृपेचेंबळअद्भुत॥ रणींमारिलासूर्यसुत॥ सुखेंनिद्रापांडवकरित॥ सर्व चिंतासोडुनी॥ ९४॥ धृतराष्ट्रालागुन॥ संजयसांगेवर्तमान॥ रणींपडिलावीरकर्ण॥ जोकांप्राणकौरवांचा॥ ९५॥- धृतराष्ट्रआणिगांधारी॥ बुडालींतेव्हांशोकसागरीं॥ संजयविदूरनानापरी॥ शांतवीततयातें॥ ९६॥ जन्मेजयधरणी नाथ॥ व्यासवैशंपायनसांगत॥ शौनकादिकांशिसूत॥ कथासांगतनैमिषारण्यीं॥ ९७॥ कर्णपर्वसंपलेंयेथुन॥ पु ढेंशैल्यपर्वकराश्रवण॥ श्रीधरब्रह्मानंदेंकरून॥ विनवीतश्रोतयांतें॥ हेंकर्णपर्वऐकतांनिर्मळ॥ अश्वमेधाचेंजोडे फळ॥ श्रवणकरीजोपुण्यशीळ॥ इच्छिलेंफळपावेतो॥ ९९॥ तोहोयधनधान्ययुक्त॥ पुत्रपौत्रींसुखेंनांदत॥ माधव उमाधवजेसमस्त॥ कृपाकरितीत्यावरी॥ १००॥ ब्राह्मणासहोयविद्याप्राप्त॥ क्षत्रीऐकतांविजयसत्य॥ निरंतरध-

धान्ययुक्त॥ वैश्यशूद्रहोतीश्रवणें॥२०१॥ कर्णपर्वक्षीराब्धीदेरव॥पार्थरथशेषमंचक॥तेथेंविराजेवैकुंठनायक॥स
र्वसामर्थ्यसहितपैं॥२०२॥जेथेंजयश्रीहेचकमला॥अर्धांगींवसतसेवेल्हाळा॥ ह्मणोनिहोतसेसोहळा॥पांडवघरीं
सर्वदा॥२०३॥श्रीद्धीमातदविहारा॥ ब्रह्मानंदासौख्यसमुद्रा॥पांडुरंगाश्रीधरवरा॥दिगंबराआदिपुरुषा॥ ४॥पुढें
शैल्यपर्वअवधारा॥पंडितश्रोतेश्रवणकरा॥श्रीधरवरदाजगदोद्धारा॥मनोरथींबैसेंकां॥५॥स्फुरसपांडवप्रताप
ग्रंथा॥कर्णपर्वव्यासभारत॥त्यांतीलसारांशयथार्थ॥ एकुणपन्नासाव्यांतकथियेला॥२०६॥ ॥श्रीकृष्ण॰
॥श्रीरामकृष्णार्पणमस्तु॥ ७ ७ ७ ७ ७ ७

श्रीगणेशायनमः॥ पंढरीदक्षिणद्वारका॥तुजआवडेरुक्मिणीनायका॥सांडोनियांवैकुंठसुखा॥पुंडलिकालागींआला
सि॥१॥समचरणसमकटीकर॥उदारवदनआकर्णनेत्र॥तोचितूंब्रह्मानंदयतींद्र॥भीमातीरविहारी॥२॥मागेंसंप
लेंकर्णपर्व॥आतांशैल्यपर्वअपूर्व॥एकाचअध्यायांतसर्व॥सुरसकथावर्णिली॥३॥जन्मेजयासह्मणेवैशंपायन॥
संजयेंकथिलेंधृतराष्ट्रालागुन॥रणीपडलावीरकर्ण॥दुर्योधनशोककरी॥४॥दुखसागरींदुर्योधन॥बुडालानाठवे
कांहींस्मरण॥नेत्रींवाहेअश्रुजीवन॥कर्णाकर्णाह्मणोनिबाहे॥५॥मागेंपडिलेभीष्मद्रोण॥परीनकष्टीदुर्योधन॥
कर्णावरीतेणेंप्राण॥ठेविलाहोतासर्वस्वें॥६॥शारद्वतकृपयासहित॥शकुनीकृतवर्माभद्रनाथ॥आणीकहीवीर-
समस्त॥दुर्योधनासमजाविती॥७॥दुर्योधनह्मणेशैल्या॥बळसमुद्रापरमकुशळा॥तुजवीणरक्षिताराहिला॥
कोणअसेआह्मातें॥८॥सेनापतीजैसाषडानन॥तैसातूंभाससीमजलागुन॥यावरीतोशैल्यपूर्ण॥पुरुषार्थबो
लेआपुला॥९॥मारोनियांपंडूपुत्र॥तुजवरीमींधरीनछत्र॥माझेंयुद्धविचित्र॥विलोकींतूंयावरी॥१०॥अभिषे
कूनशैल्यवरिष्ट॥देतसेनापतीत्वरणपट॥वस्त्रेंअळंकारअतिश्रेष्ठ॥देताझालातेधवां॥११॥उरलीघेऊनअवघी
सेना॥शैल्यनिघालासमरंगणा॥लागलींरणतुरेंनाना॥घोषनादेंगर्जती॥१२॥इकडेसिद्धझालेंपांडवदळ॥वा
जतीवाद्यांचेकल्लोळ॥प्रतापतेजेंदिसेसबळ॥सकळवाहिनीतेधवां॥१३॥दाहादिवसपर्यंत॥भीष्मेंयुद्धकेलेंअ
द्भुत॥द्रोणाचार्यगुरुनाथ॥दिवसपांचतेणेंकेले॥१४॥दोनदिवसकर्णेंजाण॥युद्धकेलेंअतिदारुण॥एवंच-
झालेसप्तदशदिन॥अठरावाएकउरला॥१५॥त्यांतशैल्याचाअर्धदिन॥अर्धकरीलदुर्योधन॥यावरीयुद्ध-
संपूर्ण॥जाहलेंमगसहजचि॥१६॥सुयोधनह्मणेशैल्यालागुन॥त्वांआपुलेभगिनीसुतसांडुन॥सात्यझाला
सिआह्मालागुन॥तुजकल्याणहोआतां॥१७॥धर्मासह्मणेइंदिराजीवन॥तूंयुद्धकरींनिर्वाण॥घेईंशैल्या-
चाप्राण॥भरींत्रिभुवनप्रतापें॥१८॥दुर्योधनसांगेवीरांसमस्तां॥शैल्याचीपाठिराखाआतां॥मागेंराहील

त्याचेमाथां॥ पंचमहापातकें॥ १९॥ सैन्यकरोनिअवघेंगोळा॥ शैल्येंव्यूहरचियेला॥ व्यूहस्थानीं आपणराहिला
डावेकडेकृतवर्मा॥ २०॥ उजवेकडेशारद्वत॥ पाठिराखाद्रोणसुत॥ दुर्योधनमध्येंविराजित॥ इंद्रजीतज्या
परी॥ २१॥ कृतवर्म्यावरीपार्थ॥ धांवलाजैसाप्रळयकृतांत॥ लक्षोनियांशारद्वत॥ वृकोदरलोटला॥ २२॥ श
कुनीवरीसहदेवसबळ॥ उलूकावरीधांवलानकुळ॥ संजयह्मणेरायादळ॥ आतांथोडेंउरलेंसे॥ २३॥ दोन
लक्षअश्वस्वांर॥ इभउरलेदाहासहस्त्र॥ पंचदशसहस्त्ररहंवर॥ पायदळतीनकोटी॥ २४॥ आंतांपांडवदळ
लक्षअश्वस्वांर॥ साहासहस्त्रउरलेरथी॥ हस्तीउरलेपांचसहस्त्र॥ २५॥ लक्षअश्वस्वांर·
उरलेंकिती॥ तेहीरायाएकगणती॥ साहासहस्त्रउरलेरथी॥ हस्तीउरलेपांचसहस्त्र॥ २५॥ लक्षअश्वस्वांर·
उरलासे॥ कोटीएकपायदळादिसे॥ असोसंग्रामअतिआवेशें॥ मांडलातेव्हांरणभूमी॥ २६॥ उष्णीषकुंडलांसमवेत॥
शिरेंउडतीअसंख्यात॥ वीरपाणीचंदनचर्चित॥ बिरुदांसहितचरणपडले॥ २७॥ पांडववीरांचाथोरमार॥ पळों
लागलेकौरवभार॥ यावरीतोशैल्यवीर॥ धर्मावरीधांवला॥ २८॥ तोरथावरीधर्मपवित्र॥ मस्तकींविराजेआतपत्र॥
तपनपत्रेंअतिविचित्र॥ मकरबिरुदेंपुढती॥ २९॥ चित्रसेनकर्णसुत॥ नकुळासवेंयुद्धकरित॥ तेणेंकरूनपुरुषा·
र्थ॥ केलाविरथनकुळतेव्हां॥ ३०॥ मगनकुळपांयेंधांवोन॥ असिलताकरींघेऊन॥ चित्रसेनासमीपजाऊन॥ शि
रछेदिलेंपुरुषार्थें॥ ३१॥ किरीटकुंडलेंसमवेत॥ कौरवदळींशीरटाकित॥ आणिकेरथींनकुळबैसत॥ वीरसमग्र
मानवती॥ ३२॥ सुरसेनआणिसत्यसेन॥ आलेनकुळावरीधांवोन॥ अद्भूतयुद्धमाद्रीनंदन॥ करिताआहलातेधवां
॥ ३३॥ सुरसेनसत्यसेनलक्षून॥ नकुळेंटाकिलेदिव्यबाण॥ दोघांचींशिरेंउडऊन॥ आकाशपंथेंधाडिलीं॥ ३४॥
कृतवर्म्याचीवाहिनी॥ पार्थेंसंहारिलीतेक्षणीं॥ इकडेशैल्यधर्मरणांगणीं॥ निकुरेंकरूनिभीडती॥ ३५॥ तोंगं
दाघेऊनवृकोदर॥ शैल्यावरीधांवलासत्वर॥ तोंमद्रराजेंचौदातोमर॥ भीमावरीभिरकाविले॥ ३६॥ अश्वास
हीतस्यंदन॥ भीमेंकेलारणींचूर्ण॥ मगशैल्यगदाघेऊन॥ चरणचालीधांवला॥ ३७॥ गदायुद्धीरवणरवणाटी॥

होऊं लागली अग्निवृष्टी ॥ गदाघायें शेवटीं ॥ शैल्य मूर्छा पावला ॥ ३८ ॥ सवेंच शैल्य उठोन ॥ दुजे रथीं बैसला येऊन ॥ मागुती धर्मासीं दारूण ॥ युद्ध तेणें मांडिलें ॥ ३९ ॥ शैल्यनें व्हांशत बाणीं ॥ धर्म खिळिला समरंगणीं ॥ ऐसें विपरीत देखो नी ॥ वीर उठावले अवघेच ॥ ४० ॥ गदा बाण शक्ती तोमर ॥ असिलता परिघ अपार ॥ शैल्यावरी सकळ वीर ॥ वर्षाव करिती ते धवां ॥ ४१ ॥ तितुक्यांची ही शस्त्रें ॥ शैल्यें छेदिलीं क्षणमात्रें ॥ कृष्णार्जुनासि गुरुपुत्रें ॥ युद्ध निकुरें मांडिलें ॥ ४२ ॥ संवत्सर संख्या बाणीं ॥ पार्थास भेदिता झाला ते क्षणीं ॥ पुराण संख्या मार्गणीं ॥ चक्रपाणी भेदिला ॥ ४३ ॥ पांडवसेनेचा संहार ॥ गुरुपुत्रें केला अपार ॥ पडिले प्रेतांचे दीग थोर ॥ मार्गन चाले रथातें ॥ यावरी पार्थें रणरंगीं ॥ गुरुपुत्र खिळिला सर्वांगीं ॥ पांच सहस्त्र वीर वेगीं ॥ विजयें मारिले ते धवां ॥ ४५ ॥ गुरुसुतें लोहमुसळ ॥ अर्जुनावरी टाकिलें तत्काळ ॥ तें एकाच बाणें सबळ ॥ छेदोनियां टाकिलें ॥ ४६ ॥ सवेंच तेणें परिघ टाकिले ॥ पार्थें तीन बाणीं छेदिले ॥ पांच बाण सवेंच काढिले ॥ विज्जू ऐसे पार्थवीरें ॥ ४७ ॥ सर्प संचरती वारुळांत ॥ तेंवि आंगीं बाण जाहाले गुप्त ॥ मूर्छना येऊनि गुरुसुत ॥ ध्वजस्तंभीं टेंकला ॥ ४८ ॥ इकडे शैल्यें निजबाणीं ॥ जर्जर केली पांडववाहिनी ॥ कौरवसेना तये क्षणीं ॥ पार्थ तिकडे संहारी ॥ शैल्यावरी सबळ ॥ धर्में घातलें बाणजाळ ॥ भीम सहदेव नकुळ ॥ पाठीरक्षिते धर्माची ॥ ५० ॥ धर्म ह्मणे चक्रपाणी ॥ आजि शैल्य मारीन समरंगणीं ॥ माझा अभिमान ये क्षणीं ॥ सिद्धी पाववीं श्रीरंगा ॥ ५१ ॥ केशव ह्मणे युधिष्ठिरा ॥ करीं आतां बहु त्वरा ॥ आजि समग्र यशाचा तुरा ॥ तूंच पावशी निर्धारें ॥ ५२ ॥ समरंगणीं धर्मभूपाळ ॥ कौरवां दिसे केवळ काळ ॥ युधिष्ठिरें ब्रह्मांड गोळ ॥ हाकें सरिसा गाजविला ॥ ५३ ॥ सिंदूरें चर्चिला नगदेख ॥ आरक्त फुलला किंशुक ॥ अनंतविजय शंख ॥ धर्मरायें त्राहाटिला ॥ ५४ ॥ शैल्याचीं चापें समरंगणीं ॥ धर्में शत छेदिलीं तये क्षणीं ॥ बाण बाणाचे संघटनीं ॥ पावक ज्वाळा वर्षत ॥ ५५ ॥ बाणजाळें कौरवरणीं ॥ जर्जर केले समरंगणीं ॥ मद्रराज सहस्त्र बाणीं ॥ धर्मरायें विंधिला ॥ ५६ ॥ चापें अलात्तचक्रापरी ॥ भ्रमती दोघांचे

हस्तांवरीं॥वर्मेंलक्षोनिपरस्परीं॥बाणभेदितीरणशूर॥५७॥धन्ययोद्धायुधिष्टिर॥मानितीविमानींसुरवर॥शतधनुष्येंशैल्य
नृपवर॥धर्माचींछेदिताजाह्मला॥५८॥धर्माचेंउणेंदेखोन॥पुढेंधांवलाभीमसेन॥बाणघातेंकरून॥कवचछेदिलेंशैल्याचें॥
५९॥धर्मेंशक्तिकाढिलीबाहेरी॥तिचीप्रतिमानाहींदूसरी॥जेधर्मराजेंदिव्यमंत्रीं॥अर्चिलीत्रिकाळपूजोनी॥६०॥तेकाळश
क्तीपरमप्रबळ॥किंवाकाळसर्पाचीगरळ॥कींप्रळयाग्नीचीकराळ॥सुरव्यज्वाळाप्रगटली॥६१॥सप्तकोटीमंत्रांचेंतेज॥जी
चेठाईवसेसहज॥घंटापताकातेजःपुंज॥पाहातांसूर्यझांकोळे॥६२॥दिव्यरत्नेतेजबुंद॥ठायींठायींतीससुबुद्ध॥विधात्या
नेंकुशलत्वबहुविध॥करोनिशक्तीरचिलीते॥६३॥तेब्रह्मशक्तीअनिवार॥बाहेरकाढीयुधिष्ठिर॥जपोनियांअथर्वणमंत्र
न्यासध्यानादिसर्वही॥६४॥सहस्त्रविजांचेंतेजअद्भुत॥धर्मेंसोडिलीअकस्मात॥पर्वतींपडे वज्रघा त॥तैशीहृदयींसंच
रली॥६५॥शैल्याचेंहृदयफोडूननिघाली॥पृथ्वीमाजीसंचरली॥पाताळउदकींविझाली॥जावोनियांतेधवां॥६६॥असोशैल्य
पडलारणीं॥जयजयकारेंगर्जेपांडववाहिनी॥जयवाद्यांचेंतयेक्षणीं॥मंगळघोषलागले॥६७॥शैल्यबंधूमहावीर॥धर्माव-
रीधांवलासत्वर॥त्याचेंहीक्षणमात्रेंशिर॥ऊर्ध्वपंथेंउडविलें॥६८॥कौरवदळींहाहाःकार॥अष्टदिशानींपळतीवीर॥रक्त
गंगेचेपूर॥लवणाब्धीपाहोंधांवती॥६९॥धर्माचेंशूरत्वपूर्ण॥वारवाणितीदेवशचीरमण॥भूतळींचेराजेकृष्णार्जुन॥ह्म
णतीधन्यवीरहा॥७०॥शैल्याचेंउरलेंदळ॥स्वदेशाचालिलेतत्काळ॥तेंदुर्योधनेंराहविलेंसकळ॥प्रार्थोनियांआद
रें॥७१॥गदाघेवोनिवृकोदर॥प्रळयतेणेंकेलाथोर॥एकवीससहस्त्रवीर॥रणांगणींमारिले॥७२॥मकरालयजें
साविशाळ॥तेंसेंरणपाडिलेंपुष्कळ॥यावरीशाल्वनामासबल॥म्लेंछपतीउगवला॥७३॥हस्तीवरीबैसोन॥तेणें
युद्धकेलेंनिर्वाण॥ऐरावतासमान॥गजतयाचाफिरतसे॥७४॥पांडवसेनेचासंहार॥म्लेंछेंकेलाअपार॥त्यावरीधृ
ष्टद्युम्नमहावीर॥शरसोडीतधांवला॥७५॥युयुधानेंशतबाणीं॥ईभजर्जरकेलारणीं॥गजबाणभयेंकरून॥रा
नोरानींपळतसे॥७६॥मगसात्यकीनेंगदाघालून॥गजमारिलानलगतांक्षण॥सर्वेचबाणटाकून॥शीरछेदिलें

शाल्याचें॥७७॥तेंदेखोनिदुर्योधन॥पुढेंधांवलावर्षतबाण॥एकअर्जुनवेगळाकरून॥सर्ववीरखिळियेले॥७८॥दुर्यो
धनेंशनबाण॥धर्मावरीटाकिलेनिर्वाण॥दशबाणींभीमसेन॥खिळिलाक्रोधेंकरूनियां॥७९॥मगगदाघेऊनिभीम
सेन॥दुर्योधनासहाकदेऊन॥रथसमरींकेलाचूर्ण॥सुयोधनपळाला॥८०॥द्रौपदीचेपांचसूत॥त्यांहींवेढिलाशार-
द्वत॥जेविंइंद्रियानींसाधुसंत॥करिजेजैसेघाविरे॥८१॥यावरीसातशेंरथीजाण॥धर्मावरीपाठवीसुयोधन॥तेंदेखो-
नपांडवसैन्य॥अवघेंचउठावलें॥८२॥साहासहस्त्रघेऊनिस्वार॥शकुनीधांवलाकपटसागर॥परिनितुक्यांचासंहार
पार्थेंकेलातेसमयीं॥८३॥रणांगणींशतरथी॥तत्काळमारीसुभद्रापती॥दोनसहस्त्रस्वारशतहस्ती॥मेतेंकरूनीपा
डिलीं॥८४॥पायदळतीनसहस्त्र॥केलातयाचासंहार॥शकुनीलक्षोनिसमोर॥पार्थवीरबोलत॥८५॥माझेंराज्यर
हेंशकुनी॥तुवांनेलींकपटेंकरूनी॥तूजमारूनसमरंगणीं॥आणवीनसर्वही॥८६॥कौरवस्त्रियावेगळ्याकरून॥स
मस्तांशिंदाखवितोंयमसदन॥तोंसुशर्मावर्षनबाण॥पार्थासमोरपातला॥८७॥अष्टादशबाणेंकरून॥भेदिताझाला-
पाकशासन॥तेणेंसर्वेंचिऐंशींमार्गण॥टाकोनिसुशर्माखिळिला॥८८॥घालोनियांबाणजाळ॥संहारिलेंसुशर्म्याचें
दळ॥जैसेंशुष्कवनअनळ॥जाळोनियांभस्मकरी॥८९॥चारघटिकापर्यंत॥युद्धजाहालेंअद्भुत॥मगबाणटाकिलाइंद्र-
दत्त॥प्रळयकृतांतजैसाकां॥९०॥तोशरयोजिलागुणीं॥वोढूनिलाविलादक्षिणकर्णीं॥सुशर्मासंसारापासोनी॥मुक्त
जाहलातेधवां॥९१॥त्याचेपंचदशपुत्र॥होतेपित्यासमानशूर॥त्यांचींशिरेंसमग्र॥पार्थेंछेदिलींतेधवां॥९२॥सुद
र्शनसत्यसेन॥तेहीकौरवदोघेजण॥फाल्गुनेंशिरेंछेदून॥तत्काळत्यांचींटाकिलीं॥९३॥उलूकशकुनीचानंदन॥
तोनिःशंकधांवलावर्षतबाण॥नकुळासियुद्धदारूण॥बहूतकेलेंतेधवां॥९४॥मगटाकोनिनिर्वाणशर॥उलूकाचें
उडविलेंशीर॥त्याचेदुःखेंशकुनीवीर॥रुदनकरीतअतिशोकें॥९५॥विदुराचींवचनेंमनीं॥आठविताझालाशकुनी
मगहातींखड्गघेउनी॥क्रोधेंकरूनधांवला॥९६॥तोंसहदेवेंटाकोनिबाण॥खड्गटाकिलेंछेदून॥शकुनीगदाघेऊन॥

धांवताजाहलातेधवां॥९७॥सहदेवपरमपुरुषार्थी॥गदातोडूनपाडिलीक्षिती॥शकुनीनेंटाकिलीशक्ति॥तेही केलीत्रिखंड॥
॥९८॥सहदेवबोलेगर्जोनी॥ह्मणेकुटिलकपटियाशकुनी॥कर्मकेलेंजसेंमुळींहुनी॥त्याचेंफळभोगींहें॥९९॥माझीं
भांडारिचींरत्नेंशकुनी॥नेलींसतीसत्वरआणीं॥तुझेहातपायखंडोनीं॥टाकीनरणींपाहेंआतां॥१००॥ध्वजसारथीआ
णिस्यंदन॥छेदूनपाडीमाद्रीनंदन॥शकुनीखालींउतरोन॥त्रासघेऊनचालिला॥१॥तोंसहदेवेंसोडलेदोनबाण॥ध
रादेवतयमकृशान॥दोनीभुजाछेदून॥शकुनीच्यातेव्हांटाकिल्या॥२॥सवेंदोनशरयोजिले॥चरणतयाचेदोनीखं
डिले॥मगसूर्यमुखबाणेंतेवेळे॥शीरउडविलेंशकुनीचें॥३॥भुजापिटोनिगर्जेसहदेव॥वरोनपुष्पवर्षावकरीवास-
व॥जयवाद्यांचाघोषअपूर्व॥पांडवदळींगर्जत॥४॥चौघेबंधूयेऊन॥सहदेवासदेतीआलिंगन॥वासुदेवह्मणेधन्य
कपटीशकुनीवधियेला॥५॥शकुनीचेंसैन्यउरलें॥तेंपार्थेंअवघेंमारिलें॥अकराक्षोणीदळसगळें॥सर्वआटलें-
कुरुक्षेत्रीं॥६॥जैसातडागभरलाविशाळ॥त्याचेचौपारींफुटलेंजळ॥कींप्राणगेलियासकळ॥निचेष्टीतइंद्रियें॥७॥
मनाचेंठाणेंउठलेंनिश्चिती॥मगतेथेंकासयाराहेलप्रीती॥तेविभीष्मद्रोणादिपडितांरणक्षिती॥मावळलेंसर्वदळ॥
८॥पांडवदळहीआटलें॥त्यामाजींकिंचितउरलें॥त्याचेंगणीतकेलें॥वैशंपायनऐकातें॥९॥दोनसहस्त्ररहंवर॥
आणिसातशतेंकुंजर॥पांचसहस्त्रस्वार॥पायदळसहस्त्रसाहा॥१०॥दुर्योधननेसमयीं॥गदाहस्तींएकलाचपाहीं॥
संहारलेबंधूसर्वही॥एकहीउरलानसेच॥११॥बैसावयाएकवहन॥एकलाचपळेदुर्योधन॥मगद्वैपायनडोहपाहो
न॥उडीत्यांतटाकिली॥१२॥विदुराचींवचनेंआठउनी॥शोकेंआरंबळेतयेक्षणीं॥आटलीसर्ववाहिनी॥चौघेत्यांत-
जीतउरले॥१३॥दुर्योधनकृतवर्मागुरुसूत॥चौथाउरलाशारद्वत॥संजयह्मणेत्यायुद्धांत॥मीहीरायागेलोंहोतों॥१४
मींआतांचआलोंजाऊन॥मजवरीहीखड्ग घेऊन॥सात्यकीआलाधांवोन॥मजलागींवधावया॥१५॥मगप्रगटले-
व्यासदेव॥त्यांहींसोडविलामाझाजीव॥म्यांशस्त्रकवचटाकूनसर्व॥कोशएकपळालों॥१६॥तोंदुर्योधनतेथ॥एकला

चदेखिलारडत॥मींहीदुःखेंदाटलोंबहुत॥मगत्यासहृत्तपुशिलें॥कृतवर्माशारद्वतगुरुनंदन॥हेगेलेमहावनांपळोन॥मग बोलिलादुर्योधन॥सांगजाऊनधृतराष्ट्रा॥१८॥याकृष्णद्वैपायनडोहांत॥मीयेकलाअसेंयेथेंगुप्त॥मजहीदशाझालीप्राप्त॥पूर्वकर्मस्फुटेना॥१९॥मगजळस्तंभकरून॥त्याडोहींराहिलादुर्योधन॥पुढेंआलोंनोंनिघेजण॥मजलापुसोंलागले॥२०॥कोठेंआहेदुर्योधन॥म्यांसांगीतलेंह्रदाचेंस्थान॥महादुर्धरवनींजाण॥निघेराहिलेघटारवाली॥२१॥अस्तासगेला-आदित्य॥इकडेपांडवसेनाधांवत॥दुर्योधनासशोधित॥कोठेंलपालाह्मणोनी॥२२॥दुर्योधनांचींशिबिरेंनिश्चिंनी॥ शिरीसर्वभणभणिती॥कित्नेकवीरपल्यापळती॥जातीसत्वररानोरान॥२३॥कींत्यालावण्यहरिणी॥प्रलापकरितीजा-तीकाननी॥पांडवांकडेगेलाह्मणोनी॥युयुत्सुमात्रएकउरला॥२४॥वैशंपायनह्मणेजन्मेजया॥युयुत्सुधर्मासिपुसो-नियां॥गजपुराआलालवलात्या॥तोंविदुरत्तयासपुसे॥२५॥कायवर्तलासांगसमाचार॥ह्मणेजाहलासर्वसंहार॥विदुरकरीहाहाःकार॥कायउत्तरबोलिला॥२६॥युयुत्सवातूंउरलासि॥यष्टीयेवदीतरीअंधासि॥तूंसत्वरजाधर्मापा-शीं॥तूजकोणीमारितील॥२७॥गजपुरींहाहाःकार॥शून्यदिसेअवघेंनगर॥कळाहीनराजमंदीर॥कळसदळूनपडियेले॥२८॥वैशंपायनह्मणेजन्मेजया॥इतकेनशैल्यपर्वझालेंराया॥गदापर्वयेथोनियां॥तेंहीश्रवणपुढेंकरीं॥२९॥शौनकादिमहामुनी॥श्रवणकरितीनैमिषारण्यीं॥वेदव्यासप्रसादेंकरूनी॥सूतसांगेतयातें॥३०॥ब्रह्मानंदेंश्रीधर॥पंडितांविनवीजोडूनिकर॥गदापर्वसुरसफार॥येथूनपुढेंश्रवणकरा॥३१॥श्रीमद्भीमातीरविहारा॥श्रीधरवरदात्रिभुवनेश्वरा॥श्रीब्रह्मानंदयतींद्रा॥बोलवीपुढेंयेथोनियां॥३२॥स्फुरसपांडवप्रतापग्रंथ॥शैल्यपर्वव्यासभारत॥त्यांतीलसारांशयथार्थ॥पन्नासाव्यांतकथियेला॥३३॥ ॥श्रीकृष्णार्पणमस्तु॥ ॥छ छ छ

श्रीगणेशायनमः॥श्रीसरस्वत्यैनमः॥ श्रीपांडुरंगापंढरीशा॥पांडवपाळकापुराणपुरुषा॥ पद्मजनकापयाब्धिवा-
सा॥पंकजनेत्रापरात्परा॥१॥तुझेंचरित्रजेंवर्णिलें॥पूर्वाध्यायींशल्यपर्वसंपलें॥ येथूनगदापर्वकथियेलें॥वै
शंपायनेंजन्मेजया॥२॥धृतराष्ट्रह्मणेसंजयाप्रति॥दुर्योधनासपांडवशोधिती॥मजरवेदवाटतोचित्ती॥पुढिलक
थींवर्तमान॥३॥संजयह्मणेपांडवसेना॥चहूंकडेशोधितीदुर्योधना॥शिबिरेंसदनेंपाहतीजाणा॥हुडकूनियांसर्व
ही॥४॥तोंकृतवर्माकृपयासकृत॥कृपयाबंधूनिजात्मासत्य॥तेहीदुर्योधनाशोधित॥ह्रदाजवळीपातले॥५॥ह्मण
तीबाहेरयेईदुर्योधना॥युद्धकरूनमारूंपृतना॥अथवाजाऊंसायोज्यसदना॥समरंगणींझुंजोनियां॥६॥आंतून
दुर्योधनबोलत॥मीश्रमलोंअसेंअत्यंत॥उदईकयुद्धकरूंयथार्थ॥जिंकूंसत्यपंडुसुता॥७॥तोंभीमाचेपारधी-
जाण॥जानहोतेश्वापदेंमारून॥तिहींतेशब्दऐकोन॥जाऊनभीमासांगीतलें॥८॥द्वैपायनडोहांमधून॥तिघांसि-
बोललासुयोधन॥ऐसेंपांडवींऐकोन॥पारध्यांसवस्त्रेंदिधलीं॥९॥पांचपांडवआणिकेशव॥उरलीपृतनाधांवे-
सर्व॥धृष्टद्युम्नसात्यकीपांडव॥द्रौपदीचेधांवती॥१०॥नवलेतेतिघेजणरथी॥पळोनगेलेवनाप्रति॥पांडवह्रदास-
मीपयेती॥परिसुमनबोले॥११॥गदाजवळीघेऊन॥जळींआहेसुयोधन॥पांडवांसह्मणेमधुसूदन॥कपटपाह्या
केसेंयाचें॥१२॥मगधर्मबोलेतेसमयीं॥दुर्योधनातूंबाहेरयेईं॥आतांलपोनव्यर्थकांहीं॥डागलागेलक्षत्रियध-
र्मा॥१३॥एवढातुझाअभिमान॥आजिकोठेंदाकिलानेऊन॥युद्धकरींबाहेरयेऊन॥समरंगणमाजवीं॥१४॥काय
करिसीवांचोन॥राज्यअथवास्वर्गभुवन॥एकघेसाधूनजळामधून॥बाहेरलवकरयेईंतूं॥१५॥दुर्योधनह्मणे
मींविरथ॥श्रमलोंएकलाआहेंयेथ॥मगह्मणेतोपंडुसुत॥आह्मींबहुतश्रमलोंआहों॥१६॥दुर्योधनह्मणेमाझी
पृतना॥आटूनगेलीस्वर्गभुवना॥धर्मामीजाईनवना॥तूंराज्यकरींआपुलें॥१७॥धर्मह्मणेतुवांदिधली॥तेमींउ
वीनिघेंकदाकाळीं॥पूर्वींआह्मींमागीतली॥परिगोष्टीऐकिलीनाहीं॥१८॥देवाधिदेवनारायण॥शिष्टाईकरूंआ

लाजाण॥ तूंबोलिलासिकायवचन॥मनामाजीआठवीनें॥१९॥सुयोचाअग्रींमृत्तिकाजाण॥इतकीमीनेदींयुद्धा-
विण॥ नरिबाहेरयेईंमाजवीरपा॥ दोंहोंतूनएकसाथीं॥२०॥तुवांघालूनिविषघोर॥मारितहोतासिवृकोदर॥अग्नी-
लाऊनलाक्षामंदीर॥ दग्धकेलेंआह्मांनें॥२१॥दुःशासनेंद्रौपदीचेकेश॥धरूनआणिलीसभेस॥ करूनियांकपट-
पाश॥राज्यमाझेंहरविलें॥२२॥रात्रीघालाघालावया॥आलांआह्मांसिमारावया॥असोकितीह्मणूनियां॥अ-
न्यायतुझेसांगावे॥२३॥ नरियेंतूंआतांझडकरी॥समईं धर्मयुद्धकरीं॥सुयोधनह्मणेनिघनां बाहेरी॥अ-
वघेमिळूनमाराल॥२४॥धर्मातुझ्यावचनेंकरून॥मींआतांबाहेरयेईन॥ परिमाझेंअधर्मांगलक्षून॥ कदा-
ताडणनकीजे॥२५॥ धर्मह्मणेतूंयेझडकरी॥मानेलतैसेंचयुद्धकरीं॥आह्मीहीपायींचनिर्धारीं॥एकाचिजा-
णयुद्धकरूं॥२६॥ वाघेंनवाजऊरणीं॥हाकानफोडूंकोणी॥भोंवतेउगेचउभेराहुनी॥आह्मीयुद्धपाहातोंपैं॥
॥२७॥भीमह्मणेमीतूंदोघेजण॥युद्धकरूंसमरींनिर्वाण॥भुजंगनिघेवारुळांतुन॥तेविंसुयोधननिघाला॥२८
क्रोधेंनेत्ररक्तांबर॥दिसेरववळलाजैसाव्याघ्र॥ इंद्राहातीजैसेंवज्र॥ तैशीगदाकरीं झळके॥२९॥ धृष्टद्युम्नसा-
त्यकीबळी॥हस्तावरीहस्तहाणितीतेवेळीं॥गदगदांहांसतीसकळी॥देखोनबोलेसुयोधन॥३०॥हांसतांबहू-
तमिळोन॥परिगदाघायेंकरीनचूर्ण॥ व्याघ्राच्याचेष्टाकरून॥ वृषभकैसावांचेल॥३१॥ एकएकउठोन॥क-
रामजशींयुद्धकंदन॥धर्मातूंधर्मपरायण॥साक्षहोईंयागोष्टी॥ एकावरीबहूतजण॥नउठावेंहाधर्मपूर्ण॥पा-
र्थह्मणेतरिअभिमन्य॥कैसामारिलाससरंगणीं॥३३॥आतांतूंसांगसीस्वधर्म॥मगबोलेराजाधर्म॥तेवेळेकां
केलाअधर्म॥ बांधवीरयुद्धींसांवरूनी॥३४॥ तूंपांचांतएकासमारीं॥तुजहेंराज्यदेऊंनिर्धारीं॥ ऐकतांरागआला
कंसारी॥भीमअंतरींदचकला॥३५॥श्रीरंगह्मणेतेवेळे॥नेमवचनकायकेलें॥तुवांपूर्वींचऐसेंबुडविलें॥ घून-
प्रसंगरवेचोनी॥३६॥नकरितांप्रधानासिविचार॥नृपेंनबोलावेंउत्तर॥तेणेंएकासजरीमारिलेंसत्वर॥नरिमग

राज्यघावेंकीं ॥ ३७ ॥ आपणासनाहींबुद्धीसाचार ॥ दुसरीयासनपुसेविचार ॥ नरिनोअनर्थीपडेलनिर्धार ॥ यांनसं
देहनसेचि ॥ ३८ ॥ भीमबळेंचआहेसबळ ॥ दुर्योधनबळकटकुशळ ॥ केसेंसंपादलेंबळ ॥ मजचिंताजाहलीनसे ॥
॥ ३९ ॥ भीमह्मणेकंसांनका ॥ तूंअसतांआह्मापाठिराखा ॥ यादुर्योधनामशका ॥ जिंकावयाक्षणनलागे ॥ ४० ॥ भी
मगदाघेऊनउठिला ॥ हाकेंब्रह्मकटाहगाजविला ॥ दुर्योधनसरसावला ॥ जरासंधासारिखाचि ॥ ४१ ॥ वृकोदरह्म-
णेतेवेळीं ॥ शकुनीच्याबोलेंकर्मेंकेलीं ॥ तींदुःखफळेंसगळीं ॥ भोगींआतांपापिया ॥ ४२ ॥ भीष्मद्रोणकर्णवीर ॥
रणपंडीतजेसेदिनकर ॥ तेतुवांमारविलेसमग्र ॥ तूंचएकटाराहसी ॥ ४३ ॥ दुर्योधनह्मणेवल्गना ॥ कितीकरसी-
लभीमसेना ॥ जीवनेंवीणमेघगर्जना ॥ व्यर्थजैसागडगडी ॥ ४४ ॥ आतांतुझाघेईनप्राण ॥ गजपुरींचेंराज्यपावेन
तोंबळिरामतीर्थेंकरून ॥ अकस्माततेथेंआला ॥ ४५ ॥ सर्वीकेलेंत्यासिनमन ॥ बाविसांदिवसांआलापरतोन ॥ प
रियुद्धाचाअठरावादिन ॥ निश्चयपूर्णजाणावा ॥ ४६ ॥ भीमसेनदुर्योधन ॥ बळिरामचेशिष्यजाण ॥ रेवतीवराचे
वंदितीचरण ॥ प्रार्थूनयुद्धपाहाह्मणती ॥ ४७ ॥ बळिरामह्मणेऐकामात ॥ शमपंचकथोरतीर्थ ॥ युद्धकरितांमोक्ष
प्राप्त ॥ चलातेथेंअवघेही ॥ ४८ ॥ मगसर्वहीउठोन ॥ आलेशमपंचकतीर्थालागुन ॥ सरसावलेदोघेजण ॥ देवग
णविलोकिती ॥ ४९ ॥ सिंहावरीसिंहजैसा ॥ वृकोदरचपेटलातैसा ॥ हाकादेतीतेणेंआकाशा ॥ कंपवाटेफुटलापें ॥
॥ ५० ॥ पूर्वीजरासंधभीमसेन ॥ कींसंदोपसंददोघेजण ॥ कींवाळीआणिसूर्यनंदन ॥ तैसेदोघेभिडतीपें ॥ ५१ ॥ कीं
मेरुआणिविंध्याचळ ॥ तैसेदोघेदिसतीसबळ ॥ हाकेसरिसाब्रह्मांडगोळ ॥ डोलूंलागलातेधवां ॥ ५२ ॥ धर्मास
ह्मणेदुर्योधन ॥ तुह्मींयुद्धपाहासर्वबैसोन ॥ अवघेअवश्यह्मणोन ॥ धरणीवरीबैसले ॥ ५३ ॥ भयेंकांपतसेक्षिती
॥ पाताळभोगींदचकलाचित्तीं ॥ कूर्मवराहकांपती ॥ रिचवतीभगणेंतेव्हां ॥ ५४ ॥ कायश्वापदांचेपाळे ॥ स्थानें
सोडूनपळूंलागले ॥ पर्वतशिखरेंतेवेळे ॥ कोसळतीउर्वीवरि ॥ ५५ ॥ सप्तसमुद्रउचंबळती ॥ मेरुमंदारआंदळती ॥

असोभीमसेनेंचित्तीं॥पूर्वदुःखआठवलें॥५६॥करकरांखाऊनदांत॥ह्मणेकेसेंजाळिलेंजोहरांत॥विषघालूनिगंगे
आंत॥बुडविलेंमजलागीं॥५७॥द्रौपदीसभेसआणुन॥अंकदाखविलाउघडाकरून॥तेमांडीआजिचूर्ण॥करीनहे
समरंगणीं॥५८॥गोगोंःह्मणोनीवचन॥बोलिलासकीदुर्गावरून॥षंढतीळपंडुनंदन॥ह्मणूनियांबोलिलासि॥
५९॥रात्रीनसतांअन्न॥तुवांपाठविलाअत्रिनंदन॥नाटदकल्दनजगज्जीवन॥आलाधांवोनतेधवां॥६०॥सुयोधन
अन्यायीथोर॥ठावनाहींघावयाउत्तर॥ह्मणेभीमातुझेंआजिकलेवर॥प्राणविरहितकरीनमी॥६१॥नोंभीमेंगदाघा
ई॥दुर्योधनताडिलाहृदयीं॥तंवतेणेंलवलाही॥भीमवीरताडिला॥६२॥कुंकुमेंमाखलाअचळ॥कींपळसफुललें
बहुसाल॥तैसेंअशब्देंबंबाळ॥आरक्तवर्णदिसतीपैं॥६३॥एकदक्षिणेकडेदावितीं॥एकउत्तरेकडेचालती॥विजे
ऐसेंसवेंचफिरती॥हाणितीमर्मेंपाहूनियां॥६४॥गदेसिगदाझगटती॥महाज्वाळतेथेंउमटती॥दोघेहीमागेंनसर
ती॥भयचित्तीनवाटेचि॥६५॥मांडेंखुटीयेऊन॥सवेंचघेतीऊर्ध्वउड्डाण॥एकएकाच्याघायेंकरून॥मूर्छनायेऊन-
पडताति॥६६॥भीममूर्छासांवरून॥पाहेदुर्योधनाविलोकुन॥तंवतोव्याकूळदेखोन॥उभाराहिलाक्षणभरी॥६७
सवेंचउठोनदुर्योधन॥मागुतीप्रवर्तेयुद्धालागुन॥जगदीश्वरासीह्मणेअर्जुन॥युद्धदारूणपरमहें॥६८॥जयको
णासप्राप्त॥हेंमजनकळेनिश्चित॥हरिह्मणेमायेनेंअद्भुत॥मारूनियांटाकावा॥६९॥षंढाप्रतिषंढपण॥करून
घ्यावात्याचाप्राण॥भीमासहरिदाखवीखूण॥मांडीवरीहाणोनियां॥७०॥मैत्रेयाचाशापदारुण॥मांडीवरीगदा-
घायपडोन॥शेवटीतूंजाशीलमरून॥जाणेमधुसूदनवर्महें॥७१॥द्रौपदीचाहीशापपूर्ण॥भीमाचेंतेंचनेमवचन॥
त्यावरीपापदारूण॥दुर्योधनआचरला॥७२॥येरवींदुर्योधनयोद्धाकुशळ॥कुलिशाऐसीगदासबळ॥समरंग-
णींआलाअखंडल॥त्यासहीहारीआणीलतो॥७३॥असोदोघांसीयुद्धहोत॥सकळवीरांभोंवतेपाहात॥नाना
मंडलेंउड्डाणेंघेत॥हाकाफोडितीअनिवार॥७४॥उफराटीउडीघेतदुर्योधन॥तेवेळेवरतेझालेचरण॥नोंभीमेंग-

दाउचलून॥ यामांकावरीघातली॥ ७५॥ फळपक्कहोयपूर्ण॥ तेंसीमांडीगेलीविदारून॥ वृक्षपडेउन्मळून॥ तेंसाभूमीव
रीपडियेला॥ ७६॥ झालेनानाउत्पात॥ गगनींउठिलेत्रिविधकेत॥ धराझालीकंपित॥ मेघवर्षतबहुतेव्हां॥ ७७॥ सुमन
वृष्टीभीमावरी॥ निर्जरकरितीतेअवसरीं॥ असोसुयोधनाचामुकुटझडकरी॥ भीमहाणीलातेनें॥ ७८॥ शिराव
रीपायदेउन॥ रगडूनियांकेलेंचूर्ण॥ आह्मासषंढतीळजाण॥ बोलिलासकैसातूं॥ ७९॥ धर्मह्मणेभीमापाहीं॥ अनु-
चितकर्मकेलेंयेसमयीं॥ हेंसर्वरायामानलेंनाहीं॥ मागेंपुढेंनिंदितीतूंतें॥ ८०॥ अकराक्षोणीदळाचापती॥ छ
त्रधरदुर्योधननृपती॥ अहाकर्माचीकैसीगती॥ पडिलाक्षितींदुर्योधन॥ अजातशत्रुधर्मरवरा॥ नयनींवाहती·
अश्रुधारा॥ ह्मणेदुर्योधनाकौरवेश्वरा॥ कैसेंप्राक्तनतुझेंहें॥ ८२॥ खेदनधरीहृदयकमळीं॥ तुझीक्रियातुजफळा
सिआली॥ तुझ्यास्त्रियारडतीसकळी॥ तेंमीश्रवणींकेविंऐकों॥ ८३॥ तोंक्रोधयुक्तबोलेबळिराम॥ भीमाधिक्
धिक्तुझापराक्रम॥ अधमांगनताडावेंहानेम॥ त्यावरीहेंकर्मविशेषकेलें॥ ८४॥ पृथ्वीपतीसुयोधनवीर॥ त्या
चेंलत्तेनेंमर्दिलेंशिर॥ क्रोधेंउचलूनमुसळनांगर॥ बळिभद्रउठिलापैं॥ ८५॥ मगधांवोनचक्रपाणी॥ मिठीघा
तलीमागूनधांऊनी॥ समाधानतेक्षणीं॥ करितज्येष्ठबंधूचें॥ ८६॥ तुह्मींआह्मींधरिलाअवतार॥ हरावयापृथ्वी
चाभार॥ त्याचीपाठीराखावीसाचार॥ पितृभगिनीसुतहेकीं॥ ८७॥ त्याचाशापहोवहिला॥ तोत्याचात्यासफ
ळासआला॥ आणिकलियुगाचाआरंभझाला॥ स्वधर्मचालिलाबुडतपैं॥ ८८॥ भीमापासूनपडिलेंअंतर॥
आंतांधर्माकडेपाहूनसाचार॥ क्षमाकरावीनिर्धार॥ नाहींविचारदुसरापैं॥ ८९॥ रथींबैसोनरेवतीवर॥ द्वारकेस
गेलासत्वर॥ मगधर्माचेंसमाधानश्रीधर॥ नानापरीकरीतसे॥ ९०॥ असोजयवाद्यांचीघाई॥ एकचिलागली·
तेसमयीं॥ सिंहनादेसर्वही॥ वीरगर्जतीआनंदें॥ ९१॥ सर्वराजेमिळोन॥ करितीभीमाचेंस्तवन॥ धर्मद्वेषीदु·
र्योधन॥ बरामारिलाचांडाळ॥ ९२॥ कृष्णाकडेदुर्योधन॥ क्रोधेंपाहेविलोकुन॥ ह्मणेतुवांकंसाचाप्राण॥ क

पटेंकरूनघेतला॥ ९३॥ तुवांचहेंकरविलें॥ कपटेंराजेमारविले॥ जरासंधासवधविलें॥ कपटबुद्धीकरूनियां॥
९४॥ आणीकहीकाळयवन॥ गोवळ्यामारविलेंकपटेंकरून॥ धर्ममुखेंअसत्यबोलऊन॥ घेतलाप्राणद्रोणाचा
॥ ९५॥ शिखंडीतुवांपुढेंघालून॥ व्यसनींपाडिलागंगानंदन॥ चक्रकाढावयागुंतलाकर्ण॥ त्याचाप्राणघेतला
तुवां॥ ९६॥ माझाकर्णवीरएकला॥ त्रैलोक्यासविस्मयझाला॥ काळरूपतूंगोवळा॥ तुवांचगिळिलेंसमरंग
णीं॥ ९७॥ धर्मयुद्धकेलेंनाहीं॥ कपटेंचमारिलेंसर्वही॥ हरिह्मणेआलोंजेसमयीं॥ मानिलीनाहीशिष्टाई
कां॥ ९८॥ तुवांजेअन्यायकेलेबहुत॥ तेचफळाआलेसमस्त॥ केशींधरूनवोढित॥ माझीबहीणसभेनेली
॥ ९९॥ तुह्मीकपटीचांडाळदुर्जन॥ तुमचेंऐसेंचकरावेंहनन॥ मींअवतारधरिलापूर्ण॥ याचकार्यालागुनी
॥ १००॥ नानाप्रकारेंकरून॥ मारावेअवघेदुर्जन॥ सद्भक्तांचेंप्रतिपालन॥ करावयालागींपैं॥ १॥ उतरावयाध
राभार॥ मींअवतरलोंसर्वेश्वर॥ रामावतारींरजनीचर॥ पूर्वींचम्यामारिले॥ २॥ नानाअवतारधरून॥ के
लेंदुष्टांचेंनिर्दलन॥ हिरण्यकशिपूमर्दून॥ प्रल्हादम्यांरक्षिला॥ ३॥ वेदतुल्यवडिलांचेंवचन॥ तेंतुजवाटलें
विषासमान॥ गुरुद्रोहकेलेदारुण॥ त्याचेंफळभोगीहें॥ ४॥ सर्पबीजपेरिलेंबहुत॥ परिगोधूमकैसेहोती
प्राप्त॥ दुष्टकर्मआचरत॥ तेपरलोककेविंपावती॥ ५॥ असोश्रीरंगाचेंस्तवन॥ पांडवकरितीकरजोडुन॥ तूंब्र
ह्मांडनायकमनमोहन॥ भक्तजनरक्षिसी॥ ६॥ पांडवपालकगोविंद॥ हेंत्रिभुवनींगर्जेब्रीद॥ तेंसाचकरूनविशद॥ दुंदुभी
तेव्हांठोकिल्या॥ ७॥ नरियावरीपीतवसना॥ ब्रह्मांडनायकाजगन्मोहना॥ नीलोत्पलदलवर्णा॥ शिबिराप्रतिचलाआ
तां॥ ८॥ दुर्योधनाचींशिबिरेंवोस॥ जडितस्तंभवरीरत्नकळस॥ कनकवर्णदिसतीराजस॥ अतिउदासभणभ
णितपैं॥ ९॥ कर्णद्रोणगंगासुत॥ त्यांचींहीशिबिरेंभणभणित॥ एवंवोसअवघेंसमस्त॥ नाहींरक्षककोणीही॥
१०॥ दिव्यास्त्ररणेंमृदुमवाळ॥ वोठंगणेंगादियातेजाळ॥ कोशसदनेंविशाळ॥ भणभणीतपडियेलीं॥ ११॥ गां

डीवासगवसणी॥ घालीतेव्हांपाकशासनी॥ तूणीरदेविलादोपुनी॥ जोकल्पांतींसरेना॥ १२॥ कोणीसेवकउरले
किंचित॥ तेधर्मासिझालेशरणागत॥ ह्मणतीपाळिलेंआजिपरयंत॥ यावरीधर्मारक्षीतूं॥ १३॥ असोजयवाद्येवाज
वित॥ स्वस्थळागेलेपंडूसूत॥ अर्जुनाचाविजयरथ॥ जगन्निवासेंसोडिला॥ १४॥ उभयकृष्णउतरलेसवेग॥ तेत
त्क्षणींसोडिलेनसतांतुरंग॥ अंजनीहृदयारविंदभृंग॥ पुसोनगेलाश्वेतबंधा॥ १५॥ रवालेंउतरतांभगवान॥ ध
डधडांजळेरथजाण॥ जळावयाकायकारण॥ जन्मेजयपुसतसे॥ १६॥ मगबोलेवैशंपायन॥ द्रोणकर्णगंगानंद-
न॥ याहींअस्त्रेंसोडिलींदारुण॥ पार्थप्राणाहर्तींजीं॥ १७॥ परिश्रीरंगआणिमारुती॥ अर्पितेझालेनिजशक्ती॥ जी
ब्रह्मांडजाळूंशकती॥ होतीभोंवतीतळपत॥ १८॥ तींकार्यसरलीयासमग्र॥ रितादेखोनरहंवर॥ प्रळयाग्नितु
ल्यसत्वर॥ चहूंकडूनधांवली॥ १९॥ धडधडांजळालारथ॥ पांचपांडवआश्चर्यकरित॥ धर्मभीमआणिपार्थ॥
श्रीवल्लभासीपुसतीपैं॥ २०॥ कांजळालास्वामीस्यंदन॥ हास्यसुखेंबोलेराजीवनयन॥ अर्जुनाचाघ्यावयाप्राण
॥ अस्त्रदेवताजपतहोत्या॥ २१॥ कार्यसरल्यावरीसमग्र॥ आह्मींउतरलोंहरिहर॥ रागेंअस्त्रेंधांवलींसमग्र॥ रहं-
वरजाळिला॥ २२॥ गांडीवचापअक्षयतूणीर॥ पार्थेंकाढिलींहोतींअगोदर॥ त्यांचीज्याउतरलीनिर्धार॥ कृष्णइ
च्छेकरूनियां॥ २३॥ एवंसर्वजगज्जीवनेंरक्षिलें॥ हेंपांडवांसपूर्णकळोंआलें॥ अभिमानसर्वांचेगळाले॥ अहंक
र्तव्यपणाचें॥ २४॥ सूत्रधारकसर्वेश्वर॥ हेंप्रत्ययाआलेंसमग्र॥ मगकृष्णास्तवनअपार॥ करितेझालेसप्रेमें॥
॥ २५॥ आदिपुरुषापरात्परा॥ सत्यज्ञानअगोचरा॥ सर्वरक्षकात्रिभुवनेश्वरा॥ वेदशास्त्राअगम्यतूं॥ २६॥ अनं
तजन्मेंतपकेलें॥ तेंएकदांचफळाआलें॥ सोयराहोऊनयेवेळे॥ सोयआमचीरक्षिली॥ २७॥ करूनियांपुण्या-
च्याराशी॥ बहुतदिवसभाकेंगोविलासि॥ नीचकर्मत्हृषीकेशी॥ सारथ्यतुवांअवलंबिलें॥ २८॥ तुझियाउप-
काराचेंऋण॥ आह्मींकोणेकाळींहोऊंउत्तीर्ण॥ पृथ्वीचेंपत्रकरूनजाण॥ लिहितांगूणनसरती॥ २९॥ ऐसीश्री

कृष्णलीळाअगाध॥पांडववर्णितांहोतीसद्गद॥मगत्यांसीह्रदयींधरूनमुकुंद॥समाधानकरीत्यांचें॥३०॥असोपां
डवयावरी॥राहिलेदुर्योधनाचेशिबिरीं॥सर्वसंपत्तीनिर्धारीं॥घेतेझालेआनंदें॥३१॥यावरीतोजगन्निवास॥
जाताझालाहस्तनापुरास॥रथींबैसोनपरमपुरुष॥धृतराष्ट्रासभेटला॥३२॥गांधारीसबोलाउन॥करीउभयांचें
समाधान॥बहूतशास्त्रपद्धतीसांगोन॥मनत्यांचेंमोहीतसे॥३३॥पुढीलदाकूनकार्यभाग॥कांतेथेंगेलाश्रीरंग॥तरि
गांधारीपतिव्रताअभंग॥शापदेईलपांडवां॥३४॥जाळोनियांकरीलभस्म॥हेंजाणोनभक्तमनोभिराम॥तीचेंस-
माधानपरम॥नानाप्रकारेंकरीतसे॥३५॥एकमुहूर्तपर्यंतजाणा॥गांधारीसआलीदुःखमूर्छना॥मगसावधहोऊ
नत्याक्षणा॥पुत्रदुःखेंआरंबळे॥३६॥श्रीधरह्मणेगांधारी॥मींशिष्टाईसआलोंतेअवसरीं॥दुर्योधनासिसिकविलें-
नानापरी॥परितोनायकेकोणाचें॥३७॥मैत्रेयविदुरसत्यवतीनंदन॥शारद्वतभीष्मद्रोण॥बहुतांचेंनायकेवचन॥त
रिपांडवांवरीदोषनाहीं॥३८॥आतांतुह्मीएकऐकावें॥पांडवआपलेह्मणावे॥तुह्मांदोघांचेंकरणवें॥धर्मशोककरी
बहु॥३९॥अंबेसोबळीतूंपतिव्रतापूर्ण॥पूर्वींबोलिलीहोतीसवचन॥जेथेंधर्मतेथेंजयकल्याण॥तेंवचनखरेंझालें॥
४०॥तोंजगद्गुरुपराशरसुत॥प्रकटलातेव्हांअकस्मात॥त्यांचेंसमाधानकरित॥ह्मणेपांडवसुतनुमचे॥४१॥श्री
कृष्णत्यांप्रतिपुसोन॥वेगेंचालिलापिटितरस्यंदन॥अनर्थकरीलद्रोणनंदन॥ह्मणूनजातत्वरेनें॥४२॥आ
लादेखोनजगजीवन॥आनंदलेपंडुनंदन॥श्रीरंगेंअवघेंवर्तमान॥झालेंतेंतनकेंकथियेलें॥४३॥इकडेराजा-
दुर्योधन॥धुळीतंलोळेदीनवदन॥केंशपसरलेचहूंकडून॥तेस्वहस्तेंआकर्षित॥४४॥श्वासोश्वासघालून
बोलत॥हेअवस्थाकींमजप्राप्त॥तोंसंजयआलाधांवत॥खेदेंस्फुंदतउभापुढें॥४५॥दुर्योधनबोलेदीनवद
न॥माझींमायबापेंवृद्धपूर्ण॥कोणासजातीलशरण॥आह्मासपाळाह्मणाउनी॥४६॥पहिलामाझालक्ष्मण
॥नदेखींयावरीकदांप्राण॥अरेसंजयासांगेजाऊन॥गुरुसुतातिघांतें॥४७॥संजयजाऊनवनांत॥तिघांसीसं-

र्वकेलेंश्रुन॥मगरूनवर्माकृपयासरून॥आलेधांवतबैसोनरथीं॥४८॥तोंदुर्योधनपडिलारणमंडळीं॥सुरवींस
वीगीमारवलीधुळी॥गदाघायेंतळमळी॥हुंकरेबळीक्षणक्षणा॥४९॥जादुर्योधनाचेंकपाळ॥केशरकस्तूरीनें
शोभेविशाळ॥तेथेंपार्थाचेंसायकसबळ॥बैसोनरक्तवाहातसे॥५०॥जोकुसुमशेजेचेकमळावरी॥भ्रमर
मंचकींपहुडेमंदिरीं॥तोंगदाघायेंधरत्री॥वरीलोळतपडिलाहो॥५१॥जोअकराक्षोणीदळाचानाथ॥त्याभों-
वतीभुतेंबैसलींबहुत॥भूतेंमांसवांटणीकरित॥पाहेतटस्थउगाची॥५२॥कृमिमक्षिकाबहुततोडिती॥हात-
हालवावयानाहींशक्ति॥आहारेकर्मीकैसीगति॥पुढतपुढतीबोलतसे॥५३॥तोंतिघेंजवळीयेउन॥स्फुंदस्फुंदो
नीकरितीरुदन॥ह्मणतीदुर्योधनातूंनिधान॥चालिलासकींयावरी॥५४॥लक्ष्मीहेपरमचंचळ॥मरीचिज
लन्यायेंसकळ॥क्षणक्षणायेनोकाळ॥कैसानेईलकेधवां॥५५॥तंवतोदुर्योधनबोलत॥तुह्मीपुरुषार्थके
लेअद्भुत॥आह्मीझालोंदैवहत॥ऐकोनबोलतअश्वत्थामा॥५६॥हातचोळूनसत्वर॥दशनींरगडिलेअ-
धर॥माझीशपथनिर्धार॥यावरीपरिसराया॥५७॥पांडवआणिपांचाळ॥यांचींशिरेंआणितोंनलगेवेळ॥हेंआ
तांचनकरींतत्काळ॥तरिमीद्रोणजकदांनव्हे॥५८॥दुर्योधनमनींहर्षला॥उदकाचाघटआणिवला॥अश्वत्थामा-
अभिषेकिला॥सेनापतीह्मणूनियां॥५९॥मगदुर्योधनाचीघेऊनआज्ञा॥तिघेगेलेपुढतीवना॥वटवृक्षातळींजा
णा॥जाऊनियांराहिले॥६०॥आतांयावरीगुरुसुत॥पांडवशिबिरांतकरीअनर्थ॥रात्रींजाऊनअकस्मात॥प्राण-
घेईलबहुतांचा॥६१॥एकाचअध्यायामध्येंजाण॥गदापर्वसंपलेंसंपूर्ण॥पुढेंसौप्तीकपर्वगहन॥रसआतांपरि-
सिजे॥६२॥पांडुरंगब्रह्मानंद॥जोसाधुह्रदयारविंदमिलिंद॥श्रीधरवरदप्रसिद्ध॥घोषगाजेबहुतपैं॥६३॥सौप्ती
कपर्वपावन॥श्रीधरसुखेंकरून॥बोलेलकैसेंरुक्मिणीरमण॥ब्रह्मानंदेंपरिसातें॥सुरसपांडवप्रतापग्रंथ॥ग-
दापर्वव्यासभारत॥त्यांतीलसारांशयथार्थ॥एकावन्नाव्यांतकथियेला॥१६५॥ ॥श्रीकृष्ण॥ ॥६७॥


अ.५२
सौप्तिकपर्व

श्रीगणेशायनमः॥ ॥मागेंगदापर्वसंपलेंदेख॥ पुढेंआरंभिलेंसौप्तिक॥ वैशंपायनवक्तासरेख॥ जन्मेजयाप्रतिसांगे॥१॥ गदाघायेंकरून॥ आरंबळेदुर्योधन॥ सिद्धझालेजावयाप्राण॥ परीआंगवणनसोडी॥२॥ एकादशक्षोणीदळसंहारलें॥ त्यांततिघेजणउरले॥ कृतवर्माकृपाचार्यवहिले॥ तिजाअश्वत्थामा॥३॥ सेनापतित्वगुरुसुता॥ दुर्योधनझालादेता॥ शपथकरोनीनत्वता॥ तिघेवीरनिघाले॥४॥ इतकांझालागनकथार्थी॥ पुढेंसावधऐकोनपंडित॥ कर्णपितापावलाअस्त॥ आंधारघोरपडियेला॥५॥ पांडवसेनेसमीपजाण॥ तिघेगुप्तयेऊन॥ जैसेंधनाढ्याचेंलक्षोनिसदन॥ तस्करपाळतपाहाति॥६॥ तोंवीरांचाहोतगजर॥ जयवाद्यांचानादथोर॥ गस्तकाढितीतलवार॥ दीपिकाअपारदीसती॥७॥ लागनचालेतेथेंकाहीं॥ तिघेनिघालेलवलाही॥ न्यग्रोधतळींतेसमयीं॥ रथसोडिलेक्षणभरी॥८॥ अंतरीकष्टीबहुत॥ सुयोधनाचेदुःखेंआरंबळत॥ क्षतेंपडलींतेणेंसमस्त॥ गात्रेंतिडकाहाणिती॥९॥ उतरोनगेलारणमद॥ पराजयाचापरमखेद॥ ह्मणतीपांडवांचाअपराध॥ ब्रह्मांडांतनसमाये॥१०॥ वटवृक्षजेसापर्वत॥ सहस्रशाखानीमंडित॥ त्याखालींतिघेजणचिताक्रांत॥ श्वासोश्वासटाकिती॥११॥ संध्याकरूनक्षितीवरी॥ तिघेनिजलेशेजारीं॥ दुखनिद्रानेअवसरीं॥ दोघांजणांआलीतें॥१२॥ कृतवर्माआणिगौतमनंदन॥ निद्रार्णवींजालेनिमग्न॥ परिक्षुपयासुतदुःखेंकरून॥ आरंबळतनयेनिद्रा॥१३॥ महासर्पजैसाधुसधुशित॥ तेविंवेळोवेळांश्वासटाकित॥ घोरनिशीहोतांप्राप्त॥ श्वापदेंपक्षीबाहाती॥१४॥ पिंगळियांचेकिलकिलाट॥ शिवातेथेंभुंकतीसैराट॥ उलूकांचेशब्दअचाट॥ भूतांचेथाटहिंडती॥१५॥ बाहेरनिघालेमहाफणी॥ मस्तकींझळकतीदिव्यमणी॥ यक्षपिशाचराक्षसिणी॥ सैरावैराहिंडती॥१६॥ मिथ्याघालूनिरीस॥ वृक्षींबेसलेसावकाश॥ जान्हवीजळावरूनलोकप्राणेश॥ सुशीतळयेतसे॥१७॥ ऐशीतेनिशाकाळीं॥ काळपुरुषाचीकांबळी॥ कींकाजळाचीउटीघेतली॥ पृथ्वीआणिआकाशें॥१८॥ जागातेथेंद्रोणसुत॥ तोंत्यावटावरीनिद्रिस्त॥ सहस्रकागकुडं

बासह्नित॥सुखेंकरोनिआसती॥१९॥तंवतेथेंआलादिवाभीत॥परमविशाळअतिउन्मत्त॥वृक्षावरीवेगेंचढत॥
तस्करगतीतेधवां॥२०॥उलूकेंख्यातीकेलीतेक्षणीं॥सहस्त्रकागांच्यामानामोडुनी॥वृक्षातळींटाकुनी॥गेलानि
घूनिक्षणार्धें॥२१॥द्रोणीतटस्थपाहेतेवेळे॥ह्मणेएकेंसर्वसंहारिले॥हेंआह्मासगुरुत्वजाहालें॥दीक्षाआतांचि·
हेंआह्मा॥२२॥त्यादोघांसमगजागेंकरून॥ह्मणेआतांनलावाक्षण॥उलूकगुरूयेऊन॥दीक्षाआह्मासदीधली॥
॥२३॥पांचाळआणिपंडूकुमर॥यांचाऐसाचकरीनसंहार॥चलानकाकरूंउशीर॥संहारून येऊंत्यांसी॥२४॥म
गह्मणेशारद्वत॥नकळतकेविंकरावाघात॥क्षत्रियधर्मयेथ॥कोठेंउरेलसांगपां॥२५॥गुरुसुतह्मणेतेवेळां॥ति
हींधर्मकोठेंसांभाळिला॥याऐशादुष्टांसकळां॥गुप्तरूपेंमारीनमी॥२६॥कृतवर्माह्मणेनिश्चित॥लोकहासतीलस
मस्त॥गुरुपुत्रदुष्टयथार्थ॥केलाघातनिद्रिस्थांचा॥२७॥अश्वत्थामाह्मणेबोल॥तुमचेवाटतीविषातुल्य॥पूर्वी-
म्यानिश्चयआदळ॥केलातोतुह्मींजाणताकीं॥२८॥पांचाळपांडवमारिल्याविणसाच॥नकाढींमीआंगीचेंकवच॥
दुर्योधनांचेपांचप्राण॥तळमळतीत्याहीलोकीं॥२९॥पृथ्वीपतीदुर्योधनवीर॥त्याचेमस्तकींचादिव्यकोटीर॥भी
मेंहाणोनिलत्ताप्रहार॥कैसाचूर्णपैंकेला॥३०॥त्याचेमस्तकींपददेऊन॥मर्दूनतेणेंकेलाचूर्ण॥मांडीवरीगदाहा
णून॥अधर्मेंकैसेंमारिलें॥३१॥परमक्रोधेंगुरुसुत॥कडकडांदांतखात॥ह्मणेतुह्मीबैसायेथ॥एकलातेथेंजातों
मीं॥३२॥रथारूढहोऊन॥वेगेंचालिलागुरुनंदन॥मगतेहीदोघेजण॥सवेंचजातेजाहाले॥३३॥समीरासमागेंटा
कून॥शिबिराजवळीआलेजाण॥काळरूपीतिघेजण॥उभेठाकलेतेधवां॥३४॥सकळसेनानिद्रिस्थ॥कोणीजा·
गेंनाहींतेथ॥पार्थेंबळीदेऊनमहंत॥महारुद्रस्थापिलाअसे॥३५॥स्वरूपपरमभयंकर॥कृतांताऐसेंपसरिलेंवक्त्र॥
केशऊर्ध्वपिंगटशरीर॥भस्मचर्चिलेंसर्वांगीं॥३६॥सिंदूरगंगावाहात॥तैशीजिव्हालळलळित॥त्रिशूळादिआ
युधेंसमस्त॥भयंकरझळकती॥३७॥विश्वग्रासीलसंपूर्ण॥ऐसेंपसरिलेंतेणेंवदन॥महद्भूततेंदेखोन॥अश्वत्था

मादचंकला॥३८॥ ह्मणेहेंनोंआलेंविघ्न॥ महद्भूतअत्यंतदारूण॥मगसोडिताझालाबाण॥ अतितीक्ष्णतेजाळ॥३९
ज्याबाणघायेंकरून॥ महानगहोतीलचूर्ण॥ तेशरनलागतांक्षण॥मुखपसरोनगिळीतसे॥ ४०॥ शरांचेमहापूर
॥गिळिताजाहलाश्रीशंकर॥ तूणीरसरलासमग्र॥गुरुपुत्रतटस्थराहे॥ ४१॥ शक्तीटाकिलीदारूण॥ तीही चूर्णके
लीचाऊन॥ गदादिधलीभिरकाऊन॥ तीहीगिळिलीतेधवां॥ ४२॥ खड्गहाणेस्फभट॥ तेंहीदंतानेंकेलेंपिष्ट॥ गु॰
रुसूतपरमधीट॥ नानाशस्त्रेंवर्षतसे॥ ४३॥ द्रोणीचेपाठीसिभयाभीत॥ कृतवर्माआणिशारद्वत॥ अश्वत्थामा
चिंताक्रांत॥ ह्मणेहेंभूतकेविआवरे॥ ४४॥ म्यांअधर्ममांडिलादारुण॥ ह्मणोनिहेंप्रगटलेंविघ्न॥ मजवारीतहो
तागोतमनंदन॥ परिम्यांतेंऐकिलेंनाहीं॥ ४५॥ मगअद्भूतशिवस्तवन॥ करिताझालागुरुनंदन॥ ह्मणेहेंकाळ-
रूपविशाळवदन॥ काळात्मयाकाळरूपा॥ ४६॥ हेभवभवांतकाभवानीवरा॥ भाळलोचनाभस्मासुरहरा॥
भस्मोद्धूलितभयंकरा॥ भद्रकारकापशुपती॥ ४७॥ त्रिगुणातीतत्र्यंबका॥ त्रिशूलधारणात्रिपुरांतका॥ त्रिदोष
रहितात्रितापमोचका॥ कृपाकरींयेवेळे॥ कामांतकाकामरहिता॥ विरूपाक्षाक्षयवर्जिता॥ दक्षमखविध्वंसाअ
परिमिता॥ गजास्यजनकागजारे॥ ४९॥ यक्षाधिपमित्रामृडानीशा॥ मृत्युंजयस्मशानवासा॥ वामदेवानाग
भूषा॥ अंधकप्राणमोचका॥ ५०॥ भूताधिपतेविश्वेश्वरा॥ विश्वपाळकामहत्पापहरा॥ अनादिसिद्धादुष्टसं
ह्यारा॥ विश्वव्यापकाजगद्गुरो॥ ५१॥ ऐसेंकरूनस्तवन॥ वेदिकात्यापुढेंनिर्मून॥ करिताझालाहवन॥ महारुद्र
प्रीत्यर्थ॥ ५२॥ तोंभूतांचेअपारपाळे॥ भयंकररूपेंसुखेंविशाळें॥ हाकादेतीपसरतीआवाळें॥ चाटितीत्याक
डेपाहावेना॥ ५३॥ गुरुस्रुतटाकीतआहुती॥ ह्मणेजयजयशंकरउमापती॥ आतांद्यावेदीमध्येंपूर्णाहुती॥ मा
झीटाकितोंभक्षीकां॥ ५४॥ सरसावलागुरुनंदन॥ उडीटाकितोहेंजाणोन॥ प्रगटताझालाउमारमण॥ पंचव
दनदशभुजजो॥ ५५॥ मागह्मणेजाहालोंप्रसन्न॥ यावरीबोलेगुरुनंदन॥ म्यांजेंआरंभिलेंकारण॥ सिद्धीपा

ववींसमस्त॥ ५६॥ यावरीबोलेकैलासपती॥ सिद्धीसपावेलधरिलेंचित्ती॥ दिव्यखड्गदिधलेंहातीं॥ कृतांतजिव्हेसा
रिखें॥ ५७॥ पायवंदूनसत्वर॥ पुढेंगेलेतियेतस्कर॥ शारद्वतकृतवर्माद्वार॥ रक्षितीतेव्हांसादरें॥ ५८॥ गुरुसुत
ह्मणेअवधारा॥ जोबाहेरनिघेलत्यासमारा॥ पाहूनकालाहानथोरा॥ सगटसंहारासर्वही॥ ५९॥ जैशीधर्मधेनूव
री॥ गळांबैसेवकसूरी॥ सगटमोकळीहोयधरित्री॥ तेचिपरीकरातुह्मीं॥ ६०॥ ऐसेंत्यांप्रतिसांगोन॥ आंतप्रवेश-
लाद्रोणनंदन॥ जैसामूषकबिळींअहीदारण॥ धुसधुशीतसंचरला॥ ६१॥ कींकुरकनिद्रिस्थअसतां॥ तेथेंव्याघ्रआ
लाअवचिता॥ कींशुष्कतृणपर्वता॥ ज्वाळमाळीजाळित॥ ६२॥ मत्स्याचेकोठाराएक॥ विभांडीतनिघेबक॥ तैसा-
तोगुरुसुतदेख॥ आधींशोधीतधृष्टद्युम्ना॥ ६३॥ ज्याशिबिरींहोताधृष्टद्युम्न॥ तेथेंचगेलागुरुनंदन॥ लत्ताप्रहार
हाणोन॥ केंशींधरोनजागाकरी॥ ६४॥ घाबरापाहेद्रौपदसुत॥ तोंकाळरूपद्रोणीदीसत॥ आपुलेगळांपाशघालि
त॥ येरूयेतकाकुळती॥ ६५॥ ह्मणेआचार्यपुत्राअवधारीं॥ मजआतांशस्त्रानेंमारीं॥ आपदाकरूंनकोयेअवसरीं॥ बो
लेयावरीगुरुसुत॥ ६६॥ तूंगुरुहत्याकेलीपापमती॥ तूजकैंचीउत्तमगती॥ धृष्टद्युम्नाच्यायुवती॥ जाग्याजाहल्याते-
धवां॥ ६७॥ सेवकसमस्तपळती॥ नितंबिनीवक्षस्थळेंबडविती॥ गळांपाशघालूनक्षिती॥ मारोनियांटाकिला॥ ६८
ऐसेंघोरकर्मकरून॥ तेथूननिघालाद्रोणनंदन॥ धृष्टद्युम्नाच्यास्त्रियामिळोन॥ महाशब्दगाजविती॥ ६९॥ लोकजा-
गेजाहालेसमस्त॥ द्रोणीधृष्टद्युम्नाच्यारथींबैसत॥ मगउत्तमौजासमारिलेंतेथ॥ क्षणमात्रनलागतां॥ ७०॥ युधाम
न्युधांवलातेथ॥ गदाघायेंतयासहाणित॥ येरेंखड्गकाढूनिशिवदत्त॥ क्षणेंतयासमारिला॥ ७१॥ आणीकनिजलेहो
तेपांचाळ॥ तेथेंचमारिलेतत्काळ॥ सहस्त्रावधीसकळवीर॥ संहारीततेधवां॥ ७२॥ हत्तीघोडेपायदळ॥ संहारीत
जायसकळ॥ खड्गधारातेजाळ॥ घायेउरीनउरेचि॥ ७३॥ जैशींकृषीकारकणसें छेदीतजाण॥ तैशींचशिरेंटाकी
छेदुन॥ तोंद्रौपदीचेपंचनंदन॥ शस्त्रेंघेऊनभांडती॥ ७४॥ प्रतिविंध्यश्रुतसोम॥ श्रुतकर्माशतानीकनाम॥ श्रु

नसेनपांचवापरम॥युद्धकरितीतेधवां॥ ७५॥शिखंडीउठलातिकडून॥तेणेंयुद्धकेलेंएकक्षण॥परितोकाळगुरु
नंदन॥त्यावरीखड्गहाणिलें॥ ७६॥शिखंडीचेंशिरकमळ॥खड्गें छेदिलेंतत्काळ॥तरिपांचहीतेद्रौपदीचेबाळ
अनिवारभांडती॥ ७७॥ तेप्रतिपांडवघेऊनिग्रास॥युद्धकरितीआसमास॥सकळशस्त्रेंतोतामस॥ छेदिताझा
लाएकदांचि॥ ७८॥रथाचींचाकेंघेऊन॥टाकितीद्रौपदीचेनंदन॥आणीकशस्त्रेंदारुण॥ वर्षतेजाह्लेअपा
र॥ ७९॥परीतोकाळरूपीद्रोणी॥पांचहीमारिलेतेक्षणीं॥शिरेंटाकिलीं छेदूनि॥नाळाविरहीतजेविकसळें॥
८०॥सोमवंशीकराजेपवित्र॥विराटाचेकित्येकपुत्र॥ एवंमारिलेसर्वत्र॥कोणीउरलानांहींच॥ ८१॥पांडवां
चेरक्षक॥नानापरींचेसेवक॥कोणीउरलानाहींह्याक॥फोडावयाकारणें॥ ८२॥निजल्याठायींमारिलेफार॥तों
मोकळेसुटलेकुंजर॥रगडीतचालिलेजीवमात्र॥तुरंगसुटलेधांवती॥ ८३॥ प्रेतेंपडलींअपार॥भूतावळी-
धांवल्यासमग्र॥मांसग्राशितीसत्वर॥मिटक्यादेतीभक्षितां॥ ८४॥मनुष्याचींकाढूनिआंतें॥आग्रहेंदेती
एकएकातें॥आनंदेंकरूनितेथें॥हाकादेतीएकदांचि॥ ८५॥इकडेकुंजरमातलेबहुत॥शिबिरेंमोडूनिजीवर-
गडित॥शुंडेनेंस्यंदनभिरकावित॥ ८६॥कित्तेकचूर्णहोतीघायें॥कज्जलेंब्रह्मांडगोलचर्चिला॥तैसाघोरअं
धारपडला॥त्यांतसवेगवायूसूटला॥ धुरोळानिबिडनगणवे॥ ८७॥कित्तेकउरलेनिश्चिती॥तेआपल्यांतेंआ
पणमारिती॥पुत्रासहीनोळखिती॥ह्मणोनिपाडितीपृथ्वीवरी॥ ८८॥कोणीशिबिराबाहेरनिघत॥तोंकृतवर्मा
आणिशारद्वत॥शस्त्रघायेंसंहारित॥जाह्लाअंतसर्वांसी॥ ८९॥मगाशिबिरासीलाविलाअग्न॥उजेडेंमारिलेअ
वघेजण॥रक्तनिम्नगाभरून॥लवणाब्धिपाहोंधांवती॥ ९०॥प्रेतेंपडलींबहुत॥धरणीरितीनदिसेतेथें॥येकक्षण
तीयेथ॥राक्षसयेऊनपडियेले॥ ९१॥भुतेंझोटिंगधांवती॥रक्तमज्जामांसभक्षिती॥एकएकाचेहातींचेघेती॥हि
रोनियांविनोदें॥ ९२॥पांडवनववनेतेस्थळीं॥अगाधनिगूढस्थळींवनमाळी॥कटकाबाहेरएकांतस्थळीं॥शिबिर

बाणतोसोडीततेवेळे॥ अनुशाल्वाचेंसैन्यधांविलें॥ बभ्रुवाहनेंजर्जरकेलें॥ शंभरबाणींसक्रोधें॥ ३७॥ रथआणि-
स्यंदन॥ अनुशाल्वाचाकेलाचूर्ण॥ बाणजाळेंदोघेजण॥ असंभाव्यवर्षती॥ ३८॥ अनुशाल्वयोद्धावीर॥ परिबभ्रुवाह-
नेंकेलाजर्जर॥ हातींचेंगळालेंचापशर॥ मूर्छनायेऊनीपाडियेला॥ ३९॥ यावरीधांविलाप्रद्युम्न॥ सोडीतबाणापाठींबा-
ण॥ नानाशस्त्रेंटाकुन॥ निःशंकभिडतीसमरंगणी॥ ४०॥ होतयुद्धाचेंघनचक्र॥ दोनीसेनापडल्याअपार॥ मोटेंमा-
जलेंरणभयंकर॥ रक्ताचेपूरधांवती॥ ४१॥ भुतावळीरणभक्षिती॥ तृप्तहोऊनरणींनाचती॥ अस्थींचींदुर्गेंरचि-
ती॥ मगभांडतीपरस्परें॥ ४२॥ परस्परेंशि रेंभिरकाविती॥ मूर्छनायेऊनभुतेंपडती॥ बभ्रुवाहनेंकेलीख्याती॥
सेनासर्वसंहारिली॥ ४३॥ बभ्रुवाहनेंसोडिलाबाण॥ भेदीतगेलावारण॥ सवेंचअश्वरथछेदून॥ सारथीयाससमा-
रित॥ ४४॥ माजलेंबहुतचिरण॥ तोंपुढेंधांविलामेघवर्ण॥ दोघांचेंयुद्धदारुण॥ शक्रारिसौमित्रासारिखें॥ ४५॥
भ्याडघायाळपळती॥ त्यासदावनेंदीकोठेंक्षिती॥ एकगजकलेवरांतपळती॥ तेथेंभेदितीसायक॥ ४६॥ समरीं
पडिलेजेवीर॥ तेविमानारूढहोतीसत्वर॥ त्यांसिदेवांगनाकरितीभ्रतार॥ नेऊनजातीआत्मसदना॥ ४७॥ भ्याऊ-
नजेमेलेरणीं॥ त्यांसवरितीयक्षिणी॥ पार्थाचीसंपदाहरूनी॥ नेववीतबभ्रुवाहन॥ ४८॥ कित्येकवीरधरूनि-
जित॥ बभ्रुवाहनेंपाठविलेनगरांत॥ पूर्वीलहुअंकुशेंरघुनाथ॥ ऐसाचजिंकिलासमरंगणीं॥ ४९॥ लहुअंकुशा-
चीकथानिश्चिती॥ वर्णिलीरामविजयग्रंथीं॥ त्याचीनलगेविस्तृती॥ तोचिपाहावाश्रोतयानीं॥ ५०॥ तीनअध्ये
जाण॥ रामविजयींलहुकुशआख्यान॥ तेथीलकथाश्रोतींपरसोन॥ परमस्फुरवपाविजेल॥ ५१॥ असोयावरी
हंसध्वज॥ स्वसेनेंसिधांविलाभूभुज॥ पांचसहस्रसेनासतेज॥ बभ्रुवाहनाचीमारिली॥ ५२॥ पार्थसुतेंतेंती-
नबाणीं॥ हंसध्वजपाडिलारणकुंभिनी॥ अत्यंतमूर्छायेउनी॥ निचेष्टितराहिला॥ ५३॥ मगसुवेगधांविलास-
त्वर॥ तेणेंमाजविलेंरणघोर॥ दाहासहस्रकुंजर॥ रणमेदिनींपाडिले॥ ५४॥ बभ्रुवाहनवीरअनिवार॥ छे-

दिलेंसुतकेताचेंतत्काळशिर॥शीरधांवोनआदळलेंसत्वर॥पार्थसुतताचेवक्षस्थळीं॥५५॥ बभ्रुवाहनासि-
आलीमूर्छना॥सर्वेचसावधहोवोनत्याक्षणा॥तोंवृषकेतवीरराणा॥समरंगणाआलाअसे॥५६॥दोघेयुद्ध
करितीअनिवार॥जेसेमेरुआणिमांदार॥वर्मेलक्षूनिभेदितीशर॥हाकेंअंबरगाजविती॥५७॥जेसेशिखी
पिच्छेंपसरति॥तेसेदोघेवीरदिसती॥दोघांचेसंकल्पहाती॥देवविमानीबैसोनियां॥५८॥जीतचिवीरधरू
न॥नगरांतपाठवीबभ्रुवाहन॥त्याचेघायबांधवितीयेऊन॥उलपीआणिचित्रांगी॥५९॥भ्रतारांचेवीरह्मण
उन॥करितीसाक्षेपेंपालन॥कृष्णपुत्रजोप्रद्युम्न॥तोही धरूनआणिला॥६०॥शिबिरासहितसर्वसंपत्ती॥
लुटूनआणिलीनगराप्रति॥पार्थह्मणेपुढेंगती॥बरवीकांहींनदिसे॥६१॥वृषकेतासह्मणेपार्थ॥तूंतरीग-
जपुरासजात्वरित॥तुजहोतांविपरीत॥धर्मकुंतीप्राणदेती॥६२॥आतांअश्वमेधराहिले॥असीपत्रव्यर्थ
गेलें॥माझेंसामर्थ्यबुडालें॥मृत्युचिन्हेंजाणवती॥६३॥वृषकेतह्मणेजीताता॥मीगजपुरानजायतत्वता॥
पश्चिमेउगवेलसविता॥परीहेगोष्टीनघडेचि॥६४॥आजमीझुंझेननिर्वाण॥घेईनबभ्रुवाहनाचाप्राण॥ह्म
णोनलोटिलास्यंदन॥क्रोधवचनेंबोलत॥६५॥ह्मणेबभ्रुवाहनाराहेंस्थिर॥समरींसाहेंमाझेशर॥मगती-
नबाणींकर्णपुत्र॥पार्थसूतभेदिला॥६६॥हृदयत्याचेंलक्षून॥वृषकेतेनेंसोडिलेसाबाण॥सर्वेचछेदूनस्यं
दन॥चूर्णकेलासमरभूमी॥६७॥यावरीअस्त्रजाळ॥सोडितेझालेवीरसकळ॥नानाशस्त्रेंतेजाळ॥टाकि-
तातिपरस्परें॥६८॥ग्रीवाडोलवीपार्थसुत॥धन्ययोद्धावृषकेत॥मगशक्तीकाढिलीअद्भुत॥कर्णसुतेंछेदि-
लीते॥६९॥कौतुकपाहेअर्जुन॥एकाचेएकउडवितीस्यंदन॥रथासहीतकर्णनंदन॥उडऊनधाडिलासूर्य
लोका॥७०॥दोनदिवससूर्यलोकांत॥अंबरींचहोताभ्रमत॥तिसरेदिवशीवृषकेत॥भूमीवरीपडियेला॥
॥७१॥बभ्रुवाहनासहितवृषकेतें॥रथउडविलागगनपंथें॥तोउडीटाकूनपार्थसुतें॥वृषकेतावरीकोसळ-

ला॥ ७३॥ पार्थकौतुकपाहेचित्तीं॥ ह्मणेधन्यवीरत्रिजगती॥ हेयुद्धनभूतोनभविष्यती॥ ऐकिलेंनादेखिलें॥ ७४
अंतरिक्षयुद्धकरिती॥ सर्वेंचउतरीरणक्षिती॥ छपन्नदेशींच्यायुद्धगती॥ दोघेदावितीपरस्परें॥ ७५॥ ऐसेयुद्धआ
समास॥ दोघांसझालेपांचदिवस॥ टाकावयाश्वासोश्वास॥ एकनिमिष्यनफावेचि॥ ७५॥ यावरीबभ्रुवाहनेंएकबा
ण॥ सोडिलानिर्वाणीचादारूण॥ वृषकेताचेंशीरजाण॥ आकाशपंथेंउडविलें॥ ७६॥ सर्वेंचशीरपरतलें॥ पार्थसूना
चेहृदयींआदळलें॥ मागुतीकंदुकाऐसेंउडालें॥ पार्थपदाजवळी॥ ७७॥ शीरकृष्णाचेंस्मरणकरित॥ कबंधरणीं
चौताळत॥ शीरनसतांएकशत॥ वीरपाडिलेरणांगणीं॥ ७८॥ हातींघेऊनरथचक्र॥ शिराविणेफिरेकलिवर॥ वी-
रमारूनअपार॥ मगगडबडेभूमीवरी॥ ७९॥ शोकार्णवींपार्थनिमग्न॥ शीरतेंहृदयींआलिंगुन॥ वृषकेताचेआठ
ऊनगुण॥ आक्रोशेंकरूंलागला॥ ८०॥ अहाकर्णाकैसेंकेलें॥ बंधुत्वकळूंनाहींदीधलें॥ आमचेंऋणफेडिलें॥ पुत्र
रूपेंकरूनियां॥ ८१॥ अरेवृषकेतावेल्हाळा॥ कर्णजामाजियारघुबाळा॥ वत्साराजसायेवेळां॥ मजटाकुनियांगेला
सी॥ ८२॥ अरेतूंदुसराप्रतिकर्ण॥ आह्मीपांचहीतुजसरखीदेखोन॥ तुजपाहोनअभिमन्य॥ मींविसरलोंवृषकेता॥
आंतांकौंतीधर्मदेतीलप्राण॥ राहिलाअश्वमेधमहायज्ञ॥ अरेतुंवांअनुशाल्वजिंकून॥ पायींधरूनआणिला॥ ८४
अरेयुवनाश्वतूंजिंकिला॥ श्यामकर्णतोआणिला॥ कींमजवरीरुसोनवेल्हाळा॥ माझियाबाळागेलासि॥ ८५॥ तु
जवरीपांचाळीचेंमन॥ तेंऐकतांत्यागीलप्राण॥ तुझेंशीरहरिस्मरण॥ करीतअजूननवलहें॥ ८६॥ वक्षस्थळपि
टितअर्जुन॥ आतांचोघेबंधूदेतीलप्राण॥ माझाकुळदीपप्रभाघन॥ आजिविझालायेठायीं॥ ८७॥ कुळक्षयझाला
निश्चयेंसी॥ ह्मणेहेकृष्णाद्वारकावासी॥ यादवेंद्राकायझालासि॥ गुंतलासीकोणाकार्या॥ ८८॥ आह्मासहेप्राप्तअ
वस्था॥ कांउपेक्षिलेंमजअनाथा॥ दुःखेंमूर्छनाआलीपार्था॥ निचेष्टितपडियेला॥ ८९॥ त्यासधनुष्यकोटीकरून॥-
येऊनडचवीबभ्रुवाहन॥ ह्मणेवेश्येचामींनंदन॥ कींपतिव्रतेचामींपाहें॥ ९०॥ दीनस्त्रियेऐसाव्यर्थ॥ पडिलासिकां

येयेरडत॥तुवांयुद्धकेलें पूर्वी अद्भुत॥ तेमजदावीक्षणभरि॥९१॥ तूंजुनाझंझारह्मणविसी॥ ऊठविद्यादावीके
सी॥ लाजसोडूनरणींरडसी॥ दुजयालाविसीदूषणें॥९२॥ मगउठोनसुभद्रापती॥ सत्वरचढिलाआपलेरथीं॥ मे
घधारावर्षती॥ तैसेसायकसोडी॥९३॥ सर्वांगीखिळिलाबभ्रुवाहन॥ सेनासंहारिलीसंपूर्ण॥ शिरें आकाशपथें
उडोन॥ मणिपुरामाजीपडती॥९४॥ आकाशव्यापिलेंबाणीं॥ धुळीनमायेदिशांचेवदनीं॥ पार्थवीरपडिलाधरणीं॥
लेखात्याचानकरवे॥९५॥ दोनीहातांचेंसमसंधान॥ अलातचक्रदिसेसायकासन॥ टाकूनियांवज्रबाण॥ कोटपाडि
लामणिपुराचा॥९६॥ गोपुरेंखवळखळांरिचवती॥ ग्रामसांडूनस्त्रियापळती॥ बभ्रुवाहनभावीचित्तीं॥ धन्यकिरीटी-
वीर॥९७॥ यावरीबभ्रुवाहन॥ सोडीलक्षानेलक्षबाण॥ छत्रपाडिलें छेदून॥ रथउडविलानिराळा॥९८॥ हनुमंतास
मवेतरथ॥ आकाशपंथें असेभ्रमत॥ मगरवालेंउतरोनिपार्थ॥ अस्त्रेंसोडीनबहुतचि॥९९॥ एककाळएककृतांत॥ स-
मरींतैसेदोघेदीसत॥ पार्थेंतोआपलासुत॥ शरपंथींखिळियेला॥१००॥ एकरमारमणएकउमारमण॥ एकसीनकरएक
ऊष्णकीर्ण॥ असोपापियातुझेंनपाहावेंवदन॥ अतितीक्ष्णनेधवां॥१॥ ह्मणेमाझेमातेसठेविलेंदूषण॥ असोबोलेब
भ्रुवाहन॥ तूंपूर्वींकुळक्षयकरून॥ आप्तगोत्रजमारिले॥२॥ तूंकरीं आतांकृष्णस्मरण॥ तुझेंशीरटाकितों छेदुन॥ तूं
अधर्मेंमारिलाकर्ण॥ रथचक्रउपटितां॥३॥ पाहाबंधूमाझावृषकेत॥ बाळेंकेवढाकेलापुरुषार्थ॥ तोंगंगेचाशापेंपा
र्थ॥ मोहपावलारणांगणीं॥४॥ तोंतेणेंसोडिलाअर्धचंद्रशर॥ उडविलेंपार्थाचेंशिर॥ ज्वाळाबाणजाळीसाचार॥ नील
ध्वजाचीदाराजे॥५॥ पार्थपडतांरणीं॥ थरथरांकांपलीकुंभिनी॥ वृषकेताच्याशिराजवळीतेक्षणीं॥ शीरपडलेंपार्था
चें॥६॥ किरीटकुंडलेंमंडित॥ चंद्रसूर्यऐशींशिरेंदिसत॥ बभ्रुवाहनजयवंत॥ वाद्येंवाजवीतपरतला॥७॥ परमउत्सा
हकरित॥ प्रवेशलामणिपुरांत॥ उलपीचित्रांगीसमान॥ वर्तलीसर्वश्रुतझाली॥८॥ दोघानींकाढिलेअळंकार॥ शिरें
भूमीवरीटाकितीसत्वर॥ आदळूनिपार्थवीर॥ दीर्घहाकाफोडिती॥९॥ आहाकृष्णाश्रीकृष्णमित्रा॥ आहाकृष्णाकम

लगात्रा ॥ तूंअनिवार ब्रह्मादिशक्रा ॥ आजरणींपडिलासी ॥ १० ॥ गोग्रहणींचापुरुषार्थ ॥ एकटेनकौरवजिंकिलेस-
मस्त ॥ निवातकवचदैत्य ॥ त्याचाअंतकेलातुवां ॥ ११ ॥ तुझासारथीइंदिरावर ॥ ध्वजींबुभुःकारमहारुद्र ॥ अकराक्षो-
णीदळसमग्र ॥ तुवांआदिलेरणांगणीं ॥ १२ ॥ आह्मामहाराजसुभद्रापती ॥ ब्रह्मांडभरीतुझीकीर्ति ॥ सर्वसोडूनर
णक्षिती ॥ शयनकेलेंकैसेंतुवां ॥ १३ ॥ रवद्योतेपाडिलागभस्ति ॥ तंदुळभारेंमेलाहस्ती ॥ सौदामिनीकल्पांतीं ॥ श
लभेंकैसेंगिळियेलें ॥ १४ ॥ मत्स्यकेंकेंविगिळिलापर्वत ॥ सुंगीनेंप्राशिलासरितानाथ ॥ चित्रींचासर्पेंअकस्मात ॥ अ
रुणातुजगिळियेला ॥ १५ ॥ मक्षिकेनेंपक्षवातेंकरूनी ॥ केंविविझाविलादावाग्नी ॥ भोगेंद्रासीआणुनी ॥ मूषकेंकें
सेंभक्षिलें ॥ १६ ॥ मातेचाकोलाहलऐकून ॥ धांवोनआलाबभ्रुवाहन ॥ तोंमंगळसूत्रेंतोडून ॥ अळंकारसर्वकाढिले
॥ १७ ॥ झालासांगीतलावृत्तांत ॥ माझाअन्यायकायसांगेंयेथ ॥ तुजदूषणठेऊनिलात ॥ मजमारिलीपितयानें ॥ १८
तंवत्याबोलतीतेसमयीं ॥ अरेपितृघातक्यापरताहोईं ॥ धिक्पुरुषार्थतुझासर्वही ॥ वदननदावीकाळमुख्या ॥ १९ ॥ ब
भ्रुवाहनह्मणेसाचार ॥ माताहोघ्यातुह्मींअळंकार ॥ तंवत्याह्मणतीरवदिरांगारावर ॥ लेववीआतांयावरी ॥ २० ॥ अ
रेआमचापतीपडलारणीं ॥ आह्मासनेईंतयेस्थानीं ॥ मगदोघीयेऊनिरणांगणीं ॥ प्रेनेंकवळुनीशोककरिती ॥ २१ ॥
पार्थाचियेचरणीं ॥ शिरेंठेउनीबोलतीकामिनी ॥ हेनाथऊठयेक्षणीं ॥ ठाकूनियांआह्माजासिकां ॥ २२ ॥ ऊठरायाय-
त्रभेदिबाणीं ॥ ऊठद्रुपदआणिधरूनीं ॥ गायीनेल्याकौरवानीं ॥ रथींबैसोनधांवेकां ॥ २३ ॥ परशरामेंवधिलीमाता
॥ तुवांकेलेदोघांचियाघाता ॥ अरेयज्ञघाततूंकर्ता ॥ नष्टापतिनापितृघ्ना ॥ २४ ॥ आनांद्रौपदीआणिचौघेसहोदर ॥
प्राणदेतीलजानांसमाचार ॥ मातांचारवेददेरवोनअपार ॥ पार्थकुमरगहिंवरला ॥ २५ ॥ मजउभयलोकअंतरले ॥
माझेंजन्मव्यर्थगेलें ॥ तोउलपीह्मणेतेवेळे ॥ उपाययेकयेथेंअसे ॥ २६ ॥ माझापितासहस्रवदन ॥ अमृतसंजीवन
मणिपूर्ण ॥ त्यापाशींआहेतोआणुन ॥ पार्थवृषकेतांजीववावे ॥ २७ ॥ परीसर्पतेथेंअनिवार ॥ कठिणकार्यअसेफार ॥

कोंतीआलीनाहींतोंसत्वर॥आधींसाधाकार्यहें॥२८॥हिमनगजामातेंतोमणी॥दिधलाअसेसर्पालागुनी॥सर्प
पडतीजेमरोनी॥मणिस्पर्शेंचउठवी॥२९॥मगबभ्रुवाहनबोलत॥याचीशरीरेंरक्षाशिरांसहित॥उलपीह्मणेपुत्रा·
तेथें॥तुजप्रवेशकदांनव्हे॥३०॥सर्पघेतीलतुझाप्राण॥तरिमींकरितोंकाहींयत्न॥मगपुंडलीकनामासर्पतेथुन॥उ
लपीपाठवीतयानें॥३१॥आपलेंमंगळसूत्रगेलेंतुटोन॥हेंदारवींजनकासिनेऊन॥मगतोपुंडरीकनिघालातेथुन
॥शेषमंदिरींपातला॥३२॥तोपाहतांपाताळभुवन॥वाटेअमरपदन्यून॥रत्नमयसर्वपाषाण॥भूमीसंपूर्णकनकाची॥
॥३३॥नानावृक्षींसमानित्व॥जेथेंहाटकेश्वरमुख्यदेवत॥हाटकनदीसदांवाहात॥प्रकाशतेथेंशेषमणी॥३४॥तेथें
सूर्याचेंनाहींकिरण॥सहस्रयोजनेंविस्तीर्ण॥असोतोपुंडलीकवर्तमान॥भोगेंद्राप्रतिसांगत॥३५॥कन्येचेंकंठसूत्र·
तुटलें॥तेंशेषानेंदृष्टीनेंपाहिलें॥गभस्तीसर्वसर्पबसले॥श्रुतझालेंवर्तमान॥३६॥मणीद्यावयासहस्रवदन॥सिद्ध·
झालाजाणोन॥धृतराष्ट्रनामासर्पवचन॥क्रोधेंकरूनबोलत॥३७॥अमृतमणीमृत्यलोकास॥नेलियागेलेंसर्वयश
॥मागुतेमणीआह्मास॥सहसानमिळेचि॥३८॥वरीगरुडेंनेलाहिरोन॥तरिमगकैसेंवर्तमान॥मानंतऋषीच्याभयें·
करून॥गरुडनयेपाताळा॥३९॥आणिमनुष्यगर्विष्टहोती॥तेआह्मासकदांनमानिती॥आमचेमस्तकींचेमणीहि·
रोननेती॥ललनाकरितीकंठहार॥मगआह्मासघेऊनभिकारी॥भीकमागतीदारोदारीं॥शेषह्मणेकोपलासुरारी॥मणी
नेदीतत्वता॥४१॥परमप्रतापीस्वामीश्रीधर॥कालियामर्दूनवधिलाअगासुर॥तरीमणीवरदेऊनइंदिरावर॥तोषऊन
मित्रकरावा॥४२॥तोंधृतराष्ट्रबोलेवचन॥कृष्णचत्यासदेईलप्राणदान॥तूंमणीनेदीगेलियाप्राण॥सत्यजाणभोगेंद्रा
॥४३॥मगनकुळाहातींजाणा॥शेषसांगोनपाठवीबभ्रुवाहना॥मींमणीदेतोंपरीयेथेंविघ्न॥सर्पसर्वकरितीनि॥४४॥
तोपुंडरीकसर्पयेऊन॥बोलेउलपीचित्रांगीलागुन॥तुह्मींस्मरवेंद्याअग्न॥मणीकदांयेतनाहीं॥४५॥यावरीतोबभ्रुवा·
हन॥क्षोभलाजैसाप्रळयकृशान॥बाणाचागळ्यांपत्रबांधोन॥पाताळभुवनापाठविला॥४६॥सर्पपत्रपाहातीउकलुन

लिहिलेमणीद्यावापाठऊन॥नाहींतरीतुह्मासंसंहारिन॥करीनपूर्णनिर्वंश॥शेषह्मणेसर्पहोअवधारा॥आतांब-
भ्रुवाहनासियुद्धकरा॥अरेधृतराष्ट्रापामरा॥ वंशक्षयमांडिलातुवां॥४८॥मगसर्पभारसिद्धझाले॥रथगजअ-
श्ववारीआरूढले॥धीवरमार्गेंपृथ्वीवरीआले॥युद्धमांडलेंसबळतेथें॥४९॥आकाशींसघनमेघमंडळें॥तैंविदाटलीं
चहूंकडेसर्पकुळें॥बभ्रुवाहनाचेंकंठवेढिलें॥संहारिलेंबहुसाल॥५०॥भांडतधृतराष्ट्रविरवार॥सेनासंहारिलीएक
वीससहस्त्र॥मगश्वेतवाहनपुत्र॥छेदितविरवारउठिला॥५१॥नडनडांतुटतीतेथेंफणी॥नक्षत्राऐसेरिचवतीमणी॥म
गअस्त्रेंचहूंकडूनी॥मयूरगरूडनकुळादी॥५२॥मधुमेघसोडूनअसुप॥आधिंह्मणिलेसर्प॥यावरीतीक्ष्णतेजोरूप॥-
पिपीलिकास्त्रसोडिलें॥५३॥नडनडांपिपीलिकातोडिती॥मयूरनकुळेंखंडूनभक्षिती॥त्यांतगरूडसंहारिती॥
चडफडतीसर्वसर्प॥५४॥बभ्रुवाहनाचेचरण॥सर्पधरितीधांवोन॥कित्येकशेषासजाऊन॥वर्तमानसांगती॥५५
शेषगदगदांह्मांसत॥आतांकांरेपळताभयाभीत॥मगअमृतमणीपाठवीत॥वरीउचितछत्रकुंडलें॥५६॥शेषस्व
येंयेऊन॥बभ्रुवाहनाचेंकरीसमाधान॥मणीदिधलादेखोन॥धृतराष्ट्रसर्पचडफडी॥५७॥आपल्यापुत्रांसांगेबुद्धी॥
नामेंत्यांचींदुःस्वभावदुर्बुद्धी॥ह्मणेपार्थवृषकेतआधी॥बकदाल्भ्यवनींलपवा॥५८॥तेगुप्तरूपेंशिरें घेउनी॥लप
विलींतात्काळघोरवनीं॥उलपीचित्रांगीदोघीजणी॥हाहाःकारकरितीतेव्हां॥५९॥शिरेंनेलींजाणोन॥दुःखेंरडे-
बभ्रुवाहन॥ह्मणेनासलेंकार्यसंपूर्ण॥केलेप्रयत्नव्यर्थगेले॥६०॥इकडेकोंतीनेंदेखिलेंस्वप्न॥पार्थवृषकेनतेलला-
उन॥उष्ट्रावरीबैसोन॥दक्षिणदिशेप्रतिगेले॥६१॥कोंतीनेंहरीपाशींसांगतांस्वप्न॥यावरीबोलेजगज्जीवन॥वृषकेन-
आणिअर्जुन॥मृत्यूपावलेनिःसंशय॥मगगरुडारूढहोऊनश्रीधर॥सवेंकोंतीआणिवृकोदर॥देवकीयशोदासुंदर॥
वळघोनवरीचालिली॥६३॥निमिषनलागतांतेकाळीं॥येतीझालीमणिपुराजवळी॥चित्रांगीउपलीदेखिली॥हा
वझालीएकचि॥६४॥अर्जुनांचेशिबिरभणभणित॥त्यासदाहासहस्त्रस्तंभजरित॥तैसेचिकळसझळकत॥भग

णांसहिणाविती॥ ६५॥ पार्थासत्हृदयींधरून॥ शोककरीजगन्मोहन॥ आल्यासमयाचाभावपूर्ण॥ पद्मजजनक
दाविता॥ ६६॥ वृषकेतासत्हृदयींधरून॥ कुंतीशोकार्णवींनिमग्न॥ बभ्रुवाहनदीनवदन॥ धरीचरणवृकोदराचे॥ ६७
ह्मणेम्यांकेलेंपितृहनन॥ मजवरीगदाघालीउचलून॥ म्यांमणीआणिलाप्रयत्नेंकरून॥ शिरेंनेलींकोणेनकळे॥ ६८
ह्मणेपरमात्म्याविश्वंभरा॥ सुदर्शनिंछेदीमाझियाशिरा॥ मजकडेनपाहेंकुंतीसुरहरा॥ दुःखम्यांदिधलेंसकळांसी
॥ ६९॥ शेषह्मणेचक्रपाणी॥ म्यांमणीदिधलाआणूनी॥ परिशिरेंलपविलींदुर्जनीं॥ मजनकळेचि॥ ७०॥ मगबोलेशे
षशयन॥ मींबाळब्रह्मचारीअसेन॥ तरिदोघेदुर्जनमरोन॥ शिरेंयेतीआपणाचि॥ ७१॥ तोंबकदाल्भ्यवनीं॥ दो
घेसर्पपडिलेमरोनी॥ आकाशपंथेंशिरेंयेउनी॥ कृष्णाजवळीपडियेलीं॥ ७२॥ आपल्याहातेंजोडून॥ मणीस्पर्श-
वीजगजीवन॥ आधींवृषकेतउठऊन॥ सवेंचिपार्थजीवविला॥ ७३॥ दोघेकरितीकृष्णस्मरण॥ ह्मणतीउभाउभारे
बभ्रुवाहना॥ यावरीवैकुंठींचाराणा॥ आलिंगीतदोघांतें॥ ७४॥ कोंतीभीमसर्वधांवोन॥ आलिंगितीवृषकेतअर्जुन
॥ सुमनेंवर्षतीसुरगण॥ जयजयकारप्रवर्तला॥ ७५॥ मगमणिस्पर्शेंकरून॥ अवघेंचउठलेंसैन्य॥ जेंविश्वामित्राला
गींद्रोणाद्रीआणुन॥ वानरसैन्यउठविलें॥ ७६॥ जैसेंवराचेप्रसंगेंकरूनी॥ वऱ्हाडीपावतीलुगडींलेणीं॥ तैशीपा
र्थानिमित्यवाहिनी॥ उठविलीतेधवां॥ ७७॥ बभ्रुवाहनासकौंती॥ हृदयींधरूनसर्वआलिंगिती॥ यावरीमणिपु-
रांतप्रवेशती॥ सभेसबैसतीसर्वही॥ ७८॥ श्रीकृष्णह्मणेधनंजया॥ पूर्वस्मरणाकरूनियां॥ पुत्रआपलाघेराया॥ आ
लिंगितआतांतो॥ ७९॥ सूर्यकोपलाकर्णावरी॥ समुद्रलहरीसीदावाकरीं॥ अमृतमधुरताबाहेरी॥ आपुलीघालूंइ
च्छितसे॥ ८०॥ आपल्याशारवांसअबोला॥ कल्पवृक्षेंजेंविधरिला॥ चंद्रेंकलांचात्यागकेला॥ मेरूकोपलाशिरव
रावरी॥ ८१॥ बभ्रुवाहनरवालेंपाहातो॥ प्राणआतांत्यागूंइच्छितो॥ महावीरहातींचाजातो॥ हृदयींत्यासआलिंगीं
॥ ८२॥ भीमहांसोनबोलिला॥ धर्मन्यायतोयेथेंझुंझला॥ आणिश्रीरंगपाहातोडोळा॥ सर्वहीपापेंदूरगेलीं॥ ८३॥

आह्मीं आपले वडिल मारून ॥ श्रीकृष्णकृपेनें झालों पावन ॥ मग बभ्रुवाहन आणि अर्जुन ॥ कृष्णें धरून भेटविला ॥ ८४ ॥
पांच दिवस राहिले तेथ ॥ उत्साह झाला अद्भुत ॥ अळंकार वस्त्रें सर्वांस देत ॥ शेषजात स्वस्थळा ॥ ८५ ॥ उलपी चित्रांगी ॥
दोघीजणी ॥ सर्व संपत्ती धन धान्य घेउनी ॥ चालिल्या गजपुरा लागुनी ॥ आपुलिया स्वधामा ॥ ८६ ॥ यशोदा देवकी कुंती ॥
भीमासमवेत गजपुराप्रति ॥ ब्रह्मानंदें तेव्हां जाती ॥ नाहीं मिती सुखवार्ते ॥ ८७ ॥ पुढें जाणोन कठिण ॥ पार्थासवें गेला
जगजीवन ॥ रसाळ कथा करिती श्रवण ॥ चिंता दारूण दूरि होय ॥ ८८ ॥ हें बभ्रुवाहनाचें आख्यान ॥ शत्रुनाशक-
पुण्यपरायण ॥ आणि होय आयुष्यवर्धन ॥ श्रवण पठण करितां त्यांची ॥ ८९ ॥ आणि सर्पभय कदांहीं ॥ सर्वथा नोहे त्या
चे ग्रहीं ॥ ऐसी ही फळश्रुती पाहीं ॥ जयमिनीभाषेंत ॥ ९० ॥ पांडुरंगपुरविलासिया ॥ ब्रह्मानंदा यतिवर्या ॥ श्रीधरव
रदा पंढरिराया ॥ कथा सुरस बोलवी पुढें ॥ ९१ ॥ सुरस पांडवप्रतापग्रंथ ॥ अश्वमेध जयमिनीकृत्य ॥ त्यांतील सारांश
यथार्थ ॥ साठाव्यांत कथिलेला ॥ ९२ ॥ ॥ इतिश्रीपांडवप्रतापे साठ अध्याय समाप्त ॥ ॥ श्रीकृष्ण ॥ ॥

श्रीगणेशायनमः॥ संपलेंबभ्रुवाहनाचेंआख्यान॥पुढेंचालिलाश्यामकर्ण॥सारथीरथींइंदिरारमण॥सच्चिदा
नंदनन्नूजो॥१॥संगेंअपारसैन्यघेउन॥निघताझालाबभ्रुवाहन॥हंसध्वजनीलध्वजमदन॥स्वभारेसीचालती
॥२॥अनुशाल्वसुवनाश्वस्कवेग॥कर्णनंदनमेघवर्णजानीसवेग॥तोंदुसराश्यामकर्णसुरंग॥तिकडूनयेतांदे-
खिला॥३॥मयूरध्वजराजाप्रसिद्ध॥जेणेंकेलेसाहाअश्वमेध॥सातवायागआरंभिलासुबंध॥घोडासोडिलापृ
थ्वीवरी॥४॥ताम्रध्वजत्याचासुत॥साठक्षोणीदळसहित॥पृथ्वीचेराजेजिंकित॥घोडासोडिलापृथ्वीवरी॥५
दोनीघोडेमिळाले॥ताम्रध्वजेंदृष्टीदेखिले॥पार्थाचाघोडात्यावेळे॥धरिलामयूरध्वजसुतें॥६॥पत्रतत्काळ
वाचिलें॥मगकुळध्वजप्रधानबोले॥ज्याणींपूर्वीकौरवआटिले॥अकराक्षोणीदळासहित॥७॥तोआला-
आहेवीरपार्थ॥सवेंरक्षीक्षीराब्धिजामात॥यावरीताम्रध्वजबोलत॥उत्तमबहूतजाहालें॥८॥साश्वमेधझा
लेपूर्ण॥आतांहेदोन्हीनेऊंश्यामकर्ण॥एवंझालेअठरायज्ञ॥त्यावरीश्रीकृष्णभेटला॥९॥धन्यआमुचेंभा
ग्य॥यागासआलाश्रीरंग॥इतुकेनसर्वसांग॥जन्मसार्थकजाहालें॥१०॥पार्थासह्मणेमनमोहन॥पुढेंयु
द्धदिसेबहुकठिण॥येवढावीरबभ्रुवाहन॥करभारदेतमयूरध्वजा॥११॥सत्वशीळवीरअद्भुत॥मयूरध्व
जपरमभक्त॥नर्मदातटींयागकरित॥रत्नापूरनगरींजो॥१२॥तोंयुद्धमांडलेंअद्भुत॥ताम्रध्वजश्रीहरीसबो
लत॥मींतुजदेखोनिनिर्भयसत्य॥युद्धअत्यंतकरीनआतां॥१३॥ताम्रध्वजेंचापवोढून॥पार्थावरीटाकिलेसप्
तरीबाण॥ऋषीसंख्यामार्गण॥सात्यकीवरिसोडिले॥१४॥कृतवर्म्यावरीआठबाण॥शतबाणींविंधिलामद
न॥श्रीकृष्णावरीतीनबाण॥टाकिताझालाताम्रध्वज॥१५॥यावरीबाणजामात॥पुढेंधांवलाउरगनाथ॥बाण
जाळघालित॥ताम्रध्वजावरीतेव्हां॥१६॥वीसबाणींहृदयभेदित॥दळसंहारीतमदनसुत॥पितामहवैकुंठ
नाथ॥विलोकीपार्थकौतुकें॥१७॥विसांबाणींहृदयभेदित॥रणभूमीमाजलीबहुत॥रक्तयुक्तवेगेंगंगाजा-

न॥ अनिरुद्धवीरअर्जुन॥ दळपाडिलेंतीनक्षोणी॥१८॥ बाणामागेंबाणसोडित॥ ताम्रध्वजकेलाविरथ॥ मगतो
मयूरध्वजाचासुत॥ कृतांतवनक्षोभला॥१९॥ काळदंडाऐसेबाण॥ सोडिताझालातीक्ष्ण॥ मगतोमन्मथाचा
नंदन॥ मूर्छीतपाडिलाताम्रध्वजें॥२०॥ पांडवांसप्रीयअत्यंत॥ पुढेंधांविलावीरवृषकेत॥ ताम्रध्वजाचारथ॥
चूर्णकेलातीक्ष्णशरीं॥२१॥ दुजेरथींतोबैसत॥ तोहीचूर्णकेलाक्षणांत॥ तिसरेरथींआरूढत॥ केलानिःपाततया
चा॥२२॥ येकामागेंयेकजाण॥ तीनशेंरथकेलेचूर्ण॥ ताम्रध्वजजर्जरकरून॥ सेनाअपारमारिली॥२३॥ त्याव
रीताम्रध्वजअविटवीर॥ करीतउठिलासंहार॥ बाणघायेंकर्णकुमर॥ मूर्छीतकेलारणांगणीं॥२४॥ सहस्त्रबा
णींतेवेळीं॥ सात्यकीमूर्छीतपाडिला॥ कृतवर्माहीपहुडला॥ समरभूमीसीतेकाळीं॥२५॥ युवनाश्वसुवेगवी
र॥ मदननीलध्वजप्रवीर॥ बभ्रुवाहनेंयुद्धकेलेंथोर॥ तोहीपाडिलाताम्रध्वजें॥२६॥ सेनाझालीभयाभीत॥
ह्मणतीहाक्षोभलाकृतांत॥ येकलटकेंचभूमीपहुडत॥ मूर्छागतासारिखे॥२७॥ बाणतयाचेपरमतीव्र॥
चपळेऐसेअनिवार॥ कोणीउभेनराहेसमोर॥ सेनासर्वत्रपडियेली॥२८॥ येकउरलेकृष्णार्जुन॥ पार्थासिह्म-
णेइंदिरावरनयन॥ महावीरपुण्यपरायण॥ तुझीसेनासंहारिली॥२९॥ शूरत्वाचाअभिमान॥ यापुढेंसकळां
चाक्षीण॥ सर्वांचेगर्वहरून॥ समरीशयनकरविलें॥ यावरीतोमहावीरपार्थ॥ बाणधारात्यावरीवर्षत॥ ताम्र
ध्वजाचेछेदूनरथ॥ सारथीमारिलातत्काळ॥३१॥ ताम्रध्वजाचेसहस्त्ररथ॥ चूर्णकरीसुभद्रानाथ॥ मगताम्रध्व
जेंपुरुषार्थ॥ अत्यद्भुतप्रगटला॥३२॥ ताम्रध्वजह्मणेवैकुंठनाथा॥ आतांतूंरक्षींआपुल्यापार्था॥ पहामाझियापु
रुषार्था॥ धरूननेईनदोघांनें॥३३॥ श्येनपक्षीजैसेधांवत॥ तैसाउडालाअकस्मात॥ ब्रह्मांडनायकद्वारकानाथ॥ उच
लूनघेतरथांदियावरी॥३४॥ अर्जूनधरिलाचरणीं॥ दोघेघेऊनउडालागगनीं॥ अर्जुनासह्मणेकैवल्यदानी॥ पा-
हापुरुषार्थययाचा॥३५॥ मगयावरीतोकमलावर॥ ताम्रध्वजाचेंहृदयसत्वर॥ वज्रप्रायलत्ताप्रहार॥ देताझाला

तेधवां॥३६॥ताम्रध्वजासी आली गिरगिरी॥तिघेही पडिले पृथ्वीवरी॥पार्थ आणि कंसारी॥मूर्छा अत्यंत पावले॥
॥३७॥गेलें च काय तनणों प्राण॥ते विविकळ पडले दोघेजण॥ताम्रध्वजें मूर्छा सांवरून॥आपुले रथीं आरूढला॥३८॥
जयवाद्यें वाजवून॥घेऊन चालिला दोन्ही श्यामकर्ण॥रत्नपुरा सजाऊन॥पितयालागीं भेटला॥३९॥सांगे समूळ वृ-
त्तांत॥जिंकिले पार्थ आणि वैकुंठनाथ॥पाडूनियां मूर्छागत॥सेना सर्व आटिली॥४०॥बभ्रुवाहन मदन प्रद्युम्न॥मेघ
वर्ण घटोत्कचनंदन॥हंसध्वज नीलध्वज संपूर्ण॥सेनेसहीत मारिले॥४१॥आणिले दोनी श्यामकर्ण॥अष्टयज्ञ तुम
चे झाले संपूर्ण॥मयूरध्वज दीक्षित होऊन॥वेष्टीन ब्राह्मण बैसलासे॥४२॥समस्त वृत्तांत ऐकोन॥मयूरध्वज गहिंव
रला पूर्ण॥ताम्रध्वजास बोले वचन॥मज आतां वदन दाऊं नको॥४३॥परब्रह्म केवळ वैकुंठनाथ॥जो कमळोद्भव जन
क समर्थ॥सनकादिकांचें आराध्य दैवत॥सार निगमागमाचें॥४४॥महाराज कृष्णार्जुन॥प्रत्यक्ष ते नरनारायण॥त्या
वरी तूं शस्त्र धरून॥कां तूं युद्ध केलें हें॥४५॥घालूनियां लोटांगण॥आणितां सये थें प्रार्थून॥तरि मी होतों सुखसंपन्न॥
म्हणतों धन्य तुजलागीं॥४६॥अरे तूं हिंसक प्रसिद्ध॥अरे कैसा केला लिंगभेद॥श्रीकृष्ण पूर्णब्रह्मानंद॥त्यावरी शस्त्र
टाकिलें तुवां॥४७॥घरास येतां चिंतामणी॥अभाग्यें दिधला भिरकावुनी॥कल्पवृक्ष उपटोनी॥आंगणींचा टाकिला॥
॥४८॥कामधेनू येतां सत्वर॥अभाग्यें मारिले काष्ठप्रहार॥तैसा तुवां केला प्रकार॥हरीवरी शर घातले॥४९॥अमृत-
भाग्यें प्राप्त झालें॥तेणें कैसें संमार्जन केलें॥तैसें ब्रह्म घरा आलें॥अपमानिलें कैसें तुवां॥५०॥अरे तूं विष्णुद्रोही घात-
का॥जाय रे परता न दाखवीं सुख॥साहा अश्वमेध केले देख॥द्वारकानायक आला पैं॥५१॥सातवा यज्ञ करावयास॥ये
न होता जगन्निवास॥धावया मज निर्दोष यश॥स्वामी माझा दयाळू॥५२॥कंठ दाटला सद्गदित॥विमळांबुधारा नेत्रीं वा
हात॥मयूरध्वज चिंताक्रांत॥अशन प्राशन ने घेचि॥५३॥ऐसा राव आरंबळत॥इकडे काय झालें सेनेंत॥उठोनियां वै
कुंठनाथ॥सावध करीत पार्थासि॥५४॥उभा रे ताम्रध्वजा म्हणऊन॥हांक देत उठिला अर्जुन॥हांसोन बोले जनार्दन॥

गेला घेऊनअश्वदोनी॥ ५५॥ सैन्यतुझेंमारिलेंसमस्त॥ उरलेआह्मीदोघेजीत॥ येवढातुझाबळपुरुषार्थ॥ क्षीण
केलेंतेणेंपाहा॥ ५६॥ तुजहूनशतगुणेंदेखथोर॥ बळकटमयूरध्वजराजेंद्र॥ मगबोलेपार्थवीर॥ आतांयज्ञरा
हिलाकीं॥ ५७॥ सर्वकर्तातूंनारायण॥ आमचाकायसाअभिमान॥ तुवांचमांडिलायज्ञ॥ कर्तापूर्णतुझातूं॥ ५८॥
पांडवांचापूर्णकैवारी॥ हेंब्रीदगाजेत्रिभुवनभरी॥ तेंतूंसांभाळीकैटभारी॥ पूतनारीकंसांतका॥ ५९॥ यावरीबो
लेमदनतात॥ मयूरध्वजाचीभक्तिअद्भुत॥ सत्वशीळसदाशांत॥ तुजदावितोंचालआतां॥ ६०॥ हरीझालावृद्ध
ब्राह्मण॥ शिष्यसहजचिअर्जुन॥ पूर्वस्वरूपेंपालटून॥ रत्नापुरासमीपआले॥ ६१॥ त्यानगरीचीपाहातांरचना॥
विस्मयवाटेअर्जुना॥ ह्मणेहस्तनापूरनारायणा॥ वोंवाळावेंयावरूनी॥ ६२॥ आधिव्याधीदुःखदरिद्रअवर्षण॥
वृद्धपुष्कळदुर्मरण॥ नगरींनाहींअणुप्रमाण॥ प्रजाजनस्वरूप॥ ६३॥ नगरांतप्रवेशलेदोघेजण॥ लोकींदेखोनि-
दिव्यब्राह्मण॥ समस्तकरितीसाष्टांगनमन॥ नाहींअभिमानकोणासि॥ ६४॥ कृतांताऐशीशिक्षालाविती॥ ऐसेवीरन-
गरींहिंडती॥ पार्थासिह्मणेश्रीपति॥ पाहावीरसमर्थहा॥ ६५॥ आधीचपरब्रह्मसाक्षात॥ त्याहीवरीद्विजरूपशोभत॥
द्वादशटिळेविराजित॥ यज्ञोपवीतझळकतसे॥ ६६॥ नेसलाक्षीरोदकसुढाळ॥ शाटीपांघुरलाशुभ्रनिर्मळ॥ कर्णींकुंड
लांचाझळाळ॥ गंडस्थळींबिंबलासे॥ ६७॥ केशसांवरूनदिधलीग्रंथी॥ पांयींपादुकाविराजती॥ पुढेंशिष्यसुभद्राप-
ती॥ काठीधरूनिजातसे॥ ६८॥ यज्ञमंडपांतआलेदोघेजण॥ तोंचारीलक्षबैसलेब्राह्मण॥ येकदांचअवघेउठोन॥ सामो
रेयेतीविप्रांतें॥ ६९॥ कुंडांतुनीतिन्हीवन्ही॥ मूर्तिमंतउभेठाकोनी॥ आहवनीयगार्हपत्यदक्षिणाग्नी॥ सामोरेजातीवि
प्रांतें॥ ७०॥ मयूरध्वजधांवोन॥ घालिताझालालोटांगण॥ परमसन्मानेंप्रीतीकरून॥ सिंहासनीबैसविला॥ ७१॥ र-
त्नाभिषेकेंकरून॥ केलेंषोडशोपचारेंपूजन॥ मयूरध्वजकरजोडून॥ उभापुढेंपाहातसे॥ ७२॥ ब्राह्मणधाकतीसमस्त
॥ वृद्धवेदोनारायणसाक्षात॥ जरिआह्मासिकांहींपुशिलेयेथ॥ तरिप्रत्योत्तरनदेववे॥ ७३॥ मयूरध्वजसुखविलो-

कित॥ तोब्राह्मणझालासद्गदित॥ स्फुंदस्फुंदें तेव्हां रडत॥ नयनींवाहतअश्रुधारा॥ ७४॥ सभागजबजिलीसमस्त॥
हाब्राह्मणसत्वशीळबहुत॥ कोण्यापतितेंदुःखप्राप्त॥ केलेंयासीकळेना॥ ७५॥ मयूरध्वजतेव्हांबोलत॥ स्वामीकाय
सांगावावृत्तांत॥ तुजदुःखदिलेंत्यासबहुत॥ दंडआतांकरीनमीं॥ ७६॥ तुजवरूनप्राण॥ मींआपलाबोंवाळुन॥
तूंसांगसीतेंकरीन॥ आतांचदेईनमागसीतें॥ ७७॥ विप्रस्फुंदेतेअवसरीं॥ बोलतांशब्दनफुटेबाहेरी॥ ह्मणेराजेंद्रा
अवधारीं॥ वृत्तांनआतांझालातो॥ ७८॥ मींद्वारकेचाब्राह्मण॥ सांगातेंपुत्रशिष्यघेऊन॥ तुवांकेलेसाहायज्ञ॥ ह्मणो
निकीर्तिऐकिली॥ ७९॥ सातव्यायज्ञालागुन॥ येतहोतोंत्वरेंकरून॥ तुझ्यानगरासमीपजाण॥ दाटउद्यानेंलागलीं॥
॥ ८०॥ त्यांतूनअकस्मातपंचानन॥ आलाआह्मांवरीधांवोन॥ येकुलताऐकजाण॥ पुत्रमाझाधरियेला॥ ८१॥ वेदशा-
स्त्रींपरमनिपुण॥ वेदविधीनामत्यालागुन॥ ऐसापुत्रप्रवीण॥ भूमंडळींनसेकोणातें॥ ८२॥ कोमळबाळधरून॥ गेला-
झाडांमाजीघेऊन॥ ऐसेंबोलतांब्राह्मण॥ कंठदाटलापुढति॥ ८३॥ कोणासदुःखसांगोंआतां॥ सेनासिद्धकरारेतत्वता
॥ मगराजेंद्रझालाबोलता॥ त्वरेंचलावनाजाऊं॥ ८४॥ पृथ्वीवरीलपंचानन॥ धरूनआतांजिवेंमारिन॥ रावसिद्धझा
लाजाणोन॥ ह्मणेब्राह्मणऐकराया॥ ८५॥ मींत्यासिबोलिलोंवचन॥ भक्षीमजसोडीनंदन॥ मगतोबोलिलापंचान
न॥ तुझेंकदीणशरीरनलगे॥ ८६॥ तुवांव्रतेंतपेंकेलींसफार॥ नभक्षींतुझेंजरठशरीर॥ आतांकाकुळतीयेतसेथोर
॥ तरिविचारएकऐका॥ ८७॥ तुझापुत्रमीरक्षितोक्षणभरी॥ तूंमयूरध्वजापाशींजाझडकरी॥ त्याचादेहकर्वतूनयेअ-
वसरीं॥ उजवेंआंगआणीकां॥ ८८॥ त्याचेंसकुमारशरीरगोरवर्ण॥ भक्षितांमीतृप्तहोईन॥ मगतुझापुत्रसोडीन॥ हा
निश्चयजाणपां॥ ८९॥ मजयेवढाचरायास्फुत॥ वेदशास्त्रींपारंगत॥ त्याचेंलग्नमांडलेंनिश्चित॥ वेशारवशुद्धद्वाद-
शीशीं॥ ९०॥ देशीलकांहींआह्मासिधन॥ ह्मणोनयेनहोतोंधांवोन॥ ऐसेंमयूरध्वजेंऐकोन॥ कायवचनबोलत॥
९१॥ आयुष्यधनयौवन॥ हेंमरीचिजलवतक्षणिकजाण॥ राज्याअंतीनरकपूर्ण॥ भोगावेंकींनस्फुटती॥ ९२॥ क्षणि

कशरीरअशाश्वत॥आयुष्याचेंनकळेगणित॥ब्राह्मणकांजींवेचितांयथार्थ॥सार्थकयाचेंजाहालें॥९३॥सिद्द
झालाराजेंद्र॥कर्वतनआणाविलासत्वर॥मगबोलतकायविप्र॥येकयेकसांगतों॥९४॥तुझीस्त्रीआणिसुत॥यांज
वळीदेऊनकर्वत॥तुझाडोळांआलेअश्रुपात॥किंवारडतदेखिलाकोणी॥९५॥नगरांतीलमनुष्यमात्र॥कोणी-
नकरावाहाहाःकार॥कर्वतितांरायाचेंशीर॥गीतगावेंस्त्रीपुत्रानें॥९६॥यांतकांहींअंतरपडतांजाण॥मीजाईन-
तत्काळउठोन॥मगरायेंस्त्रीआणिनंदन॥बोलाविलींबरव्यापरी॥९७॥तुझ्मांसिपाळिलेंआजिवरीदेख॥आ
तांमाझेंकरासार्थक॥कदांनकरावाकोणीशोक॥सर्वलोकांविनविलें॥९८॥स्नानकरूनिसत्वधीर॥नित्यकर्म-
सारूनिपरिकर॥दानेंदेऊनअपार॥उभाठाकलातेथवां॥९९॥शिरींघातलाकर्वत॥हरिनामावळीमुखीउच्चा
रित॥हेद्वारकानाथमदनतात॥कृष्णमाधवगोविंदअच्युत॥नामप्रबंधउच्चारी॥१००॥खणखणांकर्वतवाज
ता॥रावनामावळीमुखींउच्चारित॥हेद्वारकानाथमदननात॥द्रौपदीलज्जारक्षका॥१॥स्त्रीपुत्रेंधरिलाकर्वत
॥रावसमस्तांसकरजोडित॥ब्राह्मणासविपरीत॥सहसाकोणीबोलूंनका॥२॥गजेंद्रोद्धारकाजगजीवना॥
पांडवपालकाजगन्मोहना॥तुझेंअक्षयीपदजनार्दना॥मजनेयींतेथेंआतां॥३॥ब्राह्मणह्मणेमूकवत॥कांक
र्वतितांतुह्मीयेथ॥रावस्त्रीपुत्रारवुणावित॥गाकांहींयेईलनेसें॥४॥मगह्मणतीराजेंद्रा॥मयूरध्वजाअति
उदारा॥शरीरसंपत्तीदेऊनविप्रा॥कीर्तिकेलीअद्भुत॥५॥सकळपृथ्वीचेभूपाळयेउनी॥राजेंद्रालागनीतुझेच
रणीं॥तुजऐसाउदारत्रिभुवनीं॥दुजानाहींभूभुज॥६॥ब्राह्मणांच्यापंक्तीबैसऊन॥कोणादेयीलइच्छाभो-
जन॥सकळधारासतेजपूर्ण॥कर्तातुजवीणनसेचि॥७॥नगरांतआक्रांतहोतथोर॥कैंचाआलारेयेथेंविप्र॥
नमागेसंपत्तीराज्यसाचार॥राजशरीरछेदविनो॥८॥सकळदेवविमानीं॥सिद्धझालेपुष्पेंघेउनी॥ह्मणतीध
न्यउपमात्रिभुवनीं॥मयूरध्वजातुजनसे॥९॥येकह्मणतीदेवपदेंसकळी॥यासदेतोवनमाळी॥तोंआश्व

र्यवर्तलेंतेकाळीं॥ तेंचसकळींपरिसिजे॥१०॥ रायाचाजोवामनेत्र॥ तेथूनचालिलीअश्रुधार॥ ब्राह्मणचालिला सत्वर॥ ह्मणेरडतोनेघेंआतां॥११॥ ब्राह्मणजातांदेखोनी॥ स्त्रीपुत्रविनविनीरायालागुनी॥ विप्रजातोतुजटांकुनी॥ कायआह्मींकरावें॥१२॥ रावब्राह्मणासतेवेळीं॥ करेंखुणावुनीबोलावीजवळी॥ येरूपातलातत्काळीं॥ ह्मणेसांगकांअश्रुआले॥१३॥ मयूरध्वजबोलेवचन॥ माझेंसव्यांगआनंदघन॥ तुह्मींजालतेंघेऊन॥ सार्थकझालें तयाचें॥१४॥ वामनेत्रींअश्रुआले॥ आपलेंसार्थकनाहींझालें॥ तेंदुःखआठवतेंयेवेळे॥ खेदेंरडतोंयाकरितां॥ ॥१५॥ ऐसेंऐकतांजगजीवन॥ दिव्यचतुर्भूजरूपप्रकटून॥ किरीटकुंडलेंमंडितवदन॥ आकर्णनयनविराजती॥ ॥१६॥ करवतकाढूननेसमयीं॥ मयूरध्वजधरिलाह्रदयीं॥ क्षतनदिसेसहसाही॥ दिव्यरूपजाहालें॥१७॥ झालायेकचिजयजयकार॥ पुष्पेंवर्षतीसुरवारंवार॥ लागलेवाद्यांचेगजर॥ लोकधांवतीपाहावया॥१८॥ अर्जुनस्वरूपप्रगटलें॥ मयूरध्वजेंआलिंगिलें॥ तेकाळींतेंसूखझालें॥ त्यासदृष्टांतनसेचि॥१९॥ कृष्णार्जुनाचेंपूजन॥ रायेंकेलेंप्रीतीकरून॥ करूनियांअपारस्तवन॥ धरीचरणवारंवार॥ २०॥ मगमयूरध्वजासहितश्रीकृष्ण॥ संगेंसप्तक्षोणीदळघेउन॥ जेथेंपडिलेंघोररण॥ तेथेंआलेतेधवां॥२१॥ अद्भुतकेलेंगोपाळें॥ दृष्टीनेंविलोकितांसर्वदळ॥ प्राणीमात्रजिवविलेसकळ॥ गर्जोंलागलेसकळवीर॥२२॥ ताम्रध्वजाचेंदळ॥ जिवविलेंश्रीरंगेंतत्काळ॥ गर्जनवाद्यांचाकल्होळ॥ रत्नपुराप्रवेशले॥२३॥ राहावूनसप्तदिवस॥ रायेंपूजिलाजगन्निवास॥ अपारसंपत्तीरत्नेंविशेष॥ भगवंतासमर्पिलीं॥२४॥ मयूरध्वजासह्मणेजगजीवन॥ तुह्मींआह्मींसात्यहोऊन॥ धर्मयागसंपादुन॥ सिद्धीनेऊंतत्वता॥२५॥ मयूरध्वजह्मणेकृपानिधी॥ सातवायागनपावतांसिद्धी॥ अंतरपडेलवेदविधी॥ कैसायेऊंसांगातें॥२६॥ हरीह्मणेसाहायागकेले॥ तेंतुवांकोणासतोषविलें॥ आतांसप्तयागांचेंश्रेयसगळें॥ मदर्पणकरींकां॥२७॥ अनंतयागांचेफळ॥ तुझ्याहातासआलेंनिर्मळ॥ तुष्टलोंमींघननीळ॥ चालधर्मासीभेटा-

वया॥ २८॥ मयूरध्वजबोलेवचन॥तुझेंवाक्यमजप्रमाण॥ सोडिलेदोन्हीश्यामकर्ण॥सात्यआपणचालिला ॥
२९॥पूर्णब्रह्मानंदाअभंगा॥ सर्वस्वसात्यश्रीरंगा॥श्रीधरवरदानिःसंगा॥ नपडेव्यंगाकोठेंही ॥१३०॥ दोन्हीश्या
मकर्णपुढेंजात ॥सकळरायांसहितपार्थ॥पाठीसिंजातसेरक्षित॥ नृपसमस्तसमागमें॥ ३१॥ यावरीसारस्वत-
पुरीं॥वीरवर्माराज्यकरी॥त्याच्यासेवकींझडकरी॥ घोडेधरूननेलेतेव्हां॥ ३२॥ज्याच्याराज्यांतबहुतनीति ॥
जांवई ज्यांचाशयमिनीपती॥ पुण्यपरायणनृपति॥ नाहींवस्तीपापाची॥ ३४॥ परस्त्रीदेखतांनिर्बळ॥ परधनपा
हातांअंधकेवळ॥ परनिंदेविषयींसकळ॥मुकेहोतीकेवळ॥ ३४॥आधिव्याधीदरिद्रकांहीं॥ज्याचेग्रामींनसेका
ळत्रयीं॥ शयमिनीत्याचीकन्यापाहीं॥तेदिधलीयमातें॥ ३५॥ सर्वहीवीरमरती॥ शेवटींयमालयाप्रतिजाती॥
म्हणोनतेयमस्त्रीनिश्चिती॥ झालीप्रीतीविचारुन॥ ३६॥सर्वपतिव्रताम्हणविती॥अग्नीसशेवटींशरीरदेती ॥
तरितेनव्हेपतिव्रतासती॥ वैश्वानरासिमिळतां॥३७॥ ऐसेंजाणोनशयमिनी॥ झालीवैवस्वताचीपत्नी॥तेपति
व्रतांमाजीशिरोमणी॥भ्रतारसेवेसादर॥ ३८॥ वीरवर्म्याचीनगरीशुद्ध॥ धर्मेंनांदतचतुष्पद॥ घरोघरींब्रह्मानंद
॥नाहींविषमकोठेंही॥ ३९॥असोपंचपुत्रांसहित॥ वीरवर्माबाहेरनिघत॥ज्याच्यादळासनाहींअंत॥युद्धअद्भु
तमांडलें॥ ४०॥ श्वशुराचेंसंकटजाणोन॥यमपातलास्वर्गाहुन॥नानाव्याधीरोगघेऊन॥सात्यतेसपातला॥ ४१॥
तीनशतशूळमूर्तिमंत॥ ऐसेघातरोगआलेधांवत॥ पातलेचौदासन्निपात॥ अष्टादशकुष्ठवेगळाले॥ ४२॥ अष्टो
त्तरशतगुल्मरोग॥चौऱ्याशींधनुर्वातआलेसवेग॥क्षयरोगसेनापतिअभंग॥सर्वांमाजीश्रेष्ठतो॥ ४३॥ अष्टोत्तर
शतरोगमुख्यसप्त॥त्याचेभेदमगआहेतबहुत॥ वर्णितांनलगेचिअंत॥ कासयाग्रंथवाढवूं॥ ४४॥ वीरवर्म्या-
चेंअद्भुतबळ॥सात्यतेसयमाचेंपातलेसबळ॥युद्धमांडलेंतुंबळ॥पांडवदळसंहारिलें॥ ४५॥ पार्थरथींकमळा
कांत॥ वीरवर्मात्याप्रतिबोलत॥श्रीकृष्णातूंरक्षींपार्थ॥ पाहेंप्रतापमाझाआतां॥ ४६॥ साठीबाणघालुन॥ विक-

ळकेलावीरअर्जुन॥ पांचबाणींसंपूर्ण॥ पंचशरजनकविंधिला॥ ४७॥ सावधहोऊनपार्थ॥ त्यावरीबाणजाळघालि
न॥ मगह्मणेरमानाथ॥ पार्थावीरनाटोपेहा॥ ४८॥ तुवांमारिलेकर्णजयद्रथ॥ तेसेंनव्हेहेंयेथ॥ राजेसर्वकेलेमूर्छि
त॥ सात्यतूंजआलेजे॥ ४९॥ तरीहनुमंतायाचारथबांधावा॥ नेऊनससुद्रांतटाकावा॥ वायुसुतह्मणेकेशवा॥ अ-
शोकवननव्हेहें॥ ५०॥ महाराजहाविष्णुभक्त॥ नवसामर्थ्येंचबळवंत॥ मगवीरवर्म्याचारथ॥ अंजनीपुत्रेंउचलि
ला॥ ५१॥ वीरवर्म्यानेंपार्थस्यंदन॥ येकहस्तेंघेतलाउचलून॥ अलातचक्राऐसाभोंवडून॥ समुद्रावरीपातला॥ ५२
वीरवर्माह्मणेहनुमंता॥ तूंमजदाकिशीजेथेंआतां॥ पार्थआणिकृष्णनाथा॥ त्यांसहीयेथेंबुडवीनमीं॥ ५३॥ येका
हातेंधरिलारथ॥ येकहस्तेंताडिलाहनुमंत॥ वायुसुतलत्ताप्रहरदेत॥ परीतोकदांनसोडीहो॥ ५४॥ वीरवर्म्याचे-
ह्रदयीं॥ कृष्णेंलातदिधलीतेसमयीं॥ मगअवघेचआपटिलेमही॥ युद्धतेथेंहीकरितां॥ ५५॥ श्रीरंगह्मणेअर्जु-
ना॥ हावीरकदांआटोपेना॥ येथेंकोणाचेंबळचालेना॥ सहस्त्रवर्षेंभिडतां॥ ५६॥ कृष्णह्मणेरेवीरवर्म्या॥ तुवांके
लीआजियुद्धाचीसीमा॥ तूंजदेखोनप्रेमा॥ उचंबळतभेटावया॥ ५७॥ ऐसेंऐकतांवचन॥ वीरवर्माघालीलोटांग-
ण॥ कृष्णार्जुनाप्रीतीकरून॥ भेटलातोरणपंडित॥ ५८॥ आपुलेंसर्वराज्यधन॥ तत्काळकेलेंकृष्णार्पण॥ शास्त्र
संख्यादिवसराहावून॥ आदरकेलाबहुतन्वि॥ ५९॥ भांडारेंसमर्पिलींसर्व॥ येकवीससहस्त्रदिधलेअश्व॥ यमें
येऊनवंदिलामाधव॥ गेलास्वस्थानात्यावरी॥ ६०॥ श्रीकृष्णवचनेंकरून॥ वीरवर्मादळघेऊन॥ सात्यजाहलेसं-
पूर्ण॥ तनमनधनघेऊनियां॥ ६१॥ पुढेंनंददडोहोगहन॥ दोनीघोडेगेलेत्यावरून॥ भिजोंदिलानाहींचरण॥ प-
वनाहूनगमनत्याचें॥ ६२॥ मगनौकाआणूनबहुत॥ पार्थदळभारउतरित॥ पुढेंकुंतळापूरदेखत॥ नगरचंद्रह[illegible]
स्याचें॥ ६३॥ नगराजवळीयेतांजाण॥ अदृश्यझालाश्यामकर्ण॥ दळभारतेथेंथोकोन॥ तटस्थरूपपाहातसे॥ ६४
ह्मणतीवारूनेलेकोणीयेथ॥ हानकळेचिकायवृत्तांत॥ वेडावलावीरपार्थ॥ बुद्धीकांहींस्फुरेना॥ ६५॥ तोंअकस्मात

नारदमुनी॥ उभेठाकलेयेऊनी॥ जोदिव्यगंधींदिव्यसुमनीं॥ सुरगणींचर्चिला॥ देखोनिविष्णुनाभनंदन॥ नमिती-
स्तविती कृष्णार्जुन॥ सकळराजेयेऊन॥ मस्तकठेविती पांयांवरी॥ ६७॥ अर्जुनबोलेवचन॥ येथेंगुसझालेश्यामकर्ण॥
हांसिलातेव्हांब्रह्मनंदन॥ ह्मणेवर्तमानऐकआतां॥ चंद्रहास्येंश्यामकर्णनेले॥ तेंतुह्मांसकांहींचनाहींकळलें॥ यावरी
सुभद्रावरेंपुशिलें॥ चंद्रहास्यकोणअसे॥ ६९॥ नारदह्मणेऐकइतिहास॥ चंद्रहास्यमहाराजपुरुष॥ ज्याचेंचरित्रऐ
कतांनिर्दोष॥ प्राप्तयशहोयपैं॥ ७०॥ अवघेराजेआणिकृष्णार्जुन॥ कथाऐकतीसावधान॥ चंद्रहास्याचेंचरित्रगहन॥
विधिपुत्रवर्णीलतें॥ ७१॥ तेसुरसकथाअसेफार॥ ब्रह्मानंदहोऊननिर्भर॥ ऐकतेंचहोसादर॥ प्रेमभरेंकरूनियां॥
७२॥ श्रीपांडुरंगविहारा॥ श्रीधरवरदाजगदोद्धारा॥ ब्रह्मानंदाअतिउदारा॥ बोलेलसारकथातें॥ ७३॥ सुरसपांडवप्र
तापग्रंथ॥ अश्वमेधजयमिनीकृत॥ त्यांतीलसारांशनिश्चित॥ येकसष्टाव्यांतकथियेला॥ ७४॥ ॥ श्रीगोपीजन-
वल्लभायश्रीकृष्णायनमः॥ ॥ छ॥ ॥ छ॥ ॥ छ॥ ॥ छ॥ ॥ छ॥

श्रीगणेशायनमः॥ ॥सव्यसाचीप्रतिकथागहन॥सांगेसरसिजोद्भवनंदन॥पूर्वीएकनृपपावन॥केरळाधिपतीना
मनयाचें॥१॥त्यालापुत्रजाहलासुलक्षण॥चंद्रहास्यनामाभिधान॥पृथ्वीवरीएसेंआन॥स्वरूपनाहींतत्वता॥२॥
त्यानृपावरआलेंपरचक्र॥युद्धजाहलेंसप्तरात्र॥केरळाधिपतीपावलापरत्र॥शत्रूनींनगरघेतलें॥३॥राजजायाकरी॰
अग्निप्रवेश॥मगउपमातेनें घेऊनचंद्रहास॥चोरूननेतकुंतलापुरास॥निशीदिवसजतनकरी॥४॥तीनवर्षेंहोनांपू
र्ण॥धात्रीहीगेलीमरोन॥मगनिराधारराजनंदन॥आश्रयकोठेंनसेचि॥५॥तोंशालिग्रामनृसिंहमूर्ती॥सांपडलीत्या
बाळकाप्रति॥वदनसंपुटींअहोरात्री॥प्रीतिजतनकरीतया॥६॥पूजाकरूनत्रिकाळ॥मुखींरक्षीनसदानिर्मळ॥परदे॰
शींहिंडेबाळ॥ह्मणोनलोकदयाकरिती॥७॥एकपाचारूनअन्नघालिती॥एकपांघरावयासवस्त्रदेती॥चिमणेंबाळ
घेवोनिसांगती॥बिदोबिदीखेळत॥८॥बाळदेखोनिसुलक्षण॥तन्मयहोतीजननयन॥कडेवरीघेतीउचलोन॥चुं
बनघेतीप्रीतीनें॥९॥तेथीलकुंतलेश्वरनृपती॥दुष्टबुद्धीपापमती॥प्रधाननयाचानिश्चिती॥अतिदुरात्मानिर्दय॥
॥१०॥कामीकबुद्धीतोक्रूर॥पाचारूनिऋषेश्वर॥अन्नसंतर्पणहोतसेथोर॥तोंबाळसमोरदेखिला॥११॥प्रधानेंबा
ळबोलाउन॥ह्मणेंतूंकरीयेथेंभोजन॥द्विजपंक्तीतोसुलक्षण॥भोजनासिबैसला॥१२॥शाळिग्रामासितुळसीवा
हुन॥सर्वेचनैवेद्यकरीअर्पण॥तीर्थघेऊनिकरीप्राशन॥ऋषीतटस्थपाहानि॥१३॥भोजनकरूनबाळउठिला॥
प्रधानाचेपुढेंबैसला॥ऋषीसऐसाभावगमला॥कींपुत्रयाचाचनिर्धारें॥१४॥ब्राह्मणमंत्राक्षतादाकिता॥हापुत्र॰
विजयीहोतुझाश्रीमंत॥पृथ्वीजिंकोनसमस्त॥राज्यकरीलरामाऐसें॥१५॥ऐकतांक्षोभलाप्रधान॥ह्मणेपदतमू
दतुह्मींब्राह्मण॥पुत्रकोणाचानेणोन॥आशीर्वाददीधला॥१६॥स्वस्थळागेलेब्राह्मण॥असत्यनव्हेविप्रवचन॥चिं
तामानसींदारूण॥दुष्टबुद्धीसिलागली॥१७॥ह्मणेब्रह्मवचननिश्चिती॥असत्यनव्हेकल्पांतीं॥मगअंत्यजजीवघा
ती॥त्यांसिएकांतींसांगत॥१८॥ह्मणेहेंपोरचाळऊनी॥नेऊनिवधातत्काळवनीं॥साहावीअंगुलीचरणीं॥तेवधूनि॰

खुण्या आणावी ॥ १९ ॥ मग ते बाळ घेऊनि वना गेले ॥ शस्त्र मारायासि काढिलें ॥ देखोन बाळ घाबरलें ॥ ह्मणे कां
मज मारितां ॥ २० ॥ तंव ते बोलती वचन ॥ तुज मारवितो प्रधान ॥ चहूंकडे पाहे राजनंदन ॥ दिशा शून्य दीसती ॥ २१ ॥
मग सुरवींची काढिली शिळा ॥ करतळीं घेतली तेवेळां ॥ ह्मणे करावी करुणा दीनदयाळा ॥ हरि गोविंदा माधवा ॥ २२
ह्मणे मीं बाळ अनाथ दीन ॥ आजवरि केलें माझें पालन ॥ जनक जननी तुजवीण ॥ कोणी नसे मज यावेळीं ॥ २३ ॥ धां
वे प्रल्हाद रक्षका जगजेठी ॥ मज ठाव देईं तुझ्या पोटीं ॥ मीं नव कंठीं घालीन मिठी ॥ कृपादृष्टी पाहें पां ॥ २४ ॥ ऐसें बोलोन
सप्रेम ॥ सुरवीं घातला शाळिग्राम ॥ तंव चांडाळ निर्दय परम ॥ शस्त्र उचलिती वधावया ॥ २५ ॥ न्याहाळून जंव ते पा-
हाती ॥ तों सिंहवदन रमापती ॥ शंखचक्रादि आयुधें हातीं ॥ उभा पाठीसि रक्षित ॥ २६ ॥ सुदर्शन धगधगित ॥ हातीं
धरिलें क्रोधयुक्त ॥ ब्रह्मांड जाळील समस्त ॥ हेलावत त्यापरी ॥ २७ ॥ त्या तेजामाजी निश्चिती ॥ चंद्रसूर्य बुचकळ्या-
देती ॥ विद्युल्लता करपोनि जाति ॥ दंतपंक्ती तैशा हो ॥ २८ ॥ भयाभीत झाले चांडाळ ॥ ह्मणती कोणीं वधावें हें बाळ ॥ मा
गसा हावी अंगुळी तत्काळ ॥ छेदोनि गेले घेउनी ॥ २९ ॥ वधिलें ह्मणोनि दाविली खुण ॥ तोषलें दुष्टबुद्धीचें मन ॥ इक
डे बाळ करी रुदन ॥ घोर कांतारीं हिंडत ॥ ३० ॥ रुदनामाजी हरीचा छंद ॥ गात दिव्य नाम प्रबंद ॥ तों मृगया करीत राव
कुलिंद ॥ तया स्थळासि पातला ॥ ३१ ॥ बाळ देखोनि सकुमार ॥ रथ सोडून धांवे नृपवर ॥ उचलोन घेतला सुंदर ॥ उद
कनेत्रींचें पुशिलें ॥ ३२ ॥ नों नाम माळा सुंदर ॥ बाळ उच्चारी वारंवार ॥ देववाणी वदे साचार ॥ राया तुज पुत्र दिधला घे ॥-
३३ ॥ कुलिंदाचा हर्ष न माय गगनीं ॥ नगरास आला परतोनि ॥ भांडारें फोडिलीं तये क्षणीं ॥ याचकां हातिलुटविलें ॥ ३४
लागला वाद्यांचा कल्लोळ ॥ चंदनावतीचे लोक सकळ ॥ मुंडप घुसणी होतसे प्रबळ ॥ पाहावया बाळकासि ॥ ३५ ॥
कुलिंदाची मेघावती पट्टराणी ॥ कुरवंडी करी पुत्र देखोनी ॥ वोसंगा आडवा घेउनी ॥ स्तनपान करवीतसे ॥ ३६ ॥ चु
कलें बाळक भेटे पुढती ॥ तैशी गगनीं न माय प्रीती ॥ पान्हा फुटला तियेप्रति ॥ न सांवरे च सर्वथा ॥ ३७ ॥ धांवले वि

प्रबहुत॥ लक्षणपाहूनिसांगत॥ नामचंद्रहासयथार्थ॥ नसेविपरीतकदाही॥ ३८॥ नगरजनआणिनीअहेर॥
त्याचेद्विगूणदेतनृपवर॥ लोटल्याससप्तसंवत्सर॥ मौंजीबंधनजाहलें॥ ३९॥ वेदशास्त्रींनिपुण॥ जाहलाचौसष्टक
ळाप्रवीण॥ पुत्रविद्यादेखोनि॥ कुलिंदरावतोषला॥ ४०॥ राजकारभारसमस्त॥ चंद्रहासासिरावदेत॥ यथाकाळीं
मेघवर्षत॥ धरणीपिकेअसंभाव्य॥ ४१॥ धेनूदुभतीअपार॥ आधिव्याधीनसेअणुमात्र॥ चंद्रहासेंलोकसम
ग्र॥ पाचारूनिसांगीतलें॥ तुळसीवृंदावनेंहरिपूजन॥ पुराणश्रवणहरिकीर्तन॥ हरिदिनीदिनत्रयव्रतपूर्ण॥ अ
न्नोदकयाचका॥ ४३॥ इतकेंजोनकरीसत्य॥ त्यासदंडीनयथार्थ॥ लोकतैसेंचआचरतीसमस्त॥ दानधर्मयथा
विधी॥ ४४॥ षोडशवर्षेंजाहल्यापूर्ण॥ मेळऊनअपारसैन्य॥ पित्यासह्मणेपृथ्वीजिंकीन॥ आज्ञाद्यावीमहाराजा
॥ ४५॥ कुलिंदह्मणेकुंतळेश्वर॥ यासदेतोंआह्मींकरभार॥ दुष्टबुद्धीप्रधानदुराचार॥ नशकेदेखोंआह्मातें॥ ४६
चंद्रहासह्मणेउत्तर॥ पृथ्वीजिंकोनसमग्र॥ मगत्याचाघेईनसमाचार॥ शिक्षालावीनक्षणमात्रें॥ ४७॥ असो-
चंद्रहासेंनिश्चित॥ पृथ्वीजिंकिलीअकरादिवसांत॥ भूमंडळींचेनृपनाथ॥ जिंकोनआणिलेनगरातें॥ ४८॥ कु
लिंदसामोरायेत॥ पुत्रदेखोनिआनंदत॥ चंद्रहाससाष्टांगनमित॥ क्षेमदेतपित्यासी॥ ४९॥ सर्वराजेपित्यासभे
टऊन॥ करवीत्यांहातीनमन॥ असोयज्ञजाहलासंपूर्ण॥ राजेबोळविलेस्वस्थाना॥ ५०॥ कुलिंदह्मणेएककुमरा॥
करभारपाठवावाकुंतलेश्वरा॥ येरूह्मणेआज्ञादीजेसत्वरा॥ धरूनआणीनक्षणमात्रें॥ ५१॥ कुलिंदह्मणेपूर्वा
पार॥ त्यासदेतोंकरभार॥ स्वामीद्रोहनकरावासाचार॥ चंद्रहासअवश्यह्मणे॥ ५२॥ समागमेंलोकदेऊनसत्वरा॥
द्रव्यपाठविलेंकुंतलपुरा॥ दुष्टबुद्धीनेंभांडारा॥ द्रव्यसांठविलेंसमग्र॥ ५३॥ कुंलिंदाचेलोकांसयथाविधि॥ पाहुणेर
करीदुष्टबुद्धी॥ ह्मणेजाहालीपाकसिद्धी॥ भोजनासिउठावे॥ ५४॥ तंवतेलोकसत्यविश्वासी॥ ह्मणतीआजएका
दशी॥ चंद्रहासकोपेलआह्मासी॥ शासनकरीलतत्काळ॥ ५५॥ चंद्रहासआणिहृषीकेशा॥ दोहींकडेहोईलनाश॥

क्रोधदाटलादुष्टबुद्धीस॥माझेवचनासमाननदेती॥५६॥तुमचाकुलिंदआणिचंद्रहास॥क्षणनलागतांवधीनदोघांस॥
तेंवनेसांगतीपराक्रमत्यास॥अद्भुतवयाचा॥५७॥सकळजिंकिलेनृपनायक॥नृंकायत्यापुढेंमशयक॥येथीलराज्य-
सकळिक॥घेईलक्षणनलागतां॥५८॥परमकोपलादुष्टबुद्धी॥लोकआकळोनघातलेबंदी॥कुंतलेश्वराजवळीतोकु
बुद्धी॥वर्तमानसांगत॥५९॥कुलिंदमानलाबहुत॥द्रव्यपाठविलेंकिंचित॥त्याचासमाचारघेऊनत्वरित॥येतोंसत्व-
रपूढती॥६०॥रावह्मणेचंपकमालती॥उपवरकन्याझालीजाणती॥वरसकललक्षणपुरुषार्थी॥पाहोनियांआणावा॥६१
अवश्यह्मणेतेअवसरीं॥तोंविषयाप्रधानकुमरी॥पितयासह्मणेनिर्धारीं॥वरमजआणावा॥६२॥प्रधानेंगणिलेदि
वस॥षोडशवर्षैंजाहलींकन्येस॥ह्मणेद्यावीजरिशिवास॥नरितोमसणींलोळत॥६३॥विष्णुपरद्वारीनाटक॥कुला
लतोचतुर्मुख॥इंद्राआंगीभगेंदेख॥दूषणेंसमस्तनवग्रहां॥६४॥कन्येचेंकरीसमाधान॥उत्तमवरआणूनकरीनलग्न
असोदळभारघेऊन॥चंदनावतीसपातला॥६५॥कुलिंदसामोरायेऊनभेटला॥दुष्टबुद्धीमंदिराआणिला॥ह्मणेतुमचा
पुत्रपुरुषार्थीभला॥भेटवींवहिलामजलागीं॥६६॥चंद्रहासआलातत्काळ॥उठूनभेटलादुष्टखळ॥न्याहाळूनपाहे-
खळ॥चिन्हेदेखिलेंअंगुळीचें॥६७॥ह्मणेतोचहाकाळयथार्थ॥अंत्यजीयाससोडिलाजित॥मगनम्रवचन
बोलत॥कुलिंदाप्रतितेधवां॥६८॥ह्मणेऐसापुत्रतुह्मींलपविला॥आमुचेरायासिनाहींभेटविला॥मगचंद्र
हासतेवेळां॥एकांतासिनेतदुष्टबुद्धी॥६९॥ह्मणेमीपत्रदेतोंलिहोनी॥कुंतळापुराजावेंघेउनी॥मदनासभेटावेंजाउनी॥
तोंमीमागुतासत्वरयेतों॥७०॥आमुचाध्यासतुमचेपाईं॥रात्रदिवसलागलापाहीं॥चंद्रहासह्मणेलवलाहीं॥जातों-
आतांचिसत्वर॥७१॥दुष्टबुद्धीलिहीपत्र॥परमचांडाळअपवित्र॥दुष्टाचेंमनसकपटत्यफार॥इंद्रादिकांनकळेचि॥७२
सहस्त्रायुचिरंजीवमदना॥माझीतुजलाहेचिआज्ञा॥चंद्रहासासनवदर्शना॥पाठविलेंयथार्थ॥७३॥विषदीजेयासि॥
विचारनपुसेकोणासि॥भोजनींउदकींनिश्चयेंसी॥सर्वथाविसरनपडावा॥७४॥अभ्यंगशयनींनत्वता॥कींसुगंध-

आंगींचर्चिंना॥उत्साहकरावापुरता॥पुत्रआमुचाजरिहोसी॥ ७५॥विचारकोणानपुसावा॥स्फदीनकुदीननपाहावा॥
आमुचामार्गनलक्षावा॥बराकरावाउत्साह॥७६॥पत्रगुंडाळोनिकरींदेत॥ह्मणेएकलेंतुह्मींजावेंतेथ॥मगचंद्रहा॰
सत्वरित॥पितयासआज्ञापुसे॥७७॥ह्मणेकुंतलपुरासजाऊन॥सत्वरयेतोंपरतोन॥तत्काळवारूवरीबैसोन॥एक
लाचनिघाला॥७८॥शतयोजनेंपंथक्रमोनी॥कुंतलापुरासमीपयेउनी॥राहूनियांउपवनीं॥स्नानकरोनिपूजाकरितसे॥
७९॥केलेंशालग्रामाचेंअर्चन॥सहस्त्रनामकेलेंपठण॥जवळीलनिर्दोषान्नघेऊन॥केलेंभोजनचंद्रहासें॥८०॥विडा॰
घेऊनतेअवसरीं॥निद्राकेलीक्षणभरी॥तोंवनक्रीडेससुंदरी॥विषयाआलीत्यास्थाना॥८१॥सवेंसखियापांचशत॥
नानाचातुर्यकळादावित॥विषयादुरोनिदेखत॥पुरुष निद्रिस्थजाहालातो॥८२॥ह्मणेवारूदृक्षासबांधोन॥कोणीये
थेंकेलेंशयन॥सकळसखियासचुकवून॥ एकलीचतेथेंआली॥८३॥शंकतशंकतजात॥दृक्षाआडलपतलपत॥म॰
नामाजीचिंतित॥क्षणएकनिद्रिस्तअसो॥८४॥जवळीयेऊनजंवपाहात॥आंगींच्याकळादिव्यफांकत॥जैसाकेवळर॰
तीकांत॥शोभायमानदिसतसे॥८५॥तोंजवळीगांठदेखत॥तेसोडोनिजंवपाहात॥तोंशाळिग्रामदीप्तिमंत॥ह्मणेवि॰
ष्णुभक्तअसेहा॥८६॥पुढतीपाहेझडकरी॥तोंपत्रदेखेतेअवसरीं॥पितृमुद्राओळखूननिर्धारीं॥परमसंतोषवाट
ला॥८७॥उकलूनिपत्रवाचित॥विषदिजेयासत्वरित॥वरकडलेखनपदांचाअर्थ॥उत्तमचिनिघाला॥८८॥ह्म
णेहेंकांविपरीत॥तांतडीजाहालीयथार्थ॥अक्षरचुकलेंसत्य॥नरियेथेंकैसेंकरावें॥८९॥तेव्हांनखेंनेत्रींचेंकाज
ळ॥ काढूनितथेंलिहीतत्काळ॥विषयादेयींयासप्रांजळ॥लिहूनपत्रबांधिलें॥९०॥मगह्मणेजयजयभवानी॥तु
ष्टलीसमेजलागोनी॥ह्यावरदेयींयेक्षणीं॥आणीक कांहिंनमागेंतुतें॥९१॥स्वरूपसुंदरदेखोनी॥ह्मणेमीजांई
नओंवाळुनी॥वारापाल्हंकाययेक्षणीं॥घर्मपातलाशरीरा॥९२॥जरिजागाझालाप्राणनाथ॥तरितेंहीगोष्ट॰
अनुचित॥मायाजाळपरमाद्भुत॥गुंडाळतअतःकर्णा॥९३॥सवेंचसखियामाजीमिळाली॥आपुलेगृहासि

पातली॥ मनांतचिंतालागली॥ तीनसांगेकोणाते॥ ९४॥ चंद्रहासजागाहोऊन॥ सत्वरवारूवरीबैसोन॥ प्रधान
गृहासयेऊन॥ वृत्तांतआंतपाठविला॥ ९५॥ ऐकतांमदनआलाधांवत॥ क्षेमालिंगनप्रीतीनेंदेत॥ मंदिरांतनेऊ-
नित्वरित॥ पूजाकेलीप्रीतीनें॥ ९६॥ चंद्रहासपत्रदेत॥ मदनउकलूनपाहात॥ विषयादिजेत्वरित॥ पदेंसकळउ
त्तमचि॥ ९७॥ घरांतघेऊनगेलालिखित॥ मातेपुढेंघडघडांवाचित॥ ह्मणेत्वराकराबहुत॥ पदेंसमस्तउत्तमचि॥
९८॥ स्त्रियायेवोनित्वरित॥ गवाक्षद्वारेंविलोकित॥ स्वरूपासउणारतिकांत॥ हर्षभरीतसर्वजाहाल्या॥ ९९॥ म
दनमातेसह्मणत॥ आज्ञाकरावीजीत्वरित॥ तंवतीह्मणेउत्तमबहुत॥ करातयारीयासमयीं॥ १००॥ बाहेरआला
मदन॥ आणविलेज्योतिषीबोलाऊन॥ ह्मणेसांगाकधींसुलग्न॥ येरविचारूनबोलती॥ १॥ उत्तमलग्नआजिअ
से॥ पुढेंमासांतावांचोनिनसे॥ बापचरित्रकेलेंहृषीकेशें॥ त्वराह्मणोनिउठिले॥ २॥ नवरागुप्तरूपेंनेउनी॥ बैसवि
लाशेजारसदनीं॥ मदनस्त्रियाजाउनी॥ जाहाल्याबहिणीचंद्रहासाच्या॥ ३॥ वऱ्हाडीमिळालेबहुत॥ हळदवधुव
रांसलावित॥ विप्रस्वस्तिवाचनसंपादित॥ गजरेंवाजवितवाजंत्रें॥ ४॥ वरसुंदरदेखोन॥ बोलतीनगरींचेजन॥
ह्मणतीविषयेचेंभाग्यधन्य॥ ऐसेंनिधानजोडलें॥ ५॥ लग्नघटिकाजवळीआलि॥ विषयाशृंगारूनआणिली॥
मधुपर्कादिपूजाकेली॥ आरंभिलीमंगळाष्टकें॥ ६॥ अंतःपटगेलाफिटोन॥ लोकह्मणतीसावधान॥ दोघांजालें-
पाणिग्रहण॥ लाजाहोमादिसर्वही॥ ७॥ इकडेदुष्टबुद्दीनेंकेला अनर्थ॥ कुलिंदासआकळूनबंदीघालित॥ नगर
विध्वंसोनिसमस्त॥ कलहकरूननिघाला॥ ८॥ तोंवाटेससर्पबोलिलाएक॥ मीतुझ्याद्रव्याचारक्षक॥ मदनेंवेंचि
लेंसकळिक॥ विषयेचाविवाहजाहला॥ ९॥ घाबरलातोप्रधान॥ तोंपुढेंयेतांदेखिलेब्राह्मण॥ ह्मणेकोठूनिआलां
रेअवघेजण॥ ददाऊनउभेकेले॥ १०॥ तोंतेआशीर्वाददेत॥ धन्यतुझामदनसुत॥ द्रव्यवेंचिलेंअपरिमित॥ लग्न-
जाहालेंविषयेचें॥ ११॥ सेवकांसह्मणेधराब्राह्मण॥ जिव्हाटांकायांच्याउपडून॥ द्रव्यघेतलेंहिरोन॥ मगसोडूनदी

धले॥१२॥ मंदिरास आला त्वरित॥ मदन पितयास नमस्कारित॥ ह्मणे काय लिहिलें लिखित॥ कैसा अनर्थ केला
तुवां॥१३॥ येरू ह्मणे पत्र पाहून॥ तत्काळ चिलाविलें लग्न॥ पाहा वधुवरें कैशीं सुलक्षण॥ द्रव्य संपूर्ण वेंचिलें॥१४
पत्र आणविलें सत्वर॥ अक्षरें वाचिलीं सादर॥ विषया दीजे हें उत्तर॥ मग उगा चि राहिला॥१५॥ ह्मणे लेखनी गेली
चाचरी॥ कीं डोळां पडली आंधारी॥ मदनास ह्मणे ने अवसरीं॥ उत्तम कृत्य केलें तुवां॥१६॥ कुंतलेश्वरासि नमस्कारु
न॥ सांग सकळ वर्तमान॥ तत्काळ निघाला मदन॥ राया प्रति सांगत॥१७॥ प्रधान आले ग्रामाहुन॥ निद्रा केली अ·
सेश्रमोन॥ आणि साड्यांचे आहे कारण॥ जाहालें लग्न विषयेचें॥१८॥ तों लोक जवळील सांगती॥ जो कां चंद्रहास
भूपती॥ ज्याची पृथ्वीवरी ख्याती॥ विषयेस वर तो केला॥१९॥ राजा जाहाला कोपायमान॥ माझे कन्येचें सांडून लग्न
आपुले कन्येलागुन॥ वर सुंदर मेळविला॥२०॥ एक ह्मणती तो च वर आणून॥ चंपकमालती द्यावी पूर्ण॥ मग रा·
येंअपार जन॥ मदना सांगाती दीधले॥२१॥ वर आणि जे गजीं बैसऊनी॥ देऊं तया चंपकमालिनी॥ सुलग्न आहे या
चक्षणीं॥ उशीर आतां न लावावा॥२२॥ इकडे दुष्टबुद्धी काय करित॥ अंत्यज बोलाऊनि सांगत॥ ह्मणे चंडिकेचे देवळां
त॥ आंधारीं गुप्त बैसावें॥२३॥ जो येईल पूजा घेउनी॥ तेथेंच घ्यावा त्याचा प्राण॥ मग ह्मणे चंद्रहासालागुन॥ करा
पूजन चंडिकेचें॥२४॥ पूजा घेऊन ते वेळां॥ एकलें च जावें देउळा॥ नवस पाहिजे पुरविला॥ मग साडे होतील॥२५
अवश्य ह्मणोनि त्वरित॥ एकला च चंद्रहास आंधारांत॥ नगराबाहेर जात॥ चंडिकेलागी पूजावया॥१२६॥ तों
नगराबाहेर भयाभीत॥ मदन आला भारें सहित॥ चंद्रहासास देखोन ह्मणत॥ एकलें च कोठें जातां॥२७॥ आ
ह्मावरी कोपला नृपनाथ॥ तुह्मास बोलाविलें तेथ॥ येरू ह्मणे अंबा पूजोनि त्वरित॥ मग मी सत्य येईन॥२८॥ म
दन ह्मणे मी जाऊन॥ येतों सत्वर पूजा करून॥ चंद्रहासास गजीं बैसऊन॥ नेलें मिरवत राजसदना॥२९॥ रायें त
त्काळ लाविलें लग्न॥ वरदक्षिणा राज्य दिधलें दान॥ चंद्रहासावरी छत्र धरून॥ कुंतलेश्वर गेला तपातें॥१३०॥

चंपकमालती संगेघेउनी॥ वरातनिघालीतेक्षणीं॥ प्रधानगृहालागोनी॥ येताझालाचंद्रहास॥३१॥ होनवाद्यांचागजर
प्रधानाससांगतीसत्वरहेर॥ आलाचंद्रहासनृपवर॥ चंपकमालतीघेऊनी॥३२॥ ह्मणेप्रधानतयांलागुनी॥ कायरेबो-
लतांअशीवाणी॥ यांच्याजिव्हाटाकाछेदुनी॥ तंववधुवरेंनयनींदेखिलीं॥३३॥ चंद्रहासह्मणेप्रधानासि॥ मजपाठ-
ऊनराजसदनासी॥ मदनगेलाअंबिकेसी॥ पूजावयाकारणें॥३४॥ दुष्टबुद्धीवेगेंधांवत॥ नगराबाहेरआलात्वरित
॥ तयादेखोनभूतेंभयाभीत॥ विटाळत्याचानव्हावा॥३५॥ देवळांतआलाप्रधान॥ तोंछिन्नभिन्नजाहालामदन॥
तेणेंमस्तकआपटून॥ दिधलाप्राणतेथेंचि॥३६॥ इकडेचंद्रहाससाडेकरून॥ दोघीस्त्रियासांगातेंघेऊन॥ राजगृ
हाप्रतियेऊन॥ सिंहासनीबैसला॥३७॥ प्रातःकाळजाहालात्वरित॥ तंवगुरवआलेधांवत॥ ह्मणतीपुत्रासमवे
त॥ प्रधानशिळेवरीपडला॥३८॥ वर्तमानऐकोनिविरस॥ घाबराझालाचंद्रहास॥ टाकीतआलाश्वासोश्वास॥ चंडि
केचादेवालयीं॥३९॥ प्रेतेंदेखोनिबोलत॥ कवणेकेलेंहेजीवघात॥ नगरलोकह्मणत॥ नेणोंनिश्चीतराजेंद्रा॥४०॥
मगकरूनिहवन॥ करीतअंबिकेचेंस्तवन॥ शिवललनाजाहालीप्रसन्न॥ मागवरदानह्मणेतेव्हां॥४१॥ येरूह्मणे
यादोघांतें॥ उठवींआतांजगन्माते॥ तोंनेंनिद्रिस्तापरिअवचितें॥ मदनप्रधानऊठती॥४२॥ वाद्यांचागजरहोत॥ चं
द्रहासेंआणिलेमिरवत॥ तोंचंदनावतीचेदूत॥ वर्तमानसांगती॥४३॥ दुष्टबुद्धीनेंकुलिंदआकळिला॥ सकळसंप
दाहरूनिगेला॥ मगदुष्टबुद्धीघरींबैसविला॥ मदनादिधलाप्रधानपद॥४४॥ मगमातापितासत्वरा॥ चंद्रहासें-
आणिलींकुंतलापुरा॥ वर्षेंतीनशतेंअवधारा॥ राज्यकेलेंस्वरूप॥४५॥ औदार्यधैर्यपरोपकार॥ धर्मरायासम-
गंभीर॥ पराक्रमपुण्यशीळनिर्धार॥ सप्रेमभक्तविश्वासी॥४६॥ इतुक्यालक्षणींमंडित॥ चंद्रहासराजाराज्यकरीत
विषयेसमकरध्वजसुत॥ महापराक्रीजाहला॥४७॥ पद्माक्षनामेंसुंदर॥ चंपकमालतीसझालाकुमर॥ पित्यास
मानबळाढ्यअपार॥ रणपंडीतभक्तदोघे॥४८॥ नगराबाहेरयेऊन॥ मृगयाखेळतांदोघेजण॥ तुह्मादेखतांश्याम

कर्ण॥ घेऊन गेले नकळेचि॥ ४९॥ विद्युल्लता लवोनि जाये॥ तैसे घोडे नेले लवलाहें॥ युद्ध करितां तुह्मां पाहें॥ सर्वथा
तेना टोपती॥ १५०॥ चंद्रहासाची कथा सांगोन॥ नारद पावला अंतर्धान॥ मग बोले विदुर अर्जुन॥ कथा ऐकिली मनो
हर॥ ५१॥ इकडे श्यामकर्ण पाहोन॥ चंद्रहास बोले सुहास्यवदन॥ ह्मणे पुत्र हो ऐका वचन॥ उत्तम एक जाहालें॥ ५२॥
श्रीरंग आणि अर्जुन॥ साक्षात हे नरनारायण॥ त्यांस समोर जाऊन॥ सन्मानें करोनि आणावे॥ ५३॥ श्यामकर्ण देऊन
त्यासि॥ सात्य होऊं धर्मकृत्यासि॥ एसें बोलोनि वेगेसि॥ चंद्रहास निघाला॥ ५४॥ अपार निघाला दळभार॥ चरण
चाली जात नृपवर॥ तों दूर देखोनि यादवेंद्र॥ ब्रह्मानंदें उचंबळला॥ ५५॥ येतां देखोनि चंद्रहास॥ रथाखालीं उत-
रे जगन्निवास॥ पूर्णब्रह्म आदिपुरुष॥ भक्तमानससंतोषक॥ ५६॥ चंद्रहास सप्रेम होऊन॥ श्रीकृष्णास घातलें
लोटांगण॥ तों भगवंतें उचलून॥ हृदयीं धरिला प्रीतीनें॥ ५७॥ सर्व राजे आश्चर्य करिती॥ धन्य या चंद्रहासाची
भक्ति॥ जेणें अकरा दिवसांत जिंकिली क्षिती॥ ऐसा पुरुषार्थ नसे दुजा॥ ५८॥ हरिनें चंद्रहास हृदयीं धरिला॥ सो
डावा हें नवाटे घननीळा॥ जैसा कृपणास ठेवा सांपडला॥ तो न विसंबे जिवेंभावें॥ ५९॥ चंद्रहास धरी हरिचरण॥
आनंदें करी अपार स्तवन॥ ह्मणे धन्य आजि नयन॥ परब्रह्म विलोकिलें॥ ६०॥ पार्थाप्रति मधुसूदन॥ भेटवी चंद्र-
हासालागुन॥ मग बोले अर्जुन॥ दोनी घोडे धरिले कां॥ ६१॥ युद्धास आला उचलून॥ केसें यास द्यावें आलिंगन॥
क्षेत्रधर्म न सांडावा पूर्ण॥ त्वांच पूर्वीं निरोपिलें॥ ६२॥ हरि ह्मणे पार्थास॥ हा न व्हे केवळ मनुष्य॥ देवांहून विशेष॥
स्वरूप याचें जाण तूं॥ ६३॥ ऐसें मदनतातें बोलोन॥ करविलें दोघांस आलिंगन॥ मग सर्वही राजे येऊन॥ अनुक्र-
में भेटले॥ ६४॥ कृष्णासमवेत अर्जुन॥ तेणें राहविला सप्त दिन॥ अपार संपत्ती आणून॥ कृष्णापुढें समर्पिल्या॥
६५॥ चंद्रहासास ह्मणे नारायण॥ चला संगें घेऊनि श्यामकर्ण॥ धर्मरायास भेटून॥ यज्ञ समाप्त करूं त्याचा॥ ६६॥
पद्माक्ष मकरध्वज बोलावून॥ चंद्रहास बोले सुहास्यवदन॥ द्यारे श्यामकर्ण आणून॥ मग ते वचन बोलती॥ ६७॥

आलाअसे[illegible]रतीवीर॥पूर्वीकौरवमारिलेसमग्र॥हस्तलाघवपाहूंक्षणभर॥मगदेऊंवारूजी॥६८॥चंद्रहासबो
लेवचन॥हरिवचनादीजेमान॥मगआणूनिश्यामकर्ण॥हरिपुढेंसमर्पिलें॥६९॥अपारत्वभूसहजाण॥सात्यदि-
धलेदोघेनंदन॥चंद्रहासासिराहाऊन॥कृष्णार्जुननिघाले॥७०॥ब्रह्मानंदह्मणेश्रीधर॥सोडूनचंद्रहासाचेंनगर॥
दोनीवारूसत्वर॥चालिलेपुढेंएकांतें॥७१॥पुढेंलागलेंमेदिनीवसन॥श्यामकर्णधांवतीवरून॥सेनानचालेतेथू-
न॥तीरींसर्वखोळंबले॥७२॥मगबोलेरमानाथ॥मींआणिप्रद्युम्नपार्थ॥हंसकेतमयूरकेत॥पांचांचेरथचाल-
तीयेथें॥७३॥उदकावरूनसत्वर॥गेलेपांचान्वेंरहंवर॥तोंबेटावरीवटवृक्षथोर॥देखतेजाहालेतेधवां॥७४॥तों
एकवटपत्रावरीजाण॥बैसलाएकतपोधन॥तोंबकदाल्भ्यमहाराजपूर्ण॥तपकरीतदेखिला॥७५॥एकपत्रा-
चीवरीसाउली॥एकपत्राचेंआसनतळीं॥सर्वहीदेखोनितयेवेळीं॥नमितीभावेंतपोधना॥७६॥बकदाल्भ्यह्मणे
पार्था॥परब्रह्मघरींअसतां॥कांरेयागमांडिलावृथा॥आटाआटीव्यर्थकां॥७७॥ज्याचेंघेतांआवडीनाम॥सकळ-
पापेंहोतीभस्म॥तोहाश्रीकृष्णपरब्रह्म॥घरींअसतांनेणातुह्मीं॥७८॥पार्थह्मणेतेसमयीं॥स्वामीआश्रमकेला
नाहीं॥तोह्मणेनलगेकांहीं॥दारापुत्रआणिगृह॥७९॥क्षणेंआयुष्य संसार॥मरीचिजलवतभासमात्र॥तेथेंगुं-
तोनीराहातीजेनर॥तेपडतीदुःखार्णवीं॥८०॥पार्थह्मणेतयास॥तुह्मासजाहालेकितीदिवस॥बकदाल्भ्यह्म
णेपार्थापरिस॥संख्यामजनसांपडे॥८१॥मार्कंडेयलोमेशभले॥कितीवेळमेलेउपजले॥द्विदशब्रह्मदेवजाहा
ले॥मजदेखतांजाणपार्था॥८२॥अवघीजलमयसृष्टीहोत॥तेव्हांवटपत्रींएकबाळकनिजत॥रुदनकरीसवेंच-
हांसत॥देखिलेंबहुतवेळम्यां॥८३॥तोबाळह्मणसीकोण॥तरिपार्थाहाश्रीकृष्णजाण॥तोत्वांकेलाआपणाधी
न॥पंडूनंदनधन्यतुह्मी॥८४॥माझेंआयुष्यक्षणीकसाचार॥ह्मणोननकरीमंदमृत्तिकाघर॥जलबुद्बुदन्यायेंशरी
र॥पडेलकेव्हांनकळेचि॥८५॥कमलिनीपत्रावरीलजल॥केव्हांजाईलनकळेचपळ॥तैसाजगदाभासकेवळ॥

मिथ्यामयलटिकाचि॥८६॥जेजेंदिसेतेतेंनाशिवंत॥कृष्णस्वरूपएकशाश्वत॥ऐसेंबोलोनसद्गदित॥बकदा-
ल्भ्यजाहाला॥८७॥ह्मणेकृष्णाक्षेमदेमजलागोन॥हरिनेंहृदयींधरिलातपोधन॥जैसेंक्षीराब्धीनेंदिधलेंआलिं
गन॥आपुलियालहरियांप्रति॥८८॥हरिह्मणेतपोधना॥चालजाऊंधर्मदर्शना॥येरूह्मणेनववचना॥अवश्ययें
ईनआतांचि॥८९॥बकदाल्भ्यह्मणेंपार्थाजाण॥मजब्रह्माआलाह्मावयाप्रसन्न॥मनींगर्वअत्यंतधरून॥ह्मणे
मजमागकांहीं॥९०॥तंवदोघेहीउडालों॥आणिकेब्रह्मांडांतपडलों॥मायामोहेंभुललों॥लोकपुसतीआह्मातें॥
॥९१॥ह्मणतीतुह्मींकोणतत्वता॥ब्रह्माह्मणेमीविश्वकर्ता॥तंवतेह्मणतीमरशीआतां॥जीवमीहेंह्मणवीतूं॥९२
येथेंआठमुखीब्रह्मदेवजाण॥तूंजयेथेंलेखितीकोण॥तंवतेआह्मीअवघेचउडोन॥गेलोतिसरेब्रह्मांडीं॥९३॥
तेथेंषोडशमुखीब्रह्मापाहीं॥तेथूनउडालोंसर्वही॥तोंबत्तीसमुखाचाविधितोही॥आणीकब्रह्मांडींदेखिला॥९४
एवंसहस्रमुखाचाब्रह्मा॥तेथवरीपाहिलीसीमा॥मगचिंतूनब्रह्मानंदसौख्यधामा॥निजस्थानापातलों॥९५॥
तेयाकृष्णाचीमायागहन॥सुभद्रापतीसत्यजाण॥सर्वांचेगर्वगेलेहरोन॥कृष्णचरणवंदिती॥९६॥असोबकदा
ल्भ्यतेवेळा॥शिबिकेमाजीबैसविला॥दळभारमाघारापरतला॥श्यामकर्णासमवेत॥९७॥जयद्रथाचेराज्या
वरून॥वेगेंचालिलावीरअर्जुन॥तेथेंदुर्योधनाचीभगिनीजाण॥दुःशीलानामेंपुत्रतियेचा॥९८॥तोभयाभीतते
वेळां॥पार्थभयेंमूर्छितपडला॥शरणआलीदुःशीला॥कृष्णार्जुनासतेवेळे॥९९॥ह्मणेतूंबंधूमाझावेल्हाळ॥ए
कुलतेंएकमाझेंबाळ॥जयद्रथाचेंअन्यायसकळ॥आठऊनभयपावला॥१००॥मगपार्थेंउदोनिलखरित॥हृदयीं
धरिलातोभगिनीसुत॥सहस्रहस्तीद्रव्यअपरिमित॥भगिनीप्रतिदीधलें॥१॥यागपाहावयातेवेळीं॥प्रीतीनेंदो
घेंघेनलीं॥गांधारीधृतराष्ट्रवृद्धझाली॥भेटनीलतयानें॥२॥असिपत्रव्रतेंकरून॥धर्मराजाबहूतक्षीण॥याला
गींसर्वदेशजिंकून॥उभयकृष्णपरतले॥३॥बहूतदेशींच्यासंपत्ती॥घेऊनियांसुभद्रापती॥नानादेशींचेमनुष्य॰

चालती॥भद्रमाथांघेऊनियां॥४॥गजपुरासमीपआलेभार॥सवेंपृथ्वीचेसकळनृपवर॥रथारूढहोऊनिश्रीधर॥गे
लाआधीधर्मापाशीं॥५॥तोंभागीरथीतीरींमंडपांत॥धर्मराजबैसलाव्रतस्थ॥तोंरथारूढरुक्मिणीकांत॥एकाए
कींदेखिला॥६॥धरिह्मणेहस्तउभारून॥विजयआलाविजयहोऊन॥पृथ्वीचेभूभुजघेऊन॥धर्मानुजभेटेआला॥७
आनंदोनिधर्मधांवत॥हृदयींधरिलाद्वारकानाथ॥सहस्रभुजाफुटत॥आनंदातेंतेधवां॥८॥भीमनकुळसहदेव॥
इहींवंदिलारमाधव॥जाहालेंवर्तमानसर्व॥धर्माप्रतिहरिसांगे॥९॥गेलेयादिवसापासोन॥जेंजेंजाहालेंवर्तमान॥सं
कळरायांचींनामेंघेऊन॥चरित्रेंसर्वकथियेलीं॥१०॥आश्चर्यकरीयुधिष्ठिर॥तूंपाठीराखाअसतांश्रीधर॥कोणीएक
संकटविचार॥उणेंपडोंनदेशी॥११॥याशरीराच्यापादुकाकरून॥तुझेपायींलेववील्यापूर्ण॥तरिआह्मीनहोंउत्तीर्ण॥
अनंतजन्मेंगोपाळा॥१२॥द्रौपदीसुभद्राकुंती॥सर्वांसभेटलावैकुंठपती॥रुक्मिणीआदिसर्वयुवती॥षोडशसह-
स्त्रभेटल्या॥सत्यभामाह्मणेमुरारी॥कुब्जेऐशाबहूतनारी॥कितेकभोगिल्यासुंदरी॥ऐकतांकेंसारीहांसत॥१४॥
तुह्मासकोणीप्रार्थिना॥मगतीचसारिखेंतुह्मींहोनां॥लाहानथोरकृष्णनाथा॥समानतुह्मांससर्वही॥१५॥तोंजय-
वाद्येंवाजविती॥नगरासमीपआलापार्थ॥कृष्णभीमनकुळादिसमस्त॥सामोरेजातगजरेंसिं॥१६॥नानापरींचेंउ-
त्साहकरिती॥दोनीघोडेघेऊनपार्थ॥धर्मरायासभेटत॥नाहींअंतआनंदा॥१७॥गजारूढहोऊनिकुमरी॥मुक्ताफळें
वर्षतीपार्थावरी॥रत्नदीपघेऊनिनारी॥ओंवाळितीकृष्णार्जुना॥१८॥नानासुगंधजानघेउनी॥उधळितीगोपुराव
रूनी॥जाळियांतूनसर्वकामिनी॥विलोकितीसोहळाते॥१९॥यशोदादेवकीकुंतीगांधारी॥द्रौपदीसुभद्राचित्रां-
गीसुंदरी॥उलुपीप्रमादिप्रमिळादिनारी॥पाहोनमुक्तेंवर्षती॥२०॥समागमेंजेजेराजेआले॥तेपार्थेंधर्मासभेटवि-
ले॥बकदाल्भ्यासिवंदिलें॥धर्मरायेंतेधवां॥२१॥बभ्रुवाहनवृषकेत॥मेघवर्णघटोत्कचसुत॥तिघेयेऊनअंतः
पुरांत॥सर्वमातांसवंदिती॥२२॥सर्वहीराजेप्रीती॥धृतराष्ट्रासवंदिती॥विदुराप्रतिआलिंगिती॥मगनमितीदृ

द्दुस्त्रिया॥२३॥आतांयावरीयाग॥होईलसर्वप्रकारेंसांग॥तेप्राकृतभाषेंतपांडुरंग॥बोलवील ब्रह्मानंदें॥२४॥
हेंअश्वमेधपर्व॥अष्टादशांमाजीअतिअपूर्व॥श्रवणकरोतपंडीतसर्व॥अतिआदरेंकरोनियां॥२५॥श्रीधरवरदापां
डुरंगा॥क्षीराब्धिजाहृदयारविंदभृंगा॥नीलजीमूतवर्णकोमलांगा॥वंद्यत्रिजगातूंएक॥२६॥स्फुरसपांडवप्रताप॰
ग्रंथ॥अश्वमेधपर्वजयमिनीकृत्य॥त्यांतीलसारांशयथार्थ॥बासष्टाव्यांतकथियेल्या॥२७॥ ओंव्या २२७॥ ॥
॥श्रीकृष्णार्पणमस्तु॥ ॥छ॥ ॥छ॥ ॥छ॥ ॥छ॥ ॥

श्रीगणेशायनमः॥ श्रीसरस्वत्यैनमः॥ दिग्विजयकरून॥ परतोनआलाफाल्गुन॥ सकळराजेदोनीश्यामकर्ण॥ धर्मराया भेटविले॥ १॥ भूमीशकट्टरवणोन॥ साधिलेंयज्ञमंडपप्रमाण॥ साडेतीनहातांचीष्टष्ठीजाण॥ चारशेंमोजिल्याचतुरस्त्र॥ २॥ जेथेंव्यासविधीसांगणार॥ तेथेंकांहींचनपडेअंतर॥ विटबंधवेदिकासुंदर॥ प्रमाणयथोक्तयोग्यकेली॥ ३॥ मंडपाचीअष्टद्वारें॥ अष्टध्वजअष्टकुंडपरिकरें॥ दशविधदर्भसर्वयज्ञपात्रें॥ यथाशास्त्रनिर्मिलीं॥ ४॥ सोमवल्लीउलूखलमुसल॥ एवंसर्वसामग्रीनिर्मळ॥ जगद्गुरूत्यासदयाळ॥ आचार्यमुख्यजाहला॥ ५॥ पितामहबकदाल्भ्यकेला॥ वीससहस्त्रब्राह्मणाचामेळा॥ येकसंवत्सरजाहला॥ जपासधर्मराजेंघातले॥ ६॥ भीमआणिपार्थ॥ हेयज्ञरक्षकझालेयेथ॥ कार्यवारिलियासमस्त॥ जेथींचेंतेथेंठाईठाई॥ ७॥ मगशृंगाचेदंडशोभोन॥ धर्माचेहातींसदांजाण॥ मृगाजीनप्रावर्ण॥ नाहींभाषणइतरांसीं॥ ८॥ बोलिलेसत्यवतीसूत॥ उदकआणावयादंपत्य॥ चौसष्टीसिद्धकरावींयेथ॥ अतिउत्तमनिवडुनी॥ ९॥ शिरींसुवर्णकलशघेती॥ निघालींवसिष्ठअरुंधती॥ पल्लवींगांठीदेऊनप्रीती॥ अत्रिअनुसया चालिलींहो॥ १०॥ रुक्मिणीआणिश्रीकृष्ण॥ मिरवतचालिलींशोभायमान॥ रतिआणिप्रद्युम्न॥ अनिरुद्धउखाउभयतां॥ ११॥ वृषकेतआणिप्रभावति॥ युवनाश्वआणिवेदावती॥ बभ्रुवाहनस्त्रीरूपवती॥ जातीकलशघेउनी॥ १२॥ पदरींदिधल्यादंपत्यग्रंथी॥ पुढेंचतुर्विधवाद्येंगर्जती॥ वसुदेवदेवकीसती॥ तिघींनिघतीमिरवत॥ १३॥ सत्यभामेचे सदनीं॥ प्रवेशोनसांगेनारदमुनी॥ सर्वरायांदेखतरुक्मिणी॥ विशेषमानघेतसे॥ १४॥ पदरींदेऊनग्रंथी॥ सुख्यदोघें मिरवती॥ सकळउपचारसमर्पिती॥ शिरींछत्रविराजतसे॥ तुजटाकूनजगन्मोहन॥ गेलातीससंगेंघेउन॥ सत्यभामाबोलेहांसोन॥ घरांतश्रीकृष्णआहेकीं॥ १६॥ घरांतगेलानारदमुनी॥ तोमंचकींपहुडलामोक्षदानी॥ ह्मणेसभेसहोतचक्रपा[illegible]दकासरुक्मिणीसहितगेला॥ १७॥ रुक्मिणीसींसोडून॥ पहुडसीयेथेंयेऊन॥ सत्यभामाह्मणेग्रंथी बांधोन॥ उठ[illegible]जाऊंआह्मींआतां॥ १८॥ जांबुवतीच्याघरांत॥ नारदमुनीप्रवेशत॥ तीसहींतेंसेंचसांगत॥ नमानीच-

